ग्रंथसंपादक व प्रसारक मंडळीची ग्रंथमाला.
ग्रंथ १९ वा.

# हिंदुस्थानची राजनीति.

लेखक
कै. रा. रा. मुकुंद बाळकृष्ण गुर्जर, बी. ए. व
रा. रा. श्रीकृष्ण निळकंठ चापेकर, बी. ए.

प्रकाशक
दामोदर सांवळाराम आणि मंडळी,
बडोदें व मुंबई.

सन १९०१.



मुंबई; 'इंदुप्रकाश' छापखाना.

किंमत दीड रुपया.

कै. न्या. महादेव गोविंद रानडे.

जन्म
सन १८४२.

मृत्यु
ता० १६-१-०१.

कैलासवासी

## न्या. महादेव गोविंद रानडे,

एम्. ए., एल एल. बी., सी. आय. ई.



यांस,

त्यांची स्वदेशोन्नतीविषयीं कळकळ, मराठी भाषेच्या उत्कर्षार्थ त्यांचे अगणित श्रम, आणि या मंडळीस त्यांनीं वेळोवेळीं दिलेलें प्रोत्साहन, इत्यादि गुणांच्या स्मरणार्थ, हा त्यांच्या आवडत्या विषयाचा ग्रंथ, प्रकाशकांनीं अत्यादरपूर्वक अर्पण केला आहे.

---

सन १९०१.

# अनुक्रमणिका.

---:o:---

# भूमिका.

सत्यानृता च परुषा प्रियवादिनी च ।
हिंस्रा दयालुरपि चार्थपरा वदान्या ॥
नित्यव्यया प्रचुरनित्यधनागमा च ।
वेश्याङ्गनेव नृपनीतिरनेकरूपा ॥

भर्तृहरि

बडोदें येथें ग्रंथसंपादक मंडळीची स्थापना होऊन सहा वर्षें झालीं. या अवधींत तिचे उद्योगी व दिलदार सेक्रेटरी रा. सा. शंकर मोरो रानडे व रा. रा. दामोदर सांवळाराम यंदे यांच्या अव्याहत खटपटीनें विविध विषयांवर अनेक प्रकारचे १८ ग्रंथ आजपर्यंत प्रसिद्ध झाले.ही मंडळी प्रथमतः कांहीं विवक्षित लोकांच्या हिमतीवर स्थापन झाली, व हल्लीं बहुतेक लोकाश्रयावरच चालू आहे. तथापि या मंडळीचें जनकत्व परंपरेनें हल्लींचे गायकवाड श्रीमंत महाराज सयाजीराव यांस दिलें पाहिजे. इंग्रजी भाषेंतील चांगले चांगले ग्रंथांचीं भाषांतरें देशी भाषेंत करविण्याची कल्पना व उपक्रम बडोदें येथें प्रथम श्री. महाराजांनींच १०–११ वर्षांपूर्वीं केला; व सुमारें अडीच लाख रुपये खर्चून Story of the Nations नांवाच्या इतिहासमालेंतील पुष्कळ पुस्तकांची व इतर कांहीं मान्य ग्रंथांचीं मराठी भाषांतरें त्यांनीं तरुण सुशिक्षित लोकांकडून करवून प्रसिद्धही करविलीं. पुढें कलाभुवनचे प्रिन्सिपाल प्रो. गज्जर यांचे देखरेखीखालीं **ज्ञानमंजुषा** या नांवानें मराठी व गुजराथी शास्त्रीय ग्रंथमाला व एक प्रचंड देशी कोष करण्याकरितां मोठी रक्कम देऊन थोडाबहुत उपक्रमही झाला; परंतु दुर्दैवानें तें काम मध्येंच बंद पडलें. या प्रयत्नास कांहीं व्यवस्थित रूप देऊन चांगल्या विद्वान् लोकांच्या देखरेखीखालीं कायमची ग्रंथमाला चालू ठेवण्याची एके वेळीं श्री. महाराजांची फार इच्छा होती; परंतु

अनेक अडचणींमुळें तसें घडून आलें नाहीं. तेव्हांपासून स्वतः नवीन ग्रंथ करविण्यापेक्षां आयत्या प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांसच मदत करण्याचा मार्ग महाराज साहेबांनीं विशेष रीतीनें स्वीकारिला. व एका दृष्टीनें हा मार्ग अधिक बरा दिसतो; कारण ग्रंथांची व विषयांची निवड करणें, तयार झालेल्या ग्रंथांचें परीक्षण करणें, वगैरे कामें जितकीं स्वतंत्र रीतीनें व तज्ज्ञ लोकांचे हातून होतील तितकीं अधीक चांगलीं वठत असल्यामुळें अधिकारीवर्गानें होतां होईल तों प्रवर्त्तक होण्यापेक्षां उत्तेजक होणें श्रेयस्कर आहे. तथापि श्रीमंत महाराजांनीं घालून दिलेल्या उदाहरणानें दुसऱ्या कित्येक गृहस्थांस प्रोत्साहन मिळून त्यांनीं ग्रंथप्रकाशनाचें काम अधिक व्यवस्थेनें चालविण्याच्या हेतूनें ग्रंथसंपादक मंडळींची बडोदें येथें स्थापना केली; व तिला सयाजीविजय छापखान्याची चांगली जोड मिळाल्यामुळें काम लगेच सुरू होऊन आजपर्यंत अबाधित चाललें आहे. अजून मंडळीला यावा तितका व्यवस्थितपणा आला नाहीं, व पुस्तकांची व लेखकांची निवड, ग्रंथांचें परीक्षण, वगैरे संबंधानेंही अजून पुष्कळ सुधारणा करण्यासारख्या आहेत; तथापि जसजसा लोकाश्रय मिळेल व अनुभव वाढेल, तसतशा नव्या सुधारणा करण्यासही प्रवर्तकांस उमेद येईल यांत शंका नाहीं.

## मूळ ग्रंथ

मराठी भाषेंत अनेक विषयांवर चांगल्या दर्जाचे भाषांतररूप किंवा स्वकृत नवीन ग्रंथ होऊन भाषेची अभिवृद्धि व्हावी, व उत्कृष्ट ज्ञानाचा घरोघरीं फैलाव करावा हा या मंडळीचा मुख्य हेतु आहे; व त्याला अनुसरून ग्रंथ निवडतांना वैचित्र्य, उपयुक्तता आणि मनोरंजकता या तिन्ही गुणांकडे विशेष लक्ष दिलें जातें. प्रस्तुत “ Indian Politics ” अथवा “ राजनीति ” या ग्रंथाचें मराठी भाषेंत रूपांतर करण्याचा उद्देश तरी असाच आहे. राष्ट्रीय सभेच्या मंडपांत ज्या विषयांची प्राधान्यानें चर्चा होते त्यांची सामान्य लोकांस ओळख करून द्यावी आणि कांहीं महत्वाचे राज-

कीय विषयावरील निवडक व पुढारी मानल्या जाणाऱ्या गृहस्थांचे विचार सर्वांस सुलभ करून देऊन लोकमतास योग्य वळण लावावें हा हेतु प्रस्तुत ग्रंथानें बराच साध्य होणार आहे. उमेशचंद्र बानर्जी, अर्डले नार्टन, दादाभाई नौरोजी, रमेशचंद्र दत्त, सुब्रह्मण्य अय्यर वगैरे राष्ट्रभक्तांची, राष्ट्रीयसभेची वारी करणारांस किंवा त्यांचीं भाषणें व लेख इंग्रजींत वाचणारांस ओळख झाली असेल; पण निवळ मराठी वाचकांस या व्यक्ति नाममात्र आहेत. फार झालें तर त्यांचीं भाषणें सारांशरूपानें वर्तमानपत्रांत वाचलेलीं असतील; पण कोणीही आयते वेळेस सभास्थानीं उठून दहापांच मिनिटें केलेलें भाषण, व घरीं स्वस्थपणें विचार करून एकाद्या गहन विषयावर लिहिलेला लेख यांत पुष्कळ अंतर असतें. तेव्हां प्रस्तुत ग्रंथांत गोंवलेले लेख फार महत्वाचे व बोधप्रद असून कांहीं अंशानें सर्वांसही अभिनव वाटतील यांत शंका नाहीं. मूळ ग्रंथांतील लेख सर्व प्रचलित राजकीय विषयांवर बहुशः तत्प्रवीण अशा लोकांनींच लिहिलेले आहेत. व जरी मूळ प्रकाशकांनीं केलेली विषयांची निवड व लेखांची जुळणी असावी तितकी व्यापक आणि व्यवस्थित नाहीं, तरी प्रचलित राजकीय विषयांची साधारण वाचकांस माहिती करून देण्यास प्रस्तुत पुस्तक फार उपयोगी होईल यांत संदेह नाहीं. विलायतेंत Pros and Cons, Topics of the Day, Statesman's Year-Book वगैरे प्रचलित सार्वजनिक विषयांसंबंधीं अनेक पुस्तकें वारंवार प्रसिद्ध होतात. तशा प्रकारचें Indian Politics हें हिंदुस्थानांत आजपर्यंत एकच पुस्तक झालें आहे. तेव्हां तें कांहीं अंशीं अपूर्ण आणि सदोष असलें तरी त्याचें अभिनंदन केलें पाहिजे. असल्या पुस्तकापासून जितक्या अधिक लोकांस फायदा करून घेतां येईल तितकें चांगलें असें समजून ग्रंथसंपादक मंडळीनें या ग्रंथाचें मराठी रूपांतर करवून प्रसिद्ध केलें आहे. तें लोकांस आवडल्यास असे प्रचलित राजकीय व सामाजिक विषयांवर स्वतंत्र अथवा भाषांतररूप ग्रंथ आणखी प्रसिद्ध करण्याचा ग्रंथसंपादक मंडळीचा उद्देश आहे.

**प्रस्तुत भाषांतर**

तयार करविण्याचे कामीं प्रकाशकांस बऱ्याच अकल्पित अड-चणी आल्या. मूळ ग्रंथांत लेखकवैचित्र्य केलें आहे तें इष्टच होतें; परंतु भाषांतर एकाच गृहस्थाचे हांतून व एका सरणीनें व्हावें अशी प्रकाशकांची फार इच्छा होती. पण दुर्दैवानें तीन गृहस्थांच्या हातून तें काम पुरें करणें भाग पडल्यामुळें पुस्तकप्रकाशनास विलंब लागून निरनिराळ्या भागांचें भाषांतर भिन्न भिन्न प्रकारचें झालें आहे. प्रथम हें काम कै. मुकुंद बाळकृष्ण गुर्जर बी. ए. यांजकडे सोंपविलें होतें, किंबहुना त्यांनीच आपल्या आवडीनें व मोठ्या हौशीनें या ग्रंथाची निवड केली ह्मटलें तरी चालेल. कै. गुर्जरासारख्या कसलेल्या व उमेदी मराठी लेखकाकडून समग्र भाषांतर पूर्ण झालें असतें, तर मराठींत हा एक नांवाजण्यासारखा ग्रंथ झाला असता; पण दुर्दैवानें सन १९०० सालचे फेब्रुवारी महि-न्यांत रा. गुर्जर कालगतीच्या फेऱ्यांत सांपडून परलोकवासी झाल्या-मुळें भाषांतराचें काम सुमारें $\frac{१}{३}$ होऊन बंद पडलें. पुढील थोडासा भाग रा. रा. रघुनाथ गणेश लिमये यांनीं केला; व बाकी सर्व भाषांतर रा. रा. श्रीकृष्ण नीलकंठ चापेकर बी. ए. यानीं पुरें केलें. कर्तृत्रैविध्यामुळें व मूळांतील कांहीं लेख फार गहन असल्यामुळें प्रस्तुत भाषांतराची भाषा सर्व ठिकाणीं एकसारखी सुबोध व मूळास धरून ठेवतां आली नाहीं. तथापि बहुश: मूळांतील अर्थाचा विपर्यास झालेला नाहीं. ज्या अडचणींतून हें भाषांतर बाहेर पडलें त्यांजकडे लक्ष देऊन क्वचित् कांहीं चुका राहिल्या असल्यास दुसरे आवृत्तींत सुधारल्या जातील असें समजून, वाचक समाधान पावतील अशी प्रकाशकांस पूर्ण उमेद आहे.

## ग्रंथांतील विषय.

मूळ इंग्रजी ग्रंथाचे तीन भाग आहेत. ग्रथम **बाबू उमेशचंद्र बा-नर्जी** यांनीं लिहिलेला लहानसा उपोद्घात असून पुढें पहिले भागांत निरनिराळ्या लेखकांनीं लिहिलेले अकरा लेख आहेत. दुसऱ्या

भागांत पहिल्या तेरा राष्ट्रीय सभांचे अध्यक्षांचीं भाषणें समग्र छापलीं आहेत; व तिसरे भागांत तेराही राष्ट्रीय सभांत पसार झालेले ठराव जसेचे तसेच दिले आहेत. दुसरे व तिसरे भागांतील विषय केवळ कांग्रेससंबंधाचेच असून वर्तमानपत्रद्वारा लोकांचे बरेच परिचयाचे झालेले असल्यामुळें प्रस्तुत भाषांतरांत ते गाळले आहेत. पहिले बारा लेख हाच मूळ ग्रंथाचा मुख्य भाग होय, व तेवढ्याचा भाषांतरांत समावेश केला आहे. सदर्हु लेखांचे विषय पाहिले असतां सर्व प्रचलित असून राष्ट्रीयसभेंत व तदनुषंगानें वर्तमान-पत्रांत आज पंधरा सोळा वर्षें वारंवार चर्चा होते असेच आहेत; व त्यांपैकीं कांहीं तर ४०–५० वर्षें लोकांपुढें आहेत ह्मटलें तरी चालेल. "हिंदुस्थानचें दारिद्य" हा विषय शेट दादाभाई नौरोजी सार्वजनिक कामांत पडूं लागल्यापासून लोकांचे डोळ्यांसमोर आला आहे; व "हिंदुस्थानची सांपत्तिक स्थिति" या विषयावर विचार करण्यास कै. न्यायमूर्ती रानडे यांचीं तरुणपणचीं व्याख्यानें व पुणें सार्वजनिक सभेच्या त्रैमासिकांतील मुद्देसूद निबंध, यांनींच पंचवीस वर्षांपूर्वी लो-कांस शिकविलें ह्मटलें तरी चालेल. 'कायम धाऱ्याची' पद्धति व 'रेलवे प्रसार' या विषयांची वाटाघाट तर त्याचेही पूर्वीपासून चालू आहे. तात्पर्य हे विषय जुने आहेत; तथापि राष्ट्रीयसभेनें त्यांनां नियमित व सर्वगामी रूप देऊन त्यासंबंधानें सर्व हिंदुस्थानांतील सुशिक्षित लोकांचें ऐकमत्य केल्यामुळें एक प्रकारें राष्ट्रीयसभेचा ठसेछाप त्यांजवर बसला आहे. या व इतर मुख्य मुख्य राजकीय प्रश्नांचा अलीकडे राष्ट्रीयसभेच्या विचारक्रमांत अंतर्भाव केला गेल्यामुळें त्यांच्यामध्यें अन्य तऱ्हेनें कितीही वैचित्र्य असलें, तरी हिंदुस्थानच्या राजकीय सुधारणेचे अंगभूत मानले गेलेले प्रश्न ह्मणून त्यांचें साजात्य आहे; व याच दृष्टीनें त्यांपैकीं अकरा विषयांवरील लेखांचा या पुस्त-कांत समावेश केला आहे. एकंदरींत राष्ट्रीय सभेच्या मुख्य मुख्य मागण्या काय आहेत व त्यांचें समर्थन कोणत्या रीतीनें करण्यांत येतें याचें थोडक्यांत व एके ठिकाणीं विवेचन कोणास पहावयाचें असेल तर त्याला हें पुस्तक चांगलें साधन होईल.

## ग्रंथस्वरूप.

वस्तुतः विषयाचें महत्व व व्यापकत्व लक्षांत घेतलें तर मूळ ग्रंथ फारच अपूर्ता ह्मणावा लागतो. त्यांतील अकरा लेखांचें वर्गीकरण व मांडणी संगतवार व विचारपूर्वक केलेली नाहीं. राष्ट्रीय सभेपुढें नेहमीं येणाऱ्या विषयांपैकीं दहा बारा आपल्या आवडीच्या विषयांवर कांहीं राजकीय पुढारी ह्मणविणाऱ्या गृहस्थांनीं लेख लिहिले व ते एकत्र छापून प्रसिद्ध केले, असें साधारणपणें मूळ ग्रंथाचें स्वरूप आहे. "हिंदुस्थानची राजनीति" असें ह्मणण्यापेक्षां "राजकीय लेखसंग्रह" हें नांव या पुस्तकास अधिक अन्वर्थक झालें असतें. तथापि एका दृष्टीनें हें पुस्तक हिंदुस्थानांतील सांप्रतच्या इंग्रजी राजनीतीचें द्योतक आहे असें ह्मणतां येईल. कारण या लेखांत मुख्यत्वेंकरून ब्रिटिश राज्यपद्धतींतील दोष व ते काढून टाकण्यास उपाय सांगितले असल्यामुळें त्यावरून ब्रिटिश अमल सुरू झाल्यापासून या देशांत राज्यपद्धतीचें धोरण कसें चालत आलें आहे त्याचें उत्तम चित्र डोळयांपुढें उभें राहतें. या देशांतील इंग्रजी राजनीतीचा हुबेहुब फोटोग्राफ काढून दाखविणारा हा क्यामेरा अथवा दुर्बीण आहे ह्मटलें तरी चालेल. हिंदुस्थानांतील राजनीतीविषयीं येथील सुशिक्षित लोकांचें काय मत आहे हें पाहणें असल्यास प्रस्तुत पुस्तक वाचावें. हें मत कदाचित् एकदेशी असेल, किंवा थोडेंबहुत चुकलेलेंही असेल; पण ज्यांना ती राजनीति पदोपदीं जाचत आहे अशा समंजस आणि विचारी माणसांचें तें ठाम मत असल्यामुळें त्याचें भावी इतिहासांत मोठें महत्व मानलें जाईल यांत शंका नाहीं. पुढेंमागें एकादा गिबन किंवा कार्लाईल १९ व्या शतकांतील हिंदुस्थानचा इतिहास लिहूं लागेल तर सांप्रतच्या राज्यपद्धतीविषयीं दुसऱ्या समकालीन प्रजाधुरीणांचें काय मत होतें हें पाहण्यास हें पुस्तक फार उपयोगी पडेल. यांतील प्रत्येक विषय व्यापक आणि गहन आहे, व अर्थातच त्याचें दहावीस पानांचें लेखांत केलेलें विवेचन अपुरें व कांहीं ठिकाणीं अगदीं एकदेशी झालें आहे.

पण एका दृष्टीनें हे दोष गुणच आहेत; कारण तेणेंकरून त्या त्या विषयासंबंधानें वाचकांस अधिक विचार करावयाची संवय होणार आहे. एकंदरीनें हें पुस्तक नवीन पिढीला योग्य राजकीय शिक्षण देण्याला चांगलें साधन होईल यांत संशय नाहीं.

## लेखांचें वर्गीकरण

पुस्तकांतील बारा लेखांचें स्थूल मानानें चार वर्ग करतां येतील. ( १ ) हिंदुस्थानांतील लोकांची राजकीय अथवा राष्ट्रीय उन्नति; ( २ ) हिंदुस्थानांतील लोकांचें चारित्र्य व सामान्यतः त्यांचे सांपत्तिक स्थितीविषयीं विचार; ( ३ ) लोकांचें भूमिस्वत्व; आणि ( ४ ) हिंदुस्थानांतील न्यायपद्धति. राजकर्त्यांचा प्रजेशीं जो अनेक प्रकारचा संबंध असतो त्यांचे निदर्शक हे चार वर्ग आहेत असें ह्मणतां येईल. अंमलदार या नात्यानें लोकांवर हुकूम चालविणें, लोकांपासून कराच्या रूपानें द्रव्य ग्रहण करून त्याचा वाटेल तसा विनियोग करणें, भूमीचे श्रेष्ठ मालक या नात्यानें जमिनीचे उत्पन्नाचा हिस्सा मागणें, व लोकांस न्याय देऊन दुष्टांचे शासन व साधुसंतांचें परिपालन करणें; हे चारी अधिकार राजाचे आहेत. ते नीटपणें बजावील तो राजा चांगला, नाहीं तर वाईट, असा सामान्य नियम घालतां येईल. या चार अधिकारांचे प्रदर्शक वरील चार वर्ग होत. याशिवाय दुसरेही कांहीं अधिकार अथवा कर्तव्यकर्मे राजास चिकटलीं असतात. उदाहरणार्थ परकीय देशांतील शत्रूपासून लोकांचें जीवितवित्ताचें रक्षण करणें, लोकांस योग्य शिक्षण देऊन त्यांची धार्मिक, नैतिक व सामाजिक उन्नति करणें, लोकांत विद्याप्रसार करणें, देशांतील व्यापारकलादिकांस उत्तेजन देऊन राष्ट्राची संपत्ति वाढविणें, आपले राष्ट्राची इभ्रत व मानमान्यता जगांत जितकी वाढेल तितकी वाढविण्यास झटणें, व एकंदरींत लोकांमध्यें सुख, उन्नति व प्रेमभाव वृद्धिंगत करणें, हीं कामेंही राजानें केलीं पाहिजेत. परंतु त्यांपैकीं कांहीं या देशांत विधर्मी आणि विदेशी सरकारास करतां येणें अशक्य आहेत, तीं वगळलीं तरी इतर सुसाध्य गोष्टींसंबंधानें इंग्रज सरकार आपलें कर्तव्य नीट बजावीत आहे कीं

नाहीं, याचा अजून राष्ट्रीय सभेमध्यें व्हावा तसा विचार होऊं लागला नाहीं; व प्रस्तुत पुस्तकांत तर तिकडे मुळींच दुर्लक्ष केलें आहे झटलें तरी चालेल. विशेषेंकरून लोकशिक्षणासंबंधानें व धंदेव्यापाराचे वृद्धीविषयीं सरकारचें काय कर्तव्य आहे, याविषयीं एक एक तरी लेख या पुस्तकांत हवा होता. ज्या विषयांवर लेख घातले आहेत ते बहुशः केवळ तात्विक, सामान्य व चिरफलदायी असे असल्यामुळें राष्ट्रीयसभावाल्यांवर जे unpractical झणजे कर्तव्यशून्य व radical झणजे मूलविघाती असें आरोप करण्यांत येतात, त्याला या ग्रंथापासून थोडेंसें पाठबळ मिळण्याचा संभव आहे. फार खोल व व्यापक प्रश्नांत वेळ न घालवितां लहान लहान पण सद्यःफलदायी सुधारणा सुचविण्याचें काम राष्ट्रीय सभेनें किंवा तिच्या शाखांनीं हातीं घेतलें तर अधिक उपयोग होईल, असें पुष्कळ लोकांचें झणणें आहे. तें जरी सर्वांशीं मान्य करितां येणार नाहीं, तरी यांत पुष्कळ ग्राह्यांश आहे हें खरें. Indian Politics सारख्या पुस्तकाचें साधारण स्वरूप कांहीं केलें तरी तात्विकच व्हावयाचें हें उघड आहे. पण या दुसऱ्या बाजूकडे प्रकाशकांनीं अगदींच दुर्लक्ष कराचयाचें नव्हतें. तसेंच राजकीय उन्नतीचे कामीं लोकांनीं काय केलें पाहिजे याविषयीं एकही लेख या ग्रंथांत नाहीं हेंही त्यांत मोठें व्यंग आहे. राजा व प्रजा हीं दोन राष्ट्ररूपी रथाचीं चाकें आहेत. तीं दोन्ही सारख्या वेगानें व एकाच दिशेनें चालल्याशिवाय राष्ट्रिय प्रगति कधींही व्हावयाची नाहीं. सारांश सरकाराच्या कर्तव्यासंबंधानें दहा बारा लेख छापल्यावर लोकांनीं व विशेषेंकरून कांग्रेससारख्या राजकीय संस्थांनीं प्रस्तुतकाळीं काय केलें पाहिजे याविषयीं एक तरी पोक्त व निर्भीड लेख प्रस्तुत ग्रंथांत पाहिजे होता. तेणेंकरून एकदेशीयपणाचा व कर्तत्वशून्यतेचा जो आरोप आमचे पुढाऱ्यांवर हल्लीं येत आहे तो बराच नाहींसा झाला असता. असो.

## वर्ग पहिला.

वर सांगितलेल्या चोहोंपैकीं पहिल्या झणजे "लोकांच्या राष्ट्रिय उन्नतीविषयीं विचार" या वर्गांत चार लेखांचा समावेश होतो. ते

१ उमेशचंद्र बानर्जीकृत "**उपोद्घात,**" अर्डले नार्टनचा "**हिंदुस्थानची राष्ट्रिय सभा,**" रमेशचंद्र दत्त यांचा "**हिंदुस्थानांतील लोकांची सुखाची आशा**" व शिवस्वामी अय्यर यांनीं लिहिलेला "**हिंदुस्थानांतील कायदे करण्याची धोरणें**" हे होत. या चार लेखांत हल्लींची येथील एकंदर राज्यपद्धति कशी आहे व तीमध्यें सुधारणा घडवून आणण्यास लोकांकडून काय प्रयत्न चालले आहेत यांचें निरनिराळ्या दृष्टीनें सामान्य विवेचन केलें आहे. या बाबतींत ठिकठिकाणीं ज्या अनेक प्रकारच्या चळवळी चालू आहेत त्या सर्वांचें एकीकृत स्वरूप राष्ट्रियसभा होय. बानर्जी यांनीं उपोद्घातांत राष्ट्रिय सभेची उत्पत्ति लार्ड डफरीनपासून कशी झाली, व अर्डले नार्टन यानीं पहिले निबंधांत राष्ट्रियसभा हें दुरदर्शी इंग्रजी मुत्सद्यांनीं पेरलेल्या शिक्षणरूपी बीजाचें उत्तम फळ कसें आहे, हें सप्रमाण दाखविलें आहे. तें प्रत्येकानें मनन करण्यासारखें आहे. बानर्जींच्या ह्मणण्याप्रमाणें राष्ट्रियसभेचें जनकत्व लार्ड डफरीन व ह्यूम या आंग्ल मुत्सद्यांकडे आहे. अर्थात् या विदेशकुलोत्पन्न तरूणीचें स्वरूप वर्णन करण्याचें काम **नार्टन** सारख्या इंग्रजी बारिस्टराकडे सोंपविलें हें एक प्रकारें योग्यच झालें. तथापि गैरफायदाही झाला. तेणेंकरून राष्ट्रियसभेची एकच ह्मणजे इंग्रजांना दिसणारी तेवढीच बाजू लोकांपुढें मांडण्यांत आली आहे. ज्याला दुसरी बाजू पहावयाची असेल त्यानें सन १८९५ सालचे पुणें राष्ट्रीय सभेच्या स्वागत मंडळीच्या अध्यक्षाचें भाषण वाचावें. **नार्टन** साहेब आमचे परम हितचिंतक आहेत खरें; पण ते विदेशी असल्यामुळें त्यांचे लेखांत थोडा एकदेशीपणा आला आहे. तो **दत्त** यांचे लेखानें बराच दूर होईल असें वाटतें. राष्ट्रीयसभा ही एक प्रजेचे वतीनें अधिकाऱ्यांचे वर्तनांतील दोष दाखविणारी थोड्या सुशिक्षित लोकांनीं चालविलेली संस्था आहे, असा नार्टन साहेबांच्या लेखावरून जो समज होतो तो सर्वांशीं बरोबर नाहीं. राष्ट्रीयसभेचें महत्व वस्तुतः यापेक्षां अधिक आहे. आपले देशाचे कारभारांत हळुहळु आपला शिरकाव व्हावा ही सर्व एतद्दे·

शीयांची खरी इच्छा सुशिक्षित लोकांनाच फक्त व्यवस्थितपणें व उत्तम भाषेनें प्रदर्शित करतां येते; व ह्मणून ते युक्तिवादाच्या साहाय्यानें ती सरकारापुढें मांडतात. हें काम पूर्वी वर्तमानपत्रांत व अर्जद्वारें होत होतें; तेंच आतां सांवत्सरिक राष्ट्रीयसभेच्या बैठकींत अधिक जोरानें होऊं लागलें आहे. हें सर्व खरें; पण राष्ट्रीयसभेचें मुख्य काम याहून निराळें आहे. तें हें कीं, ठिकठिकाणचे चारपांचशें मुखत्यार एके ठिकाणीं जमून कोणत्याही गहन विषयाचा संथपणें विचार करूं शकतात, तेव्हां प्रनिनिधिद्वारा राज्यकारभार चालविण्याची आमचे लोकांत ताकद आली आहे, असें प्रत्यक्ष उदाहरणानें इंग्रज लोकांस दाखवावयाचें. इंग्रज लोक न्यायप्रिय व प्रगमनशील आहेत. तेव्हां अशा रीतीनें प्रत्यक्ष खात्री करून दिली असतां ते खचित हिंदुस्थानचा राज्यकारभार हळुहळु आपणाकडे सोंपवितील अशी त्यांच्या आजपर्यंतच्या इतिहासावरून, महाराणीचे जाहीरनाम्यावरून व अनेक इंग्रजी मुत्सद्यांचीं अभिवचनें ऐकून येथील सुशिक्षित लोकांची समजूत झाली. व ह्मणूनच त्यांनीं आपले कतृत्वाचें प्रत्यक्ष प्रमाण ह्मणून राष्ट्रीयसभा स्थापन केली. ही सुशिक्षित एतद्देशीयांची स्वाभाविक महत्वकांक्षा विदेशी **नार्टन** साहेबांच्या नीट लक्षांत आली न हीं हें ठीकच आहे. **रमेशचंद्र दत्तांनीं** या मुद्याचें चांगलें विवरण केलें आहे. सरकारापुढें नुसती भीक मागावयाला दरसाल हजार पांचशें लोक एकत्र जमण्याची व लाख दोन लाख रुपये खर्च करण्याची जरूर नाहीं. पण वस्तुतः राष्ट्रीयसभेच्या द्वारें आपली कर्तत्वशक्ति आपणास राज्यकर्त्यांच्या नजरेस आणावयाची आहे हें विसरतां कामा नये. तात्पर्य हे दोन्ही लेख बरोबर घेऊन वाचले असतां राष्ट्रीसभेच्या मूळाशीं खरें तत्व कोणतें आहे तें नीट कळेल.

## वर्ग दुसरा.

दुसरें वर्गांत लेख येतात ते येणेंप्रमाणें:-१ मुधोळकरकृत "**हिंदुस्थानांतील लोकांची सांपत्तिक स्थिति,** २ दादाभाई नौरोजीकृत "**हिंदुस्थान आणि चलनी नाणें,** ३ आलफ्रेड नंदीकृत

“**हिंदुस्थानचें दारिद्र्य** ” ४ परमेश्वरम् पिलेकृत “ **परदेशांत गेलेल्या हिंदुस्थानवासियांची स्थिति,** ” आणि ( ५ ) सुब्रह्मण्य अय्यरकृत “ **हिंदुस्थानांतील रेलवे प्रसार.** ” या पांचही लेखांचा रोख हिंदुस्थानांतील संपत्ति अनेक कारणांनीं उत्तरोत्तर कमी होऊन लोकांचें दारिद्र्य वाढत चाललें आहे व त्याला लवकर इलाज न केल्यास पुढें भयंकर परिणाम होईल हें प्रतिपादन करण्याकडे आहे. सर्व प्रकारच्या राष्ट्रीय उन्नतीचा पाया देशाची सुसंपन्नता होय. दरिद्री पुरुषाचे मनोरथ जसे फुकट, तसेंच दरिद्री राष्ट्रही सर्वतोपरी खालावतच जावयाचें. क्षयी माणसाला किती सुग्रास अन्न घातलें किंवा सुंदर कपडे नेसविले तरी तो पुन्हा धडधाकड होणें नाहीं; तसें राष्ट्रांतील संपत्तिरूप पोषक द्रव्याचा एकदां ऱ्हास होऊं लागला म्हणजे त्या राष्ट्रास फिरून ऊर्जितावस्था येणें कठीण. या दृष्टीनें पाहिलें तर या दुसऱ्या वर्गांतील विषय अत्यंत महत्वाचे आहेत; किंबहुना एकंदर राष्ट्रिय उन्नतीचा तो पायाच आहे म्हटलें तरी चालेल. तेव्हां इतरांपेक्षां त्यांनां प्रस्तुत ग्रंथांत अधिक जागा दिली हेंही रास्तच आहे. रा. **मुधोळकर** यांचा लेख व्यापक असून फार शांतपणें आणि निःपक्षपातबुद्धीनें सर्व बाजूंचा विचार करून लिहिला असल्यामुळें विरुद्धपक्षालाही त्यास नांव ठेवण्यास फारशी जागा मिळणार नाहीं. देशांतील संपत्तीचा ओघ बहिर्मुख झाला, प्राचीन उद्योगधंदे बुडाल्यामुळें त्यांवर निर्वाह करणारे लोक निरुद्योगी झाले, व सरकारच्या जमाबंदीपद्धतीमुळें लोकांचा मुख्य धंदा जो शेतकी तो निकृष्टावस्थेस जात चालला, हीं सांपत्तिक ऱ्हासाचीं मुख्य तीन कारणें आहेत; व त्यांना प्रत्यक्ष किंवा परंपरेनें इंग्रज सरकारची हल्लींची राज्यपद्धतीचें कारण आहे हें रा. **मुधोळकरांनीं** मुद्देसुद व सप्रमाण दाखविलें आहे. आपले सिद्धांतांचे समर्थनार्थ यांनीं सरकारी आंकडे व प्रसिद्ध इंग्रजी मुत्सद्यांचे अभिप्राय दिले आहेत. व एकंदरींत सर्व प्रश्नांचें त्यांनीं फार नेमस्तपणानें समर्थन केलें आहे. **दादाभाई नौरोजी, रमेशचंद्र दत्त, जस्टिस रानडे व विल्यम डिग्बी** यांनीं गेल्यां ३० वर्षांत जे लेख

लिहिले आहेत त्यांचा निष्कर्ष रा. **मुधोळकर** यांचे लेखांत सांपडेल. यासंबधानें जितका मतभेद हल्लीं दृष्टीस पडतो तितका दुसऱ्या कोणत्याही प्रश्नासंबंधानें पडत नाहीं ह्मटलें तरी चालेल. कांहीं वर्षांपूर्वीं हिंदुस्थान देश उत्तरोत्तर दरिद्री होत आहे कीं श्रीमंत होत आहे या विषयींच वाद होता. **दादाभाई नौरोजी** सारखे लोकाग्रणी देशाचें दारिद्र्य वाढत आहे असें प्रतिपादन करीत. उलट सरकारचे पक्षपाती कामदार, देश श्रीमंत होत आहे ह्मणून सांगत. अजूनही या दुसऱ्या बादशाही मताचा प्रतिध्वनि मधून मधून ऐकू येतो; व विशेषतः जेव्हां एकाद्या बड्या अधिकाऱ्यास आपल्या कृत्यांचें मंडण करण्याचा प्रसंग येतो तेव्हां या मताचा नाद बराच जोरानें दुमदुमतो. पण विलायतेंत व येथें हिंदुस्थानचे कैवाऱ्यांच्या ओरडीमुळें ह्मणा किंवा अलीकडे लागोपाठ येणाऱ्या दुष्काळांच्या तीव्र अंजनामुळें ह्मणा, सरकारी अधिकाऱ्यांचे या बाबतींत डोळे उघडूं लागून ते हिंदुस्था देश खरोखरच दरिद्री होत आहे असें थोडें-बहुत कबूल करूं लागले आहेत.* हिंदुस्थानांतील लोकांचें वार्षिक

---

* एकोणिसावे शतकाचे चार चरणांत एकंदर ३१ दुष्काळ पडले त्यांचा तपशील येणें प्रमाणें:—

| | दुष्काळ संख्या. | लोक मेले. |
|---|---|---|
| प्रथम चरण (१८००–१८२५) | ५ | दहा लक्ष. |
| द्वितीय चरण (१८२६–१८५०) | २ | पांच लक्ष. |
| तृतीय चरण (१८५१–१८७५) | ६ | पन्नास लक्ष. |
| चतुर्थ चरण (१८७६–१९००) | १८ | दोन कोटी साठ लक्ष. |
| | ३१ | सुमारें तीन कोटी पंचवीस लक्ष |

शेवटचे पंचवीस वर्षांत दरसाल निदान दहा लक्ष ह्मणजे दर मिनिटास दोन माणसें मेलीं असा अंदाज आहे! ( Digby's Prosperous British India. p. 133. )

उत्पन्न सरासरी २७ होतें तें आतां ३० झालें आहे असें प्रतिपादणारे लार्ड कर्झन साहेबच दुष्काळाचें तोंड दिसल्याबरोबर इंग्लंडांतील श्रीमान् लोकांपुढें येथील लोकांकरितां भीक मागण्यास तयार होतात, व शेतकऱ्यांची सांपत्तिक स्थिति सुधारण्याकरितां निरनिराळ्या व लोकांना अप्रिय प्रांतांत टेनन्सी आक्ट, ल्यांड रेव्हेन्युबिल, वगैरे मूलोच्छेदी कायदे पसार करण्यासही तयार होतात.* यावरून मोठमोठे सरकारी अधिकारीही वरकांती कांहीं बोलले तरी मनांत लोकांचे भावी सांपत्तिक स्थितीविषयीं फार चिंतातूर झाले आहेत हें उघड दिसतें. मातीच्या घागरी जाऊन तांबे पितळेचीं भांडीं आलीं, घरांवर कौलें बसलीं, पंत्या ऐवजी राकेलच्या चिमण्या लागल्या, खटाऱ्या ऐवजी आगगाडींतून लोक प्रवास करूं लागले, परदेशीं उत्तरोत्तर अधिक माल जातो, म्यांचेस्टरचें कापड खपूं लागलें, ही सर्व लोकांच्या वाढत्या श्रीमंतीचीं चिन्हें आहेत असले निरर्गल प्रलाप करणारे लोक आतां कमी झाले आहेत. पुष्कळ सरकारी अधिकारीही देश भिकारी होत चालला आहे व कांहीं तीव्र उपाय जलद न केल्यास पुढें भयंकर परिणाम होईल असें आतां उघडपणें बोलूं लागले आहेत. हें मतांतर एक प्रकारें इष्टच आहे, कारण जसजसें रोगाचें निदान स्पष्ट होत जाईल, तसे उपायही चांगले सुचून रोगी बरा होण्याचा

---

* "The calculations of 1880 showed the average agricultural income at Rs. 18 per head. If I take the figures of the recent census for the same area as was covered by the earlier computation which amount to 223 millions, I find that the agricultural income has actually increased., notwithstanding the growth in the population and an increasingly stationary tendency of that hart of the national income which is derived from agriculture, and that the average per head is Rs. 20 or Rs. 2 higher than in 1880. If I then assume,– I know of no other reason why I should not,–indeed I think it under the estimate–that the non–agricultural income has increased in the same ratio, the average income will be Rs. 30 per head, as against Rs. 27 in 1880. ( Lord Curzon's Speech at Calcutta on 28th March 1901 ).

संभव अधीक आहे. तथापि अजून यासंबंधानें पुष्कळ मतभेद दृष्टीस पडतो. विशेषेंकरून या दारिद्र्याच्या कारणांसंबंधानें राजपक्ष व प्रजापक्ष यांत अत्यंत विरोध आहे. एक ह्मणणार लोक उधळ्ये, सावकार लबाड, व मेघराज कृपण, ह्मणून प्रजा कंगाल होत आहे; व औदार्यशील सरकार त्यांस वांचविण्याची अतोनात खटपट करीत असतें. दुसरा पक्ष ह्मणतो, देशाचें सांपत्तिक शोषण, साऱ्याची लोकांवर सक्ति, प्राचीन उद्योग धंद्यांची अवनति, खर्चिक राज्यपद्धति, हिंदुस्थानचे पैशावर पुष्ट होणाऱ्या अधिकाऱ्यांची खऱ्या लोकहिताचे कामीं कृपणता, व एकंदरींत सापत्नभावाची राजनीति, हीं लोकांच्या दुःखस्थितींची खरीं कारणें आहेत. जोंपर्यंत राज्यकर्ते आणि प्रजा यांजमध्यें जाति, धर्म, विचार, हिताहित वगैरे संबंधीं हल्लींप्रमाणें भेद राहील तोंपर्यंत हा मतविरोधही कायम रहाणार. केवळ शाब्दिकवादानें तो नाहींसा होईल किंवा एक पक्ष दुसऱ्याची पूर्ण खात्री करूं शकेल, हें शक्यच नाहीं. फार झालें तर एकाच्या कांहीं गोष्टी दुसऱ्या पक्षाला कबूल होतील; पण पूर्णपणें एकमत होण्याला दोन्ही पक्षांचें हितैक्यच झालें पाहिजे. हिंदुस्थानांतील लोकांचें हित तेंच आपलें हित, अशी इंग्लंडांतील लोकांचीं मनापासून समजूत झाली नाहीं, तोंपर्यंत वरील विरोध नाहींसा होणें दुरापस्त आहे. ही समजूत कशी होईल; सभा, व्याख्यानें, अर्ज, इत्यादिकांनीं होईल कीं दुसऱ्या कोणत्या चांगल्या उपायांनीं लवकर होईल, हाच वस्तुतः आमच्यापुढें आज मुख्य प्रश्न आहे व तो फार बिकट आहे. तो ज्या दिवशीं नीटपणें सुटेल तेव्हांच हिंदुस्थानच्या भावी राष्ट्रिय उन्नतीस आरंभ झाला असें ह्मणतां येईल.

## दारिद्र्याची सीमा.

हिंदुस्थानदेश उत्तरोत्तर कसा कंगाल होत चालला आहे याविषयीं **विल्यम डिग्बी यांनीं** नुकतेंच लिहून छापलेल्या "Prosperous" British India नांवाचे पुस्तकांत फार उत्तम विवेचन

केलें आहे. डिग्बी साहेबांनीं सरकारी रिपोर्ट व खात्रीलायक आंकडे याजवरूनच हिंदुस्थानांतून संपत्तीचा प्रवाह किती जोरानें देशाबाहेर व विशेषत: इंग्लंदांत जात आहे हें सप्रमाण दाखविलें आहे. सन १८९८-९९ सालीं देशांतून ८,००,८६,४४७ पौंडाचा माल बाहेर गेला व ५,७५,३१,३०३ पौंडाचा आंत आला; ह्मणजे २,२५,५५,१४४ पौंड अथवा ३३,८३,२७,१६० रुपयांचा माल फाजील बाहेर जाऊन त्याचा मोबदला आह्मास बिलकुल मिळाला नाहीं. अर्थात् इतका पैसा एका वर्षांत देशांतून अजीबात बाहेर गेला; अथवा दुसऱ्या तऱ्हेनें सांगावयाचें तर या देशांतील प्रत्येक इसमानें त्या सालीं एक रुपया पेक्षां अधीक खंडणी इंग्लंडास पाठविली. मात्र ही जी फाजील रक्कम दरसाल विलायतेस जाते ती खंडणीच्या रूपानें नसून, व्याज, कमिशन, पगार, पेनशनें वगैरे अनेक अप्रत्यक्ष रूपांनीं जाते. त्यापैकीं "होमचार्जेस" ह्मणजे हिंदुस्थानचे तिजोरींतून सेक्रेटरी आफ स्टेटकडे खर्चाकरितां जाणारी अथवा त्यानें आपणच काढून नेलेली रक्कम सन १८९८-९९ सालीं १,६३,०३,१९७ पौंड होती; व यांत हुंडणावळीचा बटावडा मिळविला ह्मणजे जवळ जवळ २४,४५,७७६५० रुपये होते. दरसाल एवढें द्रव्य ज्या देशांतून अजीबात बाहेर जातें तो देश भिकेस लागल्यावांचून राहील काय? गेल्या ६५ वर्षांचे सरकारी आंकडे घेऊन डिग्बीसाहेबांनीं हिशेब केला आहे तो पाहून तर कोणाचीही छाती दडपून जाईल. सन १८३४ पासून सन १८९९ पर्यंत देशांतून एकंदर २,३३,४१,४७,७३० पौंडाचा माल देशांतून बाहेर गेला, व १,८८,९२,९५,८४० पौंडाचा आंत आला. ह्मणजे ४४,४८,५१,६९० पौंडाचा माल फाजील बाहेर गेला व त्यांत शेंकडा १० टक्के नफा मिळविला तर एकंदर ४८,९३,३६,-८५९ पौंड अथवा सात अब्जावर रुपये देशाचें निव्वळ नुकसान झालें. याशिवाय इतकें द्रव्य बाहेर गेल्यामुळें व्यापार धंद्यास धक्का बसून अप्रत्यक्ष नुकसान झालें तें निराळेंच. गेले एकोणिसावे शतकांत एकंदर संपत्ति देशांतून किती गेली याचा ठोकळ हिशेब केल्यास येणें प्रमाणें होईल:—

| | पौंड |
|---|---|
| सन १८३४ साला पूर्वीचा तोटा एकोत्र्यानें चक्रवाढ व्याजासुद्धां:...... | ७२,३०,००००० |
| दरसाल सरासरीनें पाऊण कोटीचे हिशेबानें पुढील ६५ वर्षांत झालेला तोटा शेंकडा ५ टक्के प्रमाणें चक्रवाढ व्याजा सुद्धां................. | ४,१८,७९,२२,७३२ |
| एकूण पौंड...... | ४,९१,०९,२२,७३२ |
| या व्यापारी तोट्या खेरीज आणखी सरकारी कार्यां करितां दरसाल वीस लक्ष प्रमाणे गेले ६५ वर्षांत इंग्लंडांत गेलेला पैसा, शेंकडा ५ टक्के चक्रवाढ व्याजा सुद्धां:...... | १,०४,४९,८०,६८४ |
| इंग्लंदांत काढलेलें कर्ज शिल्लक आहे तें.................................. | १२,४२,६८,६०५ |
| एकूण पौंड......... | ६,०८,०१,७२,०२१ |

ह्मणजे गेले शंभर वर्षांत निदान सहा अब्ज पौंड अथवा हल्लींच्या भावानें सुमारे एक निखर्व रुपये, ह्मणजे सरासरीनें दरसाल एक अब्ज रुपये एवढा पैसा हिंदुस्थानांतून अजीबात नाहींसा झाला. देश कितीही श्रीमंत असला तरी एवढ्या वित्त शोषणानंतर तो अगदीं निःसत्व होईल यांत नवल काय? हल्लींचे इंग्लंडचे मुख्य प्रधान **लार्ड सालिसबरी** यानीं सन १८७५ सालीं हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी असतांना एकदां गोड शब्दांनीं आपल्या देशबांधवांस उपदेश केला होता कीं, हिंदुस्थान देशाचें रक्तशोषण करावयाचें असेल तर तें फार बेताबातानें केलें पाहिजे. पण एकदां जळवा आंगास चिकटल्यावर त्यांस नेमस्तपणा रहात नाहीं, व सुटतां सुटत नाहीं. **लार्ड सालिसबरी** सारख्या मुत्सद्यानीं हिंदुस्थानचें रक्त शोषावें, पण थोडें थोडें प्यावें असा निर्दय उपदेश बेधडक करावा, हें आमचें दुर्दैव तर खरेंच; पण त्यावरून एकदां

विषयमदानें अंध झालेल्या राष्ट्राची नियत बिघडली ह्मणजे त्यांतील शहाणे पुरुषही कसे वाहवतात ही गोष्टही चांगली प्रत्ययास येते. हल्लींचे स्टेट सेक्रेटरी लार्ड जार्ज हामिल्टन यांना तर हिंदुस्थानांत चोहोंकडे आबादीआबादच दिसतें. ज्या दिवशीं हें अज्ञान व बेफिकिरी इंग्रजी मुत्सद्यांमधून नाहींशी होईल तेव्हांच आमचा भाग्योदय काळ येईल.

## लोकांचें कर्तव्य.

राष्ट्रियसभेमध्यें हिंदुस्थानचे सांपत्तिक स्थितीविषयीं आजपर्यंत जी चर्चा होत आली, ती बहुधा एकदेशीच होती असें ह्मणावें लागतें. ह्मणजे सरकारचे दोष, चुका व कर्तव्यें दाखविण्याकडेच सर्व वक्त्यांचा व लेखकांचा भर असतो. पण या बाबतींत लोकांचेंही कर्तव्य आहे व तें कोणतें, याकडे कोणी अजून फारसें लक्ष दिलेलें दिसत नाहीं. देशांतील संपत्तीचा ओघ विलायतेकडे जातो व त्याला पुष्कळ अंशीं राज्यकर्ते कारण आहेत हें खरें; पण लोकही अगदीं निर्दोषी नाहींत. या परद्वीपगामी संपत्तीपैकीं मोठा भाग परदेशी मालाची किंमत ह्मणून जातो; व त्याला पुष्कळ अंशीं एतद्देशीय व्यापाऱ्यांचें अज्ञान व वरच्या लोकांची विलायती मालाविषयीं आवड हीं कारणें नाहींत असें कोण ह्मणेल ? परदेशाहून येणारा बहुतेक माल साहेब व साहेबी थाटानें रहाणारे नेटिव्ह लोक यांजमध्येंच खपतो; व बाहेर जाणारा कच्चा माल मात्र गरीब लोकांचे तोंडचा काढून नेला जातो. सबब या वित्तऱ्हासाचें अपेश बहुतेक अंशीं सुशिक्षित व श्रीमंत वर्गावरच आहे. तसेंच शेतकरी, कोष्टी वगैरे कारागीर वर्गाचे दुःस्थितीला लोभी सावकार मुळींच कारण नाहींत असें ह्मणतां येणार नाहीं प्राचीन उद्योगधंदे बुडण्यास लोकांमधील अज्ञान, निकसपणा, बेइमानी, हींही पुष्कळ अंशानें कारण झालीं आहेत. सारांश सरकारावर टीका करण्याचे भरांत आपले दोष व आपलीं कर्तव्यें यांकडे अजीबात दुर्लक्ष करणें कोणाही देशहितैषी पुरुषास उचित नाहीं. या बाबतींत जनसमूहाचें निबिड अज्ञान घालविणें

एकंदर सुशिक्षित लोकांचें व विशेषेंकरून राष्ट्रीयसभेंतील पुढाऱ्यांचें कर्तव्य आहे. सामाजिक सुधारणेसंबंधानें परस्परसुधारक बनण्याचा आरोप जसा कित्येक सामाजिक सुधारकांवर लादण्यांत येतो; तसा राजकीय बाबतींत तरी येऊं नये, याविषयीं आमचे राजकीय पुढाऱ्यांनीं खबरदारी घेतली आहे काय ? असा कोणी प्रश्न केल्यास समर्पक उत्तर देणें आजमितीस कठिण पडेल. म्यांचेस्टरच्या गिरणींतून निघालेले झळक कपडे परिधान केलेला एकादा वक्ता कांग्रेसपीठावर उभा राहून विलायतेस पैसे पाठविण्याबद्दल सरकारास शिव्या देऊं लागतो, तेव्हां त्याजविषयीं एकाद्या तिऱ्हाईतास काय वाटत असेल ? राष्ट्रियसभेंत बोलतांना आह्मास आणखी स्वातंत्र्य व अधिकार द्या ह्मणून सरकारास ह्मणणारे लोकाग्रणी परत आपले गांवीं गेल्यावर म्युनिसिपालिटीच्या किंवा लोकलबोर्डाच्या सभेंत कलेक्टरासमोर ब्र काढूं शकत नाहींत; इतकेंच नाहीं, तर पोलीस साहेब, फारेस्ट साहेब, वगैरे अल्पस्वल्प देवतांची खुशामत करण्यांत चूर असतात असें आढळून आल्यास राष्ट्रिय सभेंतील वक्तृत्वाचें सरकारावर वजन कसें पडावें ? तात्पर्य राजकीय, सामाजिक, धार्मिक, कोणत्याही बाबतींत बोलतांना, मागणें मागतांना किंवा ठराव करतांना, त्याला अनुसरून आपलें आचरण आहे काय व नेहमीं तसेंच राहील काय, याचा प्रत्येकानें विचार केला पाहिजे. आमच्या सुशिक्षित लोकांस सध्यां कांहीं शिकावयाचें असेल तर तें हें तत्व होय. **रा. मुधोळकरानीं** आपले लेखाचे शेवटचे पारिग्राफांत या मुद्याचा थोडासा उल्लेख केला आहे. पण एकंदरींत त्यांचा लेख वरील व्यंग्यामुळें अपुरा राहिला आहे असेंच ह्मणावें लागतें. *

---

* या विषयासंबंधानें सविस्तर विवेचन पाहिजे असल्यास डिग्बी साहेबांचे पुस्तकाखेरीज दादाभाई नौरोजी कृत Poverty of India and Un-British Rule, रमेशचंद्र दत्त कृत Famines in India, आणि व्हॉगॅन नॅश कृत The Great Famine हीं पुस्तकें वाचावीं.

## नाण्याचा प्रश्न.

हिंदुस्थानच्या सांपत्तिक स्थितीविषयीं विचार करतांना जे अवांतर प्रश्न उद्भवतात त्यांपैकींच चलनी नाण्याचा प्रश्न होय. शेट दादाभाई नौरोजी यांचा लेख व पुरवणी म्हणून जोडलेला पत्रव्यवहार यांत त्याचें खरें स्वरूप थोडक्यांत मुद्देसूद व सामान्य वाचकांसही सहज समजेल अशा रीतीनें मांडलें आहे. या प्रश्नाला सन १८९३ पासून विशेष महत्व आलें. त्यावेळीं हिंदुस्थान सरकारानें टांकसाळी बंद करून रुपयाची किंमत केली, व पुढें हळुहळु सोन्याचें नाणें चालू केलें, त्यामुळें देशांतील व्यापारास धक्का बसला; गिरण्या वगैरे देशी कारखान्यांस चट्टा लागला; लोकांचे डोक्यावरील कराचें ओझें एकदम दीडपट झालें; चांदी स्वस्त झाल्यानें लोकांत रुपेरी दागदागिन्यांच्या रूपानें केलेल्या संचयाची किंमत एकदम कमी झाली; नाण्याची कृत्रिम किंमत वाढल्यानें जिनसांचे भाव कमी झाले, व त्यामुळें माल उत्पन्न करणाऱ्यांची प्राप्ति कमी झाली; मजुरी उतरली; धंदे किफायतीनें चालत नाहींसे झाले, व त्यामुळें पुष्कळ मजुरांना रोजगार मिळे, तो बंद झाला; पूर्वी हुंडणावळीमुळें देशी मालाला फायदा राहून खप अधिक होई तो बुडाला; म्यांचेस्टरवाले पुढें सरसावले; जपानची चढाओढ मुंबईकर गिरणीवाल्यांस चिनांत असह्य होऊं लागली; नाण्याची भीड अतिशय झाल्यामुळें व्यापार नीट चालत नाहींसा झाला; वगैरे अनेक दुष्परिणाम रुप्याचें नाणें सोनेरी केल्यामुळें झाले; हें दादाभाईंचा लेख लक्षपूर्वक वाचल्यास कोणाचेही लक्षांत येईल. नाहीं म्हणावयाला हिंदुस्थान सरकार, युरोपियन कामगार, विलायती व्यापारी आणि कारखानदार, व उक्ता पगार मिळणारे नोकर लोक, यांचा या नाण्याचे कायद्यापासून थोडाबहुत नफा झाला. पण त्याची, झालेल्या एकंदर लोकांच्या नुकसानीपुढें मातब्बरी काय ? यक्षिणीच्या कांडीप्रमाणें एक छोटासा कायदा घटकेंत पास करून सर्व देशाची स्थिति एकदम बदलून टाकणें हिंदुस्थानसरकारास किती सोपें आहे, हें

नाण्याच्या बाबतींत' चांगलें प्रत्ययास आलें. सोन्याचें नाणें नसून चलन सोन्याचें चालू ठेवणें, अशी विचित्र मूर्खपणाची व परिणामीं घातक स्थिति कोणत्याही स्वतंत्र व स्वहितैकपर देशांत राहूं शकली नसती. पण येथें सर्वच विलक्षण आहे. एक लाख राजकर्ते ३० कोटी विधर्मी लोकांवर अमल करूं शकतात; तर नुसत्या रुप्याच्या तुकड्यांनीं किंवा बिनमोल कागदाच्या कपट्यांनीं लोक संपत्तिवान दिसावे, यांत कांहीं नवल नाहीं. हें काड्यामोड्याचें घर केव्हां तरी ढासळेल, व कदाचित् हिंदुस्थान सरकारास जगापुढें नादार होऊन दिवाळेंही वाजवावें लागेल अशी पुष्कळांनीं इशारत दिली आहे; पण मुत्सदी ह्मणविणाऱ्यांचें लक्षांत ही गोष्ट मुळींच येत नाहींशी दिसते. कागदी रुपये चालू करणाऱ्या महमद तघलखाला वेडा ठरविणारे इंग्रज इतिहासकार हल्लींचे आपले जातभाईचे शहाणपणाबद्दल काय अभिप्राय देतील हें पहाण्यासारखें आहे. पण अनियंत्रित सत्ता, स्वार्थैकपरायणता आणि शहाणपणाची घमेंड या तीन गुणांनीं वेष्टिलेल्या आंग्लो–इंडियन अधिकाऱ्यांस भावी स्थितीबद्दल विचार सुचावा कसा ? केवळ नोकरी करितां २५–३० वर्षें या देशांत मुशाफरी करणाऱ्या कामदारांचे मनांत पुढें मागें देश बुडेल ही भीति काय ह्मणून वागावी ? सारांश हिंदुस्थान देशाचा कारभार हल्लीं किती बेफिकिरपणें हांकला जात आहे याचें उत्तम प्रत्यंतर हा नाण्याचा प्रश्न होय. *

---

* गेले मे महिन्यांत येथील शेट जमशेटजी आर्देशीर वाडिया यांनीं "टाईम्स आफ् इंडिया" पत्रांत कांहीं पत्रें या विषयावर छापलीं, त्यांत या कृत्रिम सोनेरी चलनानें हिंदुस्थानचें किती नुकसान होत आहे, हें उत्तम रीतीनें दाखविलें आहे. नाण्याच्या कायद्यानें कर न वाढवितां आपली वार्षिक शिल्लक वाढली असें हिंदुस्थान सरकारचें ह्मणणें आहे तें अगदीं खोटें आहे हें वाडिया शेटनीं चांगलें दाखविलें आहे. प्रजेपासून १२॥ पेन्सांचे ऐवजीं १६ पेन्स घेऊन सवरून आह्मी जास्त कर घेत नाहीं असें ह्मणणें धाष्टर्य आहे. समजा बाजारांत ४ पेनीला पौंड कापूस विकत असल्यास सरकारांस एक रुपया अथवा १६ पेन्स देण्याकरितां शेतकऱ्याला ४ पौंड कापूस विकला पाहिजे. तोच १२॥ पेन्स देण्याकरितां ३ पौंडांपेक्षां कमी पुरेल. सन १८९९–१९०० सालीं सरकारी

# रेलवे प्रसार.

हिंदुस्थानांतील रेलवेप्रसार प्रथम दर्शनीं लोकांचे फायद्याचाच दिसतो. इंग्रज राज्यकर्त्यांनीं ज्या कित्येक अजब चिजा साता समुद्रापलीकडून आह्मास आणून दिल्या व ज्याबद्दल आह्मीं हरएक प्रसंगीं त्यांचे गोडवे गातों, त्यांमध्यें रेलवे, तारायंत्र हीं गणण्याचा प्रघात पडून गेला आहे. असें असतां रेलवेप्रसार ही वाईट गोष्ट आहे व हिंदुस्थानच्या सांपत्तिक हीनतेचें एक कारण आहे, असें **सुब्रह्मण्य आयर**सारख्या विचारी गृहस्थानें प्रतिपादन करावें हें चमत्कारिक दिसतें. पण जरा विचार केला असतां त्याचा खरेपणा प्रत्ययास येईल. लोकांना इकडून तिकडे जलद प्रवास करण्याची सोय झाली, दळणवळण वाढलें, सर्व प्रांतांचें एकीकरण झालें, व्यापार धंद्याला तेजी आली, मालाचे दर चढले व एकंदरींत लोकांचें सुख व सोय वाढली, हे सर्व फायदे रेलवेमुळें झाले खरे; व त्या बद्दल आपण सर्वांनीं मूळ रेलवेची क्लृप्ति शोधून काढणाराचे व ती येथें चालू करणाऱ्या इंजिनियरांचे आभार मानले पाहिजेत. सध्यां

---

सामानाखेरीज इतर माल ७० कोटी रुपयांचा देशांत आला, व १०८ कोटींचा बाहेर गेला असें रुपयास १६ पेनीच्या दरानें निष्पन्न होतें. तोच ११॥ पेनीच्या दरानें आयात माल ९७ कोटी आणि निर्गत माल १५० कोटी झाला असता. ह्मणजे काय कीं, हा दुसरा दर चालू असता तर आयात मालाबद्दल २७ कोटी रुपये जास्ती आह्मास द्यावे लागले असते, व ते बहुशः युरोपियन आणि श्रीमंत नेटिव्हांचें खिशांतून गेले असते; पण निर्गत मालाबद्दल ४२ कोटी रुपये जास्ती आले असते व ते सर्व शेतकऱ्यांस मिळाले असते. पण एवढ्यानेंच झालें नाहीं. लार्ड कर्झनच्या ह्मणण्याप्रमाणें देशांत दरसाल एकंदर ४५० कोटींचा माल उत्पन्न होतो. त्यांतून बाहेर जाणारा १०८ कोटी, व शेंकडा ९० प्रमाणें शेतकरी वर्गांत खपणारा सुमारें ३०८ कोटी, हा माल वजा केला तर बाकी ३४ कोटी शिल्लक राहतो. तो बाकी शेकडा १० बिनशेतकी वर्गाचे निर्वाहास लागतो. हा माल १६ पेनीचे दरानें विकावा लागत असल्यानें शेतकऱ्यांचा सुमारें १४ कोटी तोटा होतो; व एकंदर नुकसान ५६ कोट होतें. याचे ऐवजीं फायदा काय तो सरकारास हुंडणावळ बचल्यामुळें १० कोटी रुपये विलायतेस कमी पाठवावे लागतात. सारांश ४६ कोटींचा निवळ तोटा दरसाल आह्मास सोसावा लागत आहे.

हिंदुस्थानांत कोणीही देशी विदेशी राज्यकर्ते असते तरी रेलवे ही झालीच असती. त्याबद्दल इंग्रजांना विशेष श्रेय दिलें पाहिजे असें कांहीं नाहीं. पण रेलवेमुळें दुसऱ्या बाजूनें आमचें जें नुकसान होत आहे तें सर्व इंग्रजांचे पदरांत जातें. रेलवे बांधावयाचें इंग्रजी भांडवल; अर्थात् त्यावर मालकीही त्यांचीच. या भांडवलावरील व्याज व नफा सर्व विलायतेस जातो; पण बूड आल्यास सरकारची ग्यारंटी आहे, व ती भरून द्यावयाची लोकांचे पैशांतून. रेलवेचें सर्व सामान विलायतेंत खरेदी होणार व त्यावर नफा, कमिशन वगैरे तिकडेच जावयाचा. हा झाला कंपनीचा फायदा. शिवाय रेलवे झाल्यानें देशांतील धान्य वगैरे कच्चा माल परदेशीं जातो, व येथील लोकांना दुष्काळ. मालाची निमपट पाऊणपट किंमत येते ती जाते सरकारचा सारा आणि सावकाराचें व्याज फेडण्यांत. हिंदुस्थानचे गहूं विलायतेस स्वस्त मिळतात, व येथील लोक अन्नावाचून उपाशी मरतात, हा विलक्षण देखावा रेलवे व आगबोटी यांमुळें दृष्टीस पडतो. हिंदुस्थानांतील रेलवे ह्मणजे येथील हरएक प्रकारचा कच्चा माल विलायतेस नेण्यास मोकळ्या करून ठेवलेल्या वाटा आहेत. भांडवलावरील व्याज व नफा, रेलवे सामानाची किंमत, इंग्रज कामगारांचे पगार, भाड्याचें उत्पन्न व परदेशांत जाणारा सर्व माल, इत्यादि अनेक रूपानें देशांतील पैसा बाहेर घालविणाऱ्या ह्या रक्तवाहिन्याच आहेत ह्मटलें तरी चालेल. ज्या शिरा सुदृढ माणसाचे आंगांत ताजें रक्त खेळवितात त्याच जखमी किंवा रक्तदोषी माणसाला निःसत्व आणि क्षयी करण्यास कारण होतात.

## आगगाड्या-कीं-कालवे.

रेलवे बरी कीं कालवे बरे, ह्मणजे रस्ते बांधावयाचे ते भूमीवर लोखंडी बांधावे कीं जलरूपी बांधावे असा एक वाद आज कित्येक वर्षांपासून चालू आहे. नुकतेच परलोकवासी झालेले मद्रासचे माजी इंजिनियर **सर आर्थर काटन** यांनीं कालवेच जास्ती बांधावे असें कांहीं वर्षांपूर्वीं मोठ्या आग्रहानें प्रतिपादन केलें, व **चेसने** साहेब हे

रेलवेचे पक्षपाती निघाले. कालवे झाल्यानें लोक व माल इकडून तिकडे जाण्यास सोय होऊन शिवाय शेतास पाणी मिळतें व जमीन सुपीक होते; आणि एकादे हंगामी पाऊस पडला नाहीं तरी अडत नाहीं असें कालवेवाल्यांचें ह्मणणें होतें. उलट पक्षीं कालव्यांनीं आसपासची हवा व जमिनी बिघडतात, रेलवेनें फार जलद प्रवास करतां येतो, व्यापार वाढतो, व विशेषतः देशसंरक्षणार्थ सैन्य इकडून तिकडे जलद नेतां येतें असें रेलवेपासून फायदे दाखविण्यांत आले. हा वाद मोठा कडाक्याचा झाला, व अखेरीस रेलवेवाल्यांनां विलायतेंतील भांडवलवाल्यांचें पाठबळ मिळून त्यांचीच सरशी झाली; आणि कालवे मागे पडले. १८७८ च्या व १८९६ च्या फ्यामिन कमिशनानें कालवे अधिक बांधावे ह्मणून भीत भीत सुचविलें. पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. सन १८८३ पासून १८९८ पर्यंत १५ वर्षांत कालव्या पेक्षां रेलवेप्रीत्यर्थ सातपट अधीक तिजोरींतून खर्च झाला, व सहापट भांडवल ओतलें गेलें! तमाम देशाला लोखंडी कांबींनीं जखडून टाकण्याचा क्रम सालोसाल वाढतच चालला आहे. हल्लीचे व्हाईसराय लार्ड कर्झन यांनीं हा प्रश्न यंदा हातीं घेतला आहे. चार पांच वर्षें सतत अवर्षण पडलें तेव्हां कालव्यांचें महत्व वाटूं लागलें. या बाबतींत सरकाराला काय काय करतां येईल हें शोधून काढण्याकरितां हिंदुस्थानसरकारानें नुकतेंक एक फिरतें कमिशन नेमलें आहे; व तें पुरावाही गोळा करूं लागलें आहे. त्यापासून कांहीं फायदा झाल्यास जिल्ह्यानिहाय कांहीं तळीं, विहिरी, कालवे होतील इतकेंच; बाकी तेणेंकरून रेलवेचा प्रसार व त्यापासून होणारे तोटे कमी होतील असा संभव दिसत नाहीं. विलायतेंत पैसा इतका मुबलक झाला आहे कीं, तो कोठें तरी नेऊन ओतलाच पाहिजे; व हिंदुस्थानासारखी सुपीक जमीन हें द्रव्य पेरण्यास दुसरी कोठें मिळणार? ज्या पैशास विलायतेस दोन टक्केही व्याज मिळण्याची मारामार, त्यावर हिंदुस्थान सरकार निदान ३॥ टक्के हमीचें व्याज देतें. मग भांडलवाल्यांच्या उड्या आमच्या या हतभाग्य देशावर कां पडणार नाहींत? येथें रेलवे, तारायंत्रें सुरू केल्याबद्दल इंग्रज राज्यकर्त्यांचे पोवाडे गाणाऱ्यांनीं 'ह्मैस विते ती

पारड्याकरितां, मालकास दूध देण्याकरितां नव्हे' ही ह्मण लक्षांत ठेवली पाहिजे.

## काळा व गोरा.

परदेशांत व विशेषेंकरून दक्षिण आफ्रिकेंत गेलेल्या हिंदुस्थानी लोकांस ज्या हालअपेष्टा भोगाव्या लागतात त्यांचें **परमेश्वरम् पिले** यांनीं आपले लेखांत यथार्थ वर्णन केलें आहे. केपकालनी व नाताळ येथें वसाहत करण्यास गेलेल्या हिंदीलोकांस कसें वागविण्यांत येतें, काळा गोरा यांत किती भेद राखण्यांत येतो, गोऱ्यांनीं बंड करूं ह्मणून धमकी दिलेली चालते; पण काळ्या लोकानां महाराणीचे दगडी पुतळ्या पुढें आपली राजनिष्ठा व्यक्त करण्यासही परवानगी मिळत नाहीं; काळ्यांनीं गांवांत रहावयाचें नाहीं, शाळेंत मुलें पाठवावयाचीं नाहींत, रात्रीं ९ वाजल्यावर हिंडावयाचें नाहीं, परवानगी शिवाय देशांत यावयाचें नाहीं, वगैरे प्रकार दक्षिण आफ्रिकेंत आज मित्तीस चालत आहेत, ते बारिस्टर **गांधी** यांचे उद्योगानें येथील सर्व लोकांस माहीत झालेच आहेत. ट्रान्सव्हाल मधील बोअरलोक काळया हिंदी प्रजेस वाईट रीतीनें वागवितात असें त्या देशाशीं लढाई सुरू करण्याचें एक कारण देणारे इंग्रज मुत्सदी शेजारीं खुद्द इंग्रजी मुलुखांत काय चाललें आहे तें बिलकुल पहात नाहींत. लढाईंत काळया लोकांची सर्व प्रकारें मदत पाहिजे; पण लढाई संपली कीं पुन्हां ते काळे व आपण गोरे. हा भेदभाव जाणून बुजून वागविणारांनीं निदान समदृष्टि व न्यायीपणा यांचा आव तरी घालूं नये. जातीस जात मिळावयाची हा नियम सर्व देशांत, सर्व लोकांत व सर्व काळांत सारखा चालत आला आहे. मग तें राष्ट्र सुधारणेच्या उच्च शिखरावरचें असो, कीं अगदीं रानटी असो. किंबहुना सुधारणेनें हा भेदभाव जास्ती तीक्ष्ण होतो असेंही आढळून येतें.

## परदेशवास.

वस्तुतः अमुक ठिकाणीं जाऊन राहिलेल्या हिंदी लोकांची स्थिति बरी आहे कीं वाईट आहे हा प्रश्न गौण आहे. मुख्य प्रश्न यापेक्षां व्यापक आहे

तो हा कीं, हिंदुस्थानांतील लोकांची हल्लींची विपन्नावस्था अंशतः तरी सुधारण्याला येथील कांहीं लोकांनीं परदेशांत जाऊन वसाहत करणें जरूर आहे कीं नाहीं; या व्यापक प्रश्नाचा विचार **पिले** यांचे लेखांत मुळींच केलेला नाहीं. त्याविषयीं संक्षिप्त पण फार मुद्देसुद आणि कळकळीचें विवेचन पाहिजे असेल तर कै. जस्टिस रानडे यांनीं सन १८९३ सालीं औद्योगिक परिषदेपुढें या विषयावर एक निबंध वाचला तो त्यांचे Essays on Indian Economics या पुस्तकांत छापला आहे तो पहावा. गेले महिन्यांत मि. मलबारी यांचे देखरेखी खालीं East and West नांवाचे मासिक पुस्तकाचा पहिला अंक निघाला आहे. त्यांत **आगाखान** यांनीं एक छोटासा पण सुंदर लेख या विषयावर लिहिला आहे, तोही मनन करण्यासारखा आहे. झांझीबार पलीकडील जर्मन ईस्ट आफ्रिकेंत हिंदी लोकांना वसाहत करण्याला पुष्कळ जागा आहे, व तेथें लोकांनीं जाऊन रहावें असा आगाखान यांचा मोठ्या कळकळीचा उपदेश आहे; व तो त्यांच्या प्रोत्साहनानें त्यांचा मुसलमानी शिष्यवर्ग अमलांत आणील यांत शंका नाहीं. तात्पर्य हिंदुस्थानचें दारिद्र्य घालविण्याला जे उपाय सुचविण्यांत येतात, त्यापैकीं एक प्रधान उपाय कांहीं हिंदी लोकांनीं परदेशांत निरनिराळ्या ठिकाणीं वसाहत करून व पैसा कमावून स्वदेशांत पाठवावा हा आहे. अशा रीतीनें परदेशांत वसाहत केल्यापासून दुसरेही कित्येक फायदे होतील. पण त्यांचा विचार करण्याचें हें स्थल नव्हे. हा उपाय अमलांत आणण्यास मुख्य अडचण येणारी आहे ती **परमेश्वरम् पिले** यांचे लेखांत निर्दिष्ट केली आहे; ह्मणजे त्यात्या प्रदेशांत आधींच जाऊन वसलेल्या बलिष्ठ युरोपियन लोकांचा प्रतिबंध होय. ही अडचण कशी दूर करावी हा मोठाच बिकट प्रश्न आहे. आमच्या कांहीं पुढारी सुशिक्षित लोकांनीं या कामीं कंबर बांधल्याशिवाय या बिकट प्रश्नाचा नीटपणें उलगडा होणें अशक्य आहे.

## जमीन पद्धति.

येथपर्यंत मागें सांगितलेल्या चार वर्गांपैकीं दोहोंचा विचार झाला. तिसऱ्या वर्गांत येणारा ह्मणजे भूमिस्वत्वासंबंधाचा असा एकच लेख प्रस्तुत

प्रथांत आहे. तो मद्रास पाच्छापा कालेजचे माजी प्रिन्सिपाल व हल्लीं बा-रिस्टर झालेले **जॉन आडाम्स** यांचा "हिंदुस्थानची कायम धारेबंदी" हा होय. हिंदुस्थानांत सर्वत्र कायम धारेबंदी असावी अशी राष्ट्रीयसभेची फार वर्षांपासून मागणी आहे, व तिला अनुसरूनच सदर्हु लेख आहे. हिंदुस्थानांतील शेंकडा ८० पेक्षां अधिक लोक शेतकीवर निर्वाह करीत असल्यामुळें जमिनी संबंधाचा प्रश्न अर्थातूच अत्यंत महत्वाचा आहे. किंबहुना हिंदुस्थांनांतील जमाबंदीचा व मुलकी अंमलाचा तो पायाच आहे झटलें तरी चालेल. परंतु कांग्रेस मंडपांत व देशी वर्तमानपत्रांत या प्रश्नाची योग्य चर्चा अजून झाली नाहीं असें मोठ्या दिलगिरीनें ह्मणावें लागतें. कांग्रेसच्या पुढाऱ्यांमध्यें या प्रश्ना-संबंधानें बराच मतभेद आहे. मद्रास इलाख्यांत वार्षिक पाहाणीचा त्रास असल्यामुळें मद्रासकरांना कायम धारेबंदी फार अवश्यक वाटते. मुंबई इलाख्यांतील ३० वर्षांची अथवा एका पिढीचे हयातीची पाहाणी तितकी जाचत नाहीं. राष्ट्रीय सभेच्या वि-षयसभेंत यासंबंधानें नेहमीं वाद होतो. बंगाल, वायव्यप्रांत, औंध व मध्यप्रांत येथें थोडयाबहुत अंशानें कायम धारेबंदी आहेच. इतर ठिकाणींही तीच सुरू करावी ही राष्ट्रीयसभेची मागणी कितपत सयुक्तिक आहे, याचा अजून व्हावा तितका विचार झाला नाहीं. वरचेवर जमाबंदी वाढल्यानें शेतकरी गांजून जातात, साऱ्याचें ओझें वाढतें, लोकांची हुरूप, खटपट, ईर्षा कमी होते व शेतकरी वर्ग अगदीं चेपून जाऊन निकृष्ट दशेला पोंचतो. तेंच जमाबंदी एकदा कायमची ठरून वरील सर्व उत्पन्न शेतकऱ्यास मिळूं लागलें ह्मणजे, तो चांगली मेहनत मशागत करून शेतकीची सुधारणा करील असें कायम धारेबंदी मागणाऱ्यांचें ह्मणणें आहे. उलट पक्षीं जेथें ही पद्धति आज शंभर वर्षें चालू आहे, तेथील शेत-कऱ्यांची स्थिति कितीशी चांगली आहे हें पाहूं गेलें असतां विशेष फरक दिसत नाहीं. बंगाल्यांतील किंवा वायव्य प्रांतांतील जमीनदारी कुळें इतर ठिकाणच्या मिरासदारांपेक्षां अधिक श्रीमंत किंवा सुखी आहेत असें मुळींच नाहीं. इतर ठिकाणीं जो फाजील भाग सरकार

घेतें तो त्या प्रांतांत जमीनदारास मिळतो. मिळून शेतकरी वर्ग कंगाल तो कंगाल. आतां सरकाराकडे गेलेला पैसा लगेच देशांतून बाहेर जातो व जमीनदारांचा येथें रहातो एवढा काय तो फरक. शिवाय जमीनदारासारखा श्रीमंत वर्ग देशांत असल्यानें राष्ट्रांत सकसपणा राहून संकट काळीं लोकांसही मदत होते, असे कायम धारेबंदीपासून दुसरें अवांतर फायदेही आहेत. कायम धारेबंदी बंगाल व वायव्य प्रांतांत विशेष जारी आहे. तेथें व इतर रयतेवरील प्रांतांत दस्ताचें कुल उत्पन्नाशीं काय प्रमाण बसतें तें रमेशचंद्र दत्त यांनीं काढलेले आंकडे येथें दिले आहेत त्यांवरून चांगलें समजेल:—

बंगाल..................शेंकडा टक्के......५ ते ६
वायव्यप्रांत...............................८—४
पंजाब.................................१०--७
मद्रास........................ .....१२ ते ३१
मुंबई ............ .................२० ते ३३

यावरून कायम धाऱ्याचे प्रांतांत लोकांवर बोजा किती कमी असतो हें लक्षांत येईल. मुंबई इलाख्यांत सरकारी कुल उत्पन्नावर दस्त सरासरीनें शेंकडा ७ पासून १० पर्यंत आहे असें सरकारी अधिकारी ह्मणतात;* पण वस्तुतः त्याचें प्रमाण याहून फार अधिक आहे हें सिद्ध करतां येईल. या दृष्टीनें पाहिलें असतां कायम धारेबंदी रयतेस पुष्कळच सुखावह होईल यांत शंका नाहीं.

## कायम धारेबंदींची निरर्थकता.

तथापि या विषयासंबंधानें सुशिक्षित लोकांतही अजून पुष्कळ गैरसमज आहे. विशेषेंकरून कायम धारेबंदी मागणारांचे लक्षांतून दोन महत्वाचे मुद्दे अजीबात गेलेले आहेत. एक राजाला पाहिजे तो कर बसविण्याचा जर अधिकार आहे तर जमिनीची धारेबंदी कायम केली ह्मणून काय झालें? धारेबंदी न वाढवितां दुसरा कर सहज बसवितां येईल. नांव बदललें ह्मणजे

---

* सन १८८५ सालीं बांबे ल्यांड रेव्हेन्यू कोड दुरुस्तीचेवेळीं नामदार पील साहेबांचें कौन्सिलांतील भाषण पहा.

बोजा कमी होतो असें थोडेंच आहे ? असाच प्रकार बंगाल्यांत व वायव्यप्रांतांत हल्लीं सुरू आहे. तेथें चौकीदारी सेस, पटवारी सेस, रोड सेस, वगैरे अनेक तऱ्हेचे किरकोळ कर व पट्ट्या जमाबंदी खेरीज शेतकऱ्यांवर लादल्या आहेत. एकूण बेरीज एकच. अशा दहा वीस पट्ट्यांचा बोजा डोक्यावर बसण्यापेक्षां एकटी जमाबंदीच वाढली तर काय वाईट ? किंबहुना जमाबंदी कांहीं नियमानुसार वाढते, व तिला मर्यादा असते; पण या किरकोळ पट्ट्यांनां धरबंदच नाहीं. दुसरी गोष्ट अशी कीं, मुंबई इलाख्याप्रमाणें जेथें मुदतीची धारेबंदी होते तेथें फार तर एक दोन खेपा ती वाढेल. पण एकदा सीमा झाली ह्मणजे ती कायम झाल्यासारखीच होणार. अलीकडे ज्या तालुक्यांत तिसरी फेर पहाणी झाली, तेथें बहुशः पूर्वीचेच दर कायम झाले, व कित्येक ठिकाणीं तर कमी होत आहेत हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. एकदां दोनदां सर्व जमिनीची हुडसून खडसून पहाणी होऊन गेली ह्मणजे पुढें वाढविण्यास फारच थोडा अवकाश राहील. राष्ट्रीय सभेंत या धारेबंदीच्या प्रश्नाचा खल करणारांचे विचार बहुधा केवळ तात्विक आणि इंग्रजी अर्थशास्त्राचे पुस्तकांतून उसने घेतलेले असतात. त्यामुळें सद्यःस्थिति कशी आहे, इकडे त्यांचें क्वचित्च लक्ष जातें. शिवाय आतां बहुतेक सर्वत्र जमिनीची श्रेष्ठ मालकी सरकारानें आपलेकडे लावून घेतली आहे; व बाकी ठिकाणींही तोच नियम हळुहळु लागू होणार असा रंग आहे. दस्ताचा एक पैसा देणें राहिला तरी सर्व जमीन खालसा करावयाचा अधिकार सरकारास असला, व गहाण विक्रीचा सर्व अधिकार रयतेचा हिरावून घेतला, म्हणजे मग जमाबंदी कायम असली काय, किंवा फिरणारी असली काय, बहुतेक एकच. तात्पर्य शेतकरी वर्गाचे ऱ्हासाला अनियमित जमाबंदी जरी पुष्कळ अंशीं कारण आहे, तरी कायम धारेबंदी केल्यानें त्यांची स्थिति सुधारेलच असा मात्र भरंवसा नाहीं. कोणतेही वस्तूचे नाशाला एक कारण पुरतें, पण नवीन रचना करण्याला सर्व साधनांचा समुच्चय लागतो, हें तत्त्व राष्ट्रोन्नतीचा विचार करणारांनीं कधींही विसरतां कामा नये.

# ब्रिटिश न्यायपद्धति.

बाकी राहिलेल्या चौथ्या वर्गांत अंतर्भूत होणारे असे दोन लेख प्रस्तुत ग्रंथांत आहेतः-( १ ) सोराब पेस्तनजी वाडिया कृत " **हिंदुस्थानांतील ज्यूरीची पद्धति** " व ( २ ) कृष्ण स्वामी अय्यर कृत " **हिंदुस्थानांतील न्याय पद्धति.** " ज्यूरीची पद्धति हिंदुस्थानांत अति प्राचीन काळापासून चालत आली आहे, व जेथें जेथें प्राचीन ग्रामव्यवस्था हल्लीं कायम आहे, तेथें अजूनही ती जुन्या रूपानें दृष्टीस पडते. प्रत्येक खेड्यांतील अथवा जातींतील पंचांनीं मारुतीचे देवळांत किंवा झाडाखालीं जमून लोकांतील तटे बखेड्यांचा निकाल करावयाचा हें तत्व लोकांचे अगदीं आंगवळणीं पडलेलें आहे; इंग्रज सरकारानें नवीन आणलेलें नाहीं. मात्र हल्लींच्या ज्यूरीला पाश्चात्य स्वरूप दिल्यामुळें ती नवीनशी भासते. वाडियांचे लेखांत ज्यूरीपद्धतीची पूर्वपीठिका दिली आहे ती फार बोधप्रद आहे. कांहीं वर्षांपूर्वी बंगालचे लेफटेनेंट गव्हर्नर सर चार्लस् ईलियट, यांनीं ज्यूरीपद्धति बंद करण्याचा घाट घातला होता; त्यावेळेस बरीच चळवळ झाली. व या प्रश्नाचा पुष्कळ काथ्याकूट झाला. ज्यूरीचा हक्क आधीं दिलेला काढून घेण्याचा प्रयत्न झाला तो लोकांच्या चळवळीमुळें निष्फळ होऊन ज्यूरीपद्धति कायम राहिली; तेव्हां एका दृष्टीनें हा हक्क आह्मीं नवीन संपादन केला असें ह्मणण्यास आतां हरकत नाहीं. **कृष्णस्वामीचे** लेखांत हल्लींचे दिवाणी व फौजदारी न्यायपद्धतींतील गुणदोषांचें विवरण चांगलें केलें आहे. त्यांपैकीं एका प्रश्नाला ह्मणजे फौजदारी व मुलकी अधिकार हल्लीं एका कामदाराचे हातीं आहेत ते वेगळे करावे याला राष्ट्रीयसभेंत बरेंच प्राधान्य आलें आहे. कै. मनोमोहन घोस व बाबू रमेशचंद्र दत्त यांनीं त्याचा एकदां पिच्छा पुरविला, पण दुहेरी कामदार नेमण्यास सरकाराजवळ पैसे नाहींत या शुष्क सबबीवर सेक्रेटरी आफ स्टेटनें तो मागें टाकला आहे. वस्तुतः फौजदारी अधिकार काढून घेतले असतां मुलकी अधिकाऱ्यांची किंमत जाईल व लोकांवर दाब

रहाणार नाहीं अशी भीति सरकारास वाटते. अलीकडे दुष्काळाकरितां ह्मणून कित्येक मुनसफांस फौजदारी अधिकार देण्याचा या इलाख्यांत प्रघात सुरू झाला आहे, व त्यापासून मुलकी कामदारांचें काम कमी होऊन लोकांना न्यायही चांगला मिळतो असा अनुभव अाहे. एकंदरींत निःपक्षपाती न्यायपद्धति आमचे देशांत चालू केल्याबद्दल इंग्रज सरकाराचे आह्मीं फार आभारी असलें पाहिजे. खरें बोलावयाचें ह्मणजे जेथें सरकारचा हितसंबंध बिलकुल आड येत नाहीं, तेथें इंग्रजासारखे निःपक्षपाती शांत आणि दयाळु राज्यकर्ते दुसरे मिळावयाचे नाहींत, हें सामान्य तत्व इंग्रजी न्यायपद्धतीचें बुडाशीं आहे. पुष्कळांना तें अजून नीटसें उमजलेलें दिसत नाहीं.

## लोकांची दैना.

**आल्फ्रेड नंदीचा** लेख बहुतेक रा. मुधोळकरांचे लेखाचाच अनुवाद आहे; सबब त्याविषयीं येथें आगखी कांहीं लिहिण्याची जरूर नाहीं. निरनिराळ्या इंग्रजी मुत्सद्यांचे हिंदुस्थानांतील लोकांचे दारिद्र्याविषयींचे विचार एके ठिकाणीं केलेले या लेखांत सांपडतील. पण या सर्व उताऱ्यांपेक्षांही या देशाच्या कंगाल स्थितीची, सन १८९६ व १८९९ सालचे दुष्काळांत सरकारानें लाखो रुपये खर्चून जागोजाग दुष्काळ कामें, व अन्नछत्रें काढलीं असतां, कोटी दोन कोटी, रुपये इंग्लंडाहून व अमेरिकेहून खैरात येथें झाली असतां, व लार्ड कर्झन सारखा दक्ष व्हाइसराय स्वतः झटत असतां, शेंकडों माणसांची, गुरांची उपासमार झाली ही एकच गोष्ट उत्तम निदर्शक आहे. विल्यम डिग्बी यांनीं या विषयावर नुकतेंच “Prosperous British India” नांवाचें उत्तम पुस्तक लिहिलें आहे त्याचा वर उल्लेख केलाच आहे. डिग्बी साहेबांनीं दिलेल्या हिशोबावरून हिंदुस्थानांतील लोकांच्या कंगाल स्थितीचें भयंकर चित्र जसें डोळ्यांपुढें उभें रहातें तसें दुसरें कशानेंही राहणार नाहीं. हिंदुस्थानांतील लोकांचा कंगालपणा व्यक्त करण्याकरितां डिग्बी साहेबांनीं अनेक प्रत्यंतरें दिलीं आहेत. मासल्याकरितां कांहीं आंकडे येथें देतों. इतर सुधारलेल्या राष्ट्रांतील व हिंदुस्थानांतील दरमाणशीं दरसाल उत्पन्नाचें

प्रमाण पाहिलें तर रुपयांचे आंकडे असे निघतातः—स्काट-लंड ( ६७५), आस्ट्रेलिया (६००), यूनायटेड स्टेटस ( ५८५ ) बेलज्यम (४२० ), फ्रान्स ( ४०५ ), कानडा ( ३९० ), जर्मनी ( ३३२ ), हालंड ( ३३० ), नार्वे ( ३०० ), स्वित्झर्लंड ( २८५ ), स्पेन ( २४० ), आस्ट्रिया ( २२५ ), इटली ( १८० ), रशिया ( १६५ ), आणि **हिंदुस्थान** अवघे रु. १७ !! आस्ट्रेलियांत एका माणसानें सालांत ५० पौंड ह्मणजे ७५० रुपये मिळविले तर निदान ३०० रुपये शिल्लक टाकतो. हिंदुस्थानांत दरमाणशीं उत्पन्न १७ रु. ८ आ. ५ पै पडतें, व अगदीं निदानचा खर्च रु. ३० येतो ! ही १२॥ रुपयांची तूट कशी भरावयाची ? परिणाम उघडच आहे. सन १८९१ पासून १९०० पर्यंत १० वर्षांत एक कोटी नव्वद लक्ष लोक उपासमारानें हिंदुस्थानांत मेले असा अंदाज आहे. पण सगळया जगांत गेल्या १०७ वर्षांत लढाईमध्यें सारे पन्नास लक्ष लोक मेले ! सन १८८७-८८ सालीं लार्ड डफरीन साहेबांचे हुकुमावरून शेतकऱ्यांचे स्थितीविषयीं एक गुप्त चवकशी झाली, व पुष्कळ उपयुक्त माहिती गोळा झाली. दुर्दैवानें ती अजून गुप्त ठेवण्यांत येत आहे; पण **डिग्बी** साहेबांनीं त्यापैकीं कांहीं आंकडे प्रसिद्ध केले आहेत. मासल्याकरितां ईटा जिल्ह्यांतील एका चांभार जातीच्या शेतकऱ्याचें वार्षिक जमाखर्चाचें टिपण येथें देतों:—

| प्राप्ति. | रु. |
|---|---|
| खरीप पीक. ...... | १२ |
| रब्बी ,, ...... | ७३ |
| तूप विक्री. ......... | १५ |
| गोंवऱ्या व शेण...... | २ |
| एकूण | १०२ |

| खर्च | रु. |
|---|---|
| अन्नखर्च ...... | ५० |
| सारा... ...... | ४० |
| बियाणें ...... | १५ |
| जनावरांस खाणें.... | ५ |
| भाडतें ...... | ३ |
| घरांतील सामान.... | २ |
| लग्न श्राद्ध. ...... | २ |
| कपडालत्ता. ...... | ७ |
| एकूण | १२४ |

" एकूण तूट रु. २२; ही कोठून आणावयाची? १७ एकर जमिनीचें उत्पन्न रु० ८५ व सारा रु. ४० हें लक्षात ठेवण्यासारखें आहे.*

सरकारचे ह्मणण्याप्रमाणें कुल उत्पन्नावर ६-७ टक्के एवढाच सारा असता तर वरील तूट भरून, १०-१५ रुपये शेतकऱ्याचे पेटींत शिल्लक राहते. कानपूर जिल्ह्यांतील एका गांवांत ६५ कुटुंबें आढळलीं, त्यांचे आंकडे येणें प्रमाणें निघाले:—३६ शेतकऱ्यांची कुटुंबें (७० पुरुष, ५० बायका, ५१ मुलें) उत्पन्न रु. ४३२३, शेतकी खर्च १७३३, बाकी २५९०, पोटगी ३६७८, अखेर तूट १०८८; मजुरी करणारीं कुटुंबें १७, त्यांचें उत्पन्न ८५०, पोटगी १४०५, व तूट ५५५; १२ कुटुंबें बोटवाले निर्वाहापुरतें मिळवितात.†

हीं उदाहरणें मुद्दाम निवडलेलीं नाहींत. सर्व देशांत बहुधा हीच स्थिति आहे; व तिचा परिणाम हिंदुस्थानांतील एकंदर प्रजा अशक्त, रोगी, अल्पायुषी, निःसत्व व निरुत्साही झाली आहे. इंग्लंडांत माणशी सरासरीनें आयुष्य ४० वर्षें असतें; हिंदुस्थानांत साडेते-विसावर नाहीं. अशा स्थितींतून देशाचें डोकें कसें वर निघणार हा प्रश्न प्रत्येकानें विचार करण्यासारखा आहे.

## सामान्य विचार.

येणेंप्रमाणें प्रस्तुत ग्रंथांतील लेखांचें सामान्य स्वरूप आहे. या गुणदोषविवेचनावरून सदर्हु लेखांचा कोतेपणा व कांहीं मुद्यांविषयीं अगदीं ताटस्थ्य लक्षांत आणून ती उणीव दुसऱ्या एकाद्या ग्रंथानें कोणी भरून काढल्यास या तांत्रिक विवेचनानें पुष्कळ काम केलेंसें होईल. असल्या राजकीय विषयांचा केवळ वरवर व तात्पुरता विचार न करतां मूळ तत्त्वें शोधून काढण्याकडे सुशिक्षित लोकांचें जितकें अधिक लक्ष लागेल तितकें इष्ट आहे. कोणताही प्रश्न घेतला तरी एकादा साहेब असें म्हणतो किंवा सरकारी रिपोर्टांत असें आहे किंवा अमुक वर्तमानपत्र असें प्रतिपादन करतें ह्मणून तेंच खरें व

* Digby's Prosperous British India, p. 313.
† Digby's Prosperous British India p. 322.

आपणही तेंच मत स्वीकारिलें पाहिजे, असें वाटूं लागणें बरें नाहीं; व राजकीय विषयांत तर तें फारच घातुक आहे. राष्ट्रीय सभा चांगली ह्मणून राष्ट्रीयसभेंत पसार झालेले सर्व ठराव चांगले व बरोबर आहेत असें गृहीत धरून चालणें म्हणजे आपले स्वतःचे विचार-शक्तीस अजीबात फांटा देण्यासारखें आहे. राष्ट्रीयसभेंतील किंवा इतर पुढारी लोक बोलतील तें सर्व खरें व हितकारक असलेंच पाहिजे असा कांहीं नियम नाहीं. असल्या बाबतींत विचारस्वातंत्र्य जितकें अधीक दृष्टोत्पत्तीस येईल तितकें चांगलें. हल्लीं आमच्या एकंदर राजकीय चळवळींना जें एक प्रकारचें संकुचित व कृत्रिम स्वरूप आलें आहे त्यामुळें राजकीय बाबतींतही आमचीं मतें पुष्कळदां एकदेशी अथवा मुद्दाम स्वीकारलेलीं दिसतात उदाहरणार्थ आपण पूर्ण राजनिष्ठ आहों असें वारंवार निक्षून सांगणें, किंवा वेळीं अवेळीं राणीच्या नांवानें त्रिवार टाळयांचा गजर करणें, किंवा कोणत्याही प्रसंगानें ब्रिटिश साम्राज्याची प्रशंसा करीत असणें, किंवा उठल्या बसल्या त्यांचे आभार मानणें हा अलीकडे एक आवश्यकपैकीं प्रकार होऊन गेला आहे; पण त्यापासून परकी लोकांचें व खुद्द राज्यकर्त्यांचे आपलेविषयीं काय मत होतें व तें इष्ट आहे काय, याचा कोणीं विचार करीत नाहीं. तसेंच पुढारी ह्मणून मानले गेलेल्या लोकांवर सर्व विचारांचा व आचारांचा बोजा टाकून त्यांचे ह्मणण्यास नुसती री ओढली किंवा फार झालें तर थोडीशी वर्गणी दिली, कीं आपलें राष्ट्रीय कर्तव्य संपलें असें मानणें, अगर आंगास घस सोसण्याची वेळ आली कीं कांहींतरी सबब काढून किंवा मुख्य गोष्टीबद्दलच विरोध दर्शवून निसटून जाऊं पहाणें, वगैरे प्रकार जे हल्लीं आमच्या राष्ट्रभक्त मंडळींत दिसतात त्याचें कारणही देशकार्याला जरूर लागणारी जी कळकळ व स्वार्थत्याग करण्याचें नीतिधैर्य पाहिजे ती अजून उत्पन्न झाली नाहीं. स्पष्टवक्तेपणा, तेजस्वीपणा, कळकळ, स्वाभिमान, करारी बुद्धि, वगैरे उदात्त गुण लोकांत जितके दिसतील तितकें त्यांचे चळवळींना व ओरडींनां जास्ती वजन व महत्व येतें, ही गोष्ट आमच्या राजकीय पुढाऱ्यांनीं व त्यांचे

अनुयायांनीं नेहमीं लक्षांत वागवली पाहिजे. उत्तम वक्तृत्व, निर्दोष तर्कशास्त्र, आगाध पांडित्य, व बाणेदार लेख एवढ्यांनींच देशाची उन्नति कधींही होत नाहीं. या कामीं नैतिक गुणांची जास्त जरूर आहे व ते नसतील तर बाकी सर्व गोष्टी नाटकांतील सोंगाप्रमाणें दिसतात हें तत्व आमच्यांतील सुशिक्षित वर्गाचे अंतःकरणांत अजून चांगलें उतरलेलें नाहीं. तात्पर्य राजकीय बाबतींत आपलें खरें कर्तव्य काय आहे, हें जोंपर्यंत आमचे लोकांनां नीटपणें कळूं लागलें नाहीं, तोंपर्यंत आमच्या प्रयत्नांस कधींही यश यावयाचें नाहीं.

## मुख्य प्रश्न.

हे सामान्य विचार येथें सुचण्याचें कारण प्रस्तुत ग्रंथांत त्यांचा पूर्ण अभाव होय. अवांतर विषय एक एक घेऊन त्याचें उत्तम उद्घाटन करणें हें तर चांगलेंच आहे; व तसें या पुस्तकांत केलेंही आहे. परंतु अतिशय महत्वाचे व मूलभूत प्रश्न जे कित्येक आपले पुढें आज उभे राहिले आहेत, त्यासंबंधानें या पुस्तकांत क्वचितच उल्लेख आढळतो; व त्यामुळें वाचकांची निराशा होते. रमेशचंद्र दत्त यांचा लेख खेरीज करून ज्यांत हिंदुस्थानवासी जनांचे खरे हृद्गत-विचार प्रदर्शित केले आहेत, असा एकही लेख या पुस्तकांत नाहीं. बहुतेक सर्व लेखांचे विषय कोणत्याही देशाच्या राज्यकारभारांत हमेषा उत्पन्न होणारे व केवळ तो राज्यकारभार सुव्यवस्थित करण्यापुरतेच आहेत. आज आपले पुढें मुख्य प्रश्न आहे तो हिंदुस्थानांतील ब्रिटिश राज्यव्यवस्था उत्तम आणि निर्दोष कशी करतां येईल हा नाहीं. इंग्रज लोक आमचेपेक्षां फार शहाणे, अनुभवी आणि राज्यधोरणी आहेत; व आपली राज्यव्यवस्था होईल तितकी निर्दोष करण्याची त्यांची मनापासून इच्छा असून प्रयत्नही चालू आहेत. आज पृथ्वीच्या एक चतुर्थांश भागांत नानाप्रकारच्या व अनेक जातींच्या लोकांवर जें राष्ट्र शें दीडशें वर्षें सुयंत्र व एकंदरींत चांगल्याप्रकारें राज्य चालवीत आहे, त्याला आमच्या सारख्या नवाशिख्या कालेजांत दोन चार

पुस्तकें वाचून पटाईत बनलेल्या मंडळीनें राज्यकारस्थान शिकवूं पहाणें धार्ष्ट्यच आहे. हिंदुस्थानांतील ब्रिटिश राज्यव्यवस्था जितकी निर्दोष होईल, तितकी ती अधिक चिरस्थायी होईल, हें तत्व इंग्रज मुत्सद्यांना पूर्णपणें अवगत आहे; व तसें करण्याचें त्यांस सामर्थ्यही आहे. आमच्या तुटपुंज्या अक्लेची त्यांस जरूर नाहीं, व किंमतही वाटत नाहीं. राष्ट्रीयसभेंतील ठराव व देशी वर्तमानपत्रांतील लेख यांविषयीं राज्यकर्त्यांकडून वारंवार तिरस्कार व उपेक्षा दाखविण्यांत येते त्यांतील बीज हेंच. कोणत्याही देशांतील राज्यव्यवस्थेंत दोष असावयाचेच. कामदारांचे जुलूम, लोकांच्या सोयीकडे दुर्लक्ष, अधिकाऱ्यांची स्वार्थपरायणता, व्यक्तिविषयक अन्याय, सरकारी नोकरांच्या चुका, पक्षाभिमान, तंटे वगैरे गोष्टी इंग्लंड अमेरिके सारख्या व स्वतंत्र लोकनियंत्रित देशांतही हमेषा आढळतात; मग जेथें जाति, धर्म, विचार, हिताहित, वगैरे अनेक बाबतींत राजकर्ते व प्रजा यांजमध्यें अपरिहार्य द्वैध आहे, त्या हिंदुस्थान देशांत हे दोष पुष्कळ असतील यांत मुळींच नवल नाहीं. किंबहुना ते आढळतात त्यापेक्षां जास्त नाहींत हेंच आमचे राज्यकर्त्यांस फार भूषणावह आहे. हे किरकोळ दोष दाखविण्याचें काम वर्तमानपत्रद्वारा व अर्जद्वारा होतच आहे. त्याकरितां दरसाल हजार पांचशें लोकांनीं जमून व लाख दोन लाख रुपये खर्चून ओरड करण्याची कांहीं जरूर नाहीं, असें पुष्कळ सरकारपक्षी लोकांचें म्हणणें आहे, व तें सर्वांशीं खोटें आहे असेंही ह्मणता येणार नाहीं वस्तुतः आमची राजकीय सुधारणा म्हणजे ज्याला administrative reforms ह्मणतात, ह्मणजे ब्रिटिश राज्यकारभार निर्दोष करणें, ही कल्पनाच चुकीची आहे. हें काम इंग्रज लोक स्वतःच करूं शकतील, व करीतही आहे. त्यानां आमच्या मदतीची व सूचनांची बिलकुल अपेक्षा नाहीं. खरोखर आम्हाला विचार करावयाचा आहे तो आमची स्वतःची राष्ट्रीय उन्नति ह्मणजे काय व ती कशानें होईल या प्रश्नाचा होय. राज्यकारभार निर्दोष आणि सुयंत्र चालणें व राष्ट्र उन्नत्त होणें या दोन्ही गोष्टी अगदीं भिन्न आहेत हें अजून आह्मांस

शिकावयाचें आहे. एकादें उत्तम कारागिरीचें यंत्र जसें ओबडधोबड पण स्वतः चलनवलन करणाऱ्या प्राण्याची बरोबरी करूं शकणार नाहीं, तशी उत्तम राज्यव्यवस्था भोगणाऱ्या निर्जीव व निःसत्व राष्ट्राची स्थिति आहे. सध्यां अमुक खात्यांत अमुक सुधारणा करावी, अमुक कायदा करूं नये, अमुक अधिकारी नेमावे, असल्या सूचना सरकारास करीत बसण्यांतच आह्मी समाधान मानून घेत असल्यामुळें हीं सर्व खाती, कायदे, अधिकारी, संस्था ज्या लोकांच्या हिताकरितां निर्माण केलीं आहेत, त्यांचें डोकें कधीं वर होईल काय या मुख्य प्रश्नाची उपेक्षा होते. हल्लींचे आमचे राजकीय सुधारणेचे विचार आणि प्रयत्न इंग्लंड वगैरे स्वतंत्र देशांत चाललेल्या चळवळींच्या धर्तीवर अ हेत, पण हा मार्ग चुकलेला आहे. ज्या राष्ट्राच्या व आपल्या स्थितींत जमीनअस्मानचें अंतर, त्याचें अनुकरण करूं लागणें या सारखी घातुक गोष्ट दुसरी कोणतीच नाहीं. मुलगा बापाचे मांडीवर लोळतो ह्मणून घरच्या गाड्यानें त्याच्या मांडीवर चढूं पहाणें हें हास्यास्पद नव्हे काय ? व तसें करूं जाणाऱ्यांना यजमानाचे चाकरांनीं योग्य शासन दिलें तर नवल कोणतें ? तात्पर्य राजकीय सुधारणेच्या मार्गाला लागण्यापूर्वी आपण आपली हल्लींची स्थिति नीट ओळखली पाहिजे. ती उमजल्यावर ती सुधारण्याचे उत्तम उपाय कोणते हा विचार, व नंतर बाकीच्या गोष्टी. राज्यकारभारांत सुधारणा करण्याचें काम आपल्या मालकांचें आहे, तें त्यांजकडे सोंपवून आपण आपल्या पुरतें व सद्यःस्थितीला अनुरूप असेंच आचरण ठेवलें पाहिजे. इंग्रजी पुस्तकें वाचून स्वतंत्रतेच्या अवाढव्य कल्पना डोक्यांत शिरल्यानें प्रथम प्रथम राज्यकर्त्या इंग्रजांची बरोबरी करण्याची व सर्व बाबतींत त्यांचें अनुकरण करण्याची इच्छा होते; पण ती केवळ कल्पनासृष्टि आहे, व त्यांत गुंग होऊन व्यर्थ कालाचा व शक्तीचा अपव्यय करणें मूर्खपणा आहे असें अनुभवांतीं दिसून येतें. यापेक्षां आपआपल्या सामर्थ्यानुरूप आपल्या देशबांधवांची राष्ट्रीय उन्नति करण्याचा प्रयत्न करावा हें उत्तम.

## राष्ट्रीयसभा.

राष्ट्रिय सभेच्या प्रयत्नांची दिशा चुकण्याला दोन कारणें एक झालीं. तिचें मूळ जनकत्व **उमेशचंद्र बानर्जी** यांनीं उपोद्घातांत लिहिल्याप्रमाणें इंग्रज मुत्सद्याकडे गेल्यामुळें व पुढेंही तिचें नियंतृत्व पुष्कळ अंशीं त्यांचेकडेच राहिल्यानें तिच्या कामाला एका विशिष्ट प्रकारचें विलायती वळण लागलें; व राष्ट्रीयसभेस जाणारे बहुतेक लोक इंग्रजी शिक्षणाचे भट्टींतून निघाले असल्यामुळें त्यांनीं तें लगेच उचललें. इंग्रजी शिक्षणानें तयार केलेली जमीन, व तींत डफरीन, ह्यूम, वेडरबर्न-सारख्या इंग्रज मुत्सद्यांनीं पेरलेलें बीं यापासून झाडही विदेशी स्वरू-पाचें व्हावें हें स्वाभावीक आहे. तें चांगलें आहे कीं वाईट आहे, हा प्रश्न फार वादग्रस्त आहे; पण जोंपर्यंत त्याचें विदेशी स्वरूप कायम आहे तोंपर्यंत हिंदुस्थानसारख्या पुराणप्रिय देशांत तें लोकप्रिय व चिरस्थायी होईल कीं नाहीं, याची शंका आहे. राष्ट्रीयसभा स्थापन होऊन १७ वर्षें झालीं असतां तिला अजून कायमपणा येत नाहीं व तिचा जोम उत्तरोत्तर वाढत जाण्याचें ऐवजीं कमी होत असलेला दिसतो. ही गोष्ट कितीही खेदकारक असली तरी मनन करण्यासारखी आहे. कांहीं सामाजिक सुधारकांनीं केवळ इंग्रजां-च्या अनुकरणानें पाश्चात्य सुधारणा हिंदुसमाजावर लादण्याजोगा जसा प्रयत्न केला, तशीच चुक पुन्हा न करण्याविषयीं आमचे राजकीय पुढाऱ्यांनीं खबरदारी घेतली पाहिजे. कोणत्याही राष्ट्राची निवळ अनुकरणानें उन्नति होऊं शकत नाहीं. व कदाचित् झालीशी वाटली तरी ती बेगडी व अशाश्वतच समजली पाहिजे. कोणतीही सुधारणा अथवा चळवळ चिरस्थायी होण्याला ती लोकांमध्येंच प्रादुर्भूत झालेली असून त्यांचे परंपरागत आचारविचारांना धरून असली पाहिजे. इंग्रज लोकांचें धुरीणत्व सध्यां आपणाला पाहिजे आहे व त्यांचेपासून पुष्कळ गोष्टी शिकावयाच्याही आहेत. पण अखेर त्यांना आपल्या सारखें करावयाचें, त्यांचे तंत्रानें आपण नेहमीं चालावयाचें नाहीं हें तत्व विसरतां कामा नये. राष्ट्रीय सभेच्या उत्पत्तीच्या वेळची

**बानर्जी** यांनीं जी एक गोष्ट लिहिली आहे ती बोधप्रद आहे. लार्ड डफरीन यांचे मनांत फक्त सामाजिक सुधारणांपुरती चर्चा करण्याकरितांच सुशिक्षित लोकांनीं एकत्र जमावें एवढेंच होतें. कारण तेणेंकरून सामाजिक व धार्मिक प्रश्नांविषयीं आपसांत चर्चा करून तंटे माजविण्यांत सुशिक्षित एतद्देशीय लोक गुंग झाले ह्मणजे अर्थातच राजकीय गोष्टींविषयीं ते फारशी पंचाईत करणार नाहींत. दिल्ली दरबारचे वेळेस हिंदुस्थानांतील सर्व एतद्देशीय पुढारी लोकांची एक वार्षिकसभा भरविणें शक्य आहे ही कल्पना प्रथम सुचली. लिटनशाहींत उत्पन्न झालेला असंतोष व रिपनशाहींत एतद्देशीयांस मिळालेलें उत्तेजन यामुळें राजकीय चळवळींला विशेष जोर येऊं लागला होता. तो मोडण्याकरितां राष्ट्रीय सामाजिक परिषदेची डफरीनसाहेबांनीं ही अजब युक्ति काढली. लहान मूल रडूं लागलें ह्मणजे हातांत खेळणें देऊन गप्प बसविण्यासारखाच हा प्रकार होता. पण हिंदुस्थानांतील सुशिक्षित लोक लहान मुलें आहेत हा डफरीनसाहेबांचा अजमास चुकला, व ह्यूम साहेबांनीं राष्ट्रीयसभेची जुळवाजुळव करून सभा जमल्यावर लोकांनीं हें सामाजिक चर्चेचें घोंगडें फेंकून देऊन राजकीय प्रश्न एकदम हातीं घेतले. आरबीभाषेंतील गोष्टींतील अल्लाउद्दीनच्या दिव्याप्रमाणें केलें एक व झालें भलतेंच, हें दिसल्याबरोबर राष्ट्रिय सभा राजद्रोही आहे म्हणून ओरड सुरू झाली. ती अंशत: कमी करण्याकरितां कै. न्यायमूर्ति रानड्यांनीं सामाजिक परिषदेचें शेपूट राष्ट्रीयसभेस जोडलें; पण इंग्रज मुत्सद्यांच्या दृष्टीनें एकदां घडी विघडली ती विघडलीच. राष्ट्रीयसभेच्या मूळ जनकांनीं केवळ लार्ड डफरीनचाच सूर न ओढतां आपले विचाराप्रमाणें तिची रचना केली हें त्यांस भूषणावह आहे, व त्यामुळेंच ती पुढें इतकी लोकप्रिय झाली. तो कित्ता पुढें गिरवून वेळोवेळीं लोकमतानुरूप राष्ट्रीयसभेला वळण देणें हें राष्ट्रीय सभेच्या हल्लींच्या चालकांचें कर्तव्य आहे. अमुक साहेब रागावेल, राज्यकर्ते आपणास राजद्रोही ह्मणतील, किंवा त्रास देतील, पार्लमेंट आपली दाद घेणार नाहीं, असल्या शुष्क भीतीनें लोकमताकडे दुर्लक्ष करून कालानुरूप तिच्या रचनेंत व कार्यक्रमांत फरक करण्यास

आमचे पुढारी चुकतील तर दुसऱ्या जमिनींतून उपटून आणलेल्या रोप्याप्रमाणें ही विदेशी संस्था लवकरच विलयास जाईल अशी भीति वाटूं लागली आहे.

## सर्व सुधारणांचें एकरूपत्व.

प्रसंगानुसार आणखी एक प्रश्नाचा येथें उल्लेख करणें जरूर दिसतें. राजकीय सुधारणा, सामाजिक सुधारणा, धार्मिक सुधारणा व औद्योगिक सुधारणा वगैरे कृत्रिम भेद करण्याचा अलीकडे प्रघात पडला आहे. परंतु बारीक विचारांतीं हा भेद निर्मूल आहे असेंच आढळून येतें. अमुक सुधारणा राजकीय कीं सामाजिक कीं औद्यौगिक हें ठरविणें फार कठीण आहे. उदाहरणार्थ परदेशांत आपले लोकांनीं जाऊन राहणें याला कोणत्याही प्रकारची सुधारणा ह्मणतां येईल. जातिभेद मोडणें ही सुधारणा सामाजिक कीं धार्मिक, व तिचे मुळाशीं राजकीय हेतु नाहींत असें ह्मणतां येईल काय? लोकांचे दारिद्र्याचा प्रश्न राजकीय कीं औद्योगिक? वस्तुतः हे भेद काल्पनिक असून जेणें करून राष्ट्राची सर्व बाजूनें सारखी उन्नति होईल त्या सर्व सुधारणा एकच आहेत. लोकांनीं एकाच तऱ्हेच्या प्रश्नांचा विचार करावा व इतरांविषयीं मौन धरावें असें ह्मणणारे गृहस्थ, मग ते सरकारी मताचे असोत कीं लोकपक्षाचे असोत, कोत्या दृष्टीचेच ह्मटले पाहिजेत. एकाच प्रकारची सुधारणा करावी, दुसरी नको, असें ह्मणणें ह्मणजे शरीराचा एक अवयव पुष्ट करून दुसरा अशक्त ठेवण्यासारखें आहे. पण सर्व सुधारणा वस्तुतः एक ह्मणून सर्वांचे मार्ग मात्र एक नाहींत हेंही लक्षांत ठेवलें पाहिजे. पोटांतील रोगास जें औषध चालतें तेंच डोळ्यांत घालणें श्रेयस्कर नाहीं. राजकीय बाबतींत आपणाकडे कर्तृत्व मुळींच नाहीं, फक्त सरकारापुढें भीक मागावयाची आहे, ह्मणून राष्ट्रीयसभेसारखी नुसती वक्तृत्वसभा तेथें ठीक आहे. पण सामाजिक व धार्मिक सुधारणांची गोष्ट निराळी आहे. तेथें पुढाऱ्यांनीं नुसतें वक्तृत्व करून संतोष पावणें ह्मणजे आपलें कर्तव्य विसरणें होय. तसेंच राजकीय व सामाजिक बाबतींत प्रतिस्पर्धीही वेगवेगळ्या तऱ्हेचे आहेत. सामाजिक

प्रश्नांमध्यें देखील विशिष्ट सुधारणांचे मार्ग भिन्न भिन्न होऊं शकतील. प्रत्येक बाबतींत अडचणी निराळ्या व त्या दूर करण्याचे मार्गही निर-निराळेच असले पाहिजेत. रोगाचे चांगलें निदान करून अनुरूप औषध देणें यांतच वैद्याचें चातुर्य आहे. सीक्काप्रमाणें सर्व रोगांवर चालणारें एकच औषध देणारा वैद्य ढोंगी व मूर्ख ह्मटला पाहिजे.

## उपसंहार.

विस्तार बराच झाला असल्यामुळें शेवटीं एका अत्यंत महत्वाच्या प्रश्नाचा मात्र येथें निर्देश करून वाचकांची रजा घेतों. शरीराचें व समाजाचें पुष्कळ साम्य आहे हें वर दाखविलेंच आहे. एका व्यक्तीचें शरीर नीरोगी करण्याला जर किती आयास पडतात तर समूहात्मक समाजांतील रोगबीजें निर्मूल करण्याला चांगलाच प्रवीण धन्वं-तरी पाहिजे. शरीरांतील अवांतर रोगांवर दुसरी औषधें चाल-तात, पण क्षयाची भावना झाल्यावर इतर विकार घटकाभर बाजूला ठेवून शक्तिवर्धक औषधच दिलें पाहिजे. माणस मरणो-न्मुख झाला असतां हातपाय शेकीत बसण्याऐवजीं एक चैतन्यो-त्पादक जालीम मात्राच दिली पाहिजे. आमचा समाज हल्लीं को-णत्या स्थितींत आहे याचा प्रत्येकानें विचार करावा. या वेळेस हेमगर्भाची मात्रा देणें जरूर असेल तर तीं कोणती, याचाही एकंदर समाज-धुरीणांनीं विचार केला पाहिजे. हिंदुस्थानचा गेल्या तीन हजार वर्षांचा इतिहास उपलब्ध आहे, तो पाहिला तर ज्या ज्या वेळेस राष्ट्राचें पुनरुज्जीवन झालें—व असे प्रसंग निदान चार पांच वेळां आलेले आढळतात—त्या त्या वेळेस धर्मजागृतीच मुख्य कारण झाली, हेंही लक्षांत घेण्यासारखें आहे. सिथियन, अफगाण, पठाण, मोंगल, पोर्च्यु-गीज वगैरे अनेक परचक्रांना तोंड देऊन रजपूत, बंगाली, विजयानगर, मराठे वगैरे लोकांनीं पुन्हा पुन्हा डोकें वर काढलें त्यावेळीं स्फूर्ति देणारा त्यांचा कडकडीत धर्माभिमानच जागृत होता. प्रत्येक राष्ट्राचे आंगीं कांहीं विशिष्ट गुण असतो व त्या त्या धोरणावर त्या राष्ट्राची उन्नति होते. ग्रीक लोकांचें तत्त्वज्ञान, रोमनलोकांची राजकीय अक्कल, स्पानिश

लोकांचें धाडस, फ्रेंच लोकांची बुद्धिमत्ता, जर्मन लोकांचा चिकटपण व इंग्रजलोकांचा व्यापारीबाणा हे गुण त्या त्या राष्ट्राचे अभ्युदयास कारण झाले. तशीच हिंदुलोकांची धर्मबुद्धि होय. सर्व उदात्त धर्म-कल्पनांचा उगम येथें झाला व अजूनही धार्मिक लोकांची कोणी बरोबरी करूं शकत नाहींत, हें जर खरें असेल तर आमची भावी राष्ट्रीय उन्नतीची इमारत धर्माचे पायावरच उभारली पाहिजे. फ्रेंच लोक कीर्तीकरितां व इंग्रज लोक पैशाकरितां प्राण देण्यास तयार होतात; तशीं हिंदुस्थानांत धर्माकरितां रणें पडलीं आहेत. आमचे येथें देशाभिमान विशेष नाहीं; पण धर्माभिमान जाज्व-ल्य आहे. आमचा देश परकीयांनीं जिंकला, तरी आह्मास फारसा विषाद वाटत नाहीं; पण धर्मांत थोडेसें बोट घातलेलेंही खपत नाहीं. ही स्थिति चांगली कीं वाईट हा प्रश्न निराळा; पण ती बदलणें कोणाच्या हातीं नाहीं. व्यक्तीचे तसेच राष्ट्राचे स्वभाव एकदा बनले ह्मणजे तसेच रहावयाचे, एकाएकीं बदलणें शक्य नाहीं. राष्ट्राची उन्नति करणें असेल तर त्याच धोरणावर केली पाहिजे. धर्मास तुच्छ मानणारे किंवा उदासीन असणारे गृहस्थ इतर प्रकारें कितीही वंद्य असले तरी लोकांचे पुढारी मानले जात नाहींत, यांतील बीज तरी हेंच असलें पाहिजे. "सर्वं धर्मे प्रतिष्ठितम्" या वचनांत फार स्वारस्य आहे. त्याचा प्रत्येक सुशिक्षित माणसानें विचार करावा अशी सर्वांस प्रार्थना आहे.

मुंबई<br>ता. १६ डिसेंबर.<br>सन १९०१.

म० रा० बोडस.

# हिंदुस्थानची राजनीति.

## उपोद्घात.

(लेखक—मि. डब्ल्यू. सी. बानर्जी.)

आपल्या भरतभूमीच्या कल्याणाविषयीं कळकळ बाळगणाऱ्या, आणि अतएव ब्रिटिशसत्ता या देशांत चिरकाळ नांदावी असें इच्छिणाऱ्या प्रत्येक मनुष्यानें प्रस्तुत पुस्तकांत संगृहीत असलेल्या निरनिराळ्या लेखांकडे नीट लक्ष दिलें पाहिजे. हे लेख त्या त्या विषयाचें परिपूर्ण ज्ञान संपादन केलेल्या गृहस्थांनीं लिहिलेले आहेत; शिवाय ते लिहिण्याची पद्धतही अशीच ठेवण्यांत आली आहे कीं, अत्यंत चिकित्साखोर टीकाकारांनाही ती पाहून मान डोलवावीच लागेल. या पुस्तकाचें नांव जरी विषयाला अनुरूप असेंच आहे, तरी त्यावरून त्यांत काय आहे हें पूर्णपणें कळावयाचें नाहीं. यांत केवळ हिंदुस्थानांतील राजनीतिविषयक प्रश्नच नाहींत, तर इंग्लंडाच्या व त्याच्या छायेखालील या अ-

फाट देशाच्या हितानहिताबद्दलच्या अत्यंत महत्वाच्या गोष्टी-ही यांत आहेत. जे जे नेटिव्ह व युरोपीयन गृहस्थ हिंदुस्था-नासंबंधाच्या राजकीय गोष्टींचा विचार करीत आहेत, त्या सर्वांस, त्या गोष्टींकडे ब्रिटिश लोक मुळींच लक्ष देत नाहींत हें पाहून अत्यंत वाईट वाटत आहे. या बेपर्वाईबद्दल ब्रिटिश लोकांना कांहीं तरी सबब सांगतां येईल खरी. त्यांच्यांतील अत्यंत मेहनती मनुष्याला पुरून उरतील इत-क्या असंख्य भानगडी त्यांच्या देशांत उपस्थित होत असतां, हिंदुस्थानविषयक गोष्टींचा विचार कोण करितो ? पण ही सबब खरी असली, तरी इंग्लंडसारख्या बादशाही राष्ट्रानें हिंदुस्थानासंबंधी प्रश्नांकडे अगदींच दुर्लक्ष करणें उचित नाहीं. हिंदुस्थानांतील राज्यकारभाराच्या बारीकसारीक बाबतींत ब्रिटिश लोकांनीं किंवा पार्लमेंटानें ढवळाढवळ करावी अशी इकडील कोणाचीही इच्छा नाहीं. त्यांचा विचार करण्याचें काम हिंदुस्थानांतील अधिकाऱ्यांकडे सोंपविणें हेंच योग्य आहे. पण हिंदुस्थानाच्या राज्यव्यवस्थेंत ब्रिटिश लोक हेंच शेवटचें अपील कोर्ट मानण्यांत येत असल्या-मुळें, ज्या तत्वांवर इकडील राज्यकारभार चालावयाचा त्या तत्वांचा ब्रिटिश लोकांनीं विचार करणें अत्यंत अवश्य व न्याय्य आहे. हिंदुस्थानाच्या राज्यकारभारांतील कोण-तेंही धोरण ठरविण्याचें काम, तसेंच तें धोरण अंमलांत आणण्याचें काम, अलीकडे हिंदुस्थानाचे स्टेटसेक्रेटरी यांजकडे आलें आहे. तेव्हां हिंदुस्थानांतील अधिकाऱ्यांच्या एखाद्या ठरावाविरुद्ध स्टेटसेक्रेटरीसाहेबांकडे अपील नेणें ह्मणजे त्यांच्याच ठरावाविरुद्ध त्यांच्याकडे अपील नेणें आहे.

या प्रस्तावलेखांत या मद्यासंबंधानें पाल्हाळ करण्याची गरज नाहीं; तरी त्यावरून इतकें स्पष्टपणें निदर्शनास येतें कीं, या देशाची राज्यव्यवस्था सुयंत्र चालण्यास इकडील परिस्थितीची माहिती ब्रिटिश लोकांनीं करून घेतली पाहिजे, व इकडील राज्यकारभाराकडे लक्ष पुरविलें पाहिजे. इंग्लंडांत हिंदुस्थानाच्या कारभाराची जरी नुसती जुजबी चौकशी झाली, तरी तेवढ्यानेंदेखील सुशिक्षित लोकांच्या मनावर चांगला परिणाम होतो. तेवढ्यानेंदेखील आपला देश आणि आपले देशबांधव यांस तें विसरलें नाहीं असें त्यांस वाटून त्यांची राज्यकर्त्यांवरील निष्ठा दृढ होते. हिंदुस्थानाच्या राष्ट्रीयसभेच्या लंडन येथील ब्रिटिश कमिटीस पैशाची मदत करण्यासाठीं या देशांतील सुशिक्षित लोक जो इतका स्वार्थत्याग करीत आहेत तो कशासाठीं? या वर्गांतील लोकांची सांपत्तिक स्थिति किती अडचणीची आहे, हें ज्यांस माहीत आहे, त्यांसच या स्वार्थत्यागाचें महत्व कळणार आहे. आपल्या राष्ट्राविषयींची माहिती ब्रिटिश राष्ट्राला करून देण्याची खटपट त्या कमिटीनें चालविली आहे हें ते जाणतात. हिंदुस्थानविषयक प्रश्नांकडे ब्रिटिश राष्ट्राचें लक्ष लावणें, हें काम किती कठिण आहे हें त्यांस समजतें. ब्रिटिश कमिटीनें जरी आजवर पुष्कळ खटपट केली, व हल्लींही तिचा उद्योग जारीनें चालू आहे, तरी तिच्या प्रयत्नांस फारसें यश आलें नाहीं हें त्यांस कळतें. तरी ते ब्रिटिश कमिटीला वर्षानुवर्ष पैसे देत आहेत. कारण त्यांना अशी आशा आहे कीं, केव्हांना केव्हां तरी, कमिटीच्या प्रयत्नानें, हिंदुस्थानासंबंधानें आपणावर केवढी जबाबदारी आहे हें

ब्रिटिश राष्ट्राला कळूं लागेल. त्या राष्ट्राच्या निःपक्षपातबुद्धी-वर आणि न्यायप्रियतेवर त्यांचा दृढ विश्वास आहे, आणि त्यांना माहीत आहे कीं, एकदां ब्रिटिश लोक आपल्या कारभाराकडे लक्ष पुरवूं लागले, ह्मणजे ब्रिटिश सार्वभौमसत्तेखालीं नागरिक या नात्यानें आपली जी स्थिति आहे ती सुधरेल, आणि ती स्थिति सुधरली ह्मणजे ब्रिटिश अंमलामुळें आपले जे फायदे व्हावयाचे असून आजपर्यंत होऊं दिलेले नाहींत, ते आपणास प्राप्त होतील. ब्रिटिश कमिटीला आपल्या कामांत या पुस्तकाचा चांगला उपयोग होईल अशी मी आशा करितों.

महाराणी सरकारच्या हिंदी प्रजेपैकीं जो सुशिक्षित वर्ग आहे, त्याजवर जो एक आरोप अलीकडे लादण्यांत येत आहे, त्याचें या प्रसंगीं होईल तितकें थोडक्यांत खंडन करणें अप्रासंगिक होणार नाहीं. तो आरोप असा कीं, सुशिक्षित हिंदुस्थानवासी लोक अंतर्यामीं राजद्रोही आहेत. सोप्या भाषेंत याचा अर्थ असा घ्यावयाचा कीं, ब्रिटिश लोकांची सत्ता या देशांतून हुसकून लावावी असें त्यांस वाटत आहे. हा आरोप अगदींच निराधार आहे. या देशांतील सुशिक्षित वर्गाला ( तसेंच अशिक्षित वर्गाला ) ब्रिटिश राज्यव्यवस्थेशिवाय इतर राज्यव्यवस्थेचा ( स्वराज्याचा ) अनुभव नाहीं. इंग्रजांची सत्ता पूर्णपणें स्थापित होण्यापूर्वीं येथली स्थिति कशी काय होती हें त्याला इतिहासावरून माहीत आहे. देशस्थितींत कसकसे फेरफार झाले आहेत आणि होत आहेत, ते त्याच्या डोळ्यापुढें आहेत. इंग्रजी राजसत्तेनें हिंदुस्थानाचे जे मोठमोठे फायदे

झाले आहेत, त्यांचा त्याला प्रत्यहीं अनुभव येत आहे. पाश्चात्य शिक्षणाच्यायोगानेंच त्या वर्गाला हल्लींची योग्यता प्राप्त झाली आहे. एकंदरीनें पाहतां हल्लींची राज्यपद्धति नाहींशी करून टाकल्यानें त्याचें सर्वस्वीं नुकसान मात्र होणारें असून कोणत्याही प्रकारें फायदा होण्यासारखा नाहीं. असें असतांही बड्या अधिकारावर असलेल्या मोठमोठ्या लोकांकडून खुशालपणें असें विधान ठोकून देण्यांत येतें कीं हिंदुस्थानांतील सुशिक्षित लोक राजद्रोही आहेत. सुशिक्षित हिंदी मनुष्याच्या अंगीं कांहीं दोष आहेत. पण ते दोष कोणतेही असले तरी स्वहिताविषयीं बेपर्वाई हा दोष त्याच्या अंगीं नाहीं. स्वार्थबुद्धीमुळेंच तो आपल्या राज्यकर्त्यांवर निष्ठा ठेवीत आहे, आणि त्यांच्या राज्यछत्राखालीं समाधानांत दिवस घालवीत आहे. ब्रिटिश राजसत्ता हिंदुस्थानांत यावच्चंद्रदिवाकर राहावी या तत्वावरच राष्ट्रीय सभेची स्थापना झाली आहे, आणि ही गोष्ट गृहीत धरून चाललों म्हणजे, हिंदुस्थानाची आधिभौतिक दृष्टीनें भरभराट होईल, आणि त्यांतील सर्व वर्णांचे आणि जातींचे लोक ब्रिटिश सार्वभौमराज्यांतील प्रजा या नात्यानें सुखांत, भरभराटींत आणि समाधानानें राहतील, अशा तऱ्हेनें राज्यशकट चालविण्यास राज्यकर्त्यांस मदत करणें हें हिंदुस्थानांतील सुशिक्षित लोकांचें आद्यकर्तव्य ठरतें. हिंदुस्थानांतील सुशिक्षित लोक अराजनिष्ठ आहेत ही भ्रममूलक आणि अनर्थोत्पादक कल्पना जितकी लवकर टाकून देण्यांत येईल तितकें बरें. राष्ट्रीय सभेंत असलेले लोक सुशिक्षित वर्गापैकीं आहेत. मि. नॉर्टन यानीं राष्ट्रीय सभेवरील आपल्या लेखांत म्हटलें आहे, ' हिंदुस्थानानें

इंग्लंडाचें आधिपत्य आनंदानें आणि कृतज्ञतेनें कबूल केलें, याचें कारण असें कीं पृथ्वीवरील सर्व राष्ट्रांत इंग्लंड श्रेष्ठ आहे ही गोष्ट तें जाणून आहे. आमचें राज्य हिंदुस्थानवासी लोकांस पसंत पडतें याचें कारण तें न्यायानें चालविलें जातें हें होय.'

हिंदुस्थानच्या राष्ट्रीय सभेची मूळ कल्पना निघण्यास, आणि तिचें काम ज्या पद्धतीनें चालू आहे ती पद्धति ठरण्यास, तिच्या स्थापनेच्या वेळीं गव्हर्नरजनरलच्या जागीं असलेले लॉर्ड डफरिनसाहेब कारण झाले, ही गोष्ट पुष्कळांस माहीत नसेल. इ. स. १८८४ मध्यें मि. ए. ओ. ह्यूम, सी. बी., यांनीं अशी कल्पना काढिली कीं, हिंदुस्थानांतील प्रमुख राजकारणी मनुष्य वर्षांतून एकदां एके ठिकाणीं जमून सामाजिक बाबतींची चर्चा करितील, आणि परस्परांमध्यें स्नेहभाव उत्पन्न करितील, तर त्यायोगानें देशास फार फायदा होईल. या मंडळीनें राजकीय गोष्टींचा ऊहापोह करण्याच्या भानगडींत मुळींच पडूं नये, कारण तसें केल्यानें कलकत्ता, मुंबई, मद्रास आणि इतर ठिकाणीं असलेल्या राजकारणी संस्थांचें महत्व कमी होईल असा त्यांचा अभिप्राय होता. मि. ह्यूम यांचा आणखी असा विचार होता कीं, ज्या इलाख्यांत ही सभा भरेल त्याच्या गव्हर्नरानें तिचें अध्यक्षस्थान स्वीकारावें, ह्मणजे त्यायोगानें, सरकारी अधिकारी आणि स्वतंत्र धंदा चालविणारे एतद्देशीय राजकारणी लोक यांमध्यें जास्त सलोखा उत्पन्न होईल. ही कल्पना ह्यूमसाहेबांच्या डोक्यांत घोळत असतां लॉर्ड डफरिनसाहेबांनीं १८८४ च्या डिसेंबरांत हिंदुस्था-

नाचीं राज्यसूत्रें हातीं घेतलीं, आणि ते पुढील वर्षाच्या आरंभीं सिमल्यास गेले, तेव्हां मि. ह्यूम यांनीं त्यांची भेट घेतली, व आपला विचार त्यांस कळविला. डफरिनसाहेबांस ती गोष्ट अत्यंत विचारणीय वाटली, व तिचा कांहीं दिवस विचार करून त्यांनीं ह्यूमसाहेबांस बोलावून आणून सांगितलें कीं तुमच्या कृतीपासून विशेष फायदा होणार नाहीं. डफरिनसाहेबांचें असें मत पडलें कीं इंग्लंडांत ज्याप्रमाणें प्रधानमंडळीच्या विरुद्ध एक तट असतो, त्याप्रमाणें सरकारच्या कृत्यांकडे डोळ्यांत तेल घालून पाहत राहणारा एक पक्ष हिंदुस्थानांत पाहिजे. वर्तमानपत्रांतून लोकमताचें जरी यथार्थ निदर्शन झालें, तरी त्यांवर तितका विश्वास ठेवितां येत नाहीं, या कारणामुळें, आपणाविषयीं आणि आपल्या राज्यपद्धतीविषयीं एतद्देशीय लोकांच्या मनांत कोणते विचार येत असतात, याचें ज्ञान इंग्रज राज्यकर्त्यांस नसतें. यासाठीं, नेटिव राज्यधोरणी लोक वर्षास एकत्र जमून राज्यकारभारात अमुकअमुक दोष आहेत, व ते अशा अशा तऱ्हेनें सुधारले पाहिजेत, असें आपल्या राज्यकर्त्यांस दाखवून देऊं लागले तर त्यापासून राज्यकर्त्यांचें व रयतेचें असें उभयतांचेंही हित होईल. नामदारसाहेबांनीं आणखी असेंही सुचविलें होतें कीं, अशा सभेचें अध्यक्षस्थान कोठल्याही इलाखाधिपतीनें स्वीकारूं नये. कारण तसें केल्यानें लोकांना आपलें मनोगत स्पष्टपणें कळवितां येणार नाहीं. लॉर्ड डफरिन यांचें ह्मणणें ह्यूमसाहेबांस पटलें. शिवाय, मि. ह्यूम यांनीं आपली स्वतःची कल्पना आणि लॉर्ड डफरिन यांची कल्पना अशा दोन्ही जेव्हां कलकत्ता,

मुंबई, मद्रास व इतर ठिकाणच्या राजकीय पुढाऱ्यांपुढें ठेविल्या, तेव्हां त्यांनीं लॉर्ड डफरिन यांचीच कल्पना सर्वानुमतें पसंत केली, आणि ती अंमलांत आणण्याची तजवीज केली. लॉर्ड डफरिन यांनीं मि. ह्यूम यांस असेंही सांगून ठेविलें होतें कीं, आपण हिंदुस्थानांत आहों तोंपर्यंत राष्ट्रीय सभेच्या कल्पनेशीं आपला संबंध आहे ही गोष्ट त्यांनीं कोणासही सांगूं नये. या सूचनेप्रमाणें, मि. ह्यूम यांनीं राष्ट्रीयसभेची स्थापना करण्याच्या कामीं ज्यांचा सल्ला घेतला अशा कांहीं गृहस्थांखेरीज इतर कोणासही ही गोष्ट कळविली नाहीं.

राष्ट्रीयसभेची स्थापना झाल्यापासून या चळवळीला यश येण्यासाठीं सुशिक्षित नेटिव लोकांनीं अत्यंत दीर्घ परिश्रम केले आहेत. त्यांच्या मार्गांत आलेलीं विघ्नेंही कांहीं सामान्य नव्हतीं. वर मि. नॉर्टन यांच्या ज्या लेखाचा उल्लेख केला आहे त्यांत दिलेल्या आंकडेविषयक माहितीवरून असें दिसून येईल कीं, या चळवळीस पुष्कळच यश मिळालें आहे, व इतकें मिळेल अशी पहिल्या राष्ट्रीय सभेच्या वेळीं जी सभासद मंडळी जमली होती त्यांनादेखील कल्पना नव्हती. राष्ट्रीयसभेनें आजपर्यंत जे प्रश्न हातीं घेतले आहेत, त्याचें महत्व जरी कमजास्त असलें तरी त्या सर्वांची मोठ्या काळजीनें आणि मनापासून चर्चा करण्यांत आली आहे.राष्ट्रीयसभा ही मानवी प्रयत्नाचें फल असल्यामुळें तिच्या हातून मुळींच चुका झाल्या नाहींत, असें ह्मणणें बरोबर होणार नाहीं. तिच्या हातून अशा कांहीं चुका झाल्या तरी, हिंदुस्थानांत ब्रिटिश सत्ता स्थापित झाल्यामुळें घडलेल्या आश्चर्यजनक सुपरिणामांपैकीं, सर्व जगाच्या दृष्टीनें राष्ट्रीयसभेची संस्था हा एक सुपरिणाम आहे.

# हिंदुस्थानची राष्ट्रीयसभा.

(लेखकः-मि. अर्डले नॉर्टन, बॅरिस्टर-ऍट-लॉ.)

हिंदुस्थानांत झालेला ब्रिटिश सत्तेचा अभ्युदय आणि तिची वाढ यांचा इतिहास एखाद्या अत्यंत विस्मयावह आणि चित्तवेधक कादंबरीप्रमाणें आहे, असें जे जे तो वाचतात ते ते कबूल करितात. पण तो इतिहास वाचणाऱ्या सर्वांना त्यांतील एक अत्यंत महत्वाचें रहस्य सारखेंच कळतें असें नाहीं. तें रहस्य हें कीं, जगांत हळूहळू पण अविरतपणें उत्क्रांति होत असून, इंग्लंडाचा आणि हिंदुस्थानाचा ज्या तत्वांवर आजपर्यंत परस्परांशीं व्यवहार चालत आला आहे, त्या तत्वांनुसार आणि कार्यकारणभावानुसार हिंदुस्थानांतील लोकांची नियति ठरत आहे. हिंदुस्थानाची सद्यःस्थिति केवळ प्रारब्धवशात्, किंवा निसर्गाची तशी लहरच लागली ह्मणून, बनलेली नाहीं. ईश्वरी योजनेनेंच ती तशी बनलेली आहे. ती बरी असो किंवा वाईट असो, इंग्लंडानें जशी ती केली आहे तशी ती झाली आहे. हिंदुस्थानच्या लोकांच्या सध्यांच्या महत्वाकांक्षा जर शहाणपणाच्या, योग्य, आणि सद्बुद्धीच्या असतील, तर त्याचें श्रेय बऱ्याच अंशीं इंग्लंडास दिलें पाहिजे. पण हिंदुस्थानवासीयांच्या मागण्या जर अयोग्य असतील, आणि त्यांची

महत्वाकांक्षा पूर्ण करितां येण्यासारखी नसेल, तर त्याचा दोष इंग्लंडाकडेच आहे.

या पूर्वेतिहासाचें आपण थोडक्यांत निरीक्षण करूं या. पूर्वेकडील संपत्तीच्या लोभानें व्यापारी बुद्धी मनांत धारण करून जे थोडेसे इंग्रज लोक प्रथम हिंदुस्थानांत आले, त्यांची थोडक्याच काळांत भरभराट होऊन ते ईस्ट इंडिया कंपनी असें नांव पावले, आणि त्यांनीं आपल्या राजाकडून सनदा मिळवून कांहीं विशिष्ट हक्क संपादन केले. कांहीं अंशीं त्या वेळच्या परिस्थितीच्या योगानें, आणि कांहीं अंशीं तिच्या नोकरांच्या उलाढालीपणामुळें, या कंपनीचा निव्वळ व्यापारी पेशा सुटून तिजकडे बऱ्याच प्रदेशाचें स्वामित्व येण्याला फारसा वेळ लागला नाहीं. पुढें जीवनार्थ कलहांत तिची आणि फ्रान्सची लढाई हिंदुस्थानांत जुंपून तिनें फ्रान्सचा पराभव केला. मध्यंतरीं एकदां मात्र, जें हिंदुस्थानरूपी रत्न आपल्या राणीच्या मुकुटांत चमकत असल्याबद्दल इंग्रज लोकांस योग्य गर्व वाटतो, तें रत्न डुप्ली यानें आपल्या कारस्थानपटुत्वानें आपल्या राजाच्या मुकुटांत बसविण्यासाठीं बहुतेक हिरावून नेलेंच होतें. नंतर हिंदुस्थानांतील दुर्बळ संस्थानिकांमध्यें जेव्हां तंटे लागले, तेव्हां क्लाइव्ह आणि वॉरन हेस्टिंग्स यांस जोर येऊन आपलें राज्य वाढविण्यास त्यांस फावलें. मोंगल बादशाहीचे तुकडे होत होते, ती संधि फार नामी होती, व ती त्यांनीं साधिली. आज एका पक्षाला, तर उद्या दुसऱ्या पक्षाला, याप्रमाणें लष्कराची कुमक करून इंग्रजांनीं दोघांकडूनही थोडथोडा मुलूख मिळवून आपला बराच फायदा करून घेतला.

याप्रमाणें कारस्थानानें आणि तरवार दाखवून मिळविलेल्या मुलुखाचें हळूहळू एक भक्कम राज्य झालें. पण हें राज्य आपल्याकडे सतत कसें चालेल याविषयीं इंग्रजांस नेहमीं भीति वाटत होती. कारण त्यांस वाटे कीं, फाटाफूट झालेले देशी संस्थानिक जर एक होतील, तर कंपनीच्या नोकरांनीं मोठ्या मेहनतीनें संपादन केलेलें राज्य आपल्या हातून जाईल, निदान तें जाण्याची वेळ तरी येईल. देशी संस्थानिकांशीं दोस्तीचे करार झालेले होते, आणि त्यांचा हा काळपावेतों चांगला उपयोग झाला होता. पण हिंदुस्थानांत इंग्लंडाची राजकीय सत्ता जसजशी वाढत गेली, तसतशा त्यांच्या गरजा वाढत जाऊन पूर्वी केलेले दोस्तीचे करार आतां निरुपयोगी ठरले, आणि त्यांच्यां जागीं, इंग्लंड हिंदुस्थानांत जी जास्त जास्त जबाबदारी आपणावर घेत चाललें होतें, तिला योग्य अशी नवीन पद्धत अंमलांत आली. राजकीय दृष्टीनें आणि प्रस्तुत विषयापुरता, हा फेरफार, ज्या उत्क्रांतीचा इतिहास मी लिहीत आहें, तिची पहिली पायरी होय.

क्लाइव्ह, हेस्टिंग्स आणि कॉर्नवॉलिस यांनीं अगदीं अव्वलीस ब्रिटिश सत्ता स्थापन करून तिची पुष्कळ वाढ केली. त्यांच्यामागून दोघां वेलेस्ली बंधूंनीं (लॉर्ड वेलेस्ली, गव्हर्नरजनरल, आणि त्यांचे बंधु, नेपोलियनचा पाडाव करणारे आर्थर वेलेस्ली, ड्यूक ऑफ वेलिंगटन, यांनीं) असा विचार मनांत आणला कीं ब्रिटिश सत्ता जर चिरकाळ टिकायला हवी असेल, तर ती सर्वश्रेष्ठ असली पाहिजे, तिला दुसरा कोणी प्रतिस्पर्धी जवळपास असून

उपयोग नाहीं; तसेंच सार्वभौम पदवी मिळविण्याची फ्रेंच लोकांची आशा साफ खुडून टाकिली पाहिजे, व नेटिव्ह संस्थानांशीं इंग्रजांचा दोस्त या नात्यानें जो संबंध आहे, त्याऐवजीं त्यांनीं आपणाकडे संस्थानिकांचें संरक्षकत्व घेतलें पाहिजे. फ्रेंच आणि टिपूसाहेब हे संगतनत करतील असें पूर्वीच जाणून वेलेस्लीसाहेबांनीं १७९९ सालीं एकदम म्हैसुरावर स्वारी केली. श्रीरंगपट्टण सर होऊन ही मोहीम लवकरच आटपली, आणि नंतर पेशव्याच्या भानगडींत लक्ष घालून शिंदे व भोंसले यांशीं लढाया करून त्यांनीं फत्ते मिळविली, आणि हातीं घेतलेलें महत्वाचें काम शेवटास नेलें. या लढायांच्या अखेरीस जे तह झाले, त्यांच्यायोगानें दोन उद्देश सिद्धीस गेले. त्यांच्यायोगानें फ्रेंचांची सत्ता समूळ नष्ट होऊन मराठेशाहीच्याही चिंध्या उडाल्या. 'चार कोट प्रजा आणि दहा कोटींचा वसूल' ब्रिटिश लोकांच्या हातीं येऊन जगाच्या साम्राज्यसिंहासनाच्या अगदीं वरच्या पायरीवर इंग्लंड जाऊन बसलें, आणि त्याचे सर्व प्रतिस्पर्धी कायमचे हताश होऊन बसले. इंग्लंडानें जो नवा राजकीय डाव टाकला, त्यांत त्याला वेलेस्लीच्या राज्यधोरणामुळें यश आलें. दोस्तपणा टाकून देऊन संरक्षक बनण्याचा इंग्लंडाचा हेतु तडीस गेला, आणि नेटिव्ह संस्थानिकांचा दर्जा कमी झाला. इतःपर त्यांस बरोबरीच्या नात्यानें वागविण्याची जरूर राहिली नाहीं. त्यांची योग्यता केवळ बड्या सरदारांसारखी राहिली, त्यांचें सैन्य कवाइतीच्या मैदानावर लांकडी पुतळ्यांप्रमाणें केवळ खेळ खेळण्याच्या उपयोगाचें झालें. त्यांस एकमेकांपासून भय उरलें नाहीं.

एकमेकांवर स्वाऱ्या करण्याची बंदी होतांच नेटिव संस्थानिकांचा धंदा बुडून जाऊन त्यांस कांहींच करावयाचें राहिलें नाहीं. इकडे अदृश्य अशा एका देवतेचा अंमल सर्वत्र बसत चालला होता, आणि सर्व घोटाळा मोडून जाऊन सुव्यवस्था लागत चालली होती. सार्वभौम सत्ताधिकाऱ्यांचा हुकूम ऐकून, आतां येथें कांहीं क्षमा व्हावयाची नाहीं असें पाहून, मोठ्या नाखुषीनें कां होईना, पुंड लोक आपलीं शिरें नमवून होते. संस्थानिक मंडळीनें आपला राज्यकारभार इतःपर सुव्यवस्थितपणें चालवावा, अशी त्यांस ठिकठिकाणीं दरबार भरवून सूचना करण्यांत आली, व कुराज्यव्यवस्थेचे दुष्परिणाम सौम्यपणानें त्यांच्यापुढें ठेवण्यांत आले. आतां आपल्या हातीं खरोखर कांहींच अधिकार राहिला नाहीं असें कळून येऊन त्यांचीं मनें उदास झालीं. त्यांजकडे नुसता नांवाला मात्र अधिकार होता, तेवढ्यानें त्यांची तृप्ति होईना, तेव्हां त्यांना एकच मार्ग राहिला होता, तिकडे ते वळले. त्यांची ऐषआरामाकडे प्रवृत्ति वळली. विषयलंपटपणा आणि कामासक्ति हीं या विनाशोन्मुख क्षत्रिय मंडळीच्या निशाणावर झळकूं लागलीं. स्त्री आणि मद्य यांचा एवढा पगडा बसल्याचें हें जगांत केवळ पहिलेंच उदाहरण होतें असें नाहीं. आपल्या ऐषआरामांत चूर होऊन गेल्यामुळें प्रजेनें केलेल्या विनवण्या त्यांस ऐकूं येईनाशा झाल्या, तसेंच ज्या विलक्षण सत्ताधारी राष्ट्रानें आपल्या कृपेची पाखर त्यांजवर न सांगतां घातली होती, त्याच्या अधिकाऱ्यांनीं दिलेल्या इशारतींकडेही ते लक्ष देईनातसे झाले. अशा स्थितींत ईश्वरी संकेताप्रमाणें त्यांना शिक्षा होण्याची वेळ अकस्मात् येऊन पोंचला, आणि

ते आपापल्या जनानखान्यांत, आणि मद्यपानोत्सवांत खडबडून जागे झाले. त्यांना झालेली ही शिक्षा अगदीं योग्य होती.

या ऐतिहासिक गोष्टींचा विचार करूं लागलें ह्मणजे लॉर्ड डालहौसीची मूर्ति डोळ्यापुढें येऊन उभी राहते. त्यानें केलेल्या गोष्टी कितपत न्याय्य होत्या याचा येथें विचार कर्तव्य नाहीं. त्याच्या महत्वाकांक्षेमुळें झांशी, सातारा, आणि अयोध्या येथील राज्यें इंग्रजी राज्यांत सामील झालीं. कित्येकांच्या मतें, इंग्रजी राज्यावर बंडाचें संकट त्यानेंच ओढविलें. हिंदुस्थानाच्या इतिहासांत त्यानें आपलें नांव ढोबळ अक्षरांनीं लिहून ठेविलें आहे, आणि त्याच्या करणीमुळेंच हिंदुस्थानास आजची स्थिति प्राप्त झाली आहे. विशेष बभ्रा न करितां, निष्ठुर अंतःकरण करून, त्यानें एकामागून एक इतिहासांत नमूद करून ठेवण्याजोग्या मोठमोठ्या गोष्टी केल्या, आणि उत्तरेकडील व्यसनाधीन राजांच्या दुष्कृत्यांमुळें खवळलेल्या ईश्वराच्या आणि सुधारणेच्या नांवानें निरनिराळ्या संस्थानिकांचीं राज्यें खालसा करून त्यांस शिक्षा केल्या, आणि त्यांचा सूड उगविला. इंग्लंडानें आपला शिक्षा करण्याचा अधिकार गाजविल्यामुळें मंडळी खवळून जाऊन त्यांनीं प्रथम एकच हाकाटी केली; पण ज्या अन्यायांचा प्रतीकार करण्याचें काम—ईश्वरी योजनेनें ह्मणा किंवा कसेंही ह्मणा—इंग्लंडाकडे होतें, त्या अन्यायांत आणखी कांहींची भर पडल्यामुळें, राज्य वाढविण्याची जी पद्धत वेलेस्ली बंधूंच्या वेळेपासून चालू होती, तिजविरुद्ध पुनः चकार शब्द सुद्धां ऐकूं आला नाहीं. नेटिव संस्थानिकांच्या अप्पलपोटेपणामुळें आणि व्यसनपरते-

मुळें हिंदुस्थानाचें राजकीय दृष्ट्या एकीकरण जरी अपरिहार्य झालें नसलें, तरी निदान शक्य तरी झालें.

सत्तावन सालचें बंड नुकतेंच मोडलें होतें, कानपूर येथील अनर्थाच्या आरोळ्या इंग्लिश लोकांच्या कानांत घुमतच होत्या, इतक्यांत राणी सरकारचा जाहिरनामा प्रसिद्ध झाला. याला सर्व नेटिव्ह लोक आपल्या स्वातंत्र्याची पहिली मोठी सनद असें मानतात. दानाची किंमत दात्याच्या वर्तनानुसार वाढत असते, तीच गोष्ट या सनदेसही लागू आहे. बंडानें सगळा देश हालवून दिलेला होता, आणि बंडखोरांचा चांगला सूड घ्या अशी राज्यकर्त्या वर्गाकडून ओरड चालली होती. गव्हर्नर जनरलांस भोळे शंकर ठरवून त्यांचा तिरस्कार करण्याचा क्रम चालू होता. इतक्यांत महाराणीसाहेबांनीं घाबरून दीन होऊन गेलेल्या हिंदुस्थानवासी प्रजेस अभय दिलें, आणि नवीन राज्यव्यवस्था सुरू करण्याचें आश्वासन दिलें. राणीसरकारच्या जाहिरनाम्यांत पुढील आश्वासनें होतीं:—

"आमच्या इतर सर्व प्रजांकरितां ज्या गोष्टी करण्यास आह्मी बांधलों गेलों आहों त्या हिंदुस्थानांतील आमच्या मुलखांतील प्रजेकरितांही करण्यास आह्मी बांधलों आहों असें आह्मी समजतों. * * * आमची आणखी अशी इच्छा आहे कीं, शिक्षण, हुषारी, आणि प्रामाणिकपणा यांच्यायोगानें आमच्या राज्यकारभारांतील जीं जीं कामें करण्यास आमची प्रजा, मग ती कोणत्याही धर्माची किंवा जातीची असो, लायक असेल, तीं तीं कामें करण्यास तिला होईल तितकें करून आमच्या नोकरींत घ्यावें.* * * त्यांची भरभराट हीच आमच्या राज्याची मजबुती, त्यांचें समाधान हीच त्याची

शाश्वतता आणि त्यांची कृतज्ञबुद्धि हेंच आह्मांला अति उत्तम बक्षीस होय. आमच्या प्रजेच्या कल्याणासाठीं आह्मांला आणि आमच्या हाताखालील कामगारांस आमच्या या इच्छा शेवटास नेण्यास सर्वशक्तिमान प्रभु सामर्थ्य देवो."

हिंदुस्थानांतील प्रत्येक सुशिक्षित मनुष्याच्या दिनचर्येशीं वरील शब्दांचा संबंध येतो. भावी सुखाची आशा बाळगण्याला, नवीन कल्पना उत्तेजित होण्याला, आणि समाधान मानण्याला, ख्रिस्ती लोकांना बायबल हें जसें साधन आहे, तसेंच हिंदुस्थानांतील सर्व जातींच्या आणि सर्व धंद्यांच्या लोकांना वरील शब्द हे साधन आहेत. राणीसरकाराचीं हीं वचनें पाळण्यांत आलीं आहेत काय? वाचक अंमळ पुढें वाचीत गेले ह्मणजे त्यांना इंग्लिश मुत्सद्यांच्या तोंडून निघालेल्या शब्दांनींच ह्या प्रश्नाचें उत्तर दिलेलें आढळेल. ते मुत्सद्दी आपल्या जन्मभूमीचीच नालस्ती करतील असें संभवत नाहीं. असो. ह्या जाहिरनाम्यापासून एका नवीन कालविभागाला सुरुवात झाली. आजपर्यंत इंग्लिश मुत्सद्यांनीं देशी राज्यकर्त्यांचें संरक्षण करण्याचीच कायती जबाबदारी स्वतःवर घेतली होती; इतउत्तर त्यांचा कार्यभार वाढून हिंदुस्थानांतील वीस कोट प्रजेची शिक्षणविषयक आणि सांपत्तिक स्थिती सुधारण्याचें कामही त्यांजकडेच आलें.

बंडापूर्वी तीन वर्षें हिंदुस्थानांतील लोकांना आणखी एक मोठा अधिकार मिळाला होता. राणीच्या जाहिरनाम्यानें हिंदुस्थानवासी प्रजेच्या राजकीय हक्कांचा जसा पाया घालून दिला, तसा १८५४ सालच्या खलित्यानें शिक्षणविषयक अधिकारांचा पाया घातला. तो खलिता पाठविणाऱ्या मंत्र्यांनीं

आपली देणगी केवळ पाण्यांत टाकली असें ह्मणणें योग्य होणार नाहीं. आपल्या नीतीचे अमोघ परिणाम त्यांच्या ध्यानांत पूर्वींच येऊन चुकले असले पाहिजत, आणि बुद्धि-पुरस्सरच तें धोरण अमलांत आणण्याचा त्यांचा विचार असला पाहिजे. बंड झालें ह्मणून इंग्लंडानें १८५४ चा खलिता रद्द केला नाहीं, किंवा कॅनिंगसाहेबांनीं १८५७ त स्थापन केलेल्या कलकत्ता, मद्रास आणि मुंबई येथील यूनि-व्हर्सिट्याही मोडल्या नाहींत. इंग्लंडाला स्वत:साठीं जे हक्क मिळविण्याला कित्येक शतकें झगडावें लागलें होतें, आणि त्रास सहन करावा लागला होता, त्यांपैकीं कांहीं हक्क राणी-सरकाराच्या राज्याधिरोहणापासून वीस वर्षांच्या आंत इंग्लंडानें हिंदुस्थानास राजीखुषीनें दिले. त्या हक्कांच्या संपादनार्थ आपणास पडलेली दगदग आणि त्रास इंग्लंडानें हिंदुस्थाना-च्या वांट्यास मुळींच येऊं दिलीं नाहींत इतकेंच नाहीं, तर पार्लमेंटाकडून एक कायदा करवून सनदी नोकऱ्या मिळवि-ण्यासाठीं पाहिजे त्यास परीक्षा देण्याची एकसहा परवानगी दिली, आणि वशिल्यानें नेमणुका करण्याची पूर्वींची पद्धत माजी पाडली. लंडन येथें होणाऱ्या परीक्षेंत यश मिळविणारास हिंदुस्थानाच्या राज्यकारभारांतील सर्वांत श्रेष्ठ जागा देखील मिळूं शकतील असें जाहीर करण्यांत आलें. विशिष्ट विद्याल-यांतील विद्यार्थ्यांस हिंदुस्थानांतील राज्यकारभाराकरितां तयार करून पाठविण्याची जी पद्धत पूर्वीं चालू होती, तींत ही मोठीच सुधारणा झाली. सर वुइल्यम हंटर यांनीं १८८८ सालीं कॉन्टेंपोररी रिव्ह्यूमध्यें लिहिलेल्या एका उत्कृष्ट निबंधावरून वरील संक्षिप्त इतिवृत्त आठवलें तसें लिहिलें

आहे. हें अर्थातच अपुरें असून ह्यांत सर्व गोष्टींचें विवेचन आलें नाहीं. वरील हकीकत १८९८ या सालापर्यंत आलेली आहे, तरी अंमळ सिंहावलोकन करून राणीच्या जाहिरनाम्या-पूर्वीं पुष्कळ वर्षें हिंदुस्थानांतील लोकांच्या राज्यकारभाराशीं मोठमोठे इंग्रज मुत्सद्दी कसा काय संबंध ठेवीत असत हें पाहिलें पाहिजे. या सिंहावलोकनापासून तीन तऱ्हेनें उपयोग होणार आहे. एक तर हिंदुस्थानाच्या इतिहासांत ज्या इंग्रज मुत्सद्यांचीं नांवें चिरकाल नोंदलेलीं राहतील त्यांच्या दृष्टीनें हिंदुस्थान हा देश हिंदुस्थानाच्याच फायद्याकरितां इंग्लंडाच्या सत्तेखालीं आलेला आहे, असा त्यांचा अभिप्राय त्यावरून दिसून येईल; दुसरें असें कीं, हिंदुस्थानाच्या लोकांस पुढें आपल्या देशाच्या राज्यकारभारांत बराच भाग घेतां येईल अशी आशा त्यांना लागली, हेंही त्यावरून दिसून येईल; आणि तिसरें असें कीं, राणीसरकार बालपणांत असतां जे मुत्सद्दी इंग्लंडाचा राज्यकारभार चालवीत होते, त्यांनीं उघड बोलून दाखविलेल्या विचारांचेंच परिपक्व फल राणीच्या जाहिरनाम्याच्या रूपानें प्रकट झालें आहे, हेंही त्यावरून दिसून येईल.

१८३३ सालीं पार्लमेंटमध्यें हिंदुस्थानाच्या राज्यकाभारा-ची जेव्हां बारकाईनें चौकशी झाली तेव्हां मार्किस ऑफ लॅन्सडाउन यांनीं हाउस ऑफ लॉर्ड्स्मध्यें जें भाषण केलें, त्यांतून पुढील उतारा घेतला आहे:—

'नवीन व्यवस्थेपासून प्रचंड लोकसमूहाच्या पुढील आयु-ष्यक्रमावर जे परिणाम व्हावयाचे आहेत, त्यांकडे जर मीं आपलें ( हाउस ऑफ लॉर्ड्स्च्या सभासदांचें ) लक्ष लाविलें

नाहीं, तर दहा कोटी लोकांच्या सुखदुःखासंबंधाच्या प्रश्नाचें अत्यंत महत्व न जाणतां मीं या विषयाचा अगदीं संकुचित दृष्टीनें विचार केला असें होईल. हिंदुस्थानावर आपली जी प्रचंड आणि अपूर्व सत्ता पसरली आहे ती योग्य आहे, असें ईश्वरापुढें शाबीत करून देण्यासाठीं, आपल्या अंमलाखालील लोकांस आपण सुख दिलें पाहिजे, आणि सर्व जगाला आणि हिंदुस्थानच्या लोकांना, अत्यंत शहाणा आणि उदारधी मुसलमान बादशहा अकबर याच्या पश्चात् त्याचें राज्य अयोग्य लोकांच्या हातीं गेलें नाहीं असें दाखवून दिलें पाहिजे, असें ज्याप्रमाणें मला वाटत आहे त्याचप्रमाणें आपणांलाही वाटेल, अशी माझी खात्री आहे. यासाठींच, हिंदुस्थानाचा राज्यकारभार ईस्ट इंडिया कंपनीच्या हातून इंग्लंडच्या राजाच्या हातीं आला, ह्मणजे हिंदुस्थानच्या जमाबंदीसंबंधानेंच केवळ नव्हे, तर तिकडील लोकांचा स्वभाव ज्यांस चांगला माहीत आहे असे अत्यंत हुषार आणि माहितगार लोक राज्यकारभाराच्या कामासाठीं आपणांस मिळणें अवश्य आहे. हिंदुस्थानचे लोक कोणत्या प्रकारचे आहेत त्याबद्दल बिनचूक माहिती देण्याला लायक अशा लोकांच्या साक्षींचा विचार करितां, त्या लोकांची स्थिती सुधारण्यासाठीं स्थानिक गोष्टींच्या व्यवस्थेचा बराच भाग त्यांच्या स्वाधीन केला पाहिजे असें मी खात्रीनें सांगू शकतों. परिपक्व वयांत नैसर्गिक आणि संपादित ज्ञान बरोबर घेऊन पूर्वेकडे गेलेल्या लोकांच्या अत्यंत विश्वसनीय अशा साक्षी, त्याचप्रमाणें नेटिवांच्या हातीं व्यवस्था दिल्यानें चांगला परिणाम झाल्याच्या हकीकती, या विषयासंबंधानें आपणापुढें आलेल्या आहेत. हिंदुस्थानवासी लोकांची मानसिक उन्नती करणें शक्य आहे

असें शाबीत करून देणाऱ्या गृहस्थांपैकीं फक्त दोघांचाच उल्लेख मी करणार आहें. हे दोघेही बिनचूक निवाडा देण्यास लायक असून त्या दोघांनीं हिंदुस्थानांतील लोकस्थिती निरनिराळ्या दृष्टींनीं पाहिली आहे हें विशेष फायदेशीर आहे. हे दोन साक्षीदार ह्मटले ह्मणजे सर टॉमस मनरो आणि बिशप हीबर हे होत. मनुष्यस्वभावासंबंधानें आणि विशेषतः हिंदुस्थानांतील लोकांसंबंधानें अभिप्राय देण्याला ह्या दोघांहून अधिक लायक मनुष्य मिळणें शक्य नाहीं असें मला वाटतें. दोघेही अत्यंत बुद्धिवान् आणि प्रामाणिक होते. तथापि ते निरनिराळ्या कामगिऱ्यांवर असल्यामुळें या बाबतींत त्यांचीं मतें भिन्न भिन्न पडणें शक्य होतें. सर टॉमस मनरो यास लहानपणापासून पूर्वेकडील घडामोडींची आणि राज्यपद्धतीची चांगली माहिती झालेली होती. बिशप हीबर हाही सुसंस्कृत विद्वान् आणि ख्रिस्ती तत्ववेत्ता असून परिणत वयांत हिंदुस्थानांत गेला होता, आणि तिकडील लोकांच्या स्वभावाचें ज्ञान करून घेण्यांत त्यानें आपल्या संपादित ज्ञानाचा उपयोग केला होता. या दोघांच्याही निरनिराळ्या प्रसिद्ध ग्रंथांतून प्रस्तुत विषयासंबंधानें काढून ठेवलेले कांहीं उतारे माझ्याजवळ आहेत, आणि आपल्या परवानगीनें मी त्यांतून कांहीं भाग वाचून दाखवितों. हिंदुस्थानवासी लोकांसंबंधानें सर टॉमस मनरो ह्यांनीं असें ह्मटलें आहे कीं, ‘ नैसर्गिक बुद्धिमत्तेंत ते लोक आपणांहून कमी आहेत असें आपण मानिलें नाहीं, (आणि असें मानण्याला आधार नाहीं), ह्मणजे युरोपियन लोकांनीं त्यांचीं कामें करण्यापेक्षां तेच आपलीं कामें करण्याला अधिक लायक ठरतील, हें अधिक संभवनीय आहे. कारण त्यांची

संख्या मोठी असल्यानें तींतून जितकी चांगली निवड करतां येईल तितकी युरोपीयन लोकांतून निवड करतां येणार नाहीं. नेटिव अधिकारी पसंत करावयाचे ते सगळ्या हिंदुस्थानांतून आह्मांला पसंत करतां येतील, पण त्यांच्या जागीं इंग्रज आणावयाचे ह्मणजे कंपनीच्या थोड्याशा सनदी नोकरांतूनच आह्मांला निवड करावी लागते. एतद्देशीय लोकांना अधिकाराच्या जागा देऊं नयेत अशी जी वेडगळपणाची कल्पना आहे तीहून वाईट अशी दुसरी कोणतीच कल्पना 'कृष्णयुगां'त उत्पन्न झाली नसेल. कीर्ति, संपत्ति, किंवा अधिकार संपादन करण्याची आशा सोडून दिली, तर कोणत्याही युगांत किंवा कोणत्याही देशांत मनुष्याला ज्ञान संपादन करण्यास लावणारें दुसरें काय आहे? अंगीं मोठमोठे गुण असून त्यांचा विनियोग स्वदेशबंधूंच्या सेवेकडे करितां येत नाहीं, तर त्या गुणांचें चीज दुसऱ्या कशानें होणार? तर मग ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें देशाच्या राज्यकारभारांतील निरनिराळ्या कामगिऱ्या ज्याला त्याला द्यावयास नकोत काय? आमच्या ग्रंथांचा त्या लोकांत प्रसार करण्यापासून ह्मणण्यासारखा फायदा होणार नाहीं. नुसतें कोरडें वाङ्मय घेऊन राष्ट्राचा स्वभाव बदलणार नाहीं. पाश्चिमात्य विद्येच्यायोगानें संपत्ति, सन्मान आणि सरकारी अधिकार यांचा मार्ग जर खुला होईल तरच हा परिणाम घडून येणार आहे. असे कांहीं तरी लाभ होण्याची आशा असल्याशिवाय शास्त्रांत केवळ पारंगत होण्यानेंच मनुष्याचा स्वभाव सुधारणार नाहीं.' हिंदुस्थानाच्या प्रत्येक भागांत प्रत्येक सरकारी खात्यांत अनुभव मिळविल्यानंतर सर टॉमस मनरो यांचा जो अभिप्राय झाला

होता, तो वरील प्रकारचा होता. बिशप हीवर यांनीं धर्मा-खातर आणि परोपकारार्थ हिंदुस्थानांत पुष्कळ प्रवास केला असून अखेर प्रवासांतच त्यांचा अंत झाला. त्यांनीं नमूद करून ठेवलेला पुढील अभिप्राय लक्षांत ठेवण्याजोगा आहे. "हिंदु लोकांच्या जातिस्वभावासंबंधानें माझें चांगलें मत होण्यास प्रत्यहीं अनेक गोष्टी माझ्या नजरेस पडतात. मि. बेली, आणि मि. मेलव्हिल या दोघांचें माझ्याप्रमाणेंच मत आहे कीं, 'ते स्वभावानें मायाळू, उद्योगी, निर्व्यसनी आणि शांतता-प्रिय लोक आहेत. शिवाय, प्रसंगविशेषीं आपल्या अंगीं धैर्य आणि पौरुष आहे असें दाखविण्यासही ते मागें सरत नाहींत.' " आणखी एके ठिकाणीं त्याच बिशपसाहेबांनीं असें ह्मटलें आहे कीं 'कांहीं लोक स्वभावतःच गरीब, उपकारी, बुद्धि-मान, अव्यसनी आणि काटकसरी असून त्यांस कांहीं लालूच दाखविल्यास ते झटून उद्योग करणारे असतात असें स्पष्ट दिसून येतें.' आपलें मतही अशाच तऱ्हेचें झालें पाहिजे, आणि त्या लोकांच्या हातून मागील युगांत ज्या गोष्टी घडल्या आहेत, आणि आपल्या उपकारकर्त्यांचीं आणि मित्रांचीं जीं स्मारकें त्यांनीं भक्तिपूर्वक आणि कृतज्ञतापूर्वक करून ठेविलीं आहेत त्यांचा आपण विचार केला, तर आपला अभिप्राय मी ह्मणतों असाच पडला पाहिजे. एका कवीनें ह्मटलें आहे—

'येथेंच गुणी लोकांस आपल्या गुणांचा मोबदला मिळतो, दुःखितांविषयीं अनुकंपा उत्पन्न होते आणि त्यांचीं दुःखें हृदयाला भेदून टाकतात'

हें ह्मणणें जर एखाद्या देशास नीट रीतीनें लागू पडत असेल तर तें हिंदुस्थानासच लागू पडतें. यद्यपि त्या देशांतील

सुधारणेवर कितीही धुरळा पडला असला, किंवा परकीय सत्ते-मुळें किंवा धर्मभोळेपणामुळें त्यांचें नैतिक वर्तन कितीही बिघडलें असलें, तरी त्यांची सुधारणा होण्यासारखी स्थिति अद्याप आहे. त्या लोकांच्या मानसिक आणि नैतिक सद्गुणांस जर आपण वाढीस लाविलें नाहीं, तर आपलें कर्तव्य बजाव-ण्यांत आपण मोठी कसूर केल्यासारखें होईल. मी जी नवीन पद्धती सुरू करण्याविषयीं सूचना करणार आहें तींतील एक तत्व असें आहे कीं, हिंदुस्थानसरकाराच्या ताब्यांतील प्रत्येक नोकरीवर प्रत्येक नेटिवाचा–मग तो कोणत्याही जातीचा, पंथाचा, किंवा धर्माचा असो–सारखा हक्क असावा, आणि ही व्यवस्था पूर्णपणें अंमलांत आणण्याचा प्रयत्न सरकार मनापासून करील अशी मी आशा बाळगतों. ही व्यवस्था लोकांना फायदेशीर होऊन हिंदुस्थानाच्या निरनिराळ्या भागांत काटकसर करण्याचे जे प्रयत्न चालू आहेत त्या प्रयत्नांचे दृष्टीनेंही फायदेशीर होईल.' ह्या प्रश्नाची दुसरी बाजू लॉर्ड एलेनबरो यांनीं हाउस ऑफ लॉर्ड्सपुढें मांडिली, ती अशी:–

'हिंदुस्थानाचें कल्याण व्हावें अशी मला अत्यंत उत्कट इच्छा आहे, आणि त्या देशाशीं निकट संबंध असलेल्या अधिकारावर मी सरकारचे वतीनें असतां त्या देशाची भरभराट होण्यासाठीं आपल्या हातून होईल तितकें करणें हें मी आपलें कर्तव्य समजत असें. हिंदुस्थानवासी लोकांचें नैतिक वर्तन सुधारावें असें मला मनापासून वाटत होतें. हिंदुस्थानांतील सर्वांत मोठ्या अधिकाराच्या जागा नेटिव लोक कधीं काळीं तरी चालवूं लागून त्या देशाचा फायदा होईल, आणि त्यांची कीर्ति होईल या गोष्टी शक्य आहेत असें मला वाटतें; पण

ती गोष्ट आपल्या हयातींत आपणास पाहायास मिळेल असें मला वाटत नाहीं. अशी वेळ कधीं तरी येईल असें मला वाटतें खरें, पण ती आजपासून फार लांब आहे असें मला वाटतें. माझी अशी सूचना आहे कीं हिंदुस्थानांतील कनिष्ठ वर्गांवरील कराचें ओझें कमी करणें हा त्यांच्या कल्याणाचा एकच मार्ग आहे, तो स्वीकारून समाजांतील वरच्या पायरीवर त्यांस बसविलें पाहिजे, आणि अशा योगानें अधिकाराचीं आणि जबाबदारीचीं कामें करण्यास त्यांस पात्र केलें पाहिजे. अशी सामाजिक स्थिती घडवून आणण्याचा एकदम प्रयत्न केला असतां आपला हेतु अजीबात फसेल. हिंदुस्थानांतील अधिकाराच्या यच्चयावत् जागा नेटिव लोकांच्या हातीं देण्याचा दिवस कधीं काळीं येईल असें मात्र मला वाटत नाहीं. राजकीय आणि लष्करी अधिकार नेटिव लोकांकडे सोंपविण्याचें कोणीही शहाणा मनुष्य मनांत आणणार नाहीं.' यावर मार्किस ऑफ लॅन्सडाउन यांनीं असा खुलासा केला कीं, 'कायद्यानें राज्यकारभारांतील सर्व जागा नेटिव लोकांस खुल्या असाव्या एवढीच सरकारतर्फेची सूचना आहे.' लॉर्ड एलेनबरो ह्मणाले, 'सरकारच्या सूचनेंत असे शब्द आहेत खरे, पण नेटिव लोकांना लष्करी आणि राजकीय अधिकार मिळूं न देण्यावरच आमचें हिंदुस्थानांतील अस्तित्व अवलंबून आहे. आह्मी त्या स्थितींत सुखासुखीं जाऊन पडलों नाहीं, आणि तेथून आह्मीं आपलें अंग काढून घेतलें असतां हिंदुस्थानाच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत रक्तपात झाल्यावांचून राहणार नाहीं. आह्मीं हिंदुस्थान तरवारीच्या जोरावर मिळविलें असून तरवारीनेंच तें राखिलें पाहिजे, आणि आमचें अस्तित्व तेथें

कायम राखून मग तेथील लोकांच्या हितार्थ जें कांहीं करितां येईल तें केलें पाहिजे.'

मेकॉले साहेबांनीं लॉर्ड एलेनबरो यांस दिलेलें उत्तर थोडेसें लांबलचक आहे तरी तें येथें देणें गैर होणार नाहीं. मेकॉले यांचे उद्गार प्रत्येक सुशिक्षित नेटिवाच्या परिचयांतले असून ते त्याला मुखोद्गत असतात, आणि त्यांतील उदात्त विचारांपासून त्यास आनंदही होत असतो. मेकॉलेसाहेब ह्मणालेः—

'मीं सभाजनांचा बराच वेळ घेतला असल्यामुळें या बिलाच्या कित्येक भागांसंबंधानें (हे भाग महत्वाचे आहेत खरे, पण पूर्वी निर्देश केलेल्या भागांपेक्षां बरेच कमी महत्वाचे आहेत.) मला जें बोलावयाचें आहे, तें आपली कमिटी भरून या बिलाचा विचार चालू झाला ह्मणजे बोलेन; पण इतरत्र या बिलावर जी टीका झाली आहे ती माझ्या नजरेस आल्यावरून एका गोष्टीसंबंधानें चार शब्द जरूर सांगितले पाहिजेत असें मला वाटतें. हिंदुस्थानांतील आमच्या राज्यांतील कोणताही नेटिव मनुष्य आपल्या वर्णामुळें, जातीमुळें किंवा धर्मामुळें सरकारी अधिकार चालविण्यास अपात्र मानिला जाणार नाहीं, असें जें एक कलम मोठ्या उदार बुद्धीनें आणि शहाणपणानें ह्या बिलांत घातलें आहे, त्यासंबंधानें मी बोलणार आहें. मला कोणीं कांहीं नांवें ठेविलीं तरी प्रस्तुत बिलांत अशा तऱ्हेचें एक कलम आहे, आणि या बिलाचा मसुदा तयार करण्यांत माझी यथाशक्ति मदत झाली आहे, या गोष्टींचा मी हयात आहें तोंपर्यंत मला अभिमान वाटत राहील. लष्करी आणि सनदी नोकरींतील श्रेष्ठ जागा हिंदुस्थानवासी लोकांना देण्याची वेळ कधींही येणार नाहीं, हिंदुस्थानांत

आमची जी सत्ता चालवयाची ती याच अटीवर, आणि हिं-दुस्थानवासी प्रजेला जे फायदे करून घेतां येतील किंवा आह्मांला करून देतां येतील, ते तिला आह्मी द्यावयाचे नव्हेत, तर आमचें वर्चस्व कमी न होतां जे फायदे आह्मांला करून देतां येतील तेवढेच फायदे आह्मी करून द्यावयाचे आहेत, असें या बिलाचे आक्षेपक ह्मणत आहेत. त्यांचे हे विचार नीति आणि न्याय यांला अनुसरून मुळींच नाहींत असें मी साफ ह्मणूं शकतों. असल्या नाज़ूक बाबतींत आपण कांहीं तरी घाईनें करून टाकावें अशी माझी मुळींच इच्छा नाहीं. हिंदुस्थानाच्या कल्याणासाठींच नेटिव लोकांस मोठमोठे अधिकार द्यावयाचे, ते हळूहळू दिले पाहिजेत, हें मी समजून आहें. पण तशी वेळ आली असून, आणि हिंदुस्थानाच्या हितार्थ आपलें धोरण बदलणें अवश्य असून देखील आपली सत्ता नाहींशी होईल या भयानें आपण तें बदलण्याचें नाकारलें पाहिजे, असें मत प्रतिपादन करणाराचा मला संताप येतो. व्यक्तीप्रमाणेंच सरकारालाही आपला आयुष्यतंतू शाबूत ठेवण्यास वाजवीपेक्षां फाजील खर्च किंवा नुकसान सोसावें लागेल. आपल्या जीविताचें संरक्षण करितांनां जीविकेच्या साधनांचा एखाद्यानें सफाई नाश केल्यास त्याला आपण शाहणा समजणार नाहीं. प्रस्तुत प्रसंगीं असलें वर्तन अनादरास पात्र होईल इतकेंच नाहीं, तर तें वेडगळपणाचें मानलें जाईल. राज्याचा नुसता विस्तार हटकून फायदेशीर होतो असें नाहीं. राज्य-विस्ताराची पुष्कळ राष्ट्रांना अडचण झाली आहे, आणि कित्येकांचा त्यामुळेंच नाश झाला आहे. समाजाची भरभराट ह्मणजे समाजांतील सर्व व्यक्तींची भरभराट होय; तसेंच

ज्या राज्यविस्तारापासून कोणत्याही व्यक्तीला समाधानाचा किंवा स्वास्थ्याचा लाभ होत नाहीं, असला राज्यविस्तार असावा अशी अपेक्षा करणें ह्मणजे ती अगदीं बालिशपणाची महत्वाकांक्षा आहे. ज्ञान, संसारसामग्रीविषयीं अभिरुचि, आणि ती सामग्री मिळण्यास लागणारा पैसा, या बाबतींत मनुष्यजातीच्या एखाद्या भागाचें पाऊल पुढें पडलें, तर आमच्यासारख्या व्यापारी आणि कारखानदार राष्ट्राला त्याबद्दल आनंदच झाला पाहिजे. पूर्वेकडील प्रचंड लोकसमूहांत युरोपीयन सुधारणेचा प्रसार करण्यापासून आपणाला जे फायदे होतील त्यांची कल्पना करितां येत नाहीं. अगदीं अप्पलपोटेपणाच्या दृष्टीनें जरी या गोष्टीचा विचार केला तरी हिंदुस्थानच्या लोकांवरील आमचा राज्यकारभार वाईट रीतीनें चालत असून ते लोक आमचे अंकित असण्यापेक्षां, ते स्वतंत्र असून त्यांच्या वरील राज्यकारभार चांगला चालावा, यांतच आपलें अधिक हित आहे. कारण, इंग्रजी व्यापाराच्या जिनसांची योग्यता न कळण्याइतके ते अडाणी, अथवा त्या विकत न घेण्याइतके ते दरिद्री राहून गोऱ्या अधिकाऱ्यांपुढें त्यांच्या नमून राहण्यानें आपणास जो फायदा होणार आहे, त्यापेक्षां त्यांचें राज्य स्वतंत्र असून ते आमच्या कारखान्यांत तयार झालेले जिन्नस वापरतील तर आपला जास्त फायदा आहे. रानटी लोकांवर अंमल चालविण्यापेक्षां सुधारलेल्या लोकांशीं व्यापार करण्यांत अतोनात अधिक फायदा आहे. दहा कोट लोक सदोदित आपले गुलाम बनून राहावे या इच्छेनें आमच्या व्यापारी जिनसांची गरज त्यांना लागूं नये अशा अडाणी आणि दरिद्री स्थितींत त्यांना ठेवून हिंदुस्थानासारखें निरुपयोगी आणि महागाईचें राज्यरूपी लोढणें

जे मुत्सद्दी आपल्या गळ्यांत बांधून घेतील त्यांना ह्मातारचळ लागला असें ह्मटलें पाहिजे.

'बर्निअर नामक प्रवाशानें असें लिहिलें आहे कीं हिंदुस्थानांतील कित्येक जुलमी राजांना आपल्या प्रजेपैकीं एखादा प्रसिद्ध मनुष्य फार हुषार आणि दमदार दिसून आल्यास त्याचें त्यांना फार भय वाटे; तेव्हां ते अफूपासून तयार केलेल्या मादक पदार्थाचा कांहीं अंश रोज त्याजकडून खाववीत, ह्मणजे त्यायोगानें थोड्याच दिवसांत त्या बिचाऱ्याची शारीरिक आणि मानसिक शक्ति लयास जाई आणि तो अगदीं वेडगळ बनून जाई. मारेकरी घालण्यापेक्षांही अधिक भयंकर अशी ही निंद्य युक्ती ज्यांनीं अमलांत आणली त्यांना ती शोभो. इंग्लिश राष्ट्रानें तरी तो कित्ता गिरवूं नये. येथून तेथून एखाद्या समाजाला तसलेंच एखादें मादक आणि घातक विष चारणें आह्मांला बिलकुल मान्य नाहीं. ईश्वरानें आमच्या स्वाधीन केलेल्या राष्ट्रांतील लोक आमच्या अंमलाखालीं तसेच मुकाट्यानें राहावे ह्मणून त्यांच्या बुद्धीचा अंकुर खुडून टाकणें आणि त्यांची शक्ती नाहींशी करणें हें वाजवी नाहीं. तीन हजार वर्षेंपर्यंत सोसलेल्या राजकीय आणि धार्मिक जुलमामुळें निकृष्टावस्थेस येऊन पोंचलेल्या लोकांसंबंधानें, ज्ञानाचा आणि राजकीय स्वातंत्र्याचा पुष्कळसा अनुभव घेणाऱ्या आमच्यासारखा राष्ट्राचें, राज्यकर्ते या नात्यानें जें कर्तव्य आहे त्याचें उल्लंघन करून, अज्ञान, व्यसनें आणि दुःख यांत बुडून गेलेल्या लोकांवर आह्मांला जें स्वामित्व स्थापन करितां येणार आहे, त्याची मातब्बरी ती किती ! मनुष्यजातीच्या कोणत्याही भागाला स्वातंत्र्य आणि

सुधारणा यांचा लाभ मिळवून देण्यास जर आह्मी तयार नसलों, तर आह्मी स्वतंत्र आणि सुधारलेले असून नसून सारखेच. तेव्हां, हिंदुस्थानांतील लोकांना आपल्या कह्यांत ठेवण्यासाठीं त्यांना तसेंच अज्ञानांत ठेवावयाचें आहे काय? कां त्यांना ज्ञान दिलें तरी त्यांच्या मनांत महत्वाकांक्षा उत्पन्न होणार नाहीं असें आह्मांला वाटतें? कां महत्वाकांक्षा उत्पन्न केली तरी तिचें समाधान करण्यास कायदेशीर मार्ग खुले ठवणं आह्मांस अगदीं अनवश्यक वाटतें? या प्रश्नांस विधिपक्षीं उत्तर कोण देईल? पण नेटिव लोकांना मोठ्या अधिकाराच्या जागा कधींही देऊं नये असें जे ह्मणत आहेत त्यांना तसेंच उत्तर दिलें पाहिजे. आपणांस आपल्या कर्तव्याचा मार्ग स्पष्ट दिसत आहे, आणि तोच शहाणपणाचा, आपल्या राष्ट्राच्या भरभराटीचा, आणि लौकिकाचा मार्ग आहे. हिंदुस्थानांतील आमच्या राज्याचें पुढें काय होणार आहे तें सांगत येत नाहीं. राजकीय दृष्ट्या हिंदुस्थानाचें इतर कोणत्याही देशाशीं साम्य आढळून येत नाहीं, आणि तें एका निराळ्याच स्वतंत्र वर्गांत जाऊन बसतें, यामुळें त्याचें पुढें काय होणार याची अटकळ आह्मांस बांधतां येत नाहीं. त्याच्या उन्नतीचे आणि अवनतीचे नियम अद्याप आह्मांला कळलेले नाहींत. आमच्या राज्यपद्धतीखालीं हिंदुस्थानांतील लोकांचीं मनें विकसित होऊन त्यांना अधिक चांगली पद्धति असावीसें वाटेल, सुराज्य-व्यवस्थेचें शिक्षण त्यांना दिल्यामुळें स्वतःच अधिक चांगला राज्यकारभार चालविण्याची त्यांच्या अंगीं ताकद येईल, आणि यूरोपीय ज्ञान संपादन केल्यामुळें पुढें केव्हां तरी आपणांस यूरोपीय संस्था असाव्या असें त्यांस वाटूं लागेल, हें सा-

हजिक आहे. असा दिवस कधीं काळीं येईल किंवा नाहीं हें मला सांगतां येत नाहीं, पण तो लौकर येऊं नये किंवा मुळींच येऊं नये ह्मणून मी कधींही खटपट करणार नाहीं. तो दिवस जेव्हां उगवेल तेव्हां इंग्रजी इतिहासांत मोठ्या भाग्याचा होईल. अज्ञान आणि पारतंत्र्य यांत रुतलेल्या राष्ट्रावर अंमल चालवून नागरिकांचे सर्व हक्क मिळविण्याची इच्छा आणि पात्रता त्यांच्या अंगीं आणिल्यानें आमची विशेष कीर्ति होईल. आमचें राज्य आमच्या हातून जाईल, अदृष्ट प्रसंग घडून येऊन आमचीं खोल कारस्थानें फसतील, लढाईंत आमचा नेहमींच जय होईल असेंही नाहीं, पण हा जो जय आहे, त्याच्यामागें कधीं पराभव लागलेलाच नाहीं. निसर्गाचीं विनाशोत्पादक कारणें या सत्तेचा उच्छेद करूं शकत नाहींत. तो जय ह्मणजे शांततेच्या काळांत रानटीपणावर ज्ञान जो पगडा बसवितें तो होय, आणि ती सार्वभौम सत्ता ह्मणजे आमच्या कला, आमचे नीतिनियम, आमचें ग्रंथभांडार आणि आमचे कायदे यांनीं स्थापन केलेलें आपलें अक्षय्य वर्चस्व होय.'

या वादविवादाच्या वेळीं मि. वुइन् यांनीं पुढें लिहिल्याप्रमाणें विचार प्रकट केले:—

'पूर्वीं भाषण केलेल्या सन्माननीय सभासदांनीं आपल्या भाषणाच्या अखेरीस सभेच्या मनावर ज्या विचारांचा ठसा उमटविण्याचा प्रयत्न केला, ते विचार मला पूर्णपणें मान्य आहेत. हिंदुस्थानाच्या राज्यकारभाराशीं माझा संबंध जडल्यापासून माझी खात्री होऊन गेली आहे कीं नेटिव लोकांचा तेथील राज्यकारभारांत हात असून त्यांना ज्या ज्या जागेचें काम नीटपणें करितां येईल ती ती जागा त्यांना दिलीच पाहिजे.

तरच ब्रिटिश राज्य न्यायानें आणि शहाणपणानें चालून उभय देशांचें हित होत आहे असें ह्मणतां येईल. सर टॉमस मनरो आणि त्यांजसारखे हिंदुस्थानांतील मोठमोठे हुषार अधिकारी या मताला अनकूल आहेत. तरी त्याजविरुद्ध जाणारे हटवादी आणि दुराग्रही लोक थोडे नाहींत. नेटिव्ह लोक कितीही बुद्धिमान आणि हुषार असले तरी त्यांजवर कोणतेंही जबाब-दारीचें काम टाकणें योग्य नसून ते प्रामाणिकपणानें वागतील अशी खात्री देतां येत नाहीं, असें प्रतिपादन करण्यांत येऊन त्याच्या पुष्टीकरणार्थ त्यांनीं लांच घेतल्याचीं उदाहरणें आणि त्यांच्या दुष्टपणाचीं कामें दाखविण्यांत येतात. पण या गोष्टी आमचें त्या लोकांशीं जें वर्तन आहे त्याचाच परिणाम नव्हेत काय? लोकांत मान्यता किंवा पगार यांच्या रूपानें त्यांस योग्य मोबदला न देतां महत्वाचीं कामें त्यांजवर सोंपविण्यांत आलेलीं असतात, आणि विश्वासूपणानें काम केल्याबद्दल बढतीचें किंवा बक्षिसाचें नांवही नाहीं. मग लांचलुचपतीचे प्रकार त्यांच्यांत चालू असल्याबद्दल आपण त्यांस नांवें कां ठेवावीं? त्याच्यांत दुर्गुण आह्मींच उत्पन्न केले, आणि आह्मींच आतां त्यांना शिक्षा करणार? त्यांना गुलामांच्या स्थितीस आह्मींच नेऊन पोंचविलें असून गुलामांचे दुर्गुण यांच्या अंगीं असल्याबद्दल आतां त्यांस आह्मी नांवें ठेवीत आहों."

मि. चार्ल्स ग्रँट यांनीं आपला अभिप्राय पुढें लिहिल्या-प्रमाणें प्रकट केला आहे:—

"या वादविवादांत ज्या कित्येक सूचना पुढें आल्या आहेत त्यांचा थोडक्यांत विचार करण्याचा माझा इरादा आहे. पण त्या कामाला सुरवात करण्यापूर्वीं माझे सन्मान्य आणि

विद्वान मित्र लीड्स् शहराच्या वतींचे सभासद यांनीं जें भाषण केलें आहे त्याबद्दल सभेनें जसे धन्योद्गार काढले आहेत तसेच धन्योद्गार काढण्याची ही संधी वायां जाऊं द्यावी असें मला वाटत नाहीं. खरा मुत्सद्दीपणा आणि शहाणपणा कोणत्या प्रकारच्या वर्तनांत आहे याचें त्यांनीं जें विवरण केलें आहे त्याहून अधिक चांगलें विवरण या सभागृहांत पूर्वी कधींच झालें नसेल. वक्त्याला आपल्या वक्तृत्वाच्या द्वारानें ज्या कित्येक उदात्त गोष्टी सांगतां येण्यासारख्या आहेत किंवा कवीला ज्या आनंदमय स्वर्गीय गोष्टींचें वर्णन करितां येण्या सारखें आहे, मनुष्य-स्वभावांत जें कांहीं खरोखर मोठें, उच्च किंवा सद्गुणपूर्ण आहे, त्याचें त्यांनीं वर्णन केलें आहे. त्यांच्या वक्तृत्वानें जर सभा इतकी तटस्थ होऊन गेली, तर जीं उदात्त तत्त्वें मीं प्रथम सभेपुढें मांडिलीं होतीं, त्यांचीच माझ्या मित्रांनीं सुंदर रीतीनें मांडणी केलेली पाहून मला काय वाटलें असेल त्याची कल्पना आपणच करावी. सभेला या बिलांतील मुख्य तत्त्व मान्य झालें आहे, आणि ईश्वरानें आमच्या हातीं दिलेल्या विस्तृत राज्याची भरभराट होईल असे कायदे करण्याचें जें कर्तव्य पार्लमेंटवर आहे, त्यापुढें द्रव्य मिळविणें किंवा व्यापार आणि जमाबंदी वाढविणें या गोष्टींची मातब्बरी न मानून हिंदुस्थानाच्या हिताच्या दृष्टीनें पार्लमेंट सभा कायदे करण्यास तयार झाली आहे, हें पाहून मला जितका आनंद वाटतो, तितका दुसऱ्या कोणत्याही गोष्टीनें वाटत नाहीं.

"युरोपीयन लोकांस हिंदुस्थानांत पाठविणें अवश्य आहे, हें जरी मी जाणून आहें, तरी त्यांस तिकडे घेण्यासंबंधानें ज्या अटी आहेत त्यांपैकीं कोणतीही अट काढून टाकल्यापासून

नेटिव्ह लोकांचें हित होत असेल तरच ती काढून टाकण्यांत यावी. नेटिव्ह लोकांच्या स्वास्थ्याची तजवीज करून मग पाहिजे तर ब्रिटिश लोकांस त्या विस्तीर्ण देशाचे दरवाजे खुले करून द्या, आणि त्यांस तिकडे परकी लोक ह्मणून किंवा गुन्हेगार ह्मणून पाठवूं नका, तर हिंदुस्थानवासी लोकांचे मित्र ह्मणून पाठवा. हीं राष्ट्रें जरी भिन्न आहेत आणि त्यांचे धर्म जरी निरनिराळे आहेत तरी त्यांजमध्यें परस्परांविषयीं प्रेम उत्पन्न होऊन तीं राष्ट्रें एक होतील, आणि या नवीन कायद्या-पासून चांगले परिणाम होतील, अशी मी फार फार आशा करितों."

वरील वादविवादानंतर जो कायदा पसार करण्यांत आला त्याचा आशय असा होता कीं, "हिंदुस्थानांतील कोणताही नेटिव्ह किंवा तेथें रहिवासी असलेला ब्रिटिश सरकाराचा अंकित असा कोणताही मनुष्य, कोणत्याही धर्माचा, कोठेंही जन्मलेला, कोणत्याही जातीचा किंवा वर्णाचा असला, तरी कंपनीच्या नोकरींतील कोणतीही कामगिरी बजाविण्यास तो अपात्र मानला जाणार नाहीं." वरील कायद्याचें स्पष्टीकरण करण्यासाठीं कोर्ट ऑफ डायरेक्टर्सनें जो खलिता हिंदुस्थान सरकाराकडे पाठविला त्यांत पुढील मजकूर होता:—"कोर्ट ऑफ डायरेक्टर्स या कलमाचा अर्थ असा घेतात कीं, ब्रिटिश हिंदुस्थानांत राज्यकर्त्यांचा वर्ग ह्मणून कोणताही निराळा वर्ग समजावयाचा नाहीं. नोकरीच्या लायकीबद्दल दुसऱ्या कोणत्या-ही अटी असल्या तरी चालतील, पण जात किंवा धर्म यांचा संबंध त्या अटींत असूं नये. हिंदुस्थानांतील बिनसनदी किंवा सनदी नोकरींतील जागा देखील इतर गुणांनीं लायक ठरले-

त्या, पाहिजे त्या इसमास देण्यास हरकत नाहीं, मग तो नेटिव असो, ब्रिटिश असो, किंवा मिश्र वर्गापैकीं असो."

यानंतर २० वर्षे गेल्यावर १८५३ सालीं पार्लमेंटनें कंपनीच्या सनदेंत पुनः दुरुस्ती केली. त्या वेळेच्या ठळक मुत्सद्यांचीं भाषणें खालीं दिलीं आहेत. मि. गोल्बर्न ह्मणाले:—

"सर टॉमस मनरो असें ह्मणाले होते कीं आपण कोणत्याही प्रकारची राज्यव्यवस्था सुरू करितांनां असा विचार केला पाहिजे कीं, लोकस्वभावावर त्या व्यवस्थेचा काय परिणाम होत आहे, ह्मणजे, लोकांची योग्यता त्या व्यवस्थेनें कमी होत आहे किंवा वाढत आहे ह्या गोष्टीचा विचार झाला पाहिजे. आपली सत्ता संभाळून आणि प्रजेचें केवळ रक्षण करून तेवढ्यानेंच आपण संतुष्ट राहावें आणि प्रजेची योग्यता हल्लींपेक्षां कमी होऊं द्यावी हें चांगलें, कां तिची योग्यता वाढविण्याचा प्रयत्न करणें हें चांगलें? नेटिव लोकांचीं मनें उन्नत करावीं आणि हिंदुस्थानाचा संबंध जेव्हां तुटेल तेव्हां आपल्या अमदानींत लोक पूर्वींपेक्षां हीनसत्व झाले एवढाच काय तो त्यांचा फायदा झाला असें कोणास वाटूं नये, अशी आपण अवश्य खबरदारी घेतली पाहिजे. आपल्या राज्य-पद्धतीनें सबंध राष्ट्र हीन दशेस यावें, यापेक्षां त्या देशांतून आपला पाय अजीबात निघाला तरी तेंच श्रेयस्कर होईल."

जॉन ब्राइट ह्मणाले:— "सरकारी नोकरींत नेटिव लोकांना जागा देणें हा एक दुसरा प्रश्न पार्लमेंटनें विचार करण्या-सारखा आहे. एडिम्बरो शहराच्या वतीचे सभासद (मि. मेकॉले) यांनीं १८३३ सालीं इंडिया बिल रुजू करितांनां जात, रंग, धर्म किंवा जन्मभूमि हीं सरकारी नोकरी मिळ-

ण्याच्या आड येऊं नयेत अशाविषयीं जें एक कलम होतें त्यासंबंधानें भाषण केलें होतें. तें कलम पास होण्यांपूर्वीं ज्यांना नोकऱ्या मिळूं शकल्या नसत्या, असे कोणीही इसम तें कलम पास झाल्यापासून नोकरींत घेण्यांत आलेले नाहींत. बोर्ड ऑफ् कन्ट्रोलचे अध्यक्ष यांच्या सांगण्यावरून असें दिसतें कीं सनदी नोकरीची पद्धती पूर्ववतच ठेवण्याचा कंपनीचा विचार आहे. यावरून असें दिसतें कीं, प्रजेला अत्यंत चीड आणणारी ही सदोष पद्धति अजून तशीच अंमलांत राहावयाची आहे. हिंदुस्थानसरकारच्या कायदेकौन्सिलाचे सभासद व इंडियन लॉ कमिशनाचे आणि बंगाल्यांतील कौन्सिल ऑफ् एज्युकेशनचे अध्यक्ष या हुद्यांचीं कामें करून या बाबतींत पुष्कळ अनुभव मिळविलेले मि. कॅमेरॉन नांवाचे एक गृहस्थ या मुद्दयासंबंधानें ह्मणाले—' १८३३ च्या कायद्यानें हिंदुस्थानांतील नेटिव लोकांस कंपनीच्या अधिकारांतील पाहिजे ती जागा चालविण्यास लायक ठरविलें; पण गेल्या २० वर्षांत त्या कायद्यापूर्वीं ज्याची नेमणूक झाली नसती असा एकही मनुष्य नेमण्यांत आलेला नाहीं.' "

मि. रिच् ह्मणाले—" नेटिवांना लष्करांत मोठ्या जागा देणें जर योग्य आहे, तर मुलकी खात्यांत त्यांना जागा देणें त्याहूनही अधिक योग्य आहे. न्यायखात्यांतील शेंकडा ९५ जागा नेटिव लोकांस देण्यांत आलेल्या आहेत. अवघड काम मात्र त्यांच्याकडे देण्यांत आलेलें आहे, पण मान आणि पैसा मिळविण्याच्या जागांवर सनदी नोकरींतील लोकांसच ह्मणजे डायरेक्टर लोकांच्या नातलगांस आणि इष्टमित्रांस नेमण्यांत येतें. नेटिव लोकांवर कामाचा एकंदर बोजा पडावा, आणि

किफायतीच्या सर्व जागा युरोपियनांसच मिळाव्या काय? अशी पद्धत चालू ठेवणें शहाणपणाचें आहे काय? अमेरिकन लोक गुलामांचा व्यापार सोडीत नाहींत ह्मणून आपण आपले डोळे फाडतां. तिकडे सर्व काम नीग्रो लोक करीत असून सगळी सत्ता आणि किफायत अमेरिकनांच्या वांट्यास येते. हिंदुस्थानांतील आमची स्थिति कांहीं भिन्न आहे काय? मिल्नें कोणती पद्धती घालून दिली?— तर नेटिवांच्या मार्फत युरोपियनानें राज्यकारभार चालवावा अशी. ह्मणजे गोऱ्यांच्या हातीं सत्ता व काळ्यांच्या कपाळीं गुलामगिरी. हा काय न्याय का शहाणपणा? नेटिवांकडून आपला मान राखून घेण्यासाठीं अशी पद्धत ठेविलीच पाहिजे असें मिल्साहेबाचें ह्मणणें होतें. अन्याय करणारांविषयीं एखाद्याच्या मनांत आदरबुद्धि कशी वागेल हें मला समजत नाहीं. शील, स्पर्धा आणि अधिकार हीं समान असलीं ह्मणजे परस्परांविषयीं पूज्यभाव उत्पन्न होतो. अशा तत्वांचा आपल्या राज्याखालीं आधार देऊन ठेविला पाहिजे, नाहीं तर एखादे दिवशीं त्याचा आमच्याच पायाखालीं चुराडा होऊन जायचा. पार्लमेंटांत बोलण्याचा जोंपर्यंत मला अधिकार आहे तोंपर्यंत ज्या जागां-साठीं आमचे नेटिव बंधू लायक असतील त्या जागा त्यांना देण्यांत याव्या असें मी प्रतिपादन करीत जाईन.”

मि. मिल्स ह्मणाले—“या बिलांतील बरेच भाग सदोष असून माझ्या मतें हा भाग अत्यंत सदोष आहे, आणि त्या-पासून फार वाईट परिणाम घडून येतील. कंपनीच्या हाता-खालीं नोकरी मिळविण्यास आपणांस हक्क आहे, असें जाहीर झाल्याचें नेटिवांना समजलें ह्मणजे त्यांना साधनें मिळालीं

तर कंपनीच्या नोकरींत शिरण्यास ते आपल्या बुद्धिमत्तेनें आणि हुषारीनें स्वतःस पात्र करून घेतील. यापासून कोणता तरी एक परिणाम घडला पाहिजे. एक तर कंपनीनें त्यांना नोकऱ्या दिल्या पाहिजेत, किंवा त्यांना नोकऱ्या न देऊन त्यांना असंतुष्ट करून ठेविलें पाहिजे. जाहीर रीतीनें परीक्षा घेऊन नोकऱ्या द्यावयाच्या असें एकदां ठरलें ह्मणजे नोकरी मिळविण्याची पूर्ण पात्रता तुमच्या अंगीं नाहीं असें आह्मांस न्यायानें ह्मणतां येणार नाहीं." वरील गृहस्थांच्या मागून मि. जे. जी. फिलिमोर नांवाच्या गृहस्थांनीं भाषण केलें, आणि आपल्या मताच्या पुष्टयर्थ लॉर्ड वुइल्यम बेन्टिक यांचा अभिप्राय दाखल केला. ते ह्मणाले—"हिंदुस्थानांतील मुलकी कारभार सर्वस्वीं परकी लोकांच्या स्वाधीन आहे एवढाच एक वाईटपणा त्यांत नाहीं. ह्या परकीय अंमलदारांचे पुरस्कर्ते, ह्मणजे त्यांना नेमण्याचा सर्व अखत्यार ज्यांकडे आहे, ते लोक या देशांत राहून हिंदुस्थानाचा कारभार चालविणारे आहेत, व त्यांच्या कामगिरीच्या बदलीं निरनिराळ्या नोकऱ्यांवर इतरांस नेमण्याचा अधिकार त्यांना देण्यांत आला आहे, हें बरें नाहीं. नेटिवांना हुसकावून लावून आपल्या हस्तकांना जितक्या जास्त नोकऱ्या देतां येतील तितक्या देण्यानेंच या अधिकाराची किंमत होत असते. पूर्वी व्यापाराच्या बाबतींत जसा प्रकार झाला होता तसा आतां राज्यकारभारांत होऊन हिंदुस्थानांतील नोकऱ्या आपल्या जातभाईनाच देण्यांत कोर्ट ऑफ् डायरेक्टर्सचें हित असल्यामुळें राज्यपद्धति सदोष झाली आहे."

मि. रिच् या वादविवादांत आणखी असें ह्मणाले

कीं "सरकारी नेमणुकांचे बाबतींत पूर्वींच्या कायद्यापेक्षां प्रस्तुत बिलानें नेटिवांचें अधिक नुकसान होणार आहे. नेटिव लोकांना सरकारी नोकरीचे मार्ग खुले करण्याचा १८३३ च्या कायद्याचा उद्देश होता. त्या वेळीं इंग्लिशांचें हिंदुस्थानांतील राज्य हल्लींइतकें निर्भय नव्हतें. हल्लीं त्याची मजबुती पुष्कळ झालेली असल्यामुळें पहिला मार्ग सोडून देण्यांत कांहीं शहाणपणा नाहीं. हिंदुस्थानांतील सर्व दर्जांचे अधिकार नेटिवांना देण्याची सवड ठेवावी, आणि त्यासाठीं या देशांत परीक्षेसाठीं येण्याचें त्यांना भाग पाडूं नये, असें माझें मत आहे. कारण तशी अट ठेवल्यास आपली जात बाटण्याच्या भयानें राणीसरकारच्या इतर सर्व प्रजाजनांस मिळणारे फायदे प्राप्त करून घेण्याकरितां त्यांच्यापैकीं कोणीही पुढें येणार नाहीं. हिंदुस्थानांत स्थापन केलेल्या पाठशाळांत हल्लीं जो शिक्षणक्रम ठेविला आहे तो पाहिला असतां त्या शिक्षणक्रमांतून गेलेल्या मंडळीला सरकारी अधिकाराचीं कामें उत्तम रीतीनें बजावतां येण्यास कांहीं अडचण पडणार नाहीं. *** हल्लींची पद्धति न्यायाची किंवा शहाणपणाची नसून तिजमुळें पुढें मोठी चळवळ उडून जाईल, आणि ज्या गोष्टी आज दिल्या असतां लोक त्यांचा कृतज्ञतापूर्वक स्वीकार करितील, त्याच गोष्टी कालांतरानें लोक पार्लमेंटपासून आपल्या हक्काच्या ह्मणून भांडून घेतील. थोड्याशा मंडळीची कुरकूर न ऐकतां आपण हिंदुस्थानाशीं व्यापार करण्याची मोकळीक सर्वांस दिली आहे. आतां आपण सरकारी अधिकाराच्या जागा नेटिव लोकांस जर दिल्या तर आपल्या अंमलांतील प्रजा अधिक सुखी आणि संतोषी राहील."

लॉर्ड स्टॅनले यांनीं आपले विचार पुढें लिहिल्याप्रमाणें प्रकट केले. "इंग्लंडांतल्याप्रमाणेंच हिंदुस्थानांत सनदी नोकरीसाठीं परीक्षा घेणें शक्य आहे, पण तसें करण्याचें नाकारून प्रस्तुत बिलाच्या मुख्य उद्देशालाच सरकार हरताळ लावीत आहे आणि सिव्हिल सर्व्हिसमध्यें पूर्वीप्रमाणें इंग्लिशांखेरीज इतर कोणाचा प्रवेश होऊं नये असें करून ठेवीत आहे असें ह्मटल्यावांचून माझ्यानें राहवत नाहीं. परिणामीं ही गोष्ट अत्यंत अन्यायाची, घातक, होईल असें मला वाटतें. आपण उदाहरणार्थ कल्पना करूं कीं, लंडन येथें सिव्हिल सर्व्हिसची परीक्षा घेण्याऐवजीं जर ती कलकत्ता येथें घेण्याचें ठरविलें तर परीक्षेसाठीं तिकडे कितीसे इंग्रज जातील? किंवा तिकडे नोकरी मिळेल या आशेवर दोनतीन वर्षेपर्यंत आपल्या मुलांस तिकडे ठेवण्यास कितीसे लोक तयार होतील? हीं गोष्ट इतकी उघड असतां, आपण हिंदुस्थानांतील लोकांस याच मार्गाचें अवलंबन करावयास लावण्याच्या विचारांत आहों."

मि. जॉन ब्राइट् ह्मणाले, "१८३३ सालच्या कायद्यांतील ज्या कलमाचा अनेकवार उल्लेख झाला आहे, तें कलम आजपर्यंत होतें किंवा नव्हतें सारखेंच करून टाकण्यांत आलें आहे किंवा नाहीं हा प्रश्न या सभेंतील वादविवादामध्यें पुष्कळ वेळां उपस्थित झालेला आहे. पण बोर्ड ऑफ् कंट्रोलच्या अध्यक्षांनीं त्याचें उत्तर अद्यापपर्यंत प्रांजलपणें दिलेलें नाहीं. तोच प्रश्न कमिटीपुढील आतांच्या सूचनेंत अंतर्भूत झालेला आहे. या कलमाच्या उद्देशासंबंधानें कोणालाही जर शंका असली तर मॉंट्रोझ परगण्याच्या वतीच्या सभासदांना बोर्ड

ऑफ् कंट्रोलच्या अध्यक्षांनीं जें उत्तर दिलें आहे त्यावरून, किंवा एडिनबरो शहराचे हल्लींचे मुखत्यार (मि मेकॉले) यांनीं जें भाषण केलें त्यावरून तो संशय दूर होईल. दोघांनींही असें स्पष्टपणें सांगितलें आहे कीं, युरोपियनाप्रमाणें नेटिवांना मोठे अधिकार देण्याला ज्या हरकती आहेत त्या काढून टाकणें हाच त्या कलमाचा उद्देश होता, असें स्पष्ट ह्मणतां येतें. तें कलम पास झालें नसतें तर ज्याला मोठा अधिकार देतां आला नसता, अशा एकादेखील नेटिव गृहस्थाला मोठ्या अधिकाराची किंवा मोठ्या पगाराची एखादी जागा दिल्याचें उदाहरण मला माहीत नाहीं."

मि. जे. जी. फिलिमोर ह्मणाले, "प्रस्तुत बिलाचा कांहीं एक उपयोग होणार नाहीं आणि नेटिव लोकांस न्याय देण्याचा जरी त्याचा वरकरणी हेतु दिसतो, तरी इंग्रजांच्या अनन्योपभोगाच्या लालसेमुळें हिंदुस्थानवासी लोकांच्या आशा खुरटून जाऊन त्यांचीं मनें उद्विग्न होतील अशी मला धास्ती वाटते. असाच प्रकार चालू असला तर हिंदुस्थान इंग्लंडाच्या प्रेमपाशांत राहणार नाहीं, तर लष्कराच्या बळावर आणि तरवारीच्या धाकानेंच त्यास कह्यांत ठेविलें पाहिजे. हिंदुस्थानांतील लोकांस मुळींच अधिकार न देतां सगळा कारभार आपणच चालवावयाचा, या अनुदार तत्वानुसार हिंदुस्थानासारख्या देशाचें राज्य कमिटीनें चालूं देऊं नये अशी माझी विनंति आहे."

हाउस ऑफ लॉर्डस् मध्यें लॉर्ड मॉँटीगल् यांनीं हिंदुस्थानाच्या सनदी नोकरींत नेटिव लोकांस घेण्यासंबंधानें अनुकूळ भाषण केलें. अर्ल ग्रॅनव्हिल् हेही तशाच आशयाचें

भाषण करून पुढें ह्मणाले "लायक नेटिव लोकांना राज्य-कारभाराच्या कोणत्याही शाखेंत नोकऱ्या देण्यास मला यत्किंचितही भय वाटत नाहीं."

पार्लमेंटनें दिलेल्या वचनांचा, आणि त्या वचनानुसार कृति कितपत झाली आहे याचा निःपक्षपातानें विचार केल्यास नेटिव लोकांस तक्रार करण्यास योग्य कारणें नाहींत असें ह्मणतां येणार नाहीं. १८६० त स्टेट सेक्रेटरींनीं आपल्या कौन्सिलांतील सर जी. वुइलोबी, मि. मँगल्स, मि. आर्बथ्नॉट, मि. मॅक्नॉटन आणि सर एर्स्किन पेरी या पांच सभासदांची एक कमिटी नेमिली होती. या अँग्लोइंडियन मंडळीनें केलेल्या रिपोर्टांत पुढील मजकूर आहे. "ब्रिटिश लोकांचें वर्चस्व कायम राखून हिंदुस्थानाचा राज्यकारभार नेटिव लोकांच्या हातीं जितका देतां येईल तितका देणें नुसतें न्याय्य आहे इतकेंच नव्हे, तर हितावहही आहे, असें आमचें सर्वांचें एकमत झालें असून नेटिव लोकांना जास्त सवलती कशा देतां येतील याचा आह्मीं विचार केला आहे. हल्लीं देखील नेटिवांस अधिकार देऊं नये अशा अर्थाचे स्पष्ट कायदे नाहींत. १८३३ सालच्या कायद्यांत असें एक कलम आहे कीं ' सदर्हू मुलखांतील मूळचा रहिवासी किंवा राणी सरकारच्या प्रजाजनांपैकीं तेथें राहणारा कोणताही इसम, धर्म, जन्मभूमि, जात, रंग किंवा अन्य कोणताही भेद, यांमुळें कंपनी सरकारची नोकरी करण्यास बिलकुल अपात्र मानला जाणार नाहीं. '

या कलमावरून हें उघड आहे कीं परीक्षा घेऊन नेमणुका करण्याची पद्धती जेव्हां सुरू करण्यांत आली, तेव्हां सनदी

नोकरींतील जागा हिंदुस्थानांतील नेटिवांस देऊं नयेत असें कोणाच्याही मनांत नव्हतें. तथापि व्यावहारिक दृष्ट्या विचार कारितां, त्यांना अधिकार देऊं नये असा निर्बंध झाल्यासारखाच आहे. कायद्याच्या दृष्टीनें ते लायक आहेत, पण हिंदुस्थान सोडून इंग्लंडांत येऊन कांहीं दिवस राहण्यास ज्या अडचणी आहेत त्यांमुळें साधारण मानानें पाहिलें असतां नेटिव लोकांस इंग्लंडांत येऊन परीक्षेस बसणें आणि यश मिळविणें बहुतेक अशक्य झालें आहे. ही असमता नाहींशी केली, ह्मणजे आपण कानाला गोड लागण्यासारखीं वचनें मात्र देतों, पण त्याप्रमाणें लोकांच्या आशा पूर्ण करीत नाहीं, असा आपणांवर आरोप येणार नाहीं. हा उद्देश सिद्धीस नेण्यासाठीं दोन उपाय सुचविण्यांत आलेले आहेत. पहिला असा कीं, सनदी नोकरींतील ज्या जागा दरवर्षी भरावयाच्या असतात, त्यांपैकीं कांहीं हिंदुस्थानांतच भरण्याचें ठरवून त्यांसाठीं हिंदुस्थानांत परीक्षा घेण्यांत याव्या, आणि सर्व नेटिव लोकांस आणि हिंदुस्थानांत रहिवासी असलेल्या राणीसरकारच्या सर्व प्रजेस त्या परीक्षेस बसण्याची परवानगी द्यावी. दुसरा उपाय असा आहे कीं, हिंदुस्थानांत आणि इंग्लंडांत एकाच वेळीं परीक्षा घेण्यांत येऊन त्यांचें धोरण होईल तितकें सारखें ठेवावें, आणि दोन्ही ठिकाणीं परीक्षेस बसणारांची सिव्हिल सर्व्हिस कमिशनरांनीं एकच यादी उमेदवारांच्या योग्यतेप्रमाणें करावी. यांपैकीं दुसरा मार्ग अधिक निःपक्षपातीपणाचा, आणि एखाद्या इष्ट हेतूसाठीं सर्व लोकांत चढाओढ लावून द्यावी या चांगल्या तत्वास अनुसरून असल्यामुळें कमिटीला तोच मार्ग पसंत वाटत आहे. हा

विचार अंमलांत आणण्याचे कामीं कमिटीनें सिव्हिल सर्व्हिस कमिशनरांचा सल्ला घेतला असून सर एडवर्ड रायन् यांनीं मेहेरबानीनें कमिटीकडे एक लेख पाठविला आहे आणि त्यांत वरील प्रत्येक मार्गाचें अवलंबन केल्यापासून फायदे किंवा तोटे कसे होतील ते विस्तृत रीतीनें आणि स्पष्टपणानें दाखविले आहेत. या लेखाचा आपणांकडून काळजीपूर्वक विचार होईल अशी विनंति आहे. अखेर कमिटीला एवढेंच कळवावयाचें आहे कीं वरील दोन्ही मार्गांपैकीं कोणताही मार्ग पसंत केला, तरी यशस्वी झालेल्या उमेदवारांची इंग्लंडांत ज्याप्रमाणें दुसरी एक परीक्षा घेण्यांत येते, तशी परीक्षा घेण्याची व्यवस्था करावी लागेल. अशी व्यवस्था करण्यास कठिण पडणार नाहीं असें सिव्हिल सर्व्हिस कमिशनरांचें मत आहे. पण कमिटीचें असें ठाम मत आहे कीं ज्या विषयांत चढाओढ लावावयाची आहे त्या विषयांतील परीक्षेचे कागद हिंदुस्थानांत आणि इंग्लंडांत एकच ठेवण्यांत यावे. मात्र नेटिव लोकांस योग्य सवलत देण्यासाठीं युरोपांतील प्रचलित तीन भाषांच्या ऐवजीं पूर्वेकडील तीन भाषा उमेदवारांस घेतां येतील अशी सवड ठेवावी."

वरील महत्वाचा लेख मि. दादाभाई नवरोजी यांनीं नुकताच प्रसिद्ध केला असून आपण तो प्रसिद्ध करीपर्यंत तसाच अज्ञातवासांत पडून राहिला होता असें मि. दादाभाई नवरोजी यांनीं इंडियन एक्स्पेंडिचर कमिशनाचे अध्यक्ष लॉर्ड वेल्बी यांस स्पष्ट लिहून कळविलें आहे. १८३३ सालचा कायदा अंशतः तरी अंमलांत यावा ह्मणून सर स्टॅफर्ड नॉर्थकोट यांनीं अशी सूचना पुढें आणिली होती कीं, सनदी नोकरींत

कांहीं थोड्या नेटिव लोकांना तरी घेण्यांत यावें. ड्यूक ऑफ् आर्गाइल यांच्या अमदानींत ही सूचना पास झाली होती. लॉर्ड सॅलिस्बरी यांनाही ही सूचना पसंत पडली होती; मात्र ते एवढेंच ह्मणाले होते कीं 'सनदी नोकरींत नेटिव लोक शिरल्यामुळें आपसांत द्वेषभाव उत्पन्न होईल, त्याबद्दल मात्र आपणांस खबरदारी घेतली पाहिजे.' सनदी नोकरींतील कांहीं ठरीव जागा नेटिव लोकांस देण्यासाठीं १८७० सालीं एक कायद्याचा मसुदा पुढें आला होता, पण हिंदुस्थानसरकार त्याला अगदीं प्रतिकूल असून १० वर्षें तो खर्डा रखडत पडला होता. सनदी नोकरींतील जागा नेटिवांस देण्याऐवजीं नेटिवांस द्यावयासाठीं एक निराळी नोकरीची शाखाच स्थापन करण्यासाठीं हिंदुस्थानसरकारानें धडपड चालविली होती. स्टेट सेक्रेटरीच्या जागेवर लागोपाठ आलेल्या कित्येक ब्रिटिश मुत्सद्यांनीं ज्या प्रकारचें धोरण ठेवण्याविषयीं आपले अभिप्राय स्पष्टपणें कळविले होते, तें धोरण एकीकडे झुगारून देऊन भलत्याच मार्गाचें अवलंबन करण्याची जी हिंदुस्थानसरकाराची इच्छा होती ती लॉर्ड क्रॅनब्रुक यांनीं सफल होऊं दिली नाहीं. १८७८ त लॉर्ड क्रॅनब्रुक यांनीं पाठविलेल्या खलित्यांतून कांहीं उतारे येथें देणें अवश्य आहे:—

"कलम ६. नेटिवांसाठीं एक वेगळीच नोकरीची शाखा स्थापन करून तिला थोड्याशा वरिष्ठ प्रतीच्या जागा जोडून टेवाव्या, आणि सनदी नोकरींत नेटिवांचा इतःपर प्रवेश होऊं देऊं नये, अशी आपली सूचना आहे; पण ती पास करावी अशी पार्लमेंटला विनंती केली असतां यश येण्याची आशा नाहीं, आणि तशी विनंती करण्यास

मी तरी पुढें होणार नाहीं. १८३३ सालच्या कायद्यांतील वर निर्दिष्ट केलेलें कलम रद्द करण्यासाठीं नवीन कायदा करण्याची सूचना केली असतां ती पार्लमेंटला मान्य होणार नाहीं असें आपणच ह्मणतां. जाहीर रीतीनें परीक्षा पास होऊन सनदी नोकरींत शिरण्याची नेटिवांस बंदी करण्याचा प्रयत्न केल्यास त्यालाही जबरदस्त विघ्नें आल्यावांचून राहणार नाहींत." * * * * * * * * *

"कलम १०. ह्मणून आपल्या विचारास येईल त्याप्रमाणें हिंदुस्थानांतील सनदी नोकरींत कांहीं नेटिवांची नेमणूक आपण दरसाल करावी. त्या मानानें इकडून जे सनदी नोकर पाठवावयाचे त्यांची संख्या कमी करावी लागेल. पसंत केलेल्या उमेदवारांची योग्यता आणि हुषारी आपणांला दिसून येण्यासाठीं त्या नोकऱ्या सुरुवातीला कांहीं दिवसांपुरत्या आणि त्यांचें काम पसंत पडल्यास त्यांस कायम करण्याच्या बोलीनें देण्यांत याव्या." * * * * * * *

"कलम ११. या साऱ्या योजनेचे फायदे उघडच आहेत; ते हे कीं (१) ह्या योजनेनें नेटिव लोकांना सनदी नोकरांच्या बरोबरीची योग्यता मिळवितां येऊन लोकांना ही पद्धति आवडूं लागेल; (२) नेटिव सिव्हिलियनांना हल्लीं ज्या जागा मिळण्याची आशा आहे त्या जागा या पद्धतीनें त्यांजपासून हिरावून घेतल्या जाणार नाहींत, आणि त्या योगानें सनदी शाखेच्या हितसंबंधांत या नवीन शाखेमुळें कांहीं घोंटाळा होणार नाहीं; (३) निव्वळ नेटिवांसाठीं नोकरीची एक शाखा स्थापन करावयाची ह्मणून तींत कांहीं मोठ्या पगाराच्या जागा पाहिजेत; वास्तविक, याप्रमाणें पगार वाढविण्याची गरज नाहीं, आणि

या नवीन पद्धतीनेंही अशा बिनसनदी नोकरांचे पगार वाढविण्याची गरज राहणार नाहीं; आणि (४) सरकारी नोकरांना राज्यकारभाराचें शिक्षण देण्याची जी पद्धति हिंदुस्थानांत फायदेशीर ठरली आहे त्याच पद्धतीला अनुसरून ही नवीन पद्धति चालणार आहे."

हा खलिता गेल्यानंतर लॉर्ड लिटन यांनीं जो शेरा त्यावर लिहून ठेविला तो सर्वांस माहीतच आहे. राणीसरकारानें आणि त्यांच्या प्रधानमंडळीनें वारंवार दिलेल्या वचनांचा किंवा पार्लमेंटनें पास केलेल्या कायद्याचा कांहीं एक उपयोग होऊं द्यावयाचा नाहीं असा स्थानिक अधिकाऱ्यांनीं बेत केलेला दिसतो, असें त्यांनीं या शेऱ्यांत बेलाशक लिहून ठेविलें. लॉर्ड लिटन यांचे शब्द पुढें लिहिल्याप्रमाणें होते. " पार्लमेंटनें आपला कायदा, विषयाचा अर्थ आणि त्याची मर्यादा नीट ध्यानांत घेऊन केलेला नाहीं. नेटिव प्रजेशीं हिंदुस्थानसरकारानें ज्या धोरणानें वागणें न्याय्य आहे त्या मार्गाचें अवलंबन करणें धोक्याचें आहे, आणि ह्मणूनच पार्लमेंटनें कायदा पास केल्याबरोबर त्याची अंमलबजावणी करण्याचें कोणत्या रीतीनें टाळतां येईल ह्याचा विचार करण्यास हिंदुस्थानसरकार लागलें. सुशिक्षित नेटिवांची संख्या एकसारखी सरकारच्या उत्तेजनानें वाढत असून त्यांच्या आशा सरकार पूर्ण करूं शकत नाहीं, आणि ते तर पार्लमेंटच्या कायद्याचीं कलमें वाचून पाहून तीं उराशीं घट्ट धरून बसले आहेत. पूर्वीं सनदी नोकरांना मात्र देण्यांत येत असलेल्या अधिकाराच्या जागा एकदां आपणाला मिळाल्या, ह्मणजे क्रमाक्रमानें बढती मिळन आपणांला राज्यकारभारांतील

सर्वांत श्रेष्ठ अधिकार देखील मिळण्याचा हक्क आहे असें ते समजून आहेत. हे हक्क किंवा ह्या आशा कधींही फलद्रूप होणार नाहींत किंवा आह्मांला पुरवितां येणार नाहींत हें आह्मी सर्व जाणून आहों. सनदी नोकरींत शिरण्याची मनाई करणें, किंवा एकीकडून त्यांचा प्रवेश होऊं देऊन दुसरीकडून त्यांच्या मार्गांत अडथळे आणून त्यांना फसविणें, हे दोन मार्ग आह्मांला खुले होते, आणि त्यांमध्यें जो सरळपणाचा मार्ग होता त्याचें अवलंबन आह्मीं केलें नाहीं. इंग्लंडांत होणाऱ्या परीक्षेचे नियम हिंदुस्थानच्या लोकांस लागू करण्यांत आणि परीक्षेस बसावयाचें वय कमी करण्यांत पार्लमेंटच्या कायद्याचा उपयोग होऊं नये हा आमचा उघड उघड विचार होता. मी लिहीत असलेला लेख खासगी असल्यामुळें मला असें ह्मणण्यास हरकत वाटत नाहीं, कीं इंग्लंडांतील आणि हिंदुस्थानांतील अधिकाऱ्यांवर 'तुह्मीं फुकाचीं गोड गोड वचनें देऊन तीं मोडण्याचा आपल्याकडून होईल तितका प्रयत्न केला आहे' असा जर कोणीं आरोप ठेविला, तर त्यांना त्या आरोपाचें परिमार्जन करितां यावयाचें नाहीं."

अखेरीस १८८० मध्यें स्टॅच्युटरी सिव्हिल सर्व्हिस नांवाची एक शाखा काढण्यांत आली. सनदी नोकरींत कांहीं नेटिवांचा तरी प्रवेश व्हावा एवढी सवलत पूर्वींच्या मुत्सद्यांनीं दिली असतां, ही नवीन शाखा सुरू करणें ह्मणजे त्या मंडळीचा एक अपराधच करणें होतें. सनदी आणि स्टॅच्युटरी असा जो नोकरीचा भेद केला, तोच आधीं कर्णकटु होता. हें नवीन नांव देण्यामध्यें तें देणारांचा कांहीं चांगला हेतु आहे असें त्या नांवावरूनच कोणाला वाटेना. स्टॅच्युटरी सि-

व्हिल सर्व्हिसच्या नियमानुसार सात आठ नेटिवांना सनदी नोकऱ्या दिल्यानंतर स्टॅच्युटरी सर्व्हिस नाहींशी कशी करावी या विचारास हिंदुस्थानसरकार लागलें, असें उघडपणें बोलून दाखविण्यांत आलें आहे. ही शाखा सुरू झाल्यापासून तीन वर्षांच्या आंत इल्बर्ट बिल पुढें येऊन सगळ्या हिंदुस्थानभर जातिमत्सराला ऊत आला, आणि आणखी तीन वर्षांनीं पब्लिक सर्व्हिस कमिशनाची बैठक होऊन स्टॅच्युटरी शाखा केव्हां नाहींशी झाली तें कोणाला कळलेंही नाहीं. लॉर्ड सॅलिसबरी यांनीं या शाखेसंबंधानें जो अखेरचा उल्लेख केला त्यांत इंग्लंडचीं सर्व वचनें, जाहिरनामे, किंवा कायदे हीं राजकारणाकरितां केलेलीं ढोंगें होत, असें बिनदिक्कत बोलून दाखविलें.

वरील विवेचनांत तीन गोष्टी स्पष्ट करून दाखविण्याचा प्रयत्न केलेला आहे. पहिली गोष्ट, ब्रिटिश लोकांनीं हिंदुस्थानांत आपल्या राजनीतीचा केलेला विस्तार; दुसरी गोष्ट, हिंदुस्थानवासीयांची स्थिती सुधारण्याकरितां केलेले प्रयत्न; आणि तिसरी गोष्ट, नेटिव लोकांना आपल्या जन्मभूमीच्या राज्यकारभारांत पूर्वीपेक्षां अधिक वांटा मिळेल अशीं राणीसरकारानें आणि पार्लमेंटनें दिलेलीं वचनें. हिंदुस्थानांतील लोकांवर राज्य चालविण्याचें काम इंग्लंडांतील लोकांनीं खुद्द आपल्या हातीं घेतलें; विद्या आणि ज्ञान संपादन करण्याचे मार्ग लोकांस खुले करून दिले; आणि जीवनार्थ कलहांत जीवनार्थ कलहाचीं साधनें संपादन करण्यास त्यांस निःपक्षपातानें मदत करण्याचें वचन दिलें. हिंदुस्थानांतील विद्यार्थ्यांचा शिक्षणक्रम बहुतेक इंग्रजी धर्तीचाच आहे. मिल्, मेकॉले, शेक्सपीयर,

मिल्टन यांचे ग्रंथ त्यांच्या वाचनांत येतात, आणि त्यांच्या योगानें त्यांची कल्पनाशक्ति तरतरीत होते. हॅम्डेनचा चरित्रक्रम प्रशंसनीय आणि अनुकरणीय ह्मणून त्यांच्यापुढें मांडण्यांत येतो. इंग्रजी ग्रंथभांडारामध्यें जेवढें कांहीं उत्तम आणि मन उदात्त करणारें आहे, तेवढें सर्व त्यांचे शिक्षक त्यांच्या नजरेस आणीत असतात. शेरिडॅन आणि बर्क यांचें सक्रोध वक्तृत्व, फॉक्स आणि पिट् यांचीं राजनीतिविषयक भाषणें, त्यांच्या परिचयाचीं झालेलीं असतात. इंग्लंडानें आयर्लंडाशीं केलेल्या अन्यायाच्या वर्तनाबद्दल त्यांस वाईट वाटतें, आणि इंग्लंडांत स्वातंत्र्य केवळ वरिष्ठ वर्गाच्याच वांट्यास आलेलें नाहीं, आणि ह्मणूनच आपलाही त्यांत वांटा आहे असें समजून त्यांला हर्ष होतो. कोणत्याही गोष्टीवर टीका करण्याची कला त्यांला सहज साध्य होते, आणि निबंधरूपानें टीका करण्याविषयीं त्यांस सांगण्यांत येतें. सारांश त्यांचें शिक्षण अशा प्रकारचें झालेलें असतें कीं आपण इंग्रज मनुष्य आहों असें समजूनच ते विचार करूं आणि बोलूं लागतात. आजपर्यंतचा वृत्तांत आणि हल्लींची परिस्थिति हीं अशा प्रकारचीं असतांना पुढें काय होईल हें सांगण्यास कोणी भविष्यवादी नको. हिंदुस्थानांतील तरुण मंडळीस आपण जें जें शिकविलें आहे तें तें त्यांनीं ताबडतोब ग्रहण केलें आहे. त्यांचीं मनें विकसित होऊन ते आतां कांहीं गोष्टी मागत आहेत, त्याबद्दल आपण रागावून काय उपयोग ?

चवदा वर्षांपूर्वीं ह्मणजे सन १८८९ सालीं आपल्या देशबांधवांच्या अगदीं निकडीच्या राजकीय अडचणींचा

विचार करण्यासाठीं सुमारें पाउणशें नेटिव गृहस्थ एकत्र जमले होते. इंग्रजी सुधारणा आणि शिक्षण यांचा या मंडळीवर पूर्ण अंमल बसलेला होता. इंग्रज लोकांच्या मनांत स्वातंत्र्य आणि स्वराज्य यांच्या कल्पना भरवून देण्यास मुख्य कारण जो इतिहास, त्याचें इंग्रजी गुरूंजवळ अध्ययन करितानां त्या मंडळींनीं जे धडे घोकून ठेविले होते त्या धड्यांचें आणि सार्वभौम प्रभूंनीं अनेकवार दिलेल्या वचनांचें सार आपल्या हातीं येण्याविषयीं त्यांची ही खटपट होती. पुढील वर्षी ( १८८६ ) कलकत्त्यास भरलेल्या सभेंत ४१२ मुखत्यार हजर होते. १८८७ सालीं मद्रास येथें भरलेल्या सभेच्या वेळीं ही संख्या ६०७ पर्यंत वाढली, आणि मुंबईस १८८९ सालीं भरलेल्या सभेंत १८८९ प्रतिनिधी हजर होते. या वर्षी सर वुइल्यम वेडरबर्न हे अध्यक्ष असून मि. चार्ल्स ब्रॅडलॉ यांच्या चित्ताकर्षक वक्तृत्वाचा सुशिक्षित नेटिव मंडळीस लाभ मिळाला. मि. ब्रॅडलॉ हे या वेळीं नुकतेच भयंकर दुखण्यांतून उठून हिंदुस्थानाचा प्रवास करावयास आले होते. १८९० सालीं कलकत्ता येथें भरलेल्या सभेस ६७७, नागपूर येथें १८९१ त भरलेल्या सभेस ८१२, अलाहाबाद येथें १८९२ त भरलेल्या सभेस ६२५, लाहोर येथें १८९३ त भरलेल्या सभेस ८६७, आणि १८९४ त मद्रास येथें भरलेल्या सभेस १२०० प्रतिनिधी हजर होते. मद्रास येथील सभेचे अध्यक्ष मि. आल्फ्रेड वेब् या नांवाचे गृहस्थ आयर्लंडाला स्वराज्य मिळवून देऊं इच्छिणाऱ्या पार्लमेंटच्या सभासदांपैकीं एक सभासद होते. त्यांच्या भाषणानें श्रोते अगदीं मोहून गेले. १८९५

सालीं पुणें येथें १९८४, १८९६ त कलकत्ता येथें ७८४, आणि १८९७ त वऱ्हाड प्रांतांतील मुख्य शहर उमरावती येथें ६९२ प्रतिनिधी जमले होते. १८९८ सालीं राष्ट्रीय सभेची बैठक मद्रास येथें झाली.

स्थूलमानानें पाहतां १३ वर्षांत सुमारें १० हजार लोक पदरच्या खर्चानें लांबचा प्रवास करून राज्यकारभारांत कोणत्या महत्वाच्या बाबतींत सुधारणा अवश्य झाली पाहिजे, याचा आपापल्या मताप्रमाणें विचार करण्यास एकत्र जमले होते, आणि यांपैकीं कांहीं डेराइस्माइलखानसारख्या अगदीं दूरच्या ठिकाणाहून आलेले होते. सर्व वर्णांचे, जातींचे, आणि धर्मांचे, निरनिराळ्या तऱ्हेचे पोषाख केलेले आणि विचित्र शिरोभूषणें घातलेले शेंकडो लोक एकत्व जमले असतां तो समाज किती मौजेचा दिसला असेल याबद्दल मी कांहींच लिहित नाहीं. तथापि आपल्या जन्मभूमीच्या प्रभावामुळें होत असलेल्या एकीकरणाची ही साक्ष पाहून माझ्या मनांत अनेकवार विलक्षण तरंग उठले आहेत. आगगाड्या आणि आगबोटी यांच्या योगानें निरनिराळ्या जातींमधील परस्परांविषयींचा द्वेष आणि परस्परांविषयींचें अज्ञान नाहींसें होत आहे हें एक मोठेंच काम होत आहे. अलाहाबाद येथील एका प्रसंगाची मला चांगली आठवण आहे. एके दिवशीं दक्षिण हिंदुस्थानांतील एक ब्राह्मण ज्ञातीचे गृहस्थ, मुंबईकडील दोन पारशी, लखनौकडील एक मुसलमान, कलकत्त्याकडील एक ब्राह्मपंथी गृहस्थ, आणि लाहोरकडील एक शीख गृहस्थ अशी मंडळी मजजवळ बसलेली होती. माझा चहा पिऊन झाल्यावर धूम्रपान करण्याची मला त्यांनीं खुशाल परवानगी

दिली, आणि कायदेकौन्सिलांची नवीन रचना कोणत्या धर्तीवर करण्यांत आली पाहिजे याविषयीं इंग्रजी भाषेमध्यें आमच्यामध्यें चर्चा चालू झाली. काँग्रेसच्या सबंध बैठकींत हजर असलेल्या कोणत्याही मनुष्याला तेथील काम किती पद्धतशीर चालतें, अध्यक्षांच्या अभिप्रायास मान देण्यास सभाजन किती तत्पर असतात, व बऱ्याच वक्त्यांच्या भाषणांत खऱ्या वक्तृत्वाचा भाग किती असतो, हें कळून आल्याशिवाय राहणार नाहीं. प्रसंगोपात्त तेथें वादविवादकौशल्यही दृष्टीस पडतें. तें पाहून एका मार्मिक गृहस्थानें तें पार्लमेंटांतील पुढाऱ्यांना देखील शोभण्यासारखें आहे असें ह्मटलेलें मीं ऐकिलें. सभाजनांमध्यें आपल्या कामाविषयीं पूर्ण उत्साह दिसून येतो. सभेंत प्रतिपादिलेल्या मतांपैकीं कांहीं किंवा सगळीं देखील सरकारी अधिकाऱ्यांच्या मतांशीं जुळणार नाहींत. तथापि निरनिराळ्या विषयांवर भाषण करण्यास नेमलेली मंडळी त्या त्या विषयांत वाकब असते यांत संशय नाहीं. स्वतःची पुष्कळ गैरसोय करून घेऊन त्यांनीं निरानिराळ्या मार्गांनीं स्वतः अनुभव मिळविलेला असतो, आणि आपल्या विरुद्ध टीका होऊन आपलें नुकसान होण्याचा संभव असतांही तो अनुभव ते सभेस सादर करीत असतात, या गोष्टीमुळें तरी त्यांच्या शब्दास महत्व दिलें पाहिजे. त्यांच्या भाषणांवरून निदान त्या त्या प्रश्नाची दुसरी बाजू तरी समजून येण्यासारखी असते. हिंदुस्थानांतील सुशिक्षित लोकांना कोणत्या गरजा विशेष भासूं लागल्या आहेत याचें विवेचन त्यांच्या भाषणांत असून, इंग्लंडाच्या अंमलाखालील ३० कोट प्रजेचें हल्लींचें कल्याण आणि त्यांची भावी स्थिति ज्यांच्या हातीं आहे,

त्यांनीं या उपयुक्त माहितीचा लाभ अवश्य घेण्यासारखा आहे.

राष्ट्रीयसभेच्या पक्षपात्यांना तिच्या शत्रूंकडून पुष्कळ निंदा आणि शिव्या ऐकून घ्याव्या लागल्या आहेत. त्या दृष्टीनें पाहिलें असतां राजकीय बाबतींतील त्यांचें शिक्षण पूर्ण झालें आहे असें ह्मणतां येईल. आपला मोठेपणा आणि स्वाभिमान कायम राखून ते या निंदक मंडळीच्या तोंडीं लागले नाहींत; आपण आपल्या सभेची वार्षिक हकीकत व्हाइसरॉय साहेबांस सादर केली ह्मणजे बस आहे, असें मानून ते स्वस्थ राहिले आहेत, ही गोष्ट त्यांनां भूषणास्पद होय. कित्येक वर्तमानपत्रांनीं त्यांच्या पुढाऱ्यांना वकिलीच्या धंद्यांत कांहीं प्राप्ति होईना ह्मणून कांहीं तरी उपद्व्याप करणारी मंडळी असें नांव दिलेलें आहे, तें अगदीं अयथार्थ आहे. कारण या पुढाऱ्यांपैकीं ना. मि. सुब्रह्मण्य अय्यर हे राष्ट्रीय सभेच्या सुरुवातीनंतर मद्रास हायकोर्टांतील न्यायधीश झाले आहेत. ना. बद्रुद्दिन तय्यबजी, ना. तेलंग, ना. रानडे, हे मुंबईस तशाच अधिकारास चढले आहेत. ना. मि. जस्टिस अमीर अल्ली ह्यांशिवाय कलकत्ता हायकोर्टांतील इतर सर्व जज्ज आणि त्यांचे अग्रणी ना. सर रोमेशचंद्र मित्र, हे सर्व राष्ट्रीय सभेचे कट्टे अभिमानी होते. कलकत्त्याचे मि. बॉनरजी आणि मनमोहन घोस यांची योग्यता कलकत्त्यांतील कोणत्याही बॅरिस्टरापेक्षां कमी नसून त्या दोघांनींही राष्ट्रीयसभेस तनमनधनेंकरून अत्यंत मदत केली आहे. यांच्या योग्यतेच्या माणसांची वर ह्मटल्याप्रमाणें किंमत करणें वेडेपणाचें आहे. राष्ट्रीय सभेच्या शत्रूंनीं अशा ढळढळीत खोट्या गोष्टी लोकांत पसरून आपल्या पक्षाला बळकटी आणण्याचा प्रयत्न करणें मूर्खपणाचें

आणि धाडसाचें काम आहे. हिंदुस्थानांतील लोकांची विवेक-शक्ति तीव्र असून कोणताही भ्रामक सिद्धान्त ते तेव्हांच खोडूं शकतात. अशा खोडसाळ प्रमाणांनीं प्रतिपक्षाची योग्यता कमी होते इतकेंच नाहीं, तर त्यांचा विरोध केवळ जातिमत्सर-जन्य आहे अशी समजूत होऊं लागते. अशी समजूत लोकांत पसरणें इंग्लंडाच्या हितास अत्यंत विघातक आहे असें मी तरी समजतों. अलाहाबादचे पंडित अयोध्यानाथ, मुंबईचे फेरोझशहा मेहता, सालेमचे विजयराघवाचारि, या मंडळींना रिकाम-टेकडे वकील कधींही ह्मणतां यावयाचें नाहीं. यांपैकीं कित्येक-जण आपापल्या प्रांतांतून अत्यंत वजनदार गृहस्थ आहेत. ( अलहाबादच्या पंडितजींबद्दल मात्र, ते आपल्या प्रांतांतील अत्यंत वजनदार गृहस्थ होते, असें ह्मणावें लागत आहे! ) ज्यांना राजकीय उलाढालींत पडावयाचें आहे त्यांनीं या खऱ्या गोष्टी पुढें आल्या असतां त्या न पाहणें धोक्याचें आणि वेडेपणाचें आहे. प्रत्येक व्यवसायांत आणि विशेषत: वकिलीच्या धंद्यांत नेटिव लोक युरोपियनांस बाजूला सारून स्वतः पुढें येऊं लागले आहेत, ही गोष्ट पुष्कळ अंग्लोइंडियनांस जरी कडू वाटत असली, तरी या नवीन वस्तुस्थितीचा प्रामा-णिकपणानें विचार करावयाचा ह्मणजे जें खरें असेल तें कबूल करून तें तुह्माला अप्रिय असेल तर 'गतं न शोच्यम्' या न्यायाचा अवलंब केला पाहिजे. ह्यूम, वेडरबर्न, जार्डिन यांजसारखी मंडळी राजद्रोहयुक्त भाषणें करून बखेडा माजविण्याचा प्रयत्न करीत आहेत असें ह्मणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. ही मंडळी लोकांच्या माहितींतली आहे; त्यांपैकीं प्रत्येक-जण आपापल्या परीनें मोठ्या योग्यतेचे असून आपण

इंग्लंडांत जन्मल्याबद्दल प्रत्येकाला अभिमान वाटत आहे, हेंही त्यांना कळतें. अशा गृहस्थांची निष्कारण निंदा करून नेटिवांचीं मनें मात्र दुखावयाचीं, आणि त्यांशीं वितुष्ट उत्पन्न व्हावयाचें. सुशिक्षित नेटिवाशीं तुह्मीं सप्रमाण कोटिक्रम चालवाल तर मात्र तो ऐकेल. तुह्मी नुसत्या शिव्या द्याल तर तो आपलें ह्मणणें कधींही सोडावयाचा नाहीं.

राष्ट्रीय सभेनें ज्या बऱ्याच मागण्या केल्या आहेत त्यांपैकीं कांहींचा आपण येथें विचार करूं. या मागण्यांपैकीं राजनिष्ठेशीं जिचा विरोध येईल अशी एकही मागणी नाहीं. राष्ट्रीय सभेच्या कांहीं मागण्या तिच्या प्रतिपक्ष्यांना कबूल नाहींत याचें कारण ऐकून घेण्यासारखें तरी असतें. पण कायदेकौन्सिलांची सुधारणा, न्यायखातें आणि अंमलबजावणीखातें पृथक् करणें, लष्करीशिक्षणालयाची हिंदुस्थानांत स्थापना करणें, देशाच्या उत्पन्नाचा खर्च काटकसरीनें करणें आणि सिव्हिल सर्व्हिससाठीं समकालीन परीक्षा सुरू करणें या सूचना कानीं पडल्या असतां ऐकणाराचा थरकांप होण्यासारखें त्यांत काय आहे?

वरील पहिल्या मागणीप्रमाणें १८९२ च्या कायद्यांत, कायदेकौन्सिलांची सुधारणा होऊन लोकनियुक्त, आणि सरकारानें पसंत केलेले प्रतिनिधी निवडणुकीच्या कामासाठीं त्याच कायद्यानें केलेल्या इलाख्याच्या निरनिराळ्या विभागांतर्फे कौन्सिलांत निवडून येऊं लागले आहेत. उदाहरणार्थ, मद्रास इलाख्यांत दक्षिण विभागातर्फे दोन सभासद आणि उत्तर विभागातर्फे दोन, आणि विश्वविद्यालय आणि मद्रास म्युनिसिपालिटी यांच्यातर्फे एक एक सभासद कौन्सिलांत निवडून

येऊं लागले आहेत. सरकारास प्रश्न विचारण्याचा हक्क त्यांस देऊन त्यांच्या मर्यादा ठरवून देण्यांत आलेल्या आहेत. इलाख्याच्या बजेटावर त्यांनीं टीका करावी ह्मणून तें त्यांच्यापुढें माडण्यांत येतें. नेटिव सभासदांची बजेटावरील टीका विद्यालयांतील वादविवाद करणाऱ्या सभांत होणाऱ्या टीकेच्याच योग्यतेची असते, आणि त्यांनीं विचारलेल्या प्रश्नांस सरकारतर्फे मिळालेलीं उत्तरें संदिग्ध अतएव चीड आणणारीं असतात, तरी राष्ट्रीयसभा ज्या प्रश्नाबद्दल ८ वर्षें खल करीत होती, त्या प्रश्नाचा नेटिवांस अनुकूल अशा दृष्टीनें विचार करण्यांत आला आहे, ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. जमाबंदीवर नेटिव लोकांचा कांहीं तरी दाब असावा असें जें मागणें आहे त्याला सरकारी अधिकारी विरुद्ध कां हें सहज समजण्यासारखें आहे. कारण जमाबंदीचा अधिकार ज्याकडे असेल त्याजकडेच देशांतील सर्व सत्ता जावयाची, आणि नेटिवांकडे सर्व सत्ता जाऊं देण्यास इंग्रज अधिकारी तयार नसावयाचे, हें उघडच आहे. पण कर देणारांना राज्यकारभारांत आपलें मत प्रकट करण्याकरितां आपला मुखत्यार पाठविण्याचा हक्क आहे, असें इंग्रजांनींच हिंदुस्थानांतील लोकांस शिकविलें असून, हॅमडेन यानें 'शिप्—मनी' नांवाचा कर देण्याचें नाकारिलें हें अगदीं योग्य आणि स्तुत्य उदाहरण त्यानें घालून दिलें असें इंग्रजांनींच त्यांस शिकविलें आहे. असें असतां, निरर्थक अयोग्य किंवा फाजील होणाऱ्या खर्चावर आपणाला चांगला दाब बसवितां यावा असें वाटून तसा कांहीं तरी अधिकार मिळण्यासाठीं जर त्यांनीं खटपट केली तर त्यांना दोष कसा देतां येईल? दुष्काळ आणि रोग आपल्या

घरांत येऊन डोकावीत असतां, वर्षांतून आठ महिने गिरि-शिखरावर राहणाऱ्या राज्यकर्त्यांच्या चैनीसाठीं निरनिराळ्या ऐषआरामाच्या गोष्टींकडे आपल्या संमतीशिवाय खर्च केलेला पैसा, एखाद्या कफल्लक म्युनिसिपालिटीच्या कामीं, आरोग्य-रक्षणाचे उपाय अमलांत आणण्याकरितां, शाळा आणि रुग्णालयें बांधण्याकरितां, प्रयोगशाळा चालविण्याकरितां, किंवा तसल्याच कांहीं तरी उपयुक्त सुधारणा करण्यासाठीं, खर्च करण्यांत यावा असें लोकनायकांच्या मनांत येऊन त्या-प्रमाणें त्यांनीं खटपट केल्यास त्यांत त्यांचा बिलकुल दोष नाहीं.

न्यायाचें आणि अंमलबजावणीचें काम निरनिराळ्या अंमलदारांकडे सोंपविणें तात्विक दृष्ट्या आपणांस पसंत आहे, असें हिंदुस्थानसरकारानें अनेक वेळां कबूल केलें असून, त्या कबुलीप्रमाणें वागण्यास आपणाजवळ पुरेसा पैसा नाहीं असें त्याचें ह्मणणें आहे. यावर हिंदुस्थानांतील सुशिक्षित लो-कांचें असें उत्तर आहे कीं जमाबंदीवर जर आपली सत्ता चालूं शकेल, तर या अत्यंत अवश्य अशा सुधारणेसाठीं पाहिजे तितका पैसा मिळूं शकेल. ह्या विनंतींत गैर काय आहे? बंगालचे माजी चीफ जस्टिस आणि हल्लीं प्रिव्हि कौन्सिलचे सभासद सर रिचर्ड गार्थ हे पूर्वीं गिल्डफोर्ड परगण्याच्या वतीनें पार्लमेंटांत असून कॉन्सरव्हेटिव पक्षाचे अनुयायी होते, आणि अजूनही ते त्याच पक्षाला चिकटून आहेत. यांनीं एकाच मनुष्याकडे न्यायाधीशाचा आणि पोलिसाचा किंवा मॅजिस्ट्रेटाचा आणि गुप्त पोलिसाचा अधिकार असावा हें अगदीं गैर आहे असें प्रतिपादन केलें आहे. एकच अधि-कारी कायद्याप्रमाणें आपल्या जिल्ह्यांतील पोलिस खात्या-

वरील मुख्य अंमलदार असून, पुरावा गोळा करण्याच्या कामीं प्रथम पोलिसाला मदत करितो, आणि नंतर जो पुरावा गोळा करण्यास त्यानें मदत केली आहे त्या पुराव्याची तोच स्वतः मॅजिस्ट्रेट या नात्यानें शहानिशा करूं लागतो, अशी हल्लींची पद्धति आहे, आणि ती गैर आहे. सर रिचर्ड गार्थ यांच्या लेखांतून पुढील अवतरण दिलेलें आहे:— ' एखाद्या तरुण आणि तरतरीत मॅजिस्ट्रेटाकडे आसपासच्या गावांच्या तोंडचें पाणी पळविण्यासारख्या दरवड्याची हकीकत आली आहे, अशी आपण कल्पना करूं. ह्या गुन्हेगारांस पकडण्यासाठीं प्रथम पोलीस अधिकाऱ्यांशीं त्याचें खलबत सुरू होतें. २।३ वेळ प्रयत्न केले ह्मणजे खरे गुन्हेगार कोण आहेत ते आपल्या हातीं लागले असें त्याला वाटतें, आणि नंतर त्या इसमांवर आरोप शाबीत करण्यासाठीं पोलीसच्या विद्यमानें तो पुरावा धुंडाळून काढितो, जबान्या घेतो आणि कोणत्या दिशेनें चौकशी करावयाची याविषयीं पोलिसाला सल्ला देतो. याप्रमाणें खटला सुरू करण्यासाठीं आस्थेनें खट-पट केल्यानंतर स्वतःच मॅजिस्ट्रेट बनून आपण गोळा केलेला पुरावा सकृद्दर्शनीं आरोपीवर आरोप लागू करण्यास पुरा आहे किंवा नाहीं हें पाहतो, आणि अखेर तो पुरा आहे असें वाटून न्यायाधीश बनून आरोपीची जूरीच्या मदतीशिवाय चौकशी करण्यास प्रवृत्त होतो, आणि त्याला शिक्षा ठोठा-वितो. वरील प्रकार इंग्लंडांतील लोकांस राक्षसी वाटेल खरा; पण माझ्या वर्णनांत अतिशयोक्ति नाहीं हें मी खास सांगूं शकतों. हिंदुस्थानांतील लोकांचीं मनें युरोपियन अधिकारी परकीय असतात एवढयामुळेंच त्यांविषयीं साशंक असतात

असें नाहीं; पण एकाच मनुष्यानें फिर्यादी आणि न्यायाधीश व्हावें, हा अगदीं ढोबळ दृष्टीनें देखील अन्याय आहे. अशी सदोष पद्धति इंग्रजी अंमलांत फार दिवस चालू असावी हेंच मला आश्चर्यकारक वाटतें.'

हिंदुस्थानांतील बड्या लोकाच्या मुलांना लष्करांत नोकऱ्या द्याव्या असें मागणें विशेषतः उत्तर हिंदुस्थानांतून पुढें आलें आहे. हिंदुस्थानांतील संस्थानिक राजनिष्ठ आहेत असा प्रत्येक व्हाइसरॉयाचा आणि प्रत्येक स्टेटसेक्रेटरीचा अभिप्राय पडला आहे. पण या आभिप्रायापुढें त्यांची मजल गेली नाहीं. या मंडळीला, तसेंच उच्च कुलांत, व लष्करी पेशांत वाढलेल्या इतर मंडळीला आपणास लष्करांत कामगिऱ्या मिळाव्या असें वाटतें. पण त्यांची इच्छा सफल होण्याला कांहींएक मार्ग नाहीं. ही स्थिती सुधारण्यासाठीं सँडहर्स्ट येथील लष्करी पाठशाळेच्या धर्तीवर तिकडे एक पाठशाळा काढण्यांत यावी, ह्मणजे तेथें लष्करी ज्ञान सपादन करून ज्यांची तशी इच्छा असेल त्यांना राणीसरकारच्या लष्करांतील सनदी नोकऱ्या मिळवितां येतील. राणीसाहेबांचे चिरंजीव डयूक ऑफ् कोनॉट हिंदुस्थानांत लष्करी हुद्यावर होते, त्या वेळीं ही सूचना फार चांगली आहे असें त्यांनीं बोलून दाखविलें होतें. इंग्लंडच्या लष्करांत नोकरी करण्याची महत्वाकांक्षा हिंदुस्थानांतील लोकांस असावी ही गोष्ट आमच्या राष्ट्रास भूषणास्पद आणि आह्मांला संमत अशीच असली पाहिजे; हिंदुस्थानांतील आमच्या लष्कराचे पोवाडे अनेक वेळां गाण्यांत आलेले आहेत. पुष्कळ निकराच्या लढायांत लढून त्यानें जगास आपला पराक्रम दाखविला आहे, आणि आपल्या अस्तित्वाचें सार्थक

केलें आहे. आह्मांला त्याचा मोठा अभिमान वाटतो आणि तो रास्तही आहे. आह्मी आमच्या मांडलिकांना आणि त्यांच्या मुलांना आपल्या देखरेखीखालीं लष्करी शिक्षण मिळविण्यास बोलावून आणि त्यांचें आमचें हित एकाच गोष्टींत आहे असें त्यांना सांगून त्यांची आमच्याविषयींची निष्ठा अधिक दृढ करून कां ठेवूं नये? मद्रास इलाख्यांत कुलवंत आणि संपन्न अशी बरीच मंडळी मला माहीत आहे. त्याचें शिक्षण इंग्रज अध्यापकांच्या हाताखालीं आस्थेनें होत असून इंग्रजांस प्रिय झालेलीं मतें, आणि त्यांचे शौर्योत्पादक खेळ यांचा त्या तरुण मंडळीशीं परिचय करून देण्यांत येत आहे. ही मंडळी एकदा वयांत आली कीं आपल्या गुरूजींच्या लगामांतून सुटली. वडिलोपार्जित बरीच संपत्ति त्यांच्या वांट्यास आलेली असते, आणि आपल्या सामर्थ्याचा कोणीकडे उपयोग करावा, किंवा कोणता धंदा करावा हें त्यांस कळत नसतें. इंग्रज लोकांप्रमाणें राहावें, इंग्रज लोकांप्रमाणें पोषाख करावा, सर्व कांहीं इंग्रजांप्रमाणें करावें असें आह्मी त्यांस शिकवीत असतों. आमच्या शिक्षणानें त्यांचे जुने आचारविचार, आणि जुन्या समजुती पार सुटून जाऊन ते आपल्या गण गोतालाही मुकतात, आणि त्यांना जगांत निराश्रितासारखा काळ कंठावा लागतो. इंग्रज समाज त्यांची वास्तपुस्तही करीत नाहीं. देशी रीतिरिवाज त्यांना नकोसे होतात आणि हळू-हळू ते आळशी, चैनी, दुर्गुणी, कर्जबाजारी आणि विषयासक्त होतात. हें कांहीं काल्पनिक वर्णन नव्हे. अशा तऱ्हेचीं बरींच उदाहरणें मला दाखवून देतां येतील. ह्या तरुण मंडळीला, व हिंदुस्थानांतील प्रतिष्ठित वर्गांना, जर लष्करांत नोकऱ्या

दिल्या तर ते वयांत येतांच त्यांच्या शिक्षणाची इतिश्री होणार नाहीं, आणि आपण शिक्षण देऊन तयार केलेली मंडळी समाजांतील उनाड आणि कनिष्ट दर्जाच्या मंडळींत सामील झाल्याचीं जीं खेदकारक उदाहरणें आपल्या पाहण्यांत येतात तीं येणार नाहींत.

कॉमन्स सभेनें पास केलेल्या समकालीन परीक्षांविषयींचा ठराव हिंदुस्थानसरकार आणि स्टेट सेक्रेटरी यांनीं अमलांत न आणल्यामुळें हिंदुस्थानांतील लोकांच्या मनांत निराशा आणि असंतोष यांचा प्रादुर्भाव झाला आहे या गोष्टीकडे दुर्लक्ष करणें वेडेपणाचें होईल. इंग्लंडांतील मोठमोठे लोक समकालीन परीक्षा सुरू करण्यास अनुकल आहेत, आणि तसें करणें न्याय्य असून त्यायोगें इंग्लंडच्या वर्चस्वास कोणत्याही तऱ्हेनें बाध येणार नाहीं. राष्ट्रीय सभेंत देखील जुन्या विचाराची ह्मणून ह्मटलेली कांहीं मंडळी असून हिंदुस्थानांत समकालीन परीक्षा सुरू झाल्यानंतर पास होणाऱ्या उमेदवारांना पुढील शिक्षणासाठीं इंग्लंडांत २।३ वर्षे ठेवण्यांत यावें ही अट त्यांस मान्य नाहीं ही गोष्ट खरी आहे. पण त्यांचा असा अभिप्राय होण्याचें कारण त्यांना असें वाटतें कीं, तरुण मंडळीला विद्याभ्यासाकरितां विलायतेंत ठेवण्यानें त्यांच्या मनावर हिंदुत्वाचे झालेले संस्कार नष्ट होऊन इकडील लोकांच्या आदरास पात्र होण्यासारखे कोणतेच नवीन गुण त्यांच्या अंगीं येणार नाहींत. १८८८ सालीं झालेल्या बैठकीच्या वेळीं हें मत विशेष जोरानें पुढें आलें होतें. पण या मताचे अनुयायी फारसे नसून उमेदवारांनीं पुढील शिक्षणासाठीं इंग्लंडांत राहिलेंच पाहिजे असें हिंदुस्थानांतील बहुतेक लोकांचें मत आहे. हिंदुस्थानांतील लोक न्यायाधीशाच्या आणि अंमलबजावणीच्या कामास लायक आहेत असें मि.

दत्त यांनीं बंगाल्यांत, आणि टागोर यांनीं मुंबई इलाख्यांत नोकरी करून सिद्ध केलें आहे. निःपक्षपात रीतीनें कसोटी लावून पाहिल असतां हिंदुस्थानांतील लोक त्या कसोटीला उतरणार नाहींत असें नाहीं. पुष्कळांनीं अशीही शंका काढिली आहे कीं, समकालीन परीक्षा घेण्याची पद्धत सुरू झाली ह्मणजे हिंदुस्थानांतील लोकच जास्त पुढें येऊन इंग्लंडांतील लोक मागें पडतील. ही शंका निराधार आहे असें मला वाटतें. माझे देशबांधव कांहीं कमी बुद्धिवान नाहींत, आणि सारख्या अटीवर दोन्ही देशांतील लोकांची चढाओढ लाविली तर तींत माझे देशबांधव मागें पडतील अशी धास्ती मला वाटत नाहीं. तशी धास्ती बाळगण्याला जागा असली तरी देखील जी मागणी मूळांतच न्याय्य आहे ती नाकारण्यास असली सबब सांगणें योग्य होईल कीं काय हाही एक प्रश्नच आहे. पाहिजे तशा नेमणुका करण्याची पद्धत मोडून टाकून तिच्या ऐवजीं परीक्षा घेऊन नेमणुका करण्याची पद्धत आपण थोड्याच वर्षांपूर्वी सुरू केली असतां सारख्याच अटीवर हिंदुस्थानांतील लोकांबरोबर चढाओढ करण्यास आमच्या देशबांधवांत ताकद नाहीं काय? कां राज्यकारभारास अवश्य लागणारे शारीरिक आणि मानसिक गुणच हिंदुस्थानांतील लोकांच्या अंगीं नाहींत असें आह्माला वाटतें? हिंदुस्थानवासीयांच्या उत्कर्षाच्या आड येणारांच्या मनांत शेवटीं सांगितलेली अडचणच विशेषेंकरून येत असावी. मात्र ती ते उघडपणें बोलून दाखवीत नसावे असें मला वाटतें.

१९ व्या शतकाच्या अखेरच्या वर्षांत युरोपांतील राष्ट्रांचें पाऊल विलक्षण वेगानें पुढें पडत आहे. गोऱ्या लोकां-

पुढें काळ्यांचा कोठेंच निभाव लागेनासा झाला आहे. ब्रह्मदेश ब्रिटिश लोकांच्या ताब्यांत आला आहे; आफ्रिकेंतील मूळच्या लोकांच्या ताब्यांतील प्रदेशावर युरोपीयन राष्ट्रें दिवसेंदिवस आपला अंमल बसवूं लागलीं आहेत; ईजिप्त सर्वस्वीं ब्रिटिशांचें अंकित झाल्यासारखेंच आहे; फ्रान्स, जर्मनी आणि बेलज्यम हीं राष्ट्र आफ्रिकेंत संपादन केलेलें आपापलें राज्य मजबूत पायावर स्थापन करण्याच्या विचारांत आहेत. नेटिव प्रांतांत वसाहती केलेले इंग्रज लोक हिंदुस्थानांतील व्यापारी लोकांना आपल्या वेशींत न येऊं देण्याच्या तजविजींत आहेत. चिनी लोकांना ऑस्ट्रेलियांत येण्याची सक्त मनाई करण्यांत आली आहे. एशियाच्या पूर्व किनाऱ्यावर मोंगोलिया प्रांताची वांटणी करण्यासंबंधानें युरोपीयन राष्ट्रांत तंटे लागले आहेत. खुद्द यूरोपांत तुर्कस्थानाचे लचके तोडण्याचें काम जारीनें चालू आहे, आणि ख्रिस्ती राष्ट्रांचा मुसलमानी देशांवर पगडा बसत चालला आहे. या सर्वांचा अर्थ काय? यावरून सुधारणेच्या अमोघ शक्तीपुढें विनाशोन्मुख राष्ट्रांचें कांहीं चालत नाहीं, एवढेंच समजावयाचें, किंवा गौरवर्ण लोक कृष्णवर्ण लोकांवर आपला अंमल शारीरबलाच्या द्वारें कायमचा स्थापन करीत असून तो सर्व प्रकारच्या परिस्थितींत त्यांजवर तसाच राहणार आहे, असें समजायाचें? ऐतिहासिक काळांत कोणत्याही राष्ट्रानें आपल्या शिरावर कधींही न घेतलेली अशा प्रकारची जबाबदारी निदान आह्मी तरी घेऊन चुकलों असून, हिंदुस्थानाला सुखी करण्यासाठीं आणि भरभराटींत आणण्यासाठीं ईश्वरानें तो देश आमच्या स्वाधीन केला आहे, असें आह्मी जाहिर करून

चकलों आहों. एकंदरीनें पाहतां आतांपर्यंत तरी आह्मीं स्वतःवर घेतलेलें काम केवळ स्वार्थाकडेच नजर न देतां सुरेख तऱ्हेनें बजाविलें आहे. उदारशिक्षणाचें बीज आह्मीं आसेतुहिमाचल पसरून दिलें, आणि देत आहों. स्वातंत्र्य-संपादनार्थ ज्या झटपटी आह्मांस स्वतः कराव्या लागल्या त्या करण्याची अवश्यकता आह्मीं आमच्या हिंदुस्थानवासी प्रजेस ठेविली नाहीं. सर्व जगाला साक्षी करून आह्मीं आपला आणि आपल्या प्रजेचा संबंध कोणत्या तऱ्हेचा असावा हें निश्चित करून ठेविलें आहे. हें वचन आह्मीं पाळणार, का आपल्या सर्व राष्ट्रास लोकांनीं लबाड ह्मणण्यासारखें आपलें वर्तन ठेवणार? या प्रश्नाचें आपण जसें उत्तर देऊं त्याप्रमाणें हिंदुस्थानावर आपलें स्वामित्व कमिजास्त वेळ राहून तें तेथील लोकांना अप्रिय किंवा प्रिय होईल.

विचारस्वातंत्र्याचा हक्क आपणाला देण्यांत आला आहे. माझ्या विचारांत कांहीं अर्थ नसेल. पण मी त्यांनाच चिकटून राहणार. हिंदुस्थानांत २० वर्षें राहिल्यानें दक्षिण प्रांतांतील लोकांशीं माझें सदोदित दळणवळण चालू आहे. मी त्यांच्या-बद्दल जें बोलतों तें स्वतःच्या माहितीवरून, आणि इतर प्रांतांतील लोकांबद्दल जें बोलतों तें, ज्यांना मी लोकांचे पुढारी ह्मणून मानतों त्यांनीं दिलेल्या माहितीवरून बोलतों. वडिलांच्या ओळखीमुळें, आणि राजकीय प्रकरणीं आणि स्वतःच्या धंद्यासं-बंधीं माझे विचार कांहीं विशेष तऱ्हेचे असल्यामुळें श्रीमंत आणि लोकमान्य मुत्सद्यापासून तों अगदीं गरीब मनुष्यापर्यंत सर्वांशीं माझा निकट आणि नाजूक संबंध जडला आहे. आपली जन्मभूमी सोडून उद्योगधंद्यासाठीं या देशांत मीं इतकीं वर्षें काढिलीं,

त्या अवधींत जर कांहीं विशेष गोष्ट मला कळून आली असली तर ती ही कीं, हिंदुस्थानांतील लोक इंग्रजांचा अंमल स्वीकारून मोठ्या आनंदानें आणि कृतज्ञपणें आपले दिवस घालवीत आहेत. कारण त्यांची खात्री झाली आहे कीं पृथ्वीवरील सर्व राष्ट्रांत इंग्रज लोक अत्यंत न्यायी आहेत. हा त्यांचा कांहीं तरी समज आहे असें नाहीं. आह्मी प्रामाणिकपणानें राज्यकारभार चालवितों ह्मणून आमचा अंमल लोक पसंत करितात. त्यांचें आमच्यावर प्रेम आहे असें नाहीं, आणि तें कां असावें हेंही मला समजत नाहीं. पण आह्मी उद्योगी असल्यामुळें ते आह्मांस मान देतात, आणि अद्यापपर्यंत आह्मी आपलीं बहुतेक वचनें, तीं मोडण्यासारखे बरेच प्रसंग आले असतां पाळिलीं आहेत, ह्मणून त्यांचा आह्मांवर विश्वास आहे. आमच्या शब्दाची अद्याप करारपत्राइतकी किंमत आहे, आणि तसें आहे तोंपर्यंतच हिंदुस्थान आमच्या अंमलाखालीं खुषीनें राहील. आह्मी जोंपर्यंत न्यायानुसार राज्य चालवूं तोंपर्यंत तें अबाधित चालेल. हिंदुस्थानांतील सुशिक्षित लोक डोळ्यांत तेल घालून आपल्या कृत्यांची चौकशी करीत आहेत; पण आमचीं कृत्यें कसास लावून पाहणारे तेवढेच लोक आहेत असें नाहीं. आमचीं विश्वविद्यालयें आणि आमच्या शाळा यांच्याशीं ज्यांचा संबंध जडला ते आपापल्या गांवांत, आपापल्या गणगोतांत, आणि नोकरचाकरांत मोठे विद्वान समजले जात असून, आपण संपादन केलेल्या ज्ञानाचा फायदा ते या मंडळीस देत असतात, आणि इंग्लंडानें हिंदुस्थानावर केलेल्या उपकारांची माहिती अगदीं लहानसहान झोंपड्यांतील लोकांसही करून

देत असतात. राणीच्या १८५८ सालच्या जाहिरनाम्याला हिंदुस्थानवासी लोक आपल्या स्वातंत्र्याची मोठी सनद समजून फार मान देतात. या जाहिरनाम्यांतील कित्येक उदात्त वचनांच्या अर्थात, राणीसरकारच्या लंडन येथील एका न्यायाधीशान वकिली बाणा पतकरून छाटाछाट करण्याचा प्रयत्न केलेला पाहून हिंदुस्थानांतील बऱ्याच इंग्रज गृहस्थांना देखील त्या अनुदार आणि आत्मघातकी प्रयत्नाबद्दल वाईट वाटल्यावांचून राहिलें नाहीं. आमच्या प्रामाणिकपणाविषयीं त्यांचा विश्वास कोणत्याही कारणानें कमी झाल्यास, त्या योगानें आमच्या इकडील राज्याची शाश्वति डळमळूं लागते. सर्व युरोपीयन राष्ट्रांत आम्ही अत्यंत न्यायी आहों, असा ग्रह जोंपर्यंत कायम राहील तोंपर्यंत पूर्वेकडील कोणत्याही लोकांना आमचें वर्चस्व वाईट वाटणार नाहीं. हिंदुस्थान आम्हीं तरवारीनें जिंकलें हें खरें आहे; पण आम्ही तें तरवारीनें राखिलें आहे हें केवळ अंशतः खरें आहे असें मला वाटतें. शस्त्रास्त्रांत आम्ही वरचढ आहों ही गोष्ट लोकांना कबूल झाली आहे; पण आमच्या राज्याची शाश्वति, हिंदुस्थानांतील लोकांच्या मनांत आमच्याविषयीं वागणाऱ्या भीतिवर अवलंबून नसून त्यांचा आमच्याठायीं जो विश्वास असेल त्यावर अवलंबून राहील. हिंदुस्थानावर इंग्लंडचें वर्चस्व असावें किंवा दुसऱ्या एखाद्या राष्ट्राचें असावें ह्मणून उद्यां जर हिंदुस्थानच्या लोकांचीं मतें घेतलीं, तर इंग्लंडचें राज्य कायम असावें असेंच सर्वांचें मत पडेल असें मला वाटतें; आणि माझी अशी समजूत आहे ह्मणूनच मला समाधान वाटतें. ही माझी समजूत ह्मणजे, न पाहिलेली एखादी गोष्ट अमुक प्रकारची असावी अशी

आपली इच्छा असते, आणि तदनुरूप आपली समजूत होते, तशा प्रकारची नव्हे. पुष्कळ दिवस बारकाईनें घेतलेला अनुभव, वस्तुस्थितीचें सूक्ष्म अवलोकन, आणि तिचीं कारणें आणि परिणाम यांची पूर्ण चौकशी, यांवरून माझी ही समजूत झालेली आहे. राज्यकारभार चालविणारांवर मोकळ्या मनानें पाहिजे तितकी टीका करणें याला जर राजद्रोह ह्मणावयाचें असेल तर हिंदुस्थानांतील लोक अत्यंत अराजनिष्ठ आहेत असें ह्मणण्यास हरकत नाहीं. पण ही टीका आपण दिलेल्या शिक्षणाचाच परिणाम आहे असें ज्यांना कळून येईल, त्यांना, लोकांनीं सरकाराविषयीं नाराज होऊन, खिन्न मुद्रेनें मूकव्रत धारण करून बसण्यापेक्षां, आपले विचार कसकसे पुढें जात आहेत हें टीकाद्वारें दाखवावें, हेंच पसंत पडेल. राष्ट्रीयसभेच्या टीकाकारांपैकीं एका वर्गाला ती सुशिक्षित लोकांची सभा असून तिजमध्यें अराजनिष्ठेचा तलखपणा मुळींच नाहीं असें वाटतें. दुसऱ्या एका वर्गाच्या लोकांस बाष्पनिर्गमद्वाराप्रमाणें तिचा उपयोग होत आहे असें वाटतें. तिसऱ्या एका वर्गाला ती लोकांच्या इच्छा आणि गरजा, तसेंच भावी सुखदुःखासंबंधाचे त्यांचे विचार कळण्याचें एक साधन झालें आहे असें वाटतें. या वर्गांपैकीं कोणत्या वर्गाचें मत बरोबर आहे, आणि निरनिराळ्या विषयांवरील माहिती आणि अभिप्राय सांगणारा जो हा राष्ट्रीयसभारूप जीवंत विश्वकोश, त्याचा उत्तम प्रकारें उपयोग कोणता पक्ष करून घेईल हें पाहणें आहे. राष्ट्रीयसभेंतील प्रतिनिधी निवडून पाठविण्याची पद्धत कितीही सदोष असली तथापि ज्या लोकांच्या वतीनें ती आपलें काम चालविते त्यांच्या सर्व महत्वकांक्षा काय आहेत त्या तिनें आपणापुढें एकत्र क-

रून ठेविल्या आहेत. मुसलमान मंडळी या चळवळीपासून अलिप्त राहिली आहे खरी; पण याचें कारण कांहीं अंशीं ते लोक हिंदूंच्या मानानें शिक्षणांत मागसलेले आहेत, आणि कांहीं अंशीं कित्येकांनीं त्यांच्या मधील जातिमत्सराचा फायदा घेऊन मुसलमानलोकांस राष्ट्रीय सभेवर विश्वास ठेवूं नका आणि तिच्याविरुद्ध जा असें चिथवून दिलें आहे. तरी पुष्कळ बुद्धिमान आणि सुशिक्षित मुसलमान लोक राष्ट्रीय सभेला अनुकूल असून तिला उघडपणें मदत करीत आहेत. दोन वेळां ठळक मुसलमान गृहस्थ तिच्या बैठकींचे अध्यक्ष झाले आहेत. मुंबई हायकोर्टाच्या न्यायाधीशाच्या जागीं असलेले मि. बद्रुद्दिन तय्यबजी १८८७ सालीं मद्रास येथें भरलेल्या राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष होते. १८९६ सालीं व्हाइसरायांचे कायदे कौन्सिलांतील एक सभासद ना. मि. सयानी हे कलकत्त्यास झालेल्या बैठकीचे अध्यक्ष होते. पारशी मंडळी राष्ट्रीय सभेस प्रतिकूळ आहे असें जें विधान करण्यांत येतें त्यांत मुळींच सत्य नाहीं. कॉमन्स सभेंत सुखासीन होऊन जे बडे पारशी गृहस्थ हिंदुस्थानांतील आपल्या देशबांधवांसंबंधानें अत्यंत हास्यास्पद टीका करीत असतात, त्यांची योग्यता कदाचित् मोठी असेल, पण ज्यांना कांहीं खरी माहिती आहे ते मि. दादाभाई नवरोजी, मि. दिनशा एदलजी वाच्छा, आणि ना. फेरोजशहा मेहेता यांसारख्या अनुभवी आणि हुषार गृहस्थांना कमी योग्यतेचे लेखणार नाहींत, असें मला वाटतें.

इंग्लडांत असलेल्या एकन एक लोकनियुक्त संस्था हिंदुस्थानास सरू कराव्या अशी राष्ट्रीय सभेची इच्छा आहे, अशी पुष्कळांनीं

टीका केलेली ऐकूं येते. राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यांचें या टीकेवर एवढेंच उत्तर असतें कीं, 'आमच्या सभेची हकीकत वाचा ह्मणजे काय आहे तें तुह्मांला समजेल.' ही हकीकत अगदीं बारकाईनें वाचून पाहिली तरी अशा प्रकारची इच्छा कोठें प्रदर्शित केल्याचें आढळून येणार नाहीं. पार्लमेंटच्याद्वारें इंग्लंडांत जसा राज्यकारभार चालतो, तसा हिंदुस्थानांत चालणें अशक्य आहे, हें सर्वांस कबूल आहे. राष्ट्रीय सभेचें मागणें सध्यां इतकेंच आहे कीं, कायदेकौन्सिलांत रयतेच्या तर्फेचे बरेच प्रतिनिधी असावे, त्यांना निवडून देण्याचा अधिकार वास्तविक रयतेच्याच हातीं असावा, आणि त्यांना सरकाराकडून होणाऱ्या खर्चावर अधिक दाब ठेवितां यावा. कायदेकौन्सिलांतील सभासदांना सरकारास प्रश्न विचारण्याचा हक्क मात्र आहे, कौन्सिलापुढें एखादा ठराव रुजू करण्याचा हल्लीं अधिकार नाहीं. तेवढा आणखी मिळावा एवढेंच राष्ट्रीय सभेचें मागणें आहे. कौन्सिलांत सभेच्या प्रतिनिधींची संख्या सरकारी सभासदांपेक्षां ज्यास्त असावी असें तिचें ह्मणणें नाहीं. तिनें विचारार्थ हातीं घेतलेल्या प्रत्येक योजनेंत सरकाराकडेच बहुमत ठेविलें आहे. आपलें बहुमत करून सरकाराचा पाडाव करण्याची तिची इच्छा नाहीं; तर खरी माहिती सरकाराला मिळावी एवढाच तिचा हेतु आहे. असें असतां तिजबद्दल सरकारी अधिकाऱ्यांचा काय अभिप्राय आहे? लॉर्ड लॅन्सडाउन यांनीं राष्ट्रीय सभेला 'हिंदुस्थानांतील प्रगामी लिबरल पक्ष' असें नांव दिलें आहे. मार्किस ऑफ् डफरिन यांनीं सेन्ट ऍंड्रूजच्या मेजवानीच्या प्रसंगीं राष्ट्रीय सभा आणि तिचे जनक मि. अॅलन ह्यूम यांजवर अद्वातद्वा तोंड सोडिलें होतें.

त्यांनीं केलेली निंदा वाचून आज देखील आश्चर्य, क्रोध आणि निराशा यांचा राष्ट्रसभाभक्तांच्या मनांत प्रादुर्भाव होईल. आपणांला उत्तेजन मिळणार नाहीं, किंवा आपली दाद कोणी घेणार नाहीं, हें राष्ट्रीय सभेचे नायक जाणून होते. पण खुद्द राणीसरकारचे प्रतिनिधि आपणांवर उठून आपल्या हेतूंचा विपर्यास करून दाखवितील असें त्यांना वाटलें नव्हतें. आपण ज्या लोकांवर राज्य करितों, त्या लोकांविषयीं आपल्या मनांत कायमचें वांकडें आलें आहे, असें राज्यकर्त्या अधिकाऱ्यानें दाखवून उपयोगी नाहीं. तो एखादी गोष्ट बोलून गेला म्हणजे त्याच्या अधिकाराच्या नात्यानें तिला कांहीं निराळीच किंमत येते. सर्व लोकांसमक्ष झालेल्या त्याच्या भाषणांची फार बारकाईनें विचक्षणा होते. ‘ राजा बोले दळ हाले ’ ही म्हण हिंदुस्थानांत जितकी खरी आहे तितकी अन्यत्र कोठेंही नसेल. सरकारानें प्रकट केलेल्या अभिप्रायावर (मग तो स्पष्ट असो, किंवा अस्पष्ट असो,) हिंदी आणि अँग्लोइंडियन मंडळीची सारखीच मदार असते, आणि बहुजन समाज त्या अभिप्रायाचें तावडतोब मोठ्या उत्साहानें ग्रहण करितो. लॉर्ड डफरिन यांच्या अमदानींत घडलेल्या या उद्वेगजनक हकीकतीचा उल्लेख करण्यांत जुने वाद उकरून काढण्याचा माझा विचार नाहीं. तथापि लॉर्ड डफरिन यांनीं केलेली निंदा लोक अद्याप विसरले नाहींत खास. व्हाइसरॉयांनीं कोणत्या गोष्टीबद्दल जपून असलें पाहिजे हें त्या प्रसंगावरून चांगलें दिसून येतें. राष्ट्रीय सभेविषयीं वादविवाद करितांनां आपल्या भाषणांत सभ्यपणा राखून जगांत कसें वागावें हें आपणास समजतें, असें एका गव्हर्नरानें मात्र दाखविलें. १८८७ साली राष्ट्रीय

सभेसाठीं जमलेल्या प्रतिनिधी मंडळीस लॉर्ड कॉनेमारा यांनीं सरकारी बंगल्यांत उपवनविहारार्थ बोलाविलें होतें. 'मद्रास येथें आलेल्या प्रसिद्ध पाहुण्यांच्या' नांवानें तें निमंत्रण करण्यांत आलेलें होतें. निमंत्रणपत्रिकेंतील उपचारभंगाकडे तादृश लक्ष न देतां सर्व प्रतिनिधींनीं त्याचा आदर केला. लॉर्ड कॉनेमारा हे दिसण्यांत ऐटदार, मोहक भाषण करणारे, धोरणी आणि मनुष्यस्वभावाचे चांगले परिचित होते, त्यांनीं राष्ट्रीय सभेच्या प्रतिनिधींचा वरील संमेलनाच्या द्वारें जो सन्मान केला तो पाहून राज्यकर्ते आणि प्रजा यांजमध्यें राष्ट्रीय सभेची बैठक आटोपते वेळीं जो प्रेमभाव दिसला तो दुसऱ्या कोणत्याही वर्षीं दिसला नाहीं. राष्ट्रीयसभेच्या चळवळींचें महत्व किती आहे हें एका गोष्टीवरून समजण्यासारखें आहे. विलायतेंत निरनिराळ्या गांवीं ज्याप्रमाणें वकिलांच्या मंडळ्या आहेत, त्याचप्रमाणें हिंदुस्थानांत सर्वत्र हुषार वकील लोक पसरलेले आहेत. जिल्ह्याच्या मुख्य शहरांत ह्या मंडळ्यांतील सभासदांची संख्या पुष्कळ असून, त्यांची बुद्धिमत्ताही विशाल आहे. प्रत्येक ठिकाणीं अधिक आणि हुषार लोकांची भरती होत आहे. ही बहुतेक मंडळी आह्मीं विश्वविद्यालयांत दिलेलें शिक्षण घेऊन बाहेर पडलेली आहे. ही सर्व मंडळी राष्ट्रीयसभेच्या कट्ट्या अभिमान्यांत मोडते. आपण राजकीय चळवळींत बिलकुल पडत नाहीं असें दाखविलें असतां आपल्या धंद्यांत आपणाला खास बढती मिळेल असें जर क्वचित् प्रसंगीं एखाद्या वकिलास वाटलें तर आपणाभोंवतीं चालू असलेल्या राजकीय चळवळींविषयीं आपण उदासीन आहों असें दाखवून क्वचित् एखादा वकील अधिकाऱ्यांची मर्जी

संपादन कारितो; पण आपल्या राष्ट्रीयसभाभक्त मित्रांना तो गुप्तपणें भेटतच असतो, आणि आपलें नांव प्रसिद्ध करावयाचें नाहीं अशा अटीवर सभेच्या कामासाठीं वर्गणी देतच असतो. राष्ट्रीयसभेस अगदीं मनापासून अनुकूल नाहीं असा एक देखील नेटिव अंमलदार मिळणार नाहीं. प्रत्यक्ष पाहिलेल्या माहितीवरून मी असें सांगूं शकतों कीं, ती सभा आपणासर्वांची आहे असें समजून, तिला पैसे पुरवून आपली तिजविषयींची सहानुभूति पुष्कळ नेटिव अधिकारी व्यक्त करीत असतात. देशी लोकांस हायकोर्टांतील न्यायाधीशाची जागा द्यावयाची वेळ आली ह्मणजे सरकाराला, मोठ्या नाखुषीनें कां होईना, राष्ट्रीयसभाभक्तांतून कोणाची तरी त्या जागेसाठीं निवड करावी लागते. मद्रास, मुंबई आणि वायव्यप्रांत या सर्व ठिकाणीं हाच प्रकार झालेला आढळून येईल. यांतील मर्म असें आहे कीं, राष्ट्रीयसभा आपल्या मुलांसाठीं आणि मुलांच्या मुलांसाठीं आपले प्रयत्न चालवीत आहे हें हिंदुस्थानांतील प्रत्येक सुजाण मनुष्यास कळत आहे, तिचे उद्देश त्याला पटलेले आहेत, आणि तिची काम करण्याची पद्धतही त्याला मान्य आहे. त्याचा संसार सरकारी नोकरीवर चालावयाचा असल्यामुळें त्याला आपले विचार उघडपणें बोलून दाखवितां येत नाहींत. पण राष्ट्रीयसभेचे चालक त्याला ओळखून आहेत, आणि त्याच्यासारखी पुष्कळ सुशिक्षित मंडळी या प्रतिवार्षिक मेळ्यास पाठिंबा देण्यास तयार आहे, यावरूनच या चळवळींत खरा जोम आहे. मी मुत्सद्दी असून जर अधिकारापन्न असतों, तर इंग्रजी शिक्षणाच्या योगानें हिंदुस्थानांतील लोकांच्या बुद्धीच्या अशा

आश्चर्योत्पादक रीतीनें विकास झालेला पाहून मला मोठा अभिमान वाटला असता. शांतपणें आणि व्यवस्थित रीतीनें चाललेली राष्ट्रीयसभेची बैठक, तिची टापटीप, तेथील अध्यक्षांनीं घालून दिलल्या नियमांचें मोठ्या तत्परतेनें आणि आनंदानें करण्यांत येत असलेलें अनुवर्तन, ब्रिटिश राज्यापासून होत असणाऱ्या अनेक फायद्यांची कृतज्ञपणें देण्यांत येत असलेली कबुली, तिनें आपल्या मागण्या मागतांना योजिलेली सभ्य भाषा, आणि खुद्द त्या मागण्या, ह्या सर्व गोष्टी आह्मीं दिलेलें शिक्षण, आमचीं वचनें व आमचें राज्यधोरण यांचे अवश्य भावी परिणाम होत; आणि तसे परिणाम व्हावे अशी आमची इच्छाही होती. या सर्व गोष्टींकडे बोट दाखवून जगांतील इतर कोणत्याही देशानें माझ्या देशाप्रमाणें प्राचीन हिंदुस्थानाचें इतक्या थोड्या दिवसांत असें रूपांतर करून दाखविलें नसतें; असें ह्मणून अभिमान वाहण्याला मला जागा आहे. आपले ३० कोट देशबांधव सुखासमाधानांत असावे, या इच्छेनें त्यांच्या स्थितीसंबंधीं आपल्या बुद्धीनुसार विचार करण्यासाठीं एकत्र जमलेल्या मंडळीला त्यांच्या सभेंतून हुसकून लावण्याचा प्रयत्न न करितां त्यांचा मार्गदर्शक होण्याचा मी प्रयत्न करीन. राजकीयबाबतींत उपद्व्याप करणारी, किंवा स्वार्थासाठीं लोकांस हवें तसें चिथवून देणारी, राज्यक्रांतीनें ज्यांचें नुकसान होणार नाहीं, अशी ही मंडळी नव्हे. ब्रिटिश राज्याच्या चिरस्थायित्वावरच त्यांचें ऐहिक कल्याण अवलंबून आहे. सर्व प्रकारच्या व्यापारांचें आणि धंद्यांचें शिक्षण मिळा-लेल्या निवडक लोकांचा त्याच्यांत समावेश झालेला आहे. त्या मंडळींत बरेच सधन जमीनदार आहेत, आणि बहुतेक लोक

चांगले संपन्न आहेत. अशा मंडळीना वेतन घेऊन राजकीय चळवळी करणारे आणि त्यांच्या धुरीणांना वकीलीच्या धंद्यांत पैसा मिळत नाहीं ह्मणून असंतुष्ट झालेली मंडळी, असें नांव देणें योग्य आहे काय? गेलीं कांहीं वर्षे, राष्ट्रीय सभेच्या व्यवस्थापक मंडळापैकीं, मी एक होतों. हल्लीं त्या मंडळीचा आणि माझा बिलकुल संबंध उरला नाहीं; तरी माझ्या जुन्या सरकारी मित्रांनीं विषय-नियामक-मंडळींत प्रत्येक विषयाचा कीस काढितांना जी हुषारी, उत्साह आणि नेमस्तपणा दाखविला त्याबद्दल माझ्या मनांत त्यांच्या विषयीं फार पूज्य बुद्धि आहे, ही गोष्ट मी मोठ्या आनंदानें सांगतों. राष्ट्रीय सभा खरोखर जें कांहीं करीते, तें या विषय-नियामक-मंडळींतच होत असे. थोरल्या सभेपुढें आणावयाच्या विषयांसंबंधानें वाटाघाट करण्यासाठीं नेमलेली मंडळी कित्येक तासपर्यंत एकत्र जमून जी चर्चा करीत असे तीवरून विद्वत्ता, सार्वजनिक कामाविषयीं आस्था, आणि कायदे करण्यास आणि ते अंमलांत आणण्यास लागणारी पात्रता, हे गुण त्यांच्या अंगीं होते असें दिसून येई. प्रत्यंतरा दाखल मी येथें एकाच प्रसंगाचें वर्णन करितों. १८९२ सालचा कायदे कौन्सिलासंबंधाचा कायदा राष्ट्रीयसभेनें ८ वर्षें सतत मेहनत केल्याचा परिणाम आहे. त्या कायद्यानें मिळालेल्या गोष्टीहून मूळ मागितलेल्या गोष्टी अगदीं निराळ्या होत्या. पण 'अरण्यरुदन करणाऱ्या' राष्ट्रीयसभेची एक मुख्य मागणी पार्लमेंटानें कबूल केली एवढें या कायद्यानें ठरलें. १८८९ सालीं मुंबई येथें राष्ट्रीयसभा भरण्यापूर्वीं कित्येक महिनेपर्यंत निरनिराळ्या इलाख्यांतील मंडळी कौन्सिलांची रचना कशी असावी ह्याब-

द्दल आपल्या निरनिराळ्या योजना तयार करण्यांत गुंतली होती. बंगाल, मुंबई आणि मद्रास यांनीं आपापल्या योजना लिहून तयार केल्या होत्या. मद्रास येथें बऱ्याच विद्वान मंडळींची एक पंचायत माझ्या घरीं कित्येक आठवडे या विषयासंबंधानें विचार करण्याकरितां जमत असे. तिनें आपणांस ज्या गोष्टी मांडावयाच्या होत्या त्यांचा एक मसुदा छापून तयार केला. त्या मसुद्यांतील एक देखील अक्षर आपल्या हातून उगाच लिहून गेलें असें वाटूं लागण्याचा प्रसंग या मंडळीला कधींही येणार नाहीं. मि. ह्यूम साहेबांच्या अध्यक्षतेखालीं मुंबईस विषय-नियामक-मंडळीच्या सभा जेव्हां होऊं लागल्या, तेव्हां या निरनिराळ्या योजनांसंबंधानें चालणारा वाद विवाद सूर्योदय होई तरी देखील संपत नसे. अखेरीस त्या वादविवादांत मद्रस्थकरांची सरशी झाली आणि त्यांनीं तयार केलेली योजना मि. ब्रॅडलॉ यांच्या हातीं पडून कॉमन्स सभेंत तिजबद्दल वांटाघांट होऊन १८९२ चा कौन्सिलासंबंधीं कायदा झाला. हें केवळ उदाहरण ह्मणून सांगितलें. राष्ट्रीय सभेच्या बैठकींत जाहीर रीतीनें प्रत्येक सूचना निरनिराळ्या वक्तयाकडून मांडण्यांत येण्या पूर्वी तिजबद्दल किती बारकाईनें चौकशी आणि विचार चाललेला असतो, आणि किती लोक तिजबद्दल विचार करीत असतात, हें राष्ट्रीयसभेच्या आक्षेपकांस मुळींच माहीत नसतें. १८९४ सालापासून मला स्वतःला पुढची माहिती नाहीं हें खरें, पण त्या सालानंतर या व्यवस्थेत कांहीं बदल करण्यांत आला असेल असें मानण्यास कारण नाहीं.

आपल्या देशबांधवांच्या राजकीय आणि इतर उणीवांचा विचार करण्यासाठीं दर वर्षी जमणाऱ्या या मंडळीच्या अंगीं असलेल्या गुणांपैकीं प्रधान गुण कोणता म्हणून जर मला कोणी विचारलें, तर आपण ब्रिटिश राज्यांतील प्रजा आहों अशाबद्दल त्यांस वाटत असलेला अभिमान, असें मी सांगेन. राष्ट्रीयसभेच्या प्रत्येक बैठकीच्या बरखास्तीच्या वेळीं राणी साहेबांच्या नांवानें जयघोष करण्यांत येत असतो, तो निव्वळ थट्टा आहे असें म्हणणारी कांहीं मंडळी आहे. पण या मंडळीच्या मनांत चिरकाल टिकण्यासारखा अत्यंत अभिमान त्यांच्या अंतःकरणांत वसत असल्यामुळेंच त्यांच्या तोंडून हा जयघोष निघतो, आणि त्या प्रमाणेंच यांची इच्छाही असते. राष्ट्रीय-सभेची अंतर्गत व्यवस्था मला पुष्कळ वर्षें माहीत आहे. आणि तिच्या प्रतिनिधींशीं माझें दळणवळण पुष्कळ झालें आहे. यामुळें इंग्लंडच्या अंमलाचें जूं वाहण्यास ते संतोषानें आणि कृतज्ञपणें तयार आहेत, हें मला चांगलें माहीत आहे. ही गोष्ट मला पूर्णपणें माहीत असल्यामुळेंच अलीकडे उठ-लेली राजद्रोहासंबंधाची हूल, आणि पुष्कळांस अनावश्यक, अनुदार आणि वेडगळपणाचा भासणारा कायदा करण्यानें तिचा झालेला कळस, हीं पाहून मला फार वाईट वाटतें. रा. टिळकां-वर खटला करण्यांत आला, ही एक घब्राड चूक आहे. त्यांचे सर्व देशबांधव, त्यांनीं स्वदेशाकरितां कष्ट भोगिले असें मानितात, आणि त्यांना ओळखणारे इंग्रज लोक ब्रिटिश राज्यांत जेवढें कांहीं चांगलें आणि प्रशंसनीय आहे, त्यांचे निस्सीम भक्त ते आहेत असेंच समजतात. अशा मनुष्यावर खटला करून त्यास शिक्षा दिल्याशिवाय ब्रिटिश राज्य कायम

राहिलें नसतें असें नाहीं. लोकांत शिक्षणाचा प्रसार एक सारखा होत आहे. त्यांना त्याची मोठी हांव सुटल्यासारखी दिसत आहे. त्यांच्या महत्वाकांक्षेला नित्य निरनिराळे मार्ग सांपडत आहेत. त्या योगानें सनदी नोकरांच्या वर्गा बाहेर जीवनार्थ कलहामध्यें आमची आणि हिंदुस्थानांतील आमच्या प्रजेची सारखी चढाओढ लागलेली आहे, आणि तींत त्यांना चांगलें यश येत असल्यामुळें आमच्या लोकांच्या मनांत हेवा आणि भीति उत्पन्न होऊं लागली आहे. राष्ट्रीयसभेच्या बैठकी सालोसाल होऊं लागल्यामुळें, एका प्रकारचा स्वदेशाभिमान लोकांच्या अंगीं उत्पन्न होऊन त्यास स्वतःच्या कर्तबगारीची खात्री अधिकाधिक पटूं लागली आहे. आम्ही देत असलेल्या शिक्षणाचा असा परिणाम झालाच पाहिजे, आणि आतां त्याकडे आम्ही काना डोळा करणें वेडेपणाचें आहे. जुटीनें आणि व्यवस्थेनें एखादें काम करावयास लागलें म्हणजे असाच परिणाम व्हावयाचा. लोकांना विचार करण्याचा मार्ग आम्हीच दाखविला आहे, त्यांनीं विचार करूं लागून आपले सिद्धान्त ठरवूं नये, असें आम्ही आतां म्हटल्यास चालेल काय?

ह्या विषयासंबंधानें निरनिराळ्या लोकांचे जे अभिप्राय आहेत, त्यांत लॉर्ड क्रोमर यांचा अभिप्राय अत्यंत महत्वाचा आहे. वर सांगितलेले परिणाम जेथें ढळढळीत दिसून येऊं लागले आहेत, त्या हिंदुस्थानांतच त्यांच्या सरकारी नोकरीचीं बरींच वर्षे गेलीं आहेत. लॉर्ड क्रोमर म्हणतातः—

"हिंदुस्थानांत घडणाऱ्या गोष्टींकडे साधारण लक्ष्यपूर्वक अवलोकन करणारालाही दिसून येईल कीं, हल्लींचें कालमान

बदललें आहे. शिक्षणाचा प्रसार, स्वतंत्र विचाराच्या वर्तमान पत्रांतील चर्चेचें वाढतें वर्चस्व, राज्यकारभाराचीं तत्वें कारभाऱ्यांच्या मर्जी प्रमाणें ठरूं न देतां त्यास कायदेशीर बंधन घालण्याची प्रवृत्ति, आगगाड्या आणि तारायंत्रें यांचा प्रसार, यूरोपाशीं दळणवळण ठेवण्यासाठीं झालेल्या अनेक सोयी, आणि यूरोपीयन कल्पनांचा देशी समाजांत झालेला सुलभ प्रवेश, यांच्या योगानें लोकांवर विशेष परिणाम घडूं लागले आहेत. हिंदुस्थानांत नवीन कल्पनांचा उदय होत असून, नव्या नव्या गोष्टी व नवे नवे हक्क असावे असें लोकांस वाटूं लागलें आहे. लोकमत दिवसेंदिवस अधिक प्रबल होत चाललें आहे. अशा परिस्थितींत राज्यकारभार चालविण्याचें काम राज्यकर्त्याला, आणि विशेषत: जुलुमी राज्यकर्त्याला, जड जातें. राज्यकारभारांत झपाट्यानें सुधारणा करणें धोक्याचें आहे; पण स्वस्थ बसून राहून मुळींच सुधारणा न करणें हें त्याहून धोक्याचें आहे. लोकांमध्यें सुधारणेविषयीं जी इच्छा उत्पन्न झालेली असते, ती जरी बऱ्याच अंशीं खोल बिंबलेली किंवा प्रबल नसते, तरी तिला नीट वळण लावून तिजपासून देशाला जितके फायदे करून देतां येण्याजोगे असतील तितके कसे करून घ्यावे हा एक मोठ्या विचाराचा प्रश्न आहे. तसेंच या इच्छेकडे दुर्लक्ष करून, किंवा तिला दडपून टाकण्याचा प्रयत्न करून, ती राजकीय अनर्थाचें मूळ होऊन बसूं नये, यासाठीं जपलें पाहिजे. मुद्रण स्वातंत्र्याचा ९० वर्षें अनुभव घेतल्या नंतर, आणि ३० वर्षें पर्यंत शिक्षण प्रसार झाल्यानंतर, इंग्रजी विचारांची भर देशांत सर्व बाजूंनीं होत असतां, आणि जुन्या चाली रीतींचा आणि संस्कारांचा लोप होत असतां,

देशांतील बुद्धिमान आणि सुशिक्षित लोकांच्या इच्छा, समजूती आणि उद्देश यांत फरक झालाच पाहिजे. सरकार शहाणें आणि प्रसंग जाणणारें असेल तर त्यानें या फेरफारांकडे दुर्लक्ष न करितां, त्यांच्या धोरणानें आपल्या राज्यव्यवस्थेंत हळुहळु फेरफार करावे. त्यानें तसें न केल्यास लोकांमध्यें स्वत: उत्पन्न केलेल्या शक्तींवर त्यांचा अंमल चालणार नाहीं, आणि त्यांचा नाश होण्याची पाळी येईल."

हिंदुस्थानांतील विषयांसंबंधानें अभिप्राय देण्यास जी मंडळी पात्र आहे, त्यांत सर वुइल्यम हंटर अग्रगण्य आहेत (होते). त्यांनीं १८८९ सालीं पुढील अभिप्राय बिनधोक ठोकून दिला आहे. 'लोक मला नेमस्त मताचा ह्मणतात, आणि मी तसा आहे; तथापि राजकीय चळवळ पाहिली ह्मणजे तींत उडी घातलीच पाहिजे.'—असें प्रत्येक खऱ्या इंग्रज गृहस्थांचें शील असल्यामुळें, आपण एकीकडे स्वस्थ उभें राहून हिंदुस्थानांत राजकीय चळवळींचा जो लोंढा चालविला आहे, त्याकडे केवळ पाहत राहणें हितकारक होणार नाहीं. मी नेमस्त मनाचा आहे, आणिं राजकीय भानगडींपासून अलिप्त राहतों याचें कारण असें कीं, माझ्या राजकयि बाबतींत ढवळाढवळ करण्यानें मी स्वत:च्या कर्तव्याची जी दिशा ठरविली आहे, त्या दिशेनें काम करण्याला हरकत येईल. हिंदुस्थानाचा इतिहास लिहिण्यास अद्यापि अवधि आहे. त्याचा खरा इतिहास लिहिण्यांत आला ह्मणजे हल्लींची राजकीय चळवळ ही, आह्मीं स्वत:च एक प्रकारची प्रेरणा दिल्यामुळें जो कारण समुच्चय उत्पन्न झाला, त्याचा परिणाम आहे, असें इंग्रज लोकांस कळून येईल. आमच्या हेतूंचा

विपर्यास करणारी मंडळी, ही चळवळ केवळ मूठभर लोकांनीं आरंभिली आहे, तींत कांहीं महत्व नाहीं, आणि तिच्या पासून अपाय मात्र होणार आहे, असें ह्मणत असतात. पण माझी समजूत अशी आहे कीं, हिंदुस्थानांत जी जागृति उत्पन्न झाली आहे, तिचाच हा सूक्ष्म पण चिरस्थायी परिणाम आहे. ही जागृति केवळ मानसिक सुधारणे पुरतीच झाली आहे असें नाहीं, तर व्यापारी बाबतींत, तसेंच एखादें राष्ट्र नव्यानें अस्तित्वांत आलें ह्मणजे त्याचीं जीं चिन्हें दिसूं लागतात, त्या सर्व चिन्हांवरून ही दिसून येऊं लागली आहे. या राजकीय चळवळीच्या योगानें जी एक शक्ति अस्तित्वांत येत आहे, ती हिंदुस्थानांतील इंग्रज लोकांचें राज्य मजबूत तरी करील किंवा मोडून तरी टाकील. ह्मणून सरकारचा जुना नोकर या नात्यानें मी ह्मणतों कीं, या शक्तीचा उपयोग आपलें राज्य मजबूत करण्याकडे केला पाहिजे. तें मोडण्यासाठीं होऊं देतां कामा नये. गेल्या वर्षी मिस्तर यूल यांनीं राष्ट्रीय सभेची जी सेवा केली आहे, ती तर बहुमोल आहे. मी लंडनपासून कांहीं अंतरावर राहत असल्यामुळें इंग्लंडांतील खेड्यापाड्यांतील लोकांचें राष्ट्रीयसभेविषयीं काय मत आहे हें ऐकण्याचे मला अनेक प्रसंग येतात. त्यांच्या मतांत जो फरक झाला आहे तो आश्चर्य करण्यासारखा आहे. एक वर्षापूर्वी राष्ट्रीयसभा हिंदुस्थानांतील इंग्रजांचें राज्य नाहींसें करणारी आहे, असें त्यांस वाटत होतें. यंदा तें मत बदललें आहे. आणि विशेषतः मि. यूल साहेबांच्या प्रयत्नानें, त्यांच्या शांतपणें वादविवाद करण्यानें आणि खुद्द त्यांजविषयीं लोकांच्या मनांत पूज्यबुद्धी वसत असल्यामुळें,

आह्मीं राष्ट्राला घातक नाहीं; पण राष्ट्रसभाभक्त काय करितात तें पाहावें आणि त्यांच्या ह्मणण्याचा विचार करावा इतकी त्यांची योग्यता आहे, असें ठरल्यासारखें आहे. आपल्या कृत्याकडे कोणी निरखून पाहू लागल्यास राष्ट्रीयसभाभक्तांस आनंदच होईल. कारण त्यांत लपवून ठेवण्यासारखें कांहींच नाहीं. राष्ट्रीयसभेचें काम सभ्य शब्दांनीं व गंभीरपणें चालतें, तसें हिंदुस्थानांतील दुसऱ्या राजकीय चळवळींचें चालत नाहीं.

१८९० सालीं सर वुइल्यम हंटर यांनीं पुढें लिहिल्याप्रमाणें आणखी टीका केली होती:—"पाश्चात्य शिक्षणाच्या योगानें हिंदुस्थान देशावर झालेल्या परिणामांचें येथें जें थोडक्यांत निरीक्षण केलें आहे, त्यांत या अनंतपार विषयाचा केवळ एकदेशीय विचार झाला आहे. राजकीय बाबतींत पाश्चात्य शिक्षणापासून कोणते परिणाम झाले आहेत, याबद्दल स्थलाभावामुळें येथें कांहींच लिहितां येत नाहीं. कारण हिंदुस्थानांतील लोकांनीं चालविलेल्या राजकीय चळवळीसारख्या वादग्रस्त विषयांचा निःपक्षपातपणें, आणि समाधानकारक रीतीनें विचार करावयाचा म्हणजे विस्तारपूर्वक विवेचन केलें पाहिजे, तसें आतां करितां येत नाहीं; म्हणून मी थोडक्यांत येथें सांगतों कीं, त्या राजकीय चळवळी हिंदुस्थानांत सुरू केलेल्या पाश्चात्य शिक्षणाचे स्वाभाविक आणि अपरिहार्य परिणाम आहेत. हिंदुस्थानांत ब्रिटिश अंमल चालू झाल्यापासून मानसिक आणि नैतिक गुणांनीं थोर असे जे मनुष्य आमच्या मतें पैदा झाले आहेत, तेच या चळवळींचे पुरस्कर्ते आहेत. सामान्य जनसमूहाला आमच्या राज्यकार-

भारांतील गोष्टी समजून सांगण्याचें काम स्वभावतःच या लोकांकडे गेलें आहे. असे लोक राजकीय चळवळी करूं लागले म्हणजे ते ब्रिटिश अंमलास नाराज आहेत असें म्हणणें चुकीचें, अन्यायाचें आहे. कारण हिंदुस्थानांतील आमच्या प्रजेपैकीं आपलें सांप्रतचें आणि भावी हित इंग्रजी राज्याच्या चिरस्थायित्वांत आहे, असें जर कोणाला वाटत असेल तर तें, त्यांस वाटत असलें पाहिजे. हें निरीक्षण नाइलाजास्तव करितां येईल तितकें संक्षिप्त जरी केलें आहे, तरी त्यावरून इतकें दिसून येईल कीं नैतिक, मानसिक, औद्योगिक वगैरे बाबतींत हिंदुस्थानांतील लोकांची जी एकंदर प्रगति होत आहे तिचा राजकीय चळवळी हा केवळ एक भाग होय. मुंबई येथें नुकत्या भरलेल्या राष्ट्रीय सभेच्या बैठकींत हिंदुस्थानाच्या निरनिराळ्या भागांतून आलेल्या १८८९ प्रतिनिधींचा जो विलक्षण मित्रसमुदाय दिसत होता, त्यांत मोठासा अर्थ नव्हता; तर राजकीय कार्यासाठीं जमलेल्या ह्या सभेच्या बरोबरच हिंदुस्थानांतील स्त्रियांची स्थिति सुधारण्यासंबंधानें तीहूनही मोठी ६००० लोकांची सामाजिक परिषद भरली होती. यामुळेंच या सभेला महत्व द्यावयाचें. केवळ राजकीय उद्देश साधण्यासाठीं सुरू केलेली चळवळ शहाणपणाची असेल किंवा नसेल; पण आपली व्यक्तिविषयक आणि संसारिकस्थिति सुधारून समाज, श्रेष्ठतर पदवी प्राप्त करून घेण्याचा प्रयत्न करूं लागला असतां, त्या प्रयत्नांत ज्या राजकीय चळवळींचा अंतर्भाव होतो त्या चळवळी मोडून टाकणें अशक्य आहे. त्या चळवळीला चांगलें वळण देतां येईल, किंवा त्या नेमस्तपणानें चालविण्याविषयीं लोकांचें मन वळवितां येईल. पण त्यांची दाद घेतलीच पाहिजे. ”

सर चार्लस डिल्क हे राष्ट्रीयसभेच्या चालकांचे आंधळ्या सारखे अनुयायी होतील किंवा राष्ट्रीयसभेच्या मागण्यांचे पुरस्कर्ते होतील, असें ह्मणतां येणार नाहीं. तथापि या चळवळीसंबंधानें टीका करितांना जें धोरण त्यांनीं ठेविलें आहे तें नापसंत करणारा कोणी निघेल असें वाटत नाहीं. सर चार्ल्स डिल्क ह्मणतात:—एकंदरीनें पाहतां हिंदुस्थानाच्या राष्ट्रीयसभेसंबंधानें प्रमुख अँग्लो-इंडियन अधिकाऱ्यांनीं जी वृत्ति धारण केली आहे, तीवरून आपण कोणत्या मार्गाचें अवलंबन करावें हें कोणालाच सांगतां येणें शक्य नाहीं. बहुतेक अँग्लो इंडियन अधिकारी राष्ट्रीयसभेस प्रतिकूलच आहेत. तथापि १८८९ सालच्या राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष सर वुइल्यम वेडरबर्न या सारख्या कित्येक विचारी पुरुषांनीं आपण तटस्थ राहून परोपकाराचें काम करीत आहों असें समजून राष्ट्रीयसभेचा कार्यक्रम पसंत केला आहे. हिंदुस्थानविषयक विषयांसंबंधानें सर वुइल्यम हंटर यांच्या अभिप्रायास फार महत्व देण्यांत येत असतें. त्यांनीं राष्ट्रीयसभेचा कार्यक्रम पसंत ठरवून आपल्या लेखांच्या द्वारें राष्ट्रीयसभेच्या गेल्या तीन बैठकींची पुष्कळांस माहिती करून दिली आहे. (१८८५ आणि १८८६ सालच्या बैठकांकडे इंग्लंडांतील लोकांचें मुळींच लक्ष गेलें नव्हतें.) सर वुइल्यम हंटर यांचा ऐकण्याचा अनुकूल अभिप्राय पुष्कळांच्या प्रतिकूल अभिप्रायांपेक्षां अधिक योग्यतेचा आहे. हिंदुस्थानासंबंधीं त्यांस जितकी चांगली माहिती आहे, तितकी इतर कोणांस नाहीं. यामुळें त्यांजवर सर्वथा अवलंबून राहणें गैर होणार नाहीं. १८८८ सालीं

डिसेंबर मध्यें भरलेल्या राष्ट्रीय सभेच्या बैठकीकडे इंग्लंडांतील लोकांचें लक्ष लागण्यास मुसलमान लोकांचा तिजविषयींचा विरोधच कारण व्हावा हें बरेंच चमत्कारिक आहे. हिंदुस्थानांतील कित्येक पुढारी मुसलमानांनीं इंग्रजांतील जुन्या विचाराच्या मंडळीच्या धरतीवर एक सुरेखसें पत्र लिहून राष्ट्रीयसभे-संबंधानें आपले प्रतिकूल अभिप्राय इंग्लंडांतील कित्येक वजनदार पत्रांतून प्रसिद्ध केले. त्यांच्या विरोधामुळें इंग्लंडांतील पुष्कळ लोकांचें या विषयाकडे लक्ष गेलें, आणि त्यांनीं मूलतत्वांचा विचार करून जो निकाल केला तो मुसलमानांस प्रतिकूल दिला. या विषयावर सर वुइल्यम हंटर यांनीं पुढें कांहीं पत्रव्यवहार आणि लेख प्रसिद्ध केले. त्यावरून इंग्लंडांतील लोकांना या विषयाची जितकी माहिती हवि होती तितकी मिळाली. कोणत्याही एखाद्या गोष्टी संबंधानें लिहितांना तत्कालीन लेखकांत जो पक्षपातीपणा दिसून येतो तो टाकून देऊन एखाद्या इतिहासकाराप्रमाणें शांत मनानें सर वुइल्यम हंटर यांनीं असें सिद्ध केलें आहे कीं, हिंदुस्थानांतील आमचें राज्य ज्या तत्वांवर स्थापन करण्यांत आलें आहे, त्या तत्वाचा राष्ट्रीयसभेची सुरुवात हा स्वाभाविक परिणाम आहे. आणि राष्ट्रीयसभेच्या मागण्या थोड्या बहुत तरी कबूल करणें आपल्या हिताचें असून तें आपणांला कीर्तिकर होणार आहे.

या विषया संबंधानें जितका वाद होईल तितका इष्टच आहे, पण दुःशब्द आणि निंदा नको आहेत. देशांतील सुशिक्षित आणि बुद्धिमान लोकांच्या मतांचें निदर्शन राष्ट्रीय सभेच्या चळवळीनें होत आहे, असें मानण्यास अनेक कारणें

आहेत. आणि जे त्या सभेचा उपहास करितात, ते योग्य गोष्टी आणि त्या योग्य मार्गानें आणि सावधगिरीनें करण्यास प्रवृत्त झालेल्या मनुष्यांस—ज्यांशीं तडजोड करणें आणि ज्यांना अनुकूल करून घेणें रास्त आहे,—दुखवून आणि त्यांचीं मनें विरस करून सार्वभौम इंग्लंडच्या हितास धक्का पोंचवीत आहेत. राष्ट्रीय सभेवर तोंड सोडणारे कित्येक नेटिव लोक केवळ राज्यकर्त्यांची मर्जी सुप्रसन्न करण्याकरितां आणि स्वतास बहुमान मिळवून घेण्याकरितां, राष्ट्रीयसभेची निंदा करीत असतात ही गोष्ट सरकारी अधिकाऱ्यांना कबूल आहे. तसेंच बहुमानाच्या कित्येक पदव्या अलीकडे ज्या कांहीं मंडळींना देण्यांत आल्या आहेत, त्या अपात्रीं दिल्या आहेत असें अधिकारी वर्गांतील बहुतेकांचें ह्मणणें आहे. हिंदुस्थानांतील आपलें पहिलें काम देशांत बेबंदशाही सुरू होऊं नये, किंवा देशावर परचक्र येऊं नये, अशी व्यवस्था करणें, हें आहे. आणि या संबंधानें मी मागील भागांत विचार केलाच आहे. पण त्याच्या खालोखाल महत्वाचें काम राष्ट्रीयसभेची चळवळ हिंदुस्थानांत चालू असतां आपणांसही त्या देशांत कसें राहतां येईल हें आपणांस शिकलें पाहिजे. ह्मणजे हिंदुस्थानांत आह्मी स्वत: जे नवीन विचारांचें बीज रुजत घातलें आहे, तें वाढूं लागलें असतां त्यांची आणि आपली घडी बरोबर कशी बसेल; हें आपणांस पाहिलें पाहिजे. हिंदु-स्थानांतील आमचें मागचें काम स्तुत्य होतें आणि तें चांगल्या तऱ्हेनें करण्यांत आलें आहे; पण त्याहूनही अधिक चांगलें काम आतां आपणापुढें येऊन पडलें आहे. पार्लमेंटांतील दोन्ही पक्षाकडील मंडळी ज्या एकाच प्रश्नाकडे आपला सर्व

भर देऊन राहिले आहेत, त्या आयरिश प्रश्नापेक्षांही हा प्रश्न अधिक महत्वाचा आहे.

वर ज्या मोठमोठ्या मंडळींचे अभिप्राय दिले आहेत त्यांच्या योग्यतेविषयीं कोणालाच शंका नाहीं, पण मी स्वतः तरी मनुष्यां-मनुष्यांच्या अभिप्रायांची किंमत त्यांच्या समाजांतील पदवी-वरून किंवा सरकारानें त्यांना दिलेल्या किताबांवरून समजत नाहीं. पदवी, किंवा किताब यांविषयीं मी धिःकारपूर्वक बोलतों असें नाहीं; पण लोकनायक या नात्यानें ज्यानें आपलें आयुष्य आमरण घालविलें, आणि किताबाची अपेक्षा न करितां हिंदुस्थानांतील लोकांस सुधारण्याच्या कामीं ज्यानें आपली बुद्धि आणि आपलें मन लाविलें, सामान्य स्थितींत असतां ही आपल्या अनुभवाचें भांडार, आणि आपली लोकोपकारबुद्धि यांची सर्वत्र प्रगति होऊन सर्वांचें ऐक्य आणि मित्रत्व व्हावें अशा प्रकारें सर्वांमध्यें परस्पर प्रेम उत्पन्न होण्याच्या कामीं लाविली, तो विशेष धन्य ह्मटली पाहिजे. माझे वडील मोठे कायदेपंडीत होते इतकेंच नाहीं तर नैसर्गिक बुद्धीच्या आणि अनुभवाच्या बळावर ते चांगले मुत्सद्दीही बनले होते. त्यांच्या डोक्यांत जणुं काय भविष्य-सूचकच अशा कांहीं तरी कल्पना येत असत, त्या परिपूर्ण झालेल्या पाहून, ते जर जिवंत असते तर आज त्यांस किती तरी धन्यता वाटली असती? असा विचार माझ्या मनांत शेंकडों-वेळां आला आहे. दुसऱ्या कोणाला तरी त्यांच्या जागेवरून ओढून काढून तेथें आपल्या वडिलांस हिंदुस्थानचे हितकर्ते या नात्यानें स्थापन करण्याचा प्रयत्न मी करीत नसल्यामुळें, माझ्या या लिहिण्यानें कोणाचेंही नुकसान होणार नाहीं.

माझ्या वडिलांनीं ४१ वर्षांपूर्वी लिहिलेली शब्दकुसुमें त्यांच्या दूरस्थ समाधीस अर्पण करून हिंदुस्थानच्या उणीवा आणि मागण्या खऱ्याखऱ्या आणि न्याय्य आहेत, असें दाखविण्याकरितां मी आजपर्यंत लिहिलेल्या लेखांपैकीं हाच शेवटचा लेख पुरा करितों.

हिंदुस्थानांतील लोकांस आह्मी विचार करावयास शिकवीत आहों, या गोष्टीचे जे परिणाम हटकून होणार ते सर्व आह्मास कबूल आहेत काय? ते तसे नसतील तर शिक्षणाचा प्रसार आणि ब्रिटिश लोकांची सत्ता या गोष्टी हिंदुस्थानांत एकत्र नांदणार नाहींत असें लॉर्ड एलेनबरोप्रमाणें बोलून दाखविण्याचें धैर्य तरी आमच्या अंगीं पाहिजे. हिंदुस्थानांतील लोकांमध्यें जो फरक शिक्षणाच्या योगानें दृष्टीस पडत आहे, त्याकडे आह्मांला डोळेझांक करावयाची आहे, किंवा तसा फरक होत असल्याचें कबूल करून हिंदुस्थानांतील लोकांस जास्त अधिकार द्यावयाचे आहेत? नेटिव लोकांस शिक्षण दिल्यानंतर आपल्या अंगीं आलेल्या नवीन सामर्थ्याचा उपयोग केल्या वांचून ते राहतील असें मानण्या इतका आमच्यांत कोणी वेडापीर आहे काय? आपल्या अंगीं आलेलें सामर्थ्य नवीन आहे. तेव्हां त्याचे परिणाम काय होतात हें पाहण्याची इच्छा त्यांना सहजच होईल. आह्मीं त्यांना नीतितत्वांचे धडे घालून देत आहोंत, मग परराष्ट्राशीं लढाया करण्यासाठीं, शेजारच्या संस्थानिकांचा मुलूख आपल्या राज्यास जोडण्यासाठीं, किंवा स्वतःला विशेष फायदेशीर असा जुन्या तहांचा अर्थ करण्यासाठीं, आह्मी जो कोटिक्रम लढवितों, त्यांत सत्य कितपत आहे, हें पाहण्याकडे त्यांची प्रवृत्ति

होत नसेल असें मानण्या इतके आह्मीं वेड बनलों आहोंत काय ? आह्मी त्यांना न्यायशास्त्राचीं तत्वें शिकवीत आहों. असें असतांना आमच्या न्यायपद्धतींतील दोष, आणि आमच्या पोलिसव्यवस्थेचा पोरखेळ, हें त्यांच्या नजरेस येत नाहींत असें आम्हाला वाटतें काय ? राज्यव्यवहाराचें ज्ञान आम्ही त्यांस देत आहों, असें असतांना विशिष्ट वर्गांचे विशेष हक्क काढून टाकून कायद्याच्या दृष्टीनें सर्व लोकांना सारखें वागवावें, देशाच्या राज्यव्यवस्थेंत आपला बराच अधिकार असावा, राजकीय बाबतींत आपणांस स्वातंत्र्य मिळालें पाहिजे, प्रतिनिधिनिक्षिप्त राज्यव्यवस्था सुरू होऊन खजिन्याच्या किल्या लोकप्रतिनिधींच्या तंत्रानें फिराव्या, इत्यादि राजकीय हक्कांसाठीं ते धडपड चालविणार नाहींत, ( आणि ती धडपड त्यांनीं या पूर्वींच चालू केलेली आहे ) असें आम्हास वाटतें काय ? गतकाळांत लोक आपलें ऐकत ते निव्वळ अज्ञानामुळें. त्यांना वाटे कीं आम्ही लोक कांहीं विशिष्ट लक्षणांनीं युक्त आहोंत, आणि आमच्या सामर्थ्यांच्या आड येण्याची कोणाची प्राज्ञा नाहीं; म्हणून ते आम्हाला भीत, आणि आमच्यापुढें नमून असत " दुरून डोंगर साजरे. "

अति परिचयामुळें जरी आमची अवज्ञा झाली नाहीं तरी आमच्याविषयीं प्रथम जी विस्मयबुद्धि होती ती कमी झाली. आणि आम्ही त्यांना शिक्षण देऊन स्वतःची चांगलीच कसोटी पाहण्याचें साधन त्यांच्या हातीं दिलें. लोकमतावर आमच्या राज्याची बळकटी अवलंबून आहे, हें ठाम सिद्ध झालें आहे. पूर्वींच्या आणि आतांच्या लोकमतांत फरक आहे, तो असा कीं पूर्वींचें लोकमत भ्रामक समजुती वरून अडाणी

लोकांनीं ठरविलेलें होतें; पण हल्लींचें लोकमत ठरविण्याला विशेष विश्वसनीय माहिती, आणि ज्ञानप्रसार हीं साधनीभूत झालीं आहेत. मेक्सिको आणि पेरू देशांतील अडाणी लोकांना कॉर्टेझ आणि पिझॅरो हे जसे देवासारखे वाटले, तद्वत हिंदुस्थानांतील लोकांना जे प्रथम देवासारखे वाटले, ते आज त्यांस आपणासारखेच सामान्य मनुष्य वाटत आहेत. नेटिवांना इंग्रज लोक जरी आपणापेक्षां श्रेष्ठ वाटत असले तरी ते आपणांप्रमाणेंच प्रमादशील आहेत असें वाटतें. ते आमचें प्रत्येक कृत्य कसोटीला लावून पहातील; आणि आपणही आपलें प्रत्येक कृत्य कसें आहे हें काळजी पूर्वक पाहणें अवश्य आहे. हिंदुस्थानाचा राज्यकारभार हांकावयाचा तो स्वतःसाठीं नसून तेथील लोकांसाठीं आहे, ही गोष्ट आपण मान्य केली पाहिजे. आपण या देशांत आलों ते केवळ स्वदेशांतून हद्दपार झालों आहों, आणि येथील वाईट हवेंतून जितकें लौकर आणि जितका अधिक पैसा घेऊन आपणांस जातां येईल तिकडे आपणांस लक्ष दिलें पाहिजे, असें आपण समजून उपयोग नाहीं. आपणां-पैकीं प्रत्येकानें हा देश आपलाच आहे असें समजून आपाप-ल्या शक्तीप्रमाणें आपण कोणत्याही अधिकाराचे असलों तरी ईश्वर आपणांला जशी संधि आणून देईल ती साधून त्याप्रमाणें नेटिवांचें हित करण्याकडे आपलें लक्ष लाविलें पाहिजे. आपण अस्तित्वांत आणलेल्या शिक्षणाच्या साधनांनीं हिंदुस्थानांत जे फेरफार झाले आहेत त्यांकडे आपणांस दुर्लक्ष करितां येत नाहीं; तेव्हां आपण स्वीकारलेल्या पद्धतीपासून जे परिणाम झाले आहेत, त्यांशीं होईल तितकें करून आपणांस

जुळतें घेतलें पाहिजे. अधिकाराच्या जागा चालविण्यास नेटिव लोक जसजसे पात्र होत जातील, तसतसा राजकीय गोष्टींत पुढें जाण्याचा त्यांना हक्क आहे हें आह्मी कबूल केलें पाहिजे.

राष्ट्रीयसभेच्या उत्क्रांतीचा हा इतिहास मी लिहिला आहे. या पासून कांहीं तरी उपयोग होईल अशी मला आशा आहे. उत्क्रांतीच्या तत्वाप्रमाणें जगांत इतर जशा नव्या शक्ती अस्तित्वांत येत आहेत, तशा हिंदुस्थानांतही येत आहेत. त्या शक्तीचा सार्वभौमसत्ता धारण करणाऱ्या इंग्लंडानें परामर्ष घेतला पाहिजे, आणि त्यांपासून आपणाला धोका येऊं नये ह्मणून उदारबुद्धीचें वर्तन ठेवून त्यांशीं मिळतें घेतलें पाहिजे. १९ व्या शतकांतील हिंदुस्थान, आह्मीं त्याला बुद्धिपुरस्कर जसें बनविलें तसें बनलें आहे. मी आपल्या सभोंवर जिकडे जिकडे नजर फेकतों तिकडे तिकडे आमच्या स्वतःच्याच योजनांचे परिणाम मला दिसून येतात असें दाखविण्याचा मी प्रयत्न केला आहे. राष्ट्रीयसभेच्या कार्यक्रमांत ज्या सुधारणांचा अंतर्भाव केलेला आहे, त्या राज्यक्रांतिकारक किंवा अराजानिष्ट पणाच्या नाहींत. त्या सुधारणा कराव्या असें मागणें वरचेवर करणारे गृहस्थ लोकांच्या विश्वासांतले आणि त्यांचे पुढारी असून त्या त्या विषयांची त्यांना चांगली माहिती असते, आणि ते जेव्हां त्या विषयांवर बोलतात तेव्हां त्यांच्या मनांतील कळकळ आणि त्यांच्या आंगचे वक्तृत्व हे गुण चांगले दिसून येतात; असेंही दाखविण्याचा मी प्रयत्न केलेला आहे. प्रतिपक्ष्यांनीं अति प्रसंग केला असतांही तोंडांतून एक देखील गैर शद्ब काढला नाहीं, आणि आपल्या

अंगीं आत्मसंयमन आणि स्वाभिमान हे गुण वसत आहेत असें दाखविलें आहे. त्यांनीं चालविलेल्या चळवळींत पुष्कळ अर्थ असून तिकडे आपण चांगलें लक्ष पुरविलें पाहिजे. इंग्रज मुत्सद्यांनीं तिला तिरस्कारानें लेखणें योग्य नाहीं. पार्लमेंटांत कौन्सिल बिलावर वादविवाद चालू असतां कार्डिफ शहराच्या वतीचे सभासद मिस्तर मॅकलीन यांनीं असें बोलून दाखविलें कीं, १८५७ सालापासून आजपर्यंत ज्या गोष्टी घडल्या त्यांत राष्ट्रीयसभेची चळवळ ही अत्यन्त महत्वाची आहे. आणि हें त्यांचें ह्मणणें खरें आहे. राष्ट्रीय सभेनें सुचविलेले कित्येक उपाय आ-पणांस अंमलांत आणण्यास अयोग्य वाटत असतील आणि तिच्या कित्येक योजना आपणांस स्वप्नसृष्टींतील योजनां सारख्या वाटतील; पण राष्ट्रीयसभेच्या रूपानें परिणाम झालेल्या विद्वान लोकांच्या चळवळीची उत्पत्ति आणि वाढ कशी झाली याकडे थोडें लक्ष लावून प्रामाणिक बुद्धीनें ज्यानें अवलोकन केलें आहे, त्याला त्या सभेची कामें मोठ्या उत्साहानें आणि हुषारीनें बजाविण्यांत येतात असें कबूल केलेंच पाहिजे. रा-ष्ट्रीयसभेचें काम पुढें होईल, किंवा तींत दोष कोणते आहेत, याचा विचार करण्याचें काम प्रस्तुत निबंधाचें नाहीं; तथापि नैसर्गिक अडचणी, प्रतिपक्ष्यांचा विरोध आणि समाजांत झालेली चळवळ यांस न जुमानतां हिंदुस्थानांतील सर्व वर्णांच्या, सर्व जातींच्या आणि सर्व धर्मांच्या लोकांसाठीं जें पवित्र कार्य राष्ट्रीयसभेनें हातीं घेतलें आहे, तें चालू ठेवतांना तिनें आपली पहिली निर्दोष पद्धती कधींही सोडूं नये अशी सप्रेम सूचना मजसारख्या

तिच्या हितचिंतकानें करणें गैर होणार नाहीं. हिंदुस्थानांतील प्रजेच्या मनांत इंग्लंडाविषयीं सदोदीत पूज्यबुद्धि व कृतज्ञता वागण्यासारखें इंग्लंडानें काय केलें आहे. असा प्रश्न कोणी विचारल्यास भावी इतिहासकारास मोठ्या आनंदानें राष्ट्रीयसभेच्या आश्चर्यकारक चळवळीकडे तेव्हांच बोट दाखवितां येईल; पण राष्ट्रीयसभेनें महत्वाकांक्षेनें हातीं घेतलेल्या उद्योगांत जर आपमतलब शिरेल तर त्या संस्थेची नासाडी होऊन इंग्लंडांतील लोकांच्या मनांत तिजविषयीं बिलकुल सहानुभूति वास करणार नाहीं.

# हिंदुस्थानांतील लोकांची सांपत्तिक स्थिति.

( लेखक. रा. ब. रंगनाथ नरसिंह मुधोळकर,
बी. ए., एलएल. बी.)

"एखाद्या देशांत जमीन अत्यंत सुपीक असून तेथें हरतऱ्हेचे जिन्नस उत्पन्न होत असतांना देखील, तेथील लोक अत्यंत दरिद्री आणि कष्टी असले तर, तेथील राज्यव्यवस्थेच्या मूळांतच कांहीं तरी चुकलेलें असण्याचा दृढतर संभव आहे."— **जॉन ब्राइट.**

दुस्थानांतील लोकांच्या सांपत्तिक स्थितीबद्दल जितका मतभेद दिसून आला आहे आणि जितका कडाक्याचा आणि क्रोधयुक्त वादविवाद झालेला आहे, तितका इतर कोणत्याही विषयावर झालेला नाहीं. १८९१ सालीं राष्ट्रीयसभेनें एक ठराव पसार करून, हिंदुस्थानांत दारिद्र्य भयंकर रीतीनें वाढत आहे व तेथील लोकसंख्येचा बराच भाग दुष्काळ येऊन ठेपल्याबरोबर ज्यांजवर मरणाची पाळी येते, असा अर्धपोटीं आणि विपन्न स्थितींत आहे असा आपला अभिप्राय व्यक्त केला. त्यावेळीं हें मत ज्यास अमान्य होतें, अशा लोकांनीं राष्ट्रीयसभाभक्तांची अगदीं टर उडविली. लोकसंख्येचा एक मोठा भाग अशा स्थितींत असल्यामुळें सर्व देशावर आणि सरकारावर भयंकर संकट येऊन गुदरेल असें मि. ह्यूम यांनीं विशेष स्पष्टोक्तीचें

एक पत्र लिहून प्रसिद्ध केलें तेव्हां जें वादरायण माजलें त्याची पुष्कळांस आठवण असेल. मि. ह्यूम यांचे आणि त्याच्या विचाराच्या मंडळीचे उद्देश आणि प्रामाणिकपणा याविषयीं कित्येकजण संशय घेऊं लागले; आणि देशस्थितींत कांहीं बिघड झाला आहे असें ह्मणणाराच्या मतांत सरकाराविषयीं आणि ब्रिटिश राष्ट्राविषयीं वैमनस्य उत्पन्न झालें असावें असा सिद्धान्त त्यांनीं ठोकून दिला. अशा विवेकशून्य सिद्धान्ताचा चांगला परिणाम होणार नाहीं. लोकांची खरोखर स्थिति कशी आहे आणि राज्यकारभारासंबंधीं व्यापारी आणि सामाजिक घडामोडीनें तिजवर कोणते परिणाम होत आहेत, ही गोष्ट अत्यंत महत्वाची असून तिचा विचार करितांना क्रोध, द्वेष, किंवा पक्षपात हे मध्यें येऊन उपयोगी नाहींत. या विषयाचा विचार करण्यांत सरकारचें आणि प्रजेचें अत्यंत हित आहे. प्रजेचें तर त्यावर सर्वस्वीं जीवित अवलंबून आहे. सबब हल्लींची स्थिति कशी आहे आणि खराखरा प्रकार काय आहे, याचा पुढील निबंधांत थोडक्यांत विचार करण्याचें योजिलें आहे.

एका पक्षाकडून असें ह्मणण्यांत येतें कीं, हिंदुस्थानांतील बरीच मोठी लोकसंख्या इतकी दरिद्री आहे कीं, साधारण सुबत्तेच्या दिवसांत देखील तिला पोटभर खावयास मिळत नाहीं. आणि तिची स्थिति खालावतां खालवतां इतकी दरिद्री आणि निःसत्व झाली आहे कीं, एक पावसाळा कोरडा गेल्यास लक्षावधी मनुष्यें प्राणास मुकतात. तसेंच दुष्काळ वारंवार पडतात आणि त्यांपासून भयंकर प्राणहानि होते, याचें मुख्य कारण लोकांतील सत्व नाहींसें झालें आहे हें होय; हें सत्व नाहींसें होण्याचें कारण देशांत पूर्वी

चालू असलेली व्यापारपद्धति बहुतेक मोडून जाऊन व्यापारधंदा अगदीं नाहींसा झाला आहे. व्यापारधंदे बुडण्याचें कारण नैसर्गिक नसून, तें राज्यकारभारांतील गोष्टींतच आढळून येतें; आणि राज्यकारभार चालविण्याची सरकारची पद्धति पहावी तर तिच्या योगानें देशाच्या संपत्तीचा मोठा प्रवाह बाह्य देशीं वाहत असून इकडील जीवनाचीं साधनें कमी होत आहेत, आणि त्यामुळें दरिद्रता वाढत आहे.

उलटपक्षीं असें प्रतिपादण्यांत येतें कीं, हिंदुस्थानांतील लोक दरिद्री झाले आहेत आणि देश निःसत्व होत चालले आहे, हें म्हणणें निराधार असून त्यांत कांहीं अर्थ नाहीं. हिंदुस्थान आणि तेथील लोक भिकारी होत चाललेला नसून श्रीमंत होत चाललेले आहेत. या म्हणण्याच्या पुष्टीकरणार्थ सप्रमाण पुरावा म्हणून असें सांगण्यांत येतें कीं, तेथील लोकसंख्या वाढली आहे, खेड्यांच्या जागीं मोठमोठीं शहरें आणि गांवें वसलीं आहेत, व्यापार झपाट्यानें वाढला आहे, नवे नवे उद्योग सुरू झाले आहेत, आणि हजारों मैलपर्यंत आगगाडीची सडक बांधण्यांत आली आहे. जलमार्गानें चालणारा व्यापार गेल्या शंभर वर्षांतच सुरू झाला असून त्या योगानें परदेशांशीं चालणाऱ्या व्यापारांत जबरदस्त वाढ झाली आहे, असें व्यापाराच्या आंकड्यांवरून दिसून येतें. तसेंच बाहेर देशांतून पुष्कळ चांदी, सोनें, या देशांत येऊन गडप झालें असत्यामुळें प्रजा जितकी गरीब आहे असें म्हणण्यांत येतें, तितकी ती गरीब नसली पाहिजे.

हीं सर्व विधानें कसोटीस लावून त्यांत असलेल्या खऱ्या गोष्टींचा वास्तविक अर्थ आणि त्यांचें वास्तविक

महत्व काय आहे, हें पाहिल्यावांचून सद्यःस्थिति कशी आहे आणि हल्लींचा ओघ आम्हास कोणीकडे घेऊन जाणार आहे, हें निश्चयात्मक सांगतां येणार नाहीं. हल्लींच्या राज्यपद्धतींतील दोष किंवा उणीवा कोणी दाखवूं लागल्यास त्यांच्यावर असद्धेतूंचा आरोप करण्यांत यावा, आणि त्यांनीं आपले पुरावे दाखविले असतां उत्तरादाखल त्यांना शिव्या देण्यांत याव्या. ही दुःखाची गोष्ट आहे. पण आपल्या म्हण॰ण्याचा विपर्यास केला जाईल किंवा आपली निंदा होईल, या भीतीनें अशा महत्वाच्या बाबतींत आपलें कर्तव्य बजाविण्या-पासून मागें सरून उपयोगी नाहीं.

ब्रिटिश राज्यापासून या देशाचें अनेक प्रकारें हित झालें आहे हें अगदीं निर्विवाद आहे. १८ व्या शतकाच्या अखेरीस निरनिराळ्या ऐक्य-विघातक कारणांनीं जिकडे तिकडे घोंटाळा आणि बेबंदशाही माजली असतां ब्रिटिश राज्याची सुरुवात होऊन सुधारणा होण्यास अवश्य असणाऱ्या-शांतता आणि सुराज्यव्यवस्था-गोष्टी ब्रिटिश राज्यानें लोकांस प्रथम दिल्या. कित्येक शतकेंपर्यंत अनुभवावयास न सांपडलेलें अंतःस्वास्थ्य हिंदुस्थानास हल्लीं मिळालें असून वित्त आणि जीवित यांचें उत्तम तऱ्हेनें रक्षण होत आहे. पण एवढ्यानेंच झालें नाहीं. तर ब्रिटिश अंमल सुरू झाल्यामुळें कायद्याप्रमाणें राज्यकारभार चालत आहे. राज्यकारभाराच्या निरनिराळ्या शाखांमध्यें पूर्वीपेक्षां चांगली आणि सुयंत्र पद्धति सुरू कर-ण्यांत आली आहे. शिक्षणासाठीं नवीन खातें सुरू करण्यांत आलें आहे. विश्वविद्यालयांची स्थापना होऊन शाळा आणि विद्यालयें सुरू करण्यांत आलीं आहेत. दवाखाने आणि

ऋणालयें उघडण्यांत आलीं आहेत. आगगाड्यांचे रस्ते, सडका, पूल, आणि मोठमोठे कालवे बांधण्यांत आले आहेत. आणि देशाचा व्यापार वाढविण्यासाठीं आणि त्याची नैसर्गिक संपात्ति मनुष्यांच्या उपयोगी पडण्यासाठीं जारीनें मेहनत घेण्यांत आली आहे. या बाबतींत इंग्लंडनें केलेल्या कामगिरीबद्दल तेथील लोकांनीं अभिमान बाळगणें रास्त आहे. आपणावर झालेले उपकार हिंदुस्थानच्या लोकांच्या ध्यानांत आहेत. आणि ते त्यांबद्दल खरोखर कृतज्ञ आहेत. राज्यकारभाराच्या निरनिराळ्या खात्यांत पूर्वींपेक्षां लोकांचा अधिक प्रवेश होऊं लागला आहे. तसेंच ब्रिटिश नागरिकांना मिळालेले कित्येक हक्कही त्यांना देण्यांत आलेले आहेत या गोष्टींचें महत्व ओळखून ते त्यांबद्दलही कृतज्ञ आहेत. तथापि ह्या फायद्यांच्याच जोडीला कित्येक व्यंगें आणि दोष असून त्यांच्या योगानें आजपर्यंत झालेल्या चांगल्या कामांची किंमत कमी होत आहे इतकेंच नाहीं, तर, बऱ्याच लोकांचें त्यांपासून नुकसान होत आहे, या गोष्टीकडे डोळेझांक करितां येत नाहीं. इंग्लंडनें केलेल्या उपकारांचें पूर्ण माप लोकांच्या पदरांत पडून दोन्ही देशांचा संबंध दृढतर होण्यासाठीं हे दोष दूर करण्यांत आलेच पाहिजेत. या उद्देशानें केलेली टीका ज्याला खपत नाहीं, किंवा जो ती ऐकूं इच्छित नाहीं, तो हिंदुस्थान आणि इंग्लंड यांचा खरा मित्रच नव्हे.

सुपीक जमीन, भूगोलावर मध्यवर्ती सोईस्कर जागा, उत्पन्नास फायदेशीर असें हरएक प्रकारचें हवापाणी, मुबलक खनिजसंपात्ति, उद्योगी, शांतताप्रिय, निर्व्यसनी आणि काटकसरीनें राहणारे लोक, हीं सर्व साधनें असल्यामुळें संपत्ति

उत्पन्न करण्यास आणि ती जतन करून ठेवण्यास या देशास विशेष साधनें अनुकूल आहेत. असें असतां केवळ पूर्वीच्या कवींनीं नव्हे, तर, इतिहासकारांनीं आणि त्या त्या वेळच्या लेखकांनीं ज्या अपार संपत्तीचें वर्णन केलेलें आहे ती संपत्ति अनुकूल परिस्थितीमध्यें हिंदुस्थानाला कां प्राप्त होऊं नये हें समजत नाहीं. अशा प्रकारची समृद्धी आणि वर्चस्व संपादन करण्याच्या मार्गाला हिंदुस्थान कधींच लागलेलें आहे असें म्हणण्यांत येतें. गेल्या फक्त १९० वर्षांत कलकत्ता, मुंबई, मद्रास या सारखीं शहरें, लोकसंख्या, संपत्ति, औद्योगिक धाडस आणि व्यापारी चळवळ या बाबतींत बऱ्याच वरच्या पायरीस येऊन बसलीं आहेत. ब्रिटिश लोकांच्या ताब्यांत येण्यापूर्वी जेथें केवळ अगदीं लहान गांवें किंवा ५।९० झोंपड्या होत्या तेथें कलकत्ता, मुंबई, मद्रास, कराची या सारखी शहरें वसलीं असून १८९१ च्या खानेसुमारी प्रमाणें तेथें ७४१,१४४; ८२१,७६४; ४५२,५१८; १०५,१९९ इतकी अनुक्रमें लोकवस्ती होती. कलकत्ता येथील व्यापाराची वार्षिक घडामोड ७२ कोट, मुंबईची जवळ जवळ ६६ कोट, आणि मद्रास, कराची या शहरांची घडामोड प्रत्येकीं ११ कोट रुपयांची आहे. ५० वर्षांत आयात आणि निर्गत व्यापार मिळून २० कोटी होता; तो २ अब्ज पर्यंत वाढला आहे. तेवढ्याच मुदतींत सूत कातण्याच्या आणि कापड विणण्याच्या १४७ गिरण्या सुरू झाल्या असून त्यांत जवळ जवळ १४ कोटींचें भांडवल गुंतलें आहे; आणि १॥ लाख लोक काम करीत आहेत. तागाचे कारखाने २९ असून त्यांत ४ कोटांचें भांडवल गुंतलें आहे, त्यांत ७९

हजार लोकांना काम मिळतें. भात भरडण्याचे कारखाने ७१, करवत कामाचे कारखाने ६८, आणि कागदाचे कारखाने ८ मिळून ४९ हजार मजुरांना काम मिळत आहे. शिवाय कातडीं कमविण्याचे कारखाने ६३, लोखंड ओतण्याचे कारखाने ९१, पीठ दळण्याचे कारखाने ९४, तेलाच्या गिरण्या ९६, आणि तंबाखूचे कारखाने ४१ आहेत आणि त्यांत कित्येक हजार मजुरांना काम मिळत आहे. कापसाचे गठ्ठे बांधण्याचे आणि पिंजण्याचे कारखाने सर्व देशभर पसरलेले आहेत. खाणींतून कोळसे काढण्याचें काम बरेंच रंगारूपास आलेलें असून दरसाल जवळ जवळ २९ लक्ष टन कोळसा बाहेर काढण्यांत येत आहे. म्हैसूर प्रांतांतील सोन्याच्या आणि केरोसीन तेलाच्या आणि लोखंडाच्या खाणी फायदेशीर होतील असें दिसत आहे. नुकतेच सुरू झालेले चहा, कॉफी आणि नीळ पिकविण्याचे धंदे बरेच भरभराटीस आले आहेत. १८६८—६९ सालीं सुएझचा कालवा सुरू झाल्यानंतर हिंदुस्थानांतील बंदरांत येऊन निरनिराळ्या जहाजांनीं मिळून ४९ लक्ष टन माल आणला होता. १८९४—९५ सालीं असलेला माल ८२,९९,८२२ टन इतका असून जहाजांची एकंदर संख्या १०,९७७ होती. ह्या गोष्टी हिंदुस्थानच्या वाढत्या संपत्तीच्या द्योतक आहेत, दारिद्र्याच्या नव्हेत असें प्रतिपादन करण्यांत येतें. आगगाडीच्या सडकांची वाढ तर ह्याशिवाय आहेच आहे. ४० वर्षांपूर्वीं आगगाडीला सुरुवात होऊन हल्लीं २० हजार मैलांहून अधिक लांबीची सडक व्यापारासाठीं खुली करण्यांत आलेली आहे. आणि आणखी सुमारें ४ हजार मैल सडक बांधण्याचें काम चालू आहे किंवा ती बांधण्याची मंजूरी मिळालेली आहे.

या सर्व गोष्टी खऱ्या आहेत आणि त्यांचें त्यांच्या परीनें महत्व आहे हेंही खरें. आतां त्यांवरून खुद्द देशांतील लोक कितपत समृद्ध, किंवा निदान खाऊन पिऊन सुखी आहेत याचा विचार केला पाहिजे. सरकारी आणि खाजगी विशाळ वाड्यांनीं भरलेलीं आणि लोकांनीं गजबजलेलीं मुंबई आणि कलकत्ता हीं राजधानीचीं शहरें सोडून आपण खेड्यापाड्यांत गेलों आणि तेथील शेतकऱ्याची किंवा मजुराची भिकार झोंपडी पाहिली; इतकें कशाला, त्या राजधानीच्या शहरांतच किंवा गरीब लोकांच्या वस्तींत आपण जाऊन पाहिलें तर वरवर दिसणाऱ्या या भरभराटीच्या लक्षणांशीं बहुजन समाजाचा चुराडा करून टाकणाऱ्या, आणि चोंहोंकडे मातलेल्या दारिद्र्याचा विरोध आपणांस दिसल्यावांचून राहणार नाहीं.

'हिंदुस्थानांतील ४ कोट लोकांना जन्मथा निर्वाहाला पुरे इतकें अन्न मिळत नाहीं,' असें सर वुइल्यम हंटर यांनीं ह्मटलें आहे. सर चार्लस इलियट यांनीं धारे बंदीच्या रिपोर्टांत ह्मटलें आहे कीं, 'शेतकरी वर्गा पैकीं निम्मे लोकांना (ह्मणजे ७ कोटीहून अधिक लोकांना) आपली क्षुधा पूर्णपणें तृप्त झाल्याचें माहित नसतें असें ह्मणण्यास मला हरकत वाटत नाहीं.' मि. डब्ल्यू. आर. रॉबर्टसन, मद्रास कडील शेतकी खात्याचे माजी मुख्य अंमलदार यांनीं ह्मटलें आहे कीं, 'हिंदुस्थानांतील शेतकरी लोकांची स्थिति इतकी वाईट आहे कीं कोणत्याही सुधारलेल्या देशांत तशी स्थिति असल्यास ती मोठी शरमेची गोष्ट मानिली जाईल.' बंगाल्यांतील शेतकी खात्याचे मुख्य अंमलदार सन १८८८ सालीं ह्मणाले, 'बहार प्रांत आणि भागलपूर जिल्ह्याचा कांहीं भाग

यांतील शेतकऱ्यांची स्थिति ब्रिटिश अंमल सुरू झाल्यापासून खालावत चालली आहे असें मला वाटतें; खुद्द बंगाल्यांतील बहुतेक भागांत लोकस्थिति सुधरत असतांना येथें मात्र ती बिघडत आहे.' सन १८८८ सालीं हिंदुस्थान सरकारानें आपल्या कित्येक अधिकाऱ्यांजवळ लोकांच्या स्थितीसंबंधानें चौकशी केली, त्यावेळीं त्यांनीं सादर केलेल्या अभिप्रायांवरून वस्तुस्थिति फार शोचनीय आहे असें दिसून येतें. बंगाल सरकारानें असा अभिप्राय लिहून कळविला होता कीं, "बहार प्रांतांतील शेतकामावरील मजूर आणि लहान सहान जमीनीच्या तुकड्यांचे मालक ( हे सर्व मिळून लोकसंख्ये पैकीं शेंकडा ४० आहेत. ) यांना निर्वाहास पुरेसें अन्न देखील मिळत नाहीं." स्थानिक अंमलदारांचें ह्मणणें असें पडतें कीं, 'रोजच्या २ वेळेच्या जेवणांपैकीं एक वेळ मात्र त्यांना पोटभर जेवावयास मिळतें. खालच्या कामदारांच्या रिपोर्टांत वर्णन केलेल्या स्थितीपेक्षां शेतकऱ्यांची स्थिति चांगली असेल असें घेऊन चालण्याचा हिंदुस्थान सरकारचा मानस होता; तरी देखील त्यांला एवढें कबूल करावें लागलेंच कीं, " हिंदुस्थानांतील पुष्कळ लोकांची केवळ हातातोंडाशीं गांठ आहे, ते कर्जानें ग्रासलेले आहेत, ते पैसा शिल्लक टाकीत नाहींत, आणि दुर्भिक्षाच्या वेळीं गुजारा करण्यास त्यांजवळ कांहींच साधन नसतें असें आमच्याकडे आलेल्या पुराव्यावरून दिसतें."

या विषया संबंधानें अगदीं अलीकडचा अभिप्राय ह्मटला ह्मणजे १८९८ सालीं बसलेल्या दुष्काळ कमिशन मधील सभासदांचा आहे. " धारण महागल्यामुळें किरकोळ धंदे-

वाल्या लोकांस फार विपत्ति सोसावी लागली आहे, पण ते सरकारानें दुष्काळ निवारणार्थ काढलेल्या कामावर येत नाहींत. या वर्गाच्याही पलीकडे अगदीं हातातोंडाशीं गांठ असलेला एक वर्ग समाजांत आहे. या वर्गांतील लोकांना निर्वाहार्थ फारच थोड्या गोष्टींची गरज लागते; तरी देखील पीक किंचित बुडालें, किंवा ऋतुमानांत बिघाड झाला ह्मणजे त्यांची फारच त्रेधा उडते. हा वर्ग फारच मोठा असून अगदीं सामान्य प्रतीचे कारागीर आणि रोजंदारीनें मजुरी करणारे लोक त्यांत येतात. आमच्या पुढें आलेल्या साक्षीदारांचा आणि इतर आंकडे विषयक पुरावा पाहतां गेल्या २० वर्षांत धारण जितकी महाग झाली आहे तितकी या वर्गास मिळणारी मजुरी वाढलेली नाहीं, असें आह्मास ह्या विषयाच्या घोंटाळ्याच्या विषयावर सामान्यतः ह्मणावें लागतें. नुकत्याच आलेल्या अनुभवावरून दुष्काळाशीं टक्कर देण्यास या वर्गांतील लोकांच्या अंगी कांहीं त्राण राहिलें आहे असें दिसत नाहीं. ह्या वर्गांतील लोकसंख्या कमी होत नसून उलट अधिकच वाढत चालली आहे असें दिसतें. देशांतील गच्च वस्तीच्या भागांत हा प्रकार विशेष होतो. लोकसंख्येच्या वाढीसारख्या जबरदस्त कारणामुळें दुष्काळाशीं टक्कर देण्यास ते अधिक अधिक असमर्थ होत चालले आहेत. पुष्कळ साक्षीदारांनीं आमच्या पुढें जो पुरावा मांडिला त्यावरून असें दिसून येतें कीं, हिंदुस्थानांत दुष्काळ पडून धान्याचे दर वाढले ह्मणजे मजुरांची मजुरी वाढत नाहीं; तर उलट शेतकीकडील काम कमी झाल्यामुळें काम थोडें

आणि तें करणारे फार, अशी स्थिति होऊन नेहमीच्या दरा-पेक्षांही कमी मजुरी देण्यांत येते, आणि मजूर ती पत्करितात. दुष्काळामुळें धान्याचे भाव वाढले असतांना इतक्या कमी मजुरींत मजुराला आपलें आणि आपल्या बायका मुलांचें पोट भरतां येणें शक्य नाहीं."

दुष्काळ कांहीं वर्षांनीं नेमका येत असल्यानें सरकाराच्या मागें त्याचा ससेमिराच लागल्यासारखा आहे. १८७९ सालीं प्रसिद्ध झालेल्या दुष्काळ कमिशनाच्या रिपोर्टांत असें नमूद केलें आहे कीं, चालू शतकाच्या आरंभापासून रिपोर्टाच्या तारखे पर्यंत ह्मणजे सुमारें ८० वर्षांत १७ दुष्काळ पडले. चालू शतकाच्या पहिल्या पादांत ५ दुष्काळ पडले, त्यांत प्राणहानि किती झाली याचा उल्लेख नाहीं. पण पुढील १२ दुष्काळांत १८३३ ते १८७८ पर्यंत लोटलेल्या ४५ वर्षांत, १२७,००,००० मनुष्यें प्राणास मुकल्याचें लिहिलें आहे. प्रसिद्ध आंकडेशास्त्री मि. मल्हॉल यांनीं सन १७९३ आणि १८७७ यांच्या दरम्यान एकंदर सुधारलेल्या राष्ट्रांमध्यें युद्ध प्रसंग होऊन ४५ लक्ष लोक मारले गेले असावे असा हिशोब काढिला आहे. ब्रिटिश अंमल सुरू झाल्यापासून हिंदुस्थानांत पूर्ण शांतता नांदत आहे, आणि परोपकार बुद्धीनें सरकार प्रजेस मदत करण्यासाठीं भगीरथ प्रयत्न करीत आहे आणि पुष्कळ पैसे खर्चीत आहे, तरी सुधारलेल्या राष्ट्रांच्या लढायांत एका शतकांत जितकी प्राणहानि झाली त्याच्या तिप्पट प्राणहानि एका अर्ध्या शतकांत हिंदुस्थानांत दुष्काळानें झाली.

सन १८९६ व ९७ सालीं दुष्काळ निवारण करण्यासाठीं सरकारची जितकी तयारी होती तितकी त्या पूर्वीं कधींही नव्हती. पूर्वींच्या अनुभवाचा उपयोग करून दुष्काळांतील कामांचे अंदाज सरकारानें तयार ठेविले होते. आणि एक दिवस देखील फुकट न घालवितां कोणत्या प्रकारचीं कामें चालू करावीं आणि त्यांची कशी काय व्यवस्था ठेवावी हें सरकारानें ठरवून टाकिलें होतें. पण इतकें सगळें करून देखील देशाची स्थिति किती भयंकर आणि हृदयद्रावक होती! दुष्काळ-ग्रस्त प्रांतांतील हालहवाल पाहण्याकरितां मुद्दाम पाठविलेल्या इंग्लंडांतील आणि हिंदुस्थानांतील इंग्रजी पत्रांच्या बातमी-दारांनीं रस्त्यांच्या बाजूंस, शेतांत, किंवा झाडाखालीं माणसें थकून पटापट पडत आणि प्राण सोडीत असें लिहिलें आहे. या दुष्काळाच्या वेळीं धान्याची वाण नव्हती, पण धान्य घेण्यालाच कोणाजवळ पुरेसे पैसे नव्हते.

हिंदुस्थांतील प्रत्येक मनुष्याच्या उत्पन्नाचें प्रमाण किती अल्प आहे हें पाहिलें म्हणजे साधारण सुबत्तेच्या वर्षांत देखील लोक किती दरिद्री असतात, आणि दुष्काळाला तोंड देण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत कमी कां असतें याचा उलगडा होईल. १८८२ सालीं मेजर बेरिंग ( लॉर्ड क्रोमर ) यानीं जमाख-र्चाचें अंदाजपत्रक व्हाइसरॉयांच्या कौन्सिलांत रुजू करितांना असें सांगितलें कीं, हिंदुस्थानांतील प्रत्येक मनुष्याचें उत्पन्न सरासरी २७ रुपये पडतें. सर डेव्हिड बारबर यांनीं केलेल्या हिशेबावरून वरील प्रमाण लॉर्ड क्रोमर साहेबांनीं दाखल केलें होतें. आणि 'हा आंकडा जरी तंतोतंत बरोबर नसला, तरी एकंदर लोक समूह किती दरिद्री आहे हें दाखविण्या-

पुरता वरील आंकडा बरोबर आहे असें त्यांनीं सांगितलें होतें. मि. दादाभाई नवरोजी यांनीं केलेल्या हिशेबा प्रमाणें दरमाणशीं उत्पन्न २० रुपये पडतें. मि. ग्रँट डफ् यांनीं १८७१ त केलेल्या भाषणांत हिंदुस्थानांतील दरएक माणसाचें उत्पन्न २ पौंड आहे असें ह्मटलें होतें. आणि हें प्रमाण बरोबर आहे असें लॉर्ड मेयो धरून चालले होते. त्यावेळीं पौंडाची किंमत जवळ जवळ १० रुपये होती. मि. दादाभाई नवरोजी आणि सर. एम्. ग्रँटडफ् यांचे अंदाज एका बाजूस ठेवून लॉर्ड क्रोमर आणि सर डेव्हिड बारबर यांचे आंकडे घेऊन चाललें तरी प्रत्येक मनुष्यास जें उत्पन्न पडतें, त्यांत आयुष्यांतील अत्यंत गरजेच्या वस्तूंचा देखील पुरवठा होणें शक्य नाहीं. साधारण सुबत्तेच्या दिवसांत तुरुंगांतील प्रत्येक कैद्या मागें त्याच्या खाण्यापिण्यासाठीं सरकाराला दरसाल २३-१२-०. खर्च येतो. पलटणींतील शिपाया मागें सालिना ४२ रुपये खर्च येतो. आणि बाजार बुणग्यासाठीं दरमाणशीं दरसाल ३० रुपये खर्च येतो. सर जेम्स यांनीं असा अंदाज काढिला आहे कीं, दक्षिणेंतील शेतकरी कुटुंबास दरसाल दरमाणशीं ४० रुपये खर्च येतो. बाजारबुणग्यांपैकीं दरएक माणसाला जो खर्च येतो त्याचें मान जरी बरेंच कमी आहे तरी आपण तेंच घेऊन चालूं, आणि १२ वर्षांच्या खालील मुलें हिशेबांत धरून एकंदरीनें दरमाणशीं वरील ३० रुपयांच्या पाउणपटच आकार धरूं. २७ रुपये उत्पन्नांतून हा खर्च वजा जातां केवळ ४॥ रुपये राहतात. त्यांतूनच सर्व प्रकारचे कर मिळून २॥ रुपये, व कपडालत्ता १॥ रुपाया हे खर्च वजा

केले असतां किरकोळ खर्च, आउतांची डागडुजी, शिलकी भांडवल, अडीअडचणीसाठीं तरतूद आणि सुख दुःखाचे प्रसंग या सगळयांत मिळून आठ आणे राहतात. हिंदुस्थान आणि इतर देश यांमध्यें दर माणशीं दरसाल उत्पन्न किती पडतें त्याचें कोष्टक खालीं दिलें आहे:—

| देश | उत्पन्न | देश | उत्पन्न |
|---|---|---|---|
| इंग्लंड | पौंड ४१ | ग्रीस | ११.८ |
| युनायटेड किंगडम | ३५.२ | यूरोप | १८ |
| रशिया | ९.९ | आस्ट्रेलिया | पौंड ४३.४ |
| स्पेन | १३.८ | आयर्लंड | १६ |
| हॉलंड | २६ | जर्मनी | १८.७ |
| स्विट्झरलंड | १६ | इटली | १२ |
| टर्की | ४ | बेलजम | ३२.१ |
| कॅनडा | २६.९ | स्वीडन आणि नॉरवे | १६.२ |
| स्कॉटलंड | ३२ | | |
| फ्रान्स | ३५.७ | युनायटेड स्टेट्स | २७.२ |
| आस्ट्रिया | १६.३ | हिंदुस्थान ( लॉर्ड क्रोमर आणि सर डेव्हिड बारबर यांच्या हिशेबाप्रमाणें.) | २ |
| पोर्च्युगल् | १३.३ | | |
| डेन्मार्क | २३.२ | | |

हिंदुस्थानांतील मुख्य उद्योग शेतकीचा आहे. आणि याच उद्योगांतील लोकांचें पुढें कसें होईल या बद्दल काळजी सरकारास कित्येक वर्षें लागलेली आहे. ते दिवसेंदिवस कर्जांत बुडत चालले असून सावकारांच्या आणि पिढीजाद शेतकरी नसलेल्या लोकांच्या घरांत त्यांच्या जमिनी जात आहेत, आणि अर्थशास्त्राच्या आणि राज्यव्यवस्थेच्या दृष्टीनें हें मोठें नुकसान होत आहे. १८७४ सालीं दक्षिणेंतील कित्येक जिल्ह्यांतील शेतकरी लोक साऱ्यांची वाढ आणि सावकारांचे तगादे यांना गांजून गेल्यामुळें सावकारावर उठले, आणि त्यांना

मारहाण करून त्यांची मालमत्ता लुटून कर्जाच्या पुराव्याचे हिशेब आणि दस्तऐवज त्यांनीं नाहींसे केले. या दंग्याचें कारण शोधून काढण्यासाठीं वजनदार मंडळींचें एक कमिशन नेमण्यांत आलें होतें. या कमिशनांतील सभासदांचें बहुमत असें पडलें कीं, सरकाराची जमाबंदीची पद्धति या दंग्याचें एक कारण आहे. मि. कालॅव्हिन ( हल्लीं सर ऑकलंड कॉलव्हिन ), आणि मि. कारपेन्टर यांनीं हें कारण विशेष जोरानें पुढें आणिलें आहे. मि. कारपेन्टर यांच्या अभिप्रायांतून पुढील अवतरण येथें घेणें अप्रासंगिक होणार नाहीं. "साऱ्याची वाढ जरी अगदीं थोडी आणि सर्वत्र सारखी झालेली असली तरी तिच्या योगानें रयतेस सदोदित कर्जांत रहावें लागून सावकारापाशीं तिची पत कमी होते. साऱ्याची वाढ जमीनीच्या मगदुराच्या मानानें भारी नसली तरी ती शेतकऱ्याच्या अंदाजा पलीकडे असल्यास वरील अनिष्ट परिणाम विशेष प्रत्ययास येतात. साऱ्याची वाढ जमीनीच्या मगदुरापलीकडे झाली ह्मणजे त्याहूनही अधिक वाईट परिणाम होतात. आणि ती वाढ सर्वत्र एकसारखी झाली नसली तर त्यामुळें कित्येक व्यक्तींचें त्याहूनही अधिक नुकसान होतें. आणि आपल्या प्रमाणें ज्यांचा सारा वाढला नाहीं असे कांहीं दैववान लोक आहेत असें पाहून त्यांना अधिकच दुःख होतें."

सर थिऑडर होप यांनीं दक्षिणेंतील शेतकऱ्यांस ऋणमुक्त करण्यासाठीं कायद्याचा एक खर्डा १८७९ सालीं कौन्सिल पुढें आणिला; त्यावेळीं 'शेतकऱ्यांस कर्जबाजारी करण्यास आमची जमाबंदीची पद्धति, अंशतः तरी कारणीभूत आहे असें मला मोकळ्या मनानें कबूल केलें पाहिजे असे उद्गार

त्यांनीं काढिले. या बिलावर झालेल्या वादविवादाच्या वेळीं पंजाबचे लेफ्टेनेंट गव्हनर यांनीं असें बोलून दाखविलें कीं 'शेतकऱ्यांचीं दुःखें आणि त्यांचा कर्जबाजारीपणा सर्वस्वीं नाहीं तरी अंशतः तरी आमच्या जमाबंदीच्या पद्धतीमुळें वाढलीं आहेत, त्या गोष्टीकडे द्यावें तितकें लक्ष देण्यांत येत नाहीं.' त्यावेळचे व्हाइसराय यांनींही 'प्रस्तुत आपणांपुढें विचारार्थ आलेल्या बिलासारख्या गोष्टींनीं जें कार्य व्हावयाचें तें होईलच पण त्या बरोबर मुलकी अधिकाऱ्यांनीं जमाबंदी पद्धतीची सक्ती कमी करण्यास झटलें पाहिजे' असें बोलून दाखविलें. ह्यानंतर १२ वर्षांनीं त्याच कायद्याची वहिवाट कशी काय झाली आहे त्याची चौकशी करण्याकरितां एक कमिशन नेमण्यांत आलें होतें. आणि त्यानेंही सरकारची जमाबंदी पद्धति फार सक्तीची आहे असा अभिप्राय प्रगट केला. हिंदुस्थान दरिद्री नाहीं असें सिद्ध करण्याकरितां आमचा हरएक देशाशीं व्यापार या शतकांत पुष्कळ वाढला आहे या मुद्यावर फार जोर देण्यांत येत असतो. या व्यापाराचें वास्तविक स्वरूप कसें आहे याचा विचार केला ह्मणजे आमच्या सांपत्तिक स्थितीचें खरें स्वरूप, आणि शेतकऱ्यांची असह्य स्थिति अधिक स्पष्टपणें वाचकांच्या समजण्यांत येईल.

१८९४–९५ सालीं आयात निर्यात व्यापाराची स्थिति पुढें लिहिल्याप्रमाणें होती.

| | |
|---|---|
| स्वदेशांतील किंवा परदेशांतील इकडे आलेला माल निर्यात झाला तो | रु. १,१७,१३,९८,५०० |
| व्यापारी माल, सरकारी खात्यांस, लागणारा माल आणि खजिना मिळून आयात. | रु. ८३,११,०२,००० |
| आयात पेक्षां निर्गत माल अधिक ...... | रु ३४,०२,९६,३०० |

१८४० पासून १८९५ पर्यंत आयात निर्गत व्यापार पुढील कोष्टकांत लिहिल्याप्रमाणें होता.

| वर्षें. | आयात. रु. | निर्गत रु. | आयात पेक्षां जास्त निर्गत माल रु. |
|---|---|---|---|
| १८४०–४४ | १०–४३ | १५१ | ४.६७ |
| | कोट रु. दरसाल | कोट रु. दरसाल. | कोट रु. दरसाल. |
| १८४५–४९ | १२५.१,, | १८.३२,, | ६.११,, |
| १८५०–५४ | १५८.५,, | २१.१०,, | ५.२५,, |
| १८५५–५९ | २६८.५,, | २६.७७,, | .०८,, |
| १८६०–६४ | ४१०.४,, | ४४.१९,, | ३.१५,, |
| १८६५–६९ | ४९३.२,, | ५९.४६,, | १०.१४,, |
| १८७०–७४ | ४१६.०,, | ५९.४२,, | १७.८३,, |
| १८७५–७६ | ४४१९२३७७ | ६०२९१७३० | १६०९९३५३ |
| १८७६–७७ | ४८८७६७५० | ६५०४३६८९ | १६१६७०३९ |
| १८७७–७८ | ५८८१९६४५ | ६७४३३३२४ | ८६१३६७९ |
| १८७८–७९ | ४४८५७३४२ | ६४९१९७४१ | २००६२३९९ |
| १८७९–८० | ५२८२१३९८ | ६९२४७५११ | १६४२६११३ |
| १८८०–८१ | ६२१०४९८४ | ७६०२१०४२ | १३९१६०५८ |
| १८८१–८२ | ६०४३६१५५ | ८३०६८१९८ | २२६३२०४३ |
| १८८२–८३ | ६५६४८८६८ | ८४५२७१८२ | १८९७८३१४ |
| १८८३–८४ | ६८१५७३११ | ८९१८६३९७ | २१०२९०८६ |
| १८८४–८५ | ६९५९१२६९ | ८५२२५९२२ | १५६३४६५३ |
| १८८५–८६ | ७११३३६६६ | ८४९८९५०२ | १३८५५८३६ |
| १८८६–८७ | ७२८३०६७० | ९०१९०६३३ | १७३६९९६४ |
| १८८७–८८ | ७८८३०४६८ | ९२१४८२७९ | १३३१७८११ |
| १८८८–८९ | ८३२८५४२७ | ९८८३३८७९ | १५५४८४५२ |
| १८८९–९० | ८६६५६९९० | १०५३६६७२० | १८७०९७३० |
| १८९०–९१ | ९३९०९४५६ | १०२३५०५२६ | ८४४०६७० |
| १८९१–९२ | ८४१५५०४५ | १११४६०२७८ | २७३०५२३३ |
| १८९२–९३ | ८३२७५०८७ | ११३५५४३९९ | ३०२७९३१२ |
| १८९३–९४ | ९५४८२६८८ | ११०६०३५६१ | १५१२०८७३ |
| १८९४–९५ | ८३११०२०० | ११७१३९८५० | ३४०२९६५० |

वरील कोष्टकांतील मुख्यत्वें लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ह्मटली ह्मणजे व्यापाराचें वाढतें परिमाण होय. शिवाय हा व्यापार एकाच देशाशीं किंवा राष्ट्राशीं चालत नसून पृथ्वी-वरील सर्व देशांशीं चालतो. हें सर्व वरवर चांगलें दिसतें खरें पण दर वर्षी आयात माला पेक्षां निर्गत माल जास्त असून या दोहोंतील फरक वर्षानुवर्ष वाढतच आहे, ही गोष्ट अत्यंत काळजी उत्पन्न करणारी आहे. १८४० सालीं हा फरक ५ कोट रुपये होता, तो आतां ३४ कोटीवर गेला आहे. देशांत आयात होणाऱ्या मालाची किंमत निर्यात होणाऱ्या मालानें भागत असते. साधारण मानानें पाहतां परदेशांशीं व्यापार करणाऱ्या प्रत्येक देशाची अशी इच्छा असते कीं, आपल्या कडून निर्यात होणाऱ्या मालाची भरपूर किंमत आपणांस मिळून आपणांस चांगला नफा व्हावा. ह्मणजे आपणांस जितका नफा मिळाला असेल तितक्या किंमतीचा जास्त आयात माल आपल्या देशांत यावा. हिंदुस्थानाच्या व्यापाराचें निरीक्षण करितां असें आढळून येतें कीं, निर्गत माला पेक्षां आयात माल अधिक असणें तर एकीकडेंच राहिलें, उलट आयाता पेक्षां निर्गत मालच वर्षा-नुवर्ष वाढत आहे. १८३५ आणि १८९५ यांच्या दरम्यान गेलेल्या ६० वर्षांत हा फरक ५८६$\frac{3}{4}$ कोटी इतका झाला आहे. व्यापारी दृष्टीनें एवढ्या मालाचा मोबदला हिंदुस्थानास मिळाला नाहीं. आणि ह्मणून इतकी संपत्ती येथून परदेशांत गेली आहे असें सिद्ध होतें.

व्यापारांत उपयोगी पडणाऱ्या जहाजांची संख्या १०,५७७ असून प्रत्येक खेपेस ८२,५५,८२२ टन माल नेण्याची

त्या सर्वांची मिळून शक्ति होती. तिची विल्हेवारी खालीं दिल्याप्रमाणें. इंग्रज कंपन्याच्या मालकीचीं जहाजें.

६७८४८४९ टन.

हिंदुस्थानांतील इंग्रज कंपन्यांची जहाजें........२८८१९२
परदेशाचीं जहाजें.................................१०२९९९३
हिंदुस्थानांतील जहाजें.........................१९६७८८

वरील आंकड्यांवरून दिसून येईल कीं, समुद्रांतून मालाची ने आण करण्याचा व्यापार विलायतेंतील किंवा हिंदुस्थानांतील शेंकडा ८०½ इंग्रज कंपन्यांच्य हातीं आहे. आणि शेंकडा १½ हिंदुस्थानांतलि लोकांच्या हातीं आहे. मि. ओकानार यांच्या पुढील शेऱ्यांत वस्तुस्थितीचें वर्णन सुरेख रीतीनें आलें आहे:—

'परदेशांशीं चालणाऱ्या व्यापारांत देशी बारकसें हळुहळु दिसेनाशीं होत आहेत. हिंदुस्थानांत जहाजें बांधण्याचें काम अत्यंत अल्प प्रमाणावर चाललेलें असतें. १८८०।८१ सालीं देशी जहाजांचें प्रमाण शेंकडा ३ होतें, तें आतां निम्यावर आलें आहे, आयात निर्यात मालाची विल्हेवारी केली असतां असें दिसून येतें कीं निर्यात मालांत बहुतेक कारखान्यांत लागणारा कच्चा माल आणि धान्यें असतात. आणि आयात मालांत कारागिरीचे जिन्नस असतात. १८९४।९५ सालच्या निर्यात मालाची विल्हेवारी पुढें लिहिल्या प्रमाणें आहे.:—

रुपये.

१ धान्यें आणि डाळी..............................१७०९
२ गळिताची धान्यें..................................१४२०
३ कच्चा ताग ......................................१०९७½

४ अफू ........................................ ९०६
५ कापूस ........................................ ८७०
६ चहा ........................................ ७५५$\frac{1}{2}$
७ कापसाचें सूत आणि कापड ........................ ७१५
८ चामडीं ........................................ ६५६
९ नीळ ........................................ ४७४$\frac{1}{2}$
१० तागाचें कापड ........................................ ४२१
११ काफी ........................................ २१२$\frac{1}{4}$
१२ लाख ........................................ १४०
१३ लोंकर ( कच्ची ) ........................................ १३७$\frac{1}{2}$
१४ रंग ........................................ ८६$\frac{1}{2}$
१५ खाद्य पदार्थ ........................................ ८४$\frac{1}{3}$
१६ तेलें ........................................ ७७$\frac{1}{2}$
१७ लांकूड ........................................ ६६
१८ साखर ........................................ ५५
१९ मसाल्याचे पदार्थ ........................................ ५१$\frac{2}{3}$
२० रेशीम कच्चे ........................................ ५०$\frac{1}{4}$

आयात मालाची विल्हेवारीपुढें लिहिल्याप्रमाणें आहे:—

१ घोडे वगैरे जनावरें ........................ २६ लक्ष
२ खाद्यें आणि पेय पदार्थ ........................ ८३८
३ धातु आणि धातूंचे पदार्थ ........................ }
हत्यारें व यंत्रें, गिरण्या व आगकाड्या यांचें सामान } १०३४
४ औषधी द्रव्यें ........................................ १८६
५ तेलें ........................................ २२२
६ कच्चा माल ........................................ ४४६

७ पूर्ण कारागिरीचा आणि अर्धा कच्चा माल........ २६९

यांपैकीं दुसऱ्या वर्गांत ८४ लक्ष किंमतीचे ९ लक्ष टन मीठ धरलेलें आहे. ७ व्या वर्गांत पुढील जिन्नस येतात.

कापसाचें सूत ..........................२८९ लक्ष

कापड............( सुमारें ) ............ ३०००

रेशमी कापड ..........................१२९ लक्ष

लोंकरीचें कापड .......................... १९० ,,

बाहेर देशीं जाणाऱ्या माला पैकीं चहा, कॉफी आणि नीळ यांची किंमत जवळ जवळ १४½ कोट रुपये होते. हा व्यापार चांगला फायदेशीर आहे. पण तो सगळा यूरोपियनांच्या हातीं असून त्याचा नफा त्यांनांच मिळतो आणि देशाच्या बाहेर जातो. निर्यात होणाऱ्या कारागिरीच्या पदार्थांपैकीं विशेष महत्वाचे ह्मटले ह्मणजे कापसाचें सूत आणि कापड, आणि तागाचें कापड हे आहेत. हे धंदे चांगले ऊर्जित दशेस येतील अशी आशा दिसत आहे. पण या धंद्यांत देखील बरेंच भांडवल परकीयांचे आहे. त्यांची व्यवस्था सर्वस्वी परकीयांकडे आहे. आणि त्यांतील कौशल्याचीं कामें करण्यासाठीं परकीय मनुष्य मुद्दाम मागवून घ्यावे लागतात.

हिंदुस्थानांत आयात झालेलें कापड आणि खाद्य व पेय पदार्थ देशांतल्या देशांत उत्पन्न होण्यासारखे आहेत. आतां कापडा संबंधी विचार करूं लागल्यास असें दिसून येतें कीं, कारागिरीच्या जिनसेच्या किंमती पैकीं ½ किंवा फार झालें तर ⅓ कच्च्या मालाची किंमत असून बाकीची किंमत कारागिरीच्या कामांत गुंतलेल्या लोकांची मजूरी, कारखानदारांचा नफा, मालाची ने आण करण्याचा खर्च वगैरे बाबतीमुळें वाढलेली असते.

कच्चा माल इकडून परदेशीं पाठवून तेथून पक्का माल आणविण्या पेक्षां कच्या मालाचा पक्का माल येथल्या येथेंच जर होऊं लागून खपूं लागेल तर पहिल्या आणि दुसऱ्या मालाच्या किंमतींत फरकानें दाखविलेली रक्कम येथल्या येथेंच राहून मजुरांस देण्यासाठीं देशांत अधिक पैसा राहिला असता, आणि कारखानदारांसही तितकाच नफा झाला असता. देशांतील मजूर आणि कारखानदार यांच्या वांट्यास न येतां परकीयांची भर सुमारें ५० पासून ६० कोटीपर्यंत आमच्या व्यापारानें होत आहे, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. या दृष्टीनें पाहतां आमचा परदेशाशीं मोठा व्यापार चालत असला किंवा गेल्या १००,७५ वर्षांत त्याची कितीही झपाट्यानें वाढ झाली असली तरी त्यांत केवळ आनंद मानण्या सारखेंच असें कांहीं नाहीं. उलट ही वाढ चांगली नसून तीमुळें देशाला सध्यां जी स्थिति येऊन पोंचली आहे ती सृष्टिनियमाला विरुद्ध आणि अर्थशास्त्र दृष्ट्या विघातक अशी आहे. औद्योगिक खटपटीनें जेवढे कांहीं पदार्थ मिळवितां येण्या सारखे आहेत तेवढे बहुतेक आह्मीं बाहेर देशांहून मागवीत आहों. रोज लागणाऱ्या जिनसांसाठीं आह्मी परकीयांवर अवलंबून राहिलों आहों. स्वतःच्या उद्योगानें आह्मी जे जिन्नस तयार करीत होतों, त्यांवर आपल्या गरजा भागवून शिवाय त्यांतूनच इतर राष्ट्रांसही आह्मी पुरवठा करीत होतों या गोष्टीला फार काळ लोटला नाहीं. सर. डब्ल्यु हंटर साहेब आपल्या हिंदुस्थानच्या इतिहासांत ह्मणतातः–

" अगदीं प्राचीन काळापासून हिंदुस्थान हा व्यापारी देश ह्मणून प्रख्यात आहे. याचें कारण तेथील अफाट संपत्ति

आणि बंदरपट्टीचा विस्तार हीं तर आहेतच पण तेथील लोकही एशियाखंडांतील इतर लोकांपेक्षां व्यापारी कामांत अधिक पटाईत आहेत. * * * * * *

मध्य युगांत इटालीमध्यें जीं चिमुकली प्रजासत्ताक राज्यें उदयास आलीं त्यांनीं हिंदुस्थानांशीं व्यापार करूनच आपली बहुतेक संपात्ति मिळविली होती. ह्या व्यापारांत आपला हात शिरकवावा या इच्छेनेंच कोलंबस जलपर्यटनास निघाला आणि त्यानें अमेरिकेचा शोध लाविला. आणि वास्को डि गामानें बरेंच मोठें चक्कर घेऊन केप ऑफ गुड होप शोधून काढिलें. मसाल्याचे पदार्थ, रंगाचीं आणि औषधी द्रव्यें, चमत्कारिक मौजेचे पदार्थ, रेशमी आणि सुती कापड, रत्नें, सोनें, आणि रुपें हीं मिळविण्याच्या हव्यासानें यूरोपांतील धाडशी लोकांनीं अगदीं अव्वलची पर्यटनें केलीं." ( हंटरकृत हिंस्थानचा इतिहास पृ० ५५९. )

ते आणखी असें ह्मणतात:-'इमारती बांधणें, रेशमी आणि सुती कापड विणणें, आणि सोन्यारुप्याचें आणि जडावाचें काम करणें यांत हिंदुस्थानच्या लोकांचा हात धरणारा कोणी नव्हता. (पृ० ५९३.)

बॅंबे टाइम्स पत्राचे संपादक डॉ. बुइस्ट यांनीं लिहिलेल्या हिंदुस्थान विषयक टिपणें या नांवाच्या पुस्तकांत असें लिहिले आहे कीं हिंदुस्थानांतील लांकडावरील कोरींव काम तेथील गालीचे, शाली, इत्यादिकांचा देखावा व रंग हीं विणकर लोक शेंकडों वर्षें वाखाणीत आले आहेत. १८५१ सालचें जंगी प्रदर्शन झाल्यापासून युरोपांतील नाणावलेल्या कारागिरांना देखील ते जिन्नस अनुकरणीय आहेत असें ठरविण्यांत

आलें आहे. एका येथील मागावर निघालेलें अप्रतिम तलम कापड आगस्टस सीझरच्या दरबारांतील बड्या लोकांच्या स्त्रिया परिधान करीत असत. १६०० वर्षां मागें रोम मध्यें त्या कापडाला जं नांव मिळालें होतें त्याच नांवानें तें अद्यापही हिंदुस्थानांत ओळखिलें जात आहे. खुद्द आमच्या अमदानींत उकरून काढलेलीं अशीं पुष्कळ रोमन लोकांची नाणीं आणि इतर स्मारक वस्तू आढळतात, आणि त्यावरून हिंदुस्थान आणि रोम यांमध्यें फार पूर्वीपासून व्यापारी दळणवळण चालू होतें असें दिसतें.

हें औद्योगिक वर्चस्व नाहींसें कसें झालें तें मिल् कृत हिंदुस्थानच्या इतिहासांतील पुढील उताऱ्यावरून दिसून येईल.

' इसवी सन १८१३ पर्यंत इंग्लंडांत तयार होणाऱ्या कापडाला जी किंमत पडे तीपेक्षां शेंकडा ५० किंवा ६० टक्के कमी किंमत घेऊन देखील हिंदुस्थानांत तयार झालेलें कापड इंग्लंडांत विकणें फायदेशीर होतें. ह्मणून देशांतील धंद्यांचें रक्षण करण्यासाठीं हिंदुस्थानच्या कापडावर त्याच्या किंमतीच्या मानानें ७० किंवा ८० टक्के जकात बसवावी लागली होती. असें केलें नसतें तर मॅन्चेस्टर आणि पेस्ले येथील गिरण्या सुरुवातीसच बंद कराव्या लागून त्या वाफेच्या शक्तीनें चालविणें देखील शक्य झालें नसतें. हिंदुस्थानांतील कारखानदारांचें नुकसान करून या गिरण्या इंग्लंडनें बचावल्या. हिंदुस्थान स्वतंत्र असतें तर त्यानें या अन्यायाचा वचपा काढिला असता. पण स्वसंरक्षणार्थ देखील इंग्लंडनें त्याला तसें करूं दिलें नाहीं. जकात मुळींच न देतां हिंदुस्थानच्या बाजरांत इंग्लंडनें आपला माल आणून भरला. हिंदुस्थानच्या व्यापा-

त्यांशीं विलायतच्या व्यापाऱ्याला प्रथम टक्कर मारितां येत नव्हती. पण राजकीय अधिकार हातीं येतांच अन्यायाचें शस्त्र उचलून इंग्रज व्यापाऱ्यांनीं देशी व्यापाऱ्यांना चीत करून त्यांची मुंडी मुरगळून टाकिली."

सर वुइल्यम लीवार्नर ह्मणतात:—' १७८६ मध्यें डाका येथून बाहेरदेशीं पाठविलेल्या मलमलींची किंमत ३० लाख रुपये होती ती १८१३ त ४ लाख आली. याप्रमाणें संरक्षक करांनीं निगडित आणि मर्यादित झालेला हिंदुस्थानचा व्यापार, युरोपांत शास्त्रज्ञानाचा औद्योगिक गोष्टींकडे अधिकाधिक उपयोग होऊं लागल्यानें दिवसें दिवस मंदावत जाऊन अखेर ठार बुडाला. वाफेची शक्ति आणि यंत्रांतील सुधारणा यांच्या योगानें कापड तयार करण्याचा खर्च इतका कमी झाला कीं, त्या योगानें हिंदुस्थानांतील कोष्टयांपेक्षां कमी दरानें त्याच्याच देशांत आपला माल विकून त्यांच्या मालास ठाव न राहूं देण्याचें सामर्थ्य इंग्रज कारखानदारांस आलें.

आतां आमच्या देशास केवळ शेतकीचाच एक उद्योग राहिला आहे. ह्या एकाच उद्योगावर अवलंबून राहिल्यानें देशाचें कसें नुकसान झालें आहे हें १८७९ सालीं प्रसिद्ध झालेल्या फॅमिन कमिशनच्या रिपोर्टांतील पुढील दुसऱ्या उताऱ्यांवरून कळून येईल.

" रयतेपैकीं बहुतेक लोकांस दुर्दैवानें केवळ एकच, शेतकीचा धंदा राहिला आहे, यामुळेंच हिंदुस्थानदेश बहुतेक अंशीं दरिद्री झाला आहे, आणि दुष्काळच्या दिवसांत लोकांस दुःखें सोसावीं लागत आहेत. पुष्कळ लोकांना शेतकीच्या धंद्यांतून काढून निरनिराळ्या धंद्यांत घातलें पाहिजे.

आणि त्या धंद्यांत त्यांचा उदर निर्वाह होईल अशी तजवीज केली पाहिजे, तेव्हांच हल्लींची दुःस्थिति सुधारेल "–फॅमिन-कमिशनचा रिपोर्ट भाग २. पृष्ठ १७९.

" हिंदुस्थानांत दुष्काळानें इतकी भयंकर प्राणहानि होण्याचें एक मुख्य कारण, आणि दुष्काळांत रयतेला योग्य रूपानें मदत करण्याला एक मोठी अडचण अशी आहे कीं, बहुतेक लोकांचा उदरनिर्वाह साक्षात शेतकीवर चालत असून बऱ्याच लोकांना उदरनिर्वाहाचें साधन होण्यासारखा दुसरा कोणताही धंदा नाहीं. यामुळें एखाद्या वर्षी पाऊस न पडला तर मजुरी करणाऱ्या एकंदर लोकांना नेहमींचे उदर-निर्वाहाचे जिन्नस स्वस्त मिळत नाहींत, इतकेंच नाहीं तर ज्या उद्योगाच्या बळावर ते निर्वाहाचे जिन्नस विकत घेणार तो उद्योगच अजीबात नाहींसा होतो. ही स्थिति नाहींशी करण्यास ऋतुमानावर अवलंबून नसलेले शेतकी खेरीज इतर धंदे सुरू करणें, हाच एक योग्य उपाय आहे. हिंदुस्थाना-सारख्या दाट वस्तीच्या देशांत शेतकीच्या कामांस जरूर असणाऱ्या लोकांपेक्षां अधिक लोकवस्ती असून त्यांना दुसरा कांहींच उद्योग नसल्यामुळें अशा प्रकारची कांहींतरी व्यवस्था करणें अतीशय अगत्याचें आहे. शेतकींत उत्तमप्रकारें उपयोगी पडणाऱ्या लोकांपेक्षां शेतकींत गुंतलेल्या लोकांची संख्या जोंपर्यंत अधिक राहील, आणि त्या अधिक लोकांना इतर कांहीं उद्योगधंदा मिळणार नाहीं तोंपर्यंत समाज आपल्या उद्योगानें जी कांहीं संपत्ति जास्त कमावील ती हे लोक खाऊन टाकतील."–फॅमिन कमिशनचा रिपोर्ट.

खेडेगांवांतील लोकसंख्येपैकीं शेंकडा ९० किंवा एकंदर लोकसंख्येपैकीं शेंकडा ८० हून कांहीं जास्त लोक शेतकींत गुंतलेले आहेत, असें दुष्काळ कमिशनांतील सभासदांचें मत होतें. पुणें येथील सार्वजनिक सभेच्या त्रैमासिकांत (जानेवारी आणि ऑक्टोबर १८९०) हिंदुस्थानच्या सांपत्तिक स्थितीसंबंधानें विश्वसनिय माहितीनें भरलेले जे लेख आले आहेत त्यांच्या विद्वान लेखकांच्या मतें एकंदर लोकसंख्येपैकीं शेंकडा ८६ लोक शेतकींत गुंतलेले आहेत. शेंकडा ६.८ सरकारी किंवा इतर नोकरींत, आणि शेंकडा ४.२ इतर उद्योगधंद्यांत गुंतलेले आहेत. यावरून लोकांचा मुख्य भर शेतकीवर आहे हें सिद्ध होतें.

आतां या उद्योगाची स्थिती कशी काय आहे हें पाहूं. शेतकीची वाढ अतोनात झाली आहे, ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. १८९२।९३ सालीं मद्रास इलाख्यांत १९७ लक्ष ८० हजार एकर जमीन लागवडीस आलेली होती. ती १८९४–९५ सालीं २ कोटी ४५ लक्ष एकर झाली. तीच १८९२।९३ सालीं मुंबई इलाख्यांत १ कोटी २६ लक्ष ९० हजार आणि १८९४।९५ त २ कोटी ८० लक्ष एकर झाली. वायव्य प्रांतांत २ कोटी १२॥ लक्ष एकरांवरून हा आंकडा २ कोटी ५० लक्षांवर गेला, आणि मध्यप्रांतांत १ कोटी ११ लक्षांवरून १ कोटी ६० लजांवर गेला, वऱ्हाडांत १८५८ सालापासून आजपर्यंत लागवडींत असलेली जमीन शेंकडा ६० वाढली आहे. ही लागवडीची वाढ पुष्कळच झाली आहे, तरी देशाच्या गरजेस तेवढीच पुरी होत नाहीं. १८९४।९५ सालीं १९

कोटी ६५ लक्ष एकर जमीन लागवडीस आलेली होती. १८९१ त लोकसंख्या २२ कोटी १० होती. १८९१ आणि १८९४ यांच्या दरम्यान लोकसंख्येत झालेली वाढ हिशेबांत धरिली असतां लागवडीस आलेल्या जमीनींचें दरमाणशीं प्रमाण पाउण एकर पडतें. सर वुइल्यम हंटर यांनीं असें प्रमाण बांधिलें आहे कीं, प्रत्येक मनुष्यानें खाऊन पिऊन भुखी असण्याला, निदान १ एकर तरी जमीन लागवडीस आणिली पाहिजे. शिवाय लागवडींत जी वाढ झाली आहे ती संबंधानें अशीं उदाहरणें पुष्कळ दाखवितां येतील कीं, गुरें, चराईच्या जमीनी, आणि जळाऊ किंवा इमारती लांकडांसाठीं राखून ठेविलेलीं जंगलें, शेतजमीनींत सामील करावीं लागलीं आहेत, किंवा कमी कसाच्या आणि नापीक जमीनी लागवडीस आणाव्या लागल्या आहेत, आणि त्यामुळें रयतेचें नुकसान झालें आहे. हिंदुस्थानांत पाश्चात्य सुधारलेल्या देशां इतकें किंवा खूद्द हिंदुस्थानांतच पूर्वी होत होतें इतकें उत्पन्न शेतींत होत नाहीं. वायव्येकडील प्रांतांतील गहूं पिकणाऱ्या जमीनींत अकबराच्या वेळीं दर एकरास ११४० रतल पीक येत असे, ( हंटर साहेबांचा इतिहास. पृ. ५१७ ) तें हल्लीं ८४० रतल येत येतें. गहूं पिकविणाऱ्या जमीनीचे सरासरीनें उत्पन्न हिंदुस्थानांत दर एकरास ७०० रतल आणि इंग्लंडांत १७०० रतल आहे, अमेरिकेंत दर एकरास २०० रतल कापूस पिकतो. हिंदुस्थानांत ६० पासून ७० रतल पिकतो. तांदुळ बऱ्हेरियांत दर एकरास २५०० रतल पिकतात, उत्तर हिंदुस्थानांत फक्त ८०० रतल पिकतात; शेतकीच्या जनावरांविषयीं विचार करूं गेलें तर, लागवडींत

असलेल्या प्रत्येक शेतकींत सुधारणा होणें अवश्य आहे, याबद्दल मुळींच वाद नाहीं. शेतकीच्या बाबती दोन. एक जमीन आणि दुसरी लोकवस्ती. पैकीं लागवड करण्यासारखी जमीन बेताचीच आहे. आणि उत्पन्नाची व लोकवस्तीची तोंडमिळवणी प्रतिवर्षी हळूहळू होत आहे. (१८९११९२ सालाचा लोकस्थितीचा रिपोर्ट. पृ. २७७).

हंटर साहेबांच्या मतें शेतकींत सुधारणा करण्यास तीन अडचणी आहेत. त्या ह्याः— (१) खताचा अभाव, (२) शेतकीस लागणाऱ्या जनावरांचा अभाव, आणि (३) पाण्याची टंचाई. शेतकऱ्यांस भांडवल मिळालें असतां ह्या सर्व अडचणी दूर होतील; पण सरकारच्या धारेबंदीमुळें शेतकींत होणाऱ्या फायद्याची शाश्वति वाटत नसल्यामुळें लोक तींत भरपूर भांडवल घालण्यास धजत नाहींत. जमिनीवरील रयतेचा हक्क, आणि तिजवर सरकारानें घ्यावयाचा सारा कायम करून टाकण्याची अवश्यकता सरकारच्या लक्षांत मागेंच येऊन चुकली आहे, आणि १८६२ आणि १८६९ सालीं कायम धारेबंदी सुरू करण्यासंबंधानें सरकारानें आपल्या खलित्यांत वचनें दिलीं आहेत. पण हीं वचनें अद्याप पुरीं करण्यांत आलीं नाहींत इतकेंच नाहीं, तर स्टेटसेक्रेटरीच्या संमतीनें लॉर्ड रिपन यांनीं जमीनीवरील सारा अमूक प्रमाणापेक्षां जास्त वाढूं नये असें ठरविलें असतांही त्या नियमाकडे हल्लीं बिलकुल लक्ष देण्यांत येत नाहीं.

आतां एकाच मुद्याचा विचार करावयाचा राहिला आहे. तो मुद्दा ह्मणजे हिंदुस्थानांत होणारी सोन्यारुप्याची आयात हा होय. १८३४ आणि १८९४।९५ यांच्या दरम्यान १९२

कोटी रुपयांचें सोनें हिंदुस्थानांत आलें. यापैकीं, (१) सोन्याचें नाणें (मोहरा) पाडण्याकडे गेलेलें ३० लक्ष रुपयांचें सोनें; (२) हिंदुस्तानांतील पेढ्यांनीं शिलकेंत ठेविलेलें सोनें, (३) व्यापारी माहिती मिळविणारांस पत्ता न लागतां खासगी मालमत्ता ह्मणून दागिने वगैरेच्या रूपानें देशाबाहेर गेलेलें सोनें, (४) सालोसाल हरवून किंवा झिजून गेलेलें सोनें, आणि (५) मध्य हिंदुस्थानांत खुष्कीच्या मार्गानें गेलेलें सोनें, (याचे आंकडे मिळत नाहींत). या सर्व बाबी वजा करितां, देशांतील लोकांच्या वांट्यास १२० पासून १२५ कोटींहून अधीक किंमतीचें सोनें राहिलें नाहीं. ह्मणजे २८ कोटि प्रजेमध्यें दरसाल २ कोटींचें ह्मणजे दर माणशीं १$\frac{१}{४}$ आ-ण्याचें सोनें वांटलें जातें

त्याचप्रमाणें चांदीची नक्त आयात त्याच ६१ वर्षांत ३६१ कोटींची झाली. नाणें पाडण्याचा प्रतिबंध होण्यापूर्वी लोटलेल्या ६० वर्षांत ३४३ कोटी रुपयांची चांदी टांकसा-ळीस लागली. सन १८८५ सालीं सर वुइल्यम हंटर यांनीं आपला इतिहास लिहिला तव्हां चलनी असलेल्या रुपयांची किंमत १५ कोटी ८० लक्ष पौंड धरिली होती (हंटरकृत इतिहास पान ५६९). हल्लीं १८ कोटी पौंड किमतीचें चांदीचें नाणें चलनांत आहे, असें मानिल्यास चूक होणार नाहीं. मध्य एशिया, अफगाणिस्थान, बलुचिस्थान आणि वायव्य सरहद्दीवरील लोक, यांनीं नेलेली चांदी हिशेबांत धरली असतां, दागिने वगैरे रूपानें सांठवून ठवण्याकरितां दरसाल १०२ कोटींहून अधिक किमतीची चांदी लोकांच्या वांटणीस येत नाहीं; ह्मणजे दरसाल दरमाणशीं पुरता १ आणाही

पडत नाहीं. ( सार्वजनिक सभेचें त्रैमासिक जुलई १८८८ मधील मि० गणेश व्यंकटेश जोशी यांचा निबंध पहा.) रा० ब० जोशी यांनीं हिशेबांत धरलेल्या कित्येक बाबी सर-वुइल्यम हंटर यांनीं हिशेबांत धरल्या नाहींत. यामुळें हिंदुस्थानांत मुरलेल्या सोन्यारुप्याचे त्यांनीं दिलेले आंकडे बरेच फुगलेले आहेत. ते ७ आणि ११ कोटींच्या दरम्यान येतात. हे आंकडे घेऊन चाललें तरी दरसाल सोनें आणि रुपें मिळून ३ आणे ९ पै आणि ९ आणे १० पै यांच्या दरम्यान कांहीं तरी किंमतीचें सोनें रुपें हिंदुस्थानांतील प्रत्येक मनुष्यास मिळतें. यावरून हिंदुस्थानांतील लोक सोनें रुपें गोळा करून ठेवित आहेत, असें जें ह्मणण्यांत येतें त्याचा निर्णय होईल.

तेव्हां प्रस्तुत प्रश्न थोडक्यांत पुढें लिहिल्याप्रमाणें मांडतां येईल. हिंदुस्थानाचा व्यापार जगांतील सर्व देशांशीं चालू असून विस्तार पुष्कळ वाढला आहे खरा; पण तो बहुतेक परकी लोकांच्या भांडवलानें, त्यांच्याच मेहनतीनें आणि त्यांच्याच जाहजांतून चालला आहे. त्याचा फायदा खुद्द देशांतील लोकांस फारच थोडा मिळतो. या व्यापारांत देखील आयात मालापेक्षां निर्यात माल अधिक असल्यामुळें देशांतील पुष्कळ संपत्ति बाहेर जाऊन हा देश दरिद्री होत चालला आहे. जुनी व्यापारी पद्धति बऱ्याच अंशी नष्ट झा-ल्यामुळें आपले कारखाने आणि उद्योग धंदे गमावून हिंदुस्था-नाला निव्वळ शेतकीवर अवलंबून राहवें लागलें आहे. येऊन जाऊन शेतकीचा एकच उद्योग राहिल्यामुळें ज्याचा त्याचा ओढा शेतकीकडे वळून तींत नको इतके लोक शिरले आहेत, आणि त्या धंद्यांतील फायदा नाहींसा झाला आहे.

याचा परिणाम असा झाला आहे कीं, दारिद्र्य सर्व देशभर पसरून त्याचा चिमटा सर्वांना जाणवूं लागला आहे, आणि कनिष्ठ वर्गातील दैन्य वाढलें आहे व स्वतःचें त्राण कायम ठेवण्याची कुवत त्यांच्यांत राहिली नाहीं.

पूर्वी घडलेल्या चुका दुरुस्त करण्याचा सरकार आणि लोक या दोघांनीं पक्का निश्चय केल्याशिवाय ही स्थिति सुधारणें शक्य नाहीं. हिंदुस्थान सरकारास विलायतेंत कराव्या लागणाऱ्या खर्चाबद्दल, सरकारी अधिकारी स्वतःची शिलक विलायतेंत पाठवितात तिजबद्दल, आणि व्यापारी लोकांच्या नफ्याबद्दल ह्मणून आयात मालापेक्षां हिंदुस्थानास जास्त माल निर्गत करावा लागतो. विलायतखातीं खर्चाबद्दल (होम चार्जेस) भारी रक्कम द्यावी लागते, ती कमी करणें अवश्य आहे, असें इंग्लंडांतील जबाबदार मुत्सद्यांनीं बोलून दाखविलें आहे. हिंदुस्थानाच्या राज्यव्यवस्थेबद्दलचा खर्चही लोकांच्या ऐपतीच्या मानानें फार जबर आहे. याबाबतींत काय केलें पाहिजे तें राष्ट्रीयसभेनें पुढें लिहिल्याप्रमाणें सांगितलें आहे:—

" हिंदुस्थानच्या राज्यकारभाराचा खर्च बराच कमी करण्यांत आला पाहिजे. लष्करी खात्याच्या खर्चाच्या काटकसरीचा विचार करूं लागलें असतां असें दिसतें कीं, सध्यां जें सैन्य जय्यत तयारींत ठेवण्यांत येत आहे, त्यांतील पुष्कळ कमी करितां येईल. हल्लीं थोडक्या मुदतीच्या करारानें ज्या पलटणी इकडे आणण्यांत येतात, त्यांच्या ऐवजीं ईस्ट इंडिया कंपनीच्या धोरणाप्रमाणें पुष्कळ दिवसांच्या नोकरीच्या करारानें गोरें सैन्य ठेवण्याचा, सैन्यांत नवी भरती करण्याचा, तें इकडून तिकडे आणि तिकडून इकडे नेण्याचा, जो अचाट

खर्च होतो तो वांचेल. हल्लीं जे तरुण लोक लष्करांत नवीन भरण्यांत येतात त्यांस इकडील हवापाण्याची संवय नसल्यामुळें त्यांच्यांतील मृत्यूचें मान फार असतें. ह्मणून गोऱ्या सैन्याच्या हिंदुस्थानांतील नोकरीची मुदत वाढविण्यांत आली पाहिजे. कित्येक वर्षेंपर्यंत सरहद्दीवरील तटबंदीच्या पायीं जो पाण्या सारखा पैसा ओतण्यांत येत आहे तो बंद केला पाहिजे, आणि लष्करी सामग्रीचा पुरवठा करणाऱ्या निरनिराळ्या खात्यांत शक्य असेल तितकी काटकसर केली पाहिजे. मुलकी खात्या-मध्यें परदेशांहून पुष्कळ खर्चानें आणिलेल्या नोकरांच्या ऐवजीं देशांतल्या देशांत थोडक्या पगारावर मिळणाऱ्या लोकांस अधिकाधिक जागा देत जाव्या. ३० वर्षांपूर्वीं सरकारनें वचन दिल्याप्रमाणें जमीनधारा एकदांचा कायम करून टाकण्याची व्यवस्था करण्यांत यावी, ह्मणजे भांडवल आणि परिश्रम एकत्र होऊन देशांतील शेतकींत सुधारणा होईल. हल्लींच्या अल्प कालिन् धारेबंदीच्या पद्धतीनें (ही पद्धति कोठें कोठें द्वादश वार्षिक आणि दश वार्षिकही आहे.) शेतकींत सुधारणा होणें अशक्य आहे असें पूर्वींच आढळून आलें आहे. तसेंच शेतकऱ्यांच्या मदती साठीं निराळ्या पेढ्या (शेतकऱ्यांच्या ब्यांका) स्थापन करण्यांत याव्या. (७ व्या राष्ट्रीय सभेंतील ३ रा ठराव.)

(अ) हिंदुस्थान सरकारच्या खर्चावर दाब ठेवण्यासाठीं कांहीं तरी तजवीज केली पाहिजे. ती अशी असावी:—(१) व्हॉईसरॉयांच्या कौन्सिलांत सरकारी नोकर नाहींत असे सभासद खरे लोकप्रतिनिधी होतील अशी व्यवस्था व्हावी आणि जमाखर्चाच्या पत्रकांतील रकमा संबंधानें वाटल्यास

कांहीं फेरफार सुचवून त्यांवर आपलें मत प्रगट करावें असें कौन्सिलला ह्मणण्याचा अधिकार त्यांस असावा. (२) प्रांतिक कौन्सिलांतील आणि व्हॉईसरॉयांच्या कौन्सिलांतील लोकनियुक्त सभासदांच्या शिफारसी वरून स्टेट सेक्रेटरीच्या कौन्सिलांत कांहीं तरी अनुभवशीर आणि लायक मंडळी नेमण्यांत यावी. आणि (३) हिंदुस्थानाच्या सांपत्तिक स्थितीची चौकशी करून तिजसंबंधीं आपला अभिप्राय व्यक्त करण्याकरितां कॉमन्स सभेंतील कांहीं सभासदांचें एक मंडळ नेमण्यांत यावें.

**(ब.)** हिंदुस्थानाचा खर्च वाढत चालल्यामुळें आमची अशी विनंती आहे कीं, लष्करी आणि इतर निरुपयोगी खर्च कमी करण्यांत यावा; लोकांच्या कल्याणाच्या गोष्टींकडे बरीच रक्कम खर्च करण्यांत यावी; आणि राज्यकारभारांतील मोठमोठ्या अधिकारांवर गोरे अमलदार न नेमितां साधेल तेथें हिंदुस्थानांतील लोकांसच नेमून राज्य कारभारांत सुधारणा आणि खर्चाची काटकसर या दोनही गोष्टी साधण्यांत याव्या.

**(क.)** हिंदुस्थान आणि इंग्लंड यांजमधील खर्चाच्या वांटणीसंबंधानें आमची अशी विनंती आहे कीं, हिंदुस्थानाच्या हिताची आणि ब्रिटिश राज्याच्या इतर भागांच्या हिताची जेथें सांगड झालेली आहे, अशा सर्व बाबतींतील खर्चाची रास्त वांटणी इंग्लंडानें आपल्या माथ्यावर घ्यावी; विशेषतः सरहद्दी पलीकडे जी लढाई हल्लीं चालू आहे तिचा बहुतेक खर्च इंग्लंडानेंच द्यावा.– ( १३ व्या राष्ट्रीय सभेचा तिसरा ठराव. )

हिंदुस्थान विषयक विषयांचा पुष्कळ दिवस विचार करून, सर्व विचारशील देशी गृहस्थांचा आणि स्वतंत्र विचारानें चालणाऱ्या कित्येक इंग्रज गृहस्थांचा जो अभिप्राय झाला आहे तो राष्ट्रीयसभेच्या मागण्यांत नमूद केलेला आहे. न्याय मिळावा, शांतता असावी, व काटकसर आणि सुधारणा व्हावी, अशी जी ओरड पूर्वी पासून चालू आहे तीच राष्ट्रीयसभेनें चालविली आहे. न्याय आणि युक्तायुक्तता यांचा विचार केला तर ज्या पद्धतीनें काटकसर होऊन देशाचा पैसा अडचणीच्या प्रसंगीं उपयोगी पडावा ह्मणून सांठवून ठेवण्यांत येईल, नष्ट प्राय झालेले ठिकठिकाणचे उद्योग धंदे आणि कलाकौशल्यें हीं वाढीस लागतील, आणि हुन्नर कलांचा या देशांत प्रवेश होईल, त्याच पद्धतीचा स्वीकार करणें वाजवी आहे.

पण केवळ सरकारच्या प्रयत्नानें आह्मी आमच्या हल्लींच्या खालावलेल्या स्थितींतून वर येणार नाहीं. पाश्चिमात्य देशांतील सुधारणा आणि औद्योगिक चळवळी यांच्याशीं झगडून आपणांला यश मिळावें, असें जर आह्मास वाटत असेल तर उद्योग धंदे चालविण्याच्या पद्धतींत कसकसे फरक झाले आहेत ते आह्मांला उत्तम प्रकारें कळले पाहिजेत. आणि त्या प्रमाणें आपली दिशा बदलण्यास आपण तयार असलें पाहिजे. आज पर्यंत आपण जी कल्पकता लढविली आहे, आपल्या व्यापाराची घडी बसविण्यांत जें रचनाचातुर्य दाखविलें आहे, आणि जें संघ कर्तृत्व, आणि जी अपरिमित उद्योगशीलता दाखविली आहे, ती पेक्षां पुष्कळ अधीक इतउपर दाखविली पाहिजे. सर्व प्रकारचें तात्विक आणि व्यवहारिक धंदे-

शिक्षण आपणांस मिळाल्यावांचून एक पाऊल देखील पुढें टाकितां येणार नाहीं. हल्लीं जो अर्थशास्त्रविषय आपणांपुढें येऊन पडला आहे, त्या विषयाकडे देशांतील उत्तम बुद्धिवान, आणि शिकलेल्या गृहस्थांनीं आपलें लक्ष लाविलें पाहिजे. आमची मंडळी एवढें करितील काय? एवढें त्यांनीं केल्यास स्वतःची स्थिति सुधारण्याचें थोडें बहुत तरी आमच्या हातीं आहे असें ह्मणतां येईल.

# इंग्रजींत हिंदुस्थानच्या लोकांच्या सुखाची आशा.

( **लेखक**—रमेशचंद्र दत्त, सी. आय. ई. )

सर हेनरी फाउलर कॉमन्स सभेंत मि. पिकर्सगिल् यांनीं केलेल्या कांहीं टीकेवर उत्तर देतांना १८९८ सालीं जून महिन्यांत ह्मणाले "मी आपणास सांगून ठेवितों कीं, लॉर्ड क्लाइव्ह आणि वॉरन हेस्टिंग्स यांच्या ज्या कृत्यांवर या सभेंत वारंवार टीका झाली असती त्या कृत्यांची पार्लमेंटनें चौकशी करण्याचें मनावर घेतलें असतें तर आपणास कदाचित् हिंदुस्थानांत राज्य संपादन करितांच आलें नसतें." पार्लमेंटकडून होणारी चौकशी या शब्दांचा, सर हेनरी फाउलर यांनीं कोणत्या अर्थीं उपयोग केला असेल हें सहज समजण्यासारखें नाहीं. हिंदुस्थानच्या इतिहासाचें अवलोकन केलेली मंडळी त्या शद्बांचा जो अर्थ समजतात तो अर्थ घेऊन चाललें असतां, सर हेनरी फाउलर यांनीं जें सांगितलें त्याच्या उलट गोष्टच खरी आहे. हिंदुस्थानांत इंग्लंडचें राज्य जें आज मित्तीस टिकलें आहे तें, ईस्ट इंडिया कंपनीच्या नोकरांच्या कृत्यांची वेळोवेळीं चौकशी करण्यांत येत होती आणि अशी चौकशी आटोपल्यानंतर राज्यकारभारांतील दोष काढून टाकण्यांत आले आणि सुधारणा करण्यांत आली ह्मणूनच तें राज्य टिकलें आहे. 'हिंदुस्थानाचा राज्यकारभार' या नांवाचें एक पुस्तक सर कोर्टने इलबर्ट यांनीं लिहिलें आहे. त्याला जोडलेल्या सुरेख ऐतिहासिक प्रस्तावनेंत १७६० पासून

१८९८ पर्यंत दर २० वर्षांनीं कंपनीच्या राज्यकारभाराची पार्लमेंटकडून चौकशी होई. तीवर कंपनीची सनद नवी करून देण्याचें अवलंबून असे आणि याप्रमाणें २० वर्षांनीं नवीन कायदा करण्याचें काम पार्लमेंटकडे असे आणि तें त्याजकडून सबंद शतकांत एकदांच काय तें झालें नाहीं. कंपनीच्या राज्यकारभारांतील दोष या पार्लमेंटच्या चौकशींत निघून जात आणि त्यांतील व्यंगें दुरस्त होत. यामुळें इंग्रजलोकांस हिंदुस्थानांत आपलें राज्य स्थापन करण्यास पुष्कळच मदत झाली आहे.

"इंग्लंड आणि हिंदुस्थान १७८९–१८८९" या नांवाच्या सन १८९७ सालीं लिहिलेल्या पुस्तकांत मी असें लिहिलें होतें कीं, 'पूर्वींच्या नियत वार्षिक तपासणीचा फायदा हल्लीं आह्माला मिळत नसून हिंदुस्थानचा राज्यकारभार राणी सरकारानें खुद्द आपल्या हातीं घेतल्यापासून जरी पुष्कळ मोठमोठे फायदे झाले आहेत, तरी त्यापासून हा एक मोठा तोटा झाला आहे कीं, आपल्या राज्यकारभाराबद्दल हिंदुस्थानांतील अधिकारी कोणालाच जबाबदार नाहींत असें झालें आहे! वरील विधानासंबंधानें हिंदुस्थानांतील राज्यकारभारांत पुष्कळ नांवलौकिक मिळविलेल्या एका अमलदारानें 'एशियाटिक क्वार्टली रिव्ह्यू'च्या सन १८९८ ज्यानेवारी महिन्याच्या अंकांत अनुकूल टीका करून कित्येक चांगले विचार प्रदर्शित केले आहेत. ते येथें उतरून घेतों.

ह्या सर्व अव्यवस्थेचें मूळ मि. दत्त यांनीं आपल्या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत सांगितलें आहे तें असें कीं, 'हिंदुस्थानचा कारभार राणी सरकारनें खुद्द आपल्या हातीं घेतल्यापासून जरी पुष्कळ मोठेमोठे फायदे झाले आहेत, तरी त्यापासून

ह्याही एक मोठा तोटा झाला आहे कीं, आपल्या राज्यकारभाराबद्दल हिंदुस्थानांतील अधिकारी कोणालाच जबाबदार नाहीत असें झालें आहे' हिंदुस्थानचा राज्यकारभार ह्मणजे परोपकारी लोकांच्या स्वतंत्रतेचा एक नमुना आहे. हिंदुस्थानांतील रहिवाशांना मग ते देशी गृहस्थ असोत किंवा यूरोपियन असोत, अधिकारी असोत किंवा अनाधिकारी असोत—हिंदुस्थान सरकारच्या कृत्यांवर बिलकुल दाब ठेवितां येत नाहीं. सरकारचे लष्करी किंवा सनदी अधिकारी यांना ते वड्या कौन्सिलचे सभासद नसतील तर हिंदुस्थानच्या राज्यपद्धतींत फिरवाफिरव करतां येत नाहीं. आणि त्यांना ते विलायतेहून आले असले तरी या बाबतींत पांढरपेशा देशी लोकांच्या किंवा शेतकरी वर्गाच्याच —असें देखील ह्मणण्याला हरकत नाहीं—पंक्तीला बसावें लागतें. ब्रिटिश पार्लमेंटला मात्र हिंदुस्थानसरकारावर आपली हुकमत चालवितां येते. पण ग्रेटब्रिटन मधील मतदार लोक आपल्या लहरी प्रमाणें जसे * कॉन्सरव्हेटिव किंवा लिबरल सभासद निवडून पाठवितील तसें पार्लमेंट बनणार.

---

* इंग्लंडच्या राज्यकारभारांत दोन पक्ष आहेत. हे दोन पक्ष दुसऱ्या चार्लस राजाच्या वेळी प्रचारांत प्रथम आले. ह्या वेळेपासून सन १८३४–३६ पर्यंत त्या दोन्ही पक्षांस **व्हिग** व **टोरी** अशीं नांवें चालत होतीं. पुढें त्याचें रूपांतर **लिबरल** व **कान्सरव्हेटिव** यांत झालें. या दोन पक्षांत मतभेद आहे. लोकमत पाहून लोकांच्याच हिताकडे दृष्टि ठेवून एक पक्ष सदा असतो. आणि लोकहितासाठींच केवळ त्यांस राज्यव्यवस्थेंत फेर बदल व्हावा आणि तो फरक करावा असेंच वाटतें, त्या पक्षास व्हिग किंवा लिबरल हें नांव देतां येईल. लोककल्याणार्थ ह्या पक्षाचे लोक सदा खटपट करतात. पण टोरी

हिंदुस्थानाच्या राज्यकारभाराच्या निरनिराळ्या बाबींत बारकाईनें सुधारणा करण्याचें काम ग्रेटब्रिटन मधील कान्सरव्हेटिव किंवा लिबरलस् आपल्या हातीं कधीं तरी घेईल असें संभवतें काय? आणि असा संभव असला तरी राज्यकारभार संबंधीं बारीक सारीक गोष्टींत ब्रिटिश लोकांच्या मर्जीप्रमाणें हिंदुस्थान सरकारानें चालावें हें तरी इष्ट आहे काय? तसें झाल्यानें हल्लींची स्वैरवृत्ति हिंदुस्थानवासी लोकांची मानगुटी अधिक गच्च मात्र धरील. हल्लींच्या अधिकाऱ्यांनीं जर अधिक उदार हेतु मनांत बाळगिले, तर त्यांचा जुलूम हल्लींप्रमाणें विशेष भासणार देखील नाहीं.

'हिंदुस्थानच्या राज्यकारभारासंबंधानें पार्लमेंटनें केलेली नियतवार्षिक चौकशी मागें फायदेशीर झालेली आहे, आणि हल्लींही अवश्य आहे तथापि हिंदुस्थानच्या राज्यकारभारांत रोज उद्भवणाऱ्या भानगडींचा विचार करण्याचा अधिकार ग्रेटब्रिटन मधील मतदारांकडे न ठेवितां तो हिंदुस्थानच्याच लोकांकडे असावा' या मि. *वार्डच्या अभिप्रायासारखाच हिंदुस्थानच्या

---

किंवा कान्सरव्हेटिव पक्षाचे लोक जुन्याचे भक्त आहेत. त्यांस जुनें तेवढेंच प्रिय असतें. राज्यकारभारांत ते राजाचाच पक्ष बहुतांशीं घेत असतात. या दोन पक्षांपैकीं ज्या पक्षाची सरशी होते त्या पक्षाचें प्रधान मंडळ असावयाचें असा सर्वसाधारण नियम आहे. लार्ड जार्ज हामिल्टन, सर मंचरजी भावनगरी आदि मंडळी कान्सरव्हेटिव आहे. सर डब्ल्यु वेडरबर्न, दादाभाई नवरोजी वगैरे मंडळी लिबरल पक्षाची आहे. या दोन पक्षांस व्यवहारांत "नवा पक्ष व जुना पक्ष" किंवा "उदार आणि अनुदार" हीं नांवे देण्यापेक्षां लोकपक्षवादी व राजपक्षवादी असे ह्मणणें विशेष संयुक्तिक दिसेल असें वाटतें.

* मि. जी. ई. वार्ड वायव्यप्रांतांतील माजी कमिशनर.

राज्य कारभाराचा ज्यांना अनुभव आहे त्यांचा अभिप्राय पडेल. वेडपणानें आणि अनुदारपणानें राज्यकारभारांत लोकांना मुळींच झुगारून दिल्यामुळें राज्यकारभाराच्या कामांत त्यांना सविभागी करण्याचें सोडून दिल्यामुळें, त्यांना वायफळ आणि प्रतिकूल टीका करण्याला सवड मिळत आहे, आणि हेंच हिंदुस्थानांत दिसून येणारें अस्वास्थ्य आणि निरनिराळ्या वर्गांमधील द्वेषभाव उत्पन्न होण्याचें कारण होय. असें शांतपणें विचार केला असतां समजून येईल. आपली व्यवस्था ठेवण्यास अंशत: तरी जे लोक पात्र आहेत त्यांस देखील ती ठेवूं न दिल्यामुळें गेल्या एक दोन वर्षांत देखील हिंदुस्थान सरकारचें किती नुकसान झालें आहे तें त्यांच्या अलीकडील कित्येक कृत्यांचा विचार केला असतां दिसून येणार आहे.

इजिप्तच्या सरहद्दीवर झालेल्या लढाईच्या खर्चासाठीं इंग्लंडनें जवळ जवळ १० लाख पौंड इजिप्तला बहाल केले असतां हिंदुस्थानच्या सरहद्दीवर झालेल्या लढाईचा सगळा खर्च हिंदुस्थानच्या तिजोरीवर लादण्यांत आलेला आहे. हिंदुस्थानच्या विषयींची चांगली माहिती असलेल्या इंग्रज लोकांपैकीं फारच थोड्यांना सरकाराचा हा ठराव किंवा ज्या धोरणानें हा कारभार चालला आहे तें धोरण पसंत पडलें आहे. या बाबतींत अखेरचा निकाल करण्याचें काम हिंदुस्थानच्या लोकांवर सोंपविण्यांत आलें असतें किंवा निदान सरकारच्या विचारांना योग्य वळण लावण्यासाठीं लोकांना आपले अभिप्राय कायदेशीर रीतीनें वरिष्ठ सरकारापुढें ठेवितां आले असते तर, फायदा झाला असता कीं तोटा झाला असता? या मुद्यासंबंधानें हिंदुस्थानच्या लोकांनीं

कोणता अभिप्राय व्यक्त केला असता हें मि. वार्ड यानीं चांगल्या रीतीनें सांगितलें आहे. ते ह्मणतात, " आज मितीला हिंदुस्थान सरकारचें सरहद्दीवरील धोरण बरोबर आहे किंवा चुकीचें आहे, याबद्दलच जोरानें सर्व देशभर चर्चा चालली आहे असें नाहीं, तर तें धोरण कसें ठरविण्यांत आलें आणि त्याचा दोष कोणत्या पक्षाकडे आहे, याचीच जोरानें चर्चा चालली आहे. एक गोष्ट मात्र निर्विवाद आहे ती ही कीं, गेल्या १० वर्षांत देशांतील कर—आकारणी संबंधानें किंवा पैशाचा विनियोग करण्या संबंधानें हिंदुस्थानांतील लोकांस जर यत्किंचित देखील अधिकार असता तर सरहद्दीवर तटबंदी करण्याचे आपले बहुखर्चाचे बेत सरकारास बाजूस ठेवावे लागले असते, किंवा इंग्लंडाच्या खर्चानें ते पार पाडण्यासाठीं पार्लमेंटची मंजुरी मिळवावी लागली असती. हिंदुस्थानाची स्थिति पूर्वीं कधींही नव्हती इतकी यंदा(१८९८) चांगली असून त्याला इंग्लंडकडून पैशाची मदत न मिळाली तरी चालेल, अशी हिंदुस्थानवासीयांच्या प्रतिनिधींनीं स्टेट सेक्रेटरीस कधींही तार केली नसती. आणि इंग्लिश लोकांनींही इजिप्तच्या सरहद्दीवरील लढाईबद्दल त्या देशाला १० लाख पौंड देऊन व हिंदुस्थानच्या सरहद्दीवरील लढाईचा सर्व बोजा मात्र हिंदुस्थानावर लादून आपल्या पदरांत अन्याय बांधून घेतला नसता. हिंदुस्थानच्या राज्यकारभारांत लोकमताची पर्वा करण्यांत येऊन प्रजेकडे थोडासा अधिकार असता तर हिंदुस्थान सरकाराला निरुपयोगी लढाईची नीति तरी सोडून द्यावी लागली असती; किंवा सार्वभौम राज्यतंत्राखातर कराव्या लागलेल्या लढाईचा खर्च तरी ब्रिटिश खजिन्यांतून मागून

घ्यावा लागला असता. लॉर्ड एल्जिन किंवा सर जेम्स वेस्टलंड यांना हिंदुस्थानानें वकीलपत्र दिलेलें नव्हतें, आणि ते जें बोलले त्यांत शहणपणाही नव्हता.

सर्व लोकांचें ज्या विषयाकडे लक्ष लागलें आहे तिकडे आपण वळूं. हिंदुस्थानांतील चलनी नाण्यासंबंधानें काय करावें या विषयीं कित्येक सूचना लॉर्ड एल्जिन् आणि सर जेम्स वेस्टलंड यांनीं पाठविल्या असून त्या सूचनांचा विचार या देशांत एक कमिशन (मंडळ) बसून करीत आहे. मंडळाचा निकाल कोणत्या प्रकारचा होईल किंवा त्यांतील सभासदांची लायकी कोणत्या प्रकारची आहे याविषयीं आह्मी कांहींच लिहूं इच्छित नाहीं. आह्मांला जो मुद्दा पुढें आणावयाचा आहे तो हा कीं, लोकांच्या प्रतिनिधींचे किंवा त्यांच्या पुढाऱ्यांचे या बाबतींत अभिप्राय घेतल्या खेरीज हिंदुस्थान सरकारानें वास्तवीक पाहतां कोणत्याच सूचना करावयाच्या नव्हत्या. लोकांच्या विचाराप्रमाणें जर सरकारानें आपल्या सूचना तयार करून पाठविल्या असत्या तर त्या बिनचुक आणि शहाणपणाच्या होऊन त्यांनीं राज्यास दुजोरा आला असता एवढेंच दाखविण्याचा आमचा उद्देश आहे. जमाखर्चाची तोंडमिळवणी करणाऱ्या हिंदुस्थान सरकारचें किंवा पूर्वेकडील देशांशीं व्यापार करणाऱ्या व्यापारी लोकांचें हिंदुस्थानच्या चलनाच्या प्रकरणांत जें नफा नुकसान आहे, त्या पेक्षां खुद्द हिंदुस्थानांतील लोकांचेंच त्यांत अधिक नफा-नुकसान आहे. हिंदुस्थानांतील गरीब लोक आपल्या सगळ्या हयातींत जी कांहीं जोड करून ठेवतात ती सरकारी पेढीवर न ठेवतां चांदीच्या दागिन्यांच्या रूपानें आपल्या बायकांच्या

अंगावर घालितात. हिंदुस्थानांतील लक्षावधि मजुरांनीं आणि शेतकऱ्यांनीं पिढ्यानपिढ्या बाळगून ठेवलेल्या दागिन्यांची किंमत एकदम कमी करून टाकण्या सारख्या सूचना करण्या-पूर्वीं त्या गरीब लोकांचें ह्मणणें त्यांच्या मुखत्यारांकडून हिंदुस्थान सरकारानें ऐकून घेतलें पाहिजे. हिंदुस्थानांत चोहोंकडे शेतकरी लोक सावकारांच्या कर्जांत बुडालेले आहेत. आणि रुपयांची किंमत कृत्रिम उपायांनीं वाढवून त्यांच्या कर्जाचा बोजा वाढविण्यासारख्या सूचना अमलांत आणण्या-पूर्वीं त्या लोकांचें ह्मणणें त्यांच्या मुखत्यारांच्या मार्फत सरका-रानें ऐकून घेतलें पाहिजे. सर्व राष्ट्राच्या संपत्तीची किंमत एकदम कमी करून टाकून त्याच्या कर्जाचा बोजा वाढविण्या-सारख्या सूचना थोड्याशा सरकारी अधिकाऱ्यांनीं पुढें आणाव्या आणि त्यांत त्यांना कांहीं गैर वाटूं नये अशी हिंदुस्थानच्या राज्यकारभारांतील स्थिति आहे. या सूचना करणारी अधिकारी मंडळी कितीही अनुभवी आणि हुषार असली तरी त्यांजकडून नाण्याच्या किंमतींत बदल करण्या-सारख्या सूचना पुढें येतात हा या राज्यपद्धतींतलाच एक दोष आहे. हिंदुस्थान सरकारानें योजिलेल्या उपायांवरून जणुंकाय असें दिसतें कीं, हिंदुस्थानदेश, हिंदुस्थानसरकार आणि परकीय व्यापारी यांच्या सोईकरितां मात्र आहे; व हिंदुस्थानां-तील लोकांच्या नफा नुकसानीची विशेष पर्वा करण्याची, किंवा लोकांच्या पुढाऱ्यांचे अभिप्राय काय आहेत तें पाहण्या-ची गरजच नाहीं. एकाच पक्षाचा पुरावा घेऊन न्यायाधिशानें जर निवाडा केला तर जगांतील सर्व न्यायाधीशांत तो अत्यंत निःपक्षपाती ह्मणून विख्यात असला तरी त्यानें दिलेला

न्याय चुकीचा आणि गैरकायदा आहे असें ह्मणण्यास हरकत नाहीं. त्याचप्रमाणें आपल्या राज्यकारभारावर थोडासा देखील दाब लोकांच्या हातीं न ठेवणारें सरकार कितीही उत्तम आणि प्रामाणीक असलें तरी तें प्रजेशीं अप्पलपोटे-पणाचें, निष्ठुर आणि अन्यायाचें वर्तन करून अखेर बऱ्या लोकांच्या हितार्थ एकंदर लोकहिताचा विघात करितें.

हल्लीं ज्याकडे बरेंच लक्ष लागलें आहे असा आणखी एक विषय घेऊं या. सरकारी तिजोरींतून पैसे खर्चून किंवा सरकाराकडून व्याजाची हमी देववून हिंदुस्थानांत नवे नवे आगगाडीचे रस्ते बांधणें योग्य आहे किंवा नाहीं या विषयाची नेहमीं चर्चा चाललेली असते. हिंदुस्थान सरकार स्टेट सेक्रेटरीपुढें जी माहिती सादर करील तीवरून तेथें प्रत्येक बाब-तींत निर्णय होतो अशी हल्लींची पद्धति आहे, ती सोडून देऊन ज्या लोकांचा पैसा खर्च होतो त्यांच्या मुखत्यारांचें मत या कामीं घेतलें तर बावगें काय होईल? हिंदुस्थानांतील सामान्य लोकमत असें आहे कीं, लष्कराची ने आण कर-ण्याकरितां किंवा दुष्काळांत रयतेचें संरक्षण करण्याकरितां आगगाडीचे मोठमोठे रस्ते बांधणें अत्यंत अवश्य होते ते बांधून झालेले आहेत. सबब जास्त रस्ते बांधण्यासाठीं सर-कारानें प्रजेच्या पैशांचा साक्षात् किंवा परंपरेनें विनियोग करू नये. आगगाडीच्या ज्या नवीन सडका प्रति वर्षी बांधण्यांत येत आहेत त्या बांधण्या इतकी श्रीमंती हिंदुस्थानाजवळ नाहीं, आणि लोकांना ज्या सडकांची तादृश जरूरी नाहीं, आणि ज्या बांधण्याला पुरेसा खजिन्यांत पैसा नाहीं, त्या बांधून देशावरील कर्जाचा बोजा सालोसाल वाढविणें हें वेडेपणाचें

आणि अपायकारक आहे अशी लोकांची समजूत आहे. त्यांना आणखी असेंही वाटतें कीं, मोठमोठे भांडवलवाले आणि कारखानदार आपआपल्या फायद्यासाठीं नवीन नवीन सडका बांधण्यास सरकारास भाग पाडतात, आणि प्रामाणिकपणानें आणि निःपक्षपातानें राज्यकारभार चालविण्याची सरकारची जरी इच्छा आहे तरी वजनदार आणि धनिक लोकांच्या अभिप्रायाविरुद्ध आपला अभिप्राय दाखल करून त्या प्रमाणें सरकाराला वागावयास लावण्याला प्रजेच्या हातीं कांहींच अधिकार नसल्यामुळें सरकार लोकहिताचा चुराडा उडवीत आहे. बंगालचे माजी लेफ्टनंट गव्हर्नर सर जॉर्ज कॅम्बेल यांनीं एके प्रसगीं बोलून दाखविल्याप्रमाणें लोकांची आणखी अशीहिं समजूत आहे कीं, हिंदुस्थानांतील एखाद्या बुडीत धंद्यांत भांडवल गुंतवून इंग्रज व्यापारी फसले ह्मणजे लंडन येथील लोक हिंदुस्थान सरकारास शिव्या देऊं लागतात, आणि जबरदस्तीनें ते धंदे आपल्या हातीं घेण्यास हिंदुस्थान सरकारास भाग पाडितात. ह्या समजुतींत सत्याचा कांहीं अंश असेल किंवा नसेल; आपला विचार घेतल्यावांचून, आपला पैसा हिंदुस्थानांत नवीन आगगाडीच्या सडका बांधण्याकडे किंवा ब्रह्म देशांतून चीन देशापर्यंत रस्ता बांधण्यांत येऊं नये असें जें लोकाचें मागणें आहे तें न्याय्य आणि सयुक्तिक आहे. इंग्लंडांत लागेल तितका पैसा कर्ज काढून हिंदुस्थानांत किंवा हिंदुस्थानाबाहेर आगगाडीचे रस्ते वाढविण्यांत हिंदुस्थान सरकारचा उधळेपणा आणि अन्यायाचें वर्तन दिसून येतें.

आह्मी केलेल्या टीकेच्या समर्थनार्थ दुसरें एखादें उदाहरण हवें असल्यास हिंदुस्थानांतील आयात जकातीचा इतिहास

पाहिला ह्मणजे पुरे. हिंदुस्थानांतील अनेक इंग्रज अधिकाऱ्यांस आठवत असेलच कीं, हिंदुस्थान सरकारानें आणि विलायत सरकारानें लँकेशायरमधील कारखानदारांच्या मर्जीप्रमाणें त्यांना भरपूर सवलती देऊन हिंदुस्थानच्या तिजोरींत तूट आणिली आहे. अशा मागण्या नाकारण्याच्या कामीं हिंदुस्थान सरकाराला दुजोरा देण्याचा अधिकार कायद्यानें हिंदुस्थानच्या रयतेस दिलेला नाहीं. ह्मणूनच असे प्रकार होतात. पण एवढ्यानेंच झालें नाहीं. १८९८ सालीं आगष्ट महिन्यांत स्टेट सेक्रेटरी यांस अशी विनंती करण्यांत आली होती कीं, विलायतच्या मालावरील जकात आणखी कमी करून, कानड्यामध्यें इतर देशांच्या मालावरील जकातीच्या पावपट जकात ब्रिटिश मालावर ज्याप्रमाणें घेण्यांत येते त्याप्रमाणेंच हिंदुस्थानांतील जकातीचें प्रमाण ठेवावें; लॉर्ड जॉर्ज हॅमिल्टन यांनीं त्यावेळीं तसें करण्याचें नांकारिलें; पण लँकशायर वाले जर तसेच चिकाटी धरून बसते तर त्यांचा उद्देश सिद्धीस गेला असता. लँकॅशायरचे हातीं पार्लमेंटांतील ९।९० मतें असल्यामुळें लिबरल किंवा कॉन्सरव्हेटिव्ह पक्ष कितीही बलवान असला तरी त्याला त्याची मागणी फार दिवस नाकारतां येत नाहीं. आपल्या सरकारच्या वतीनें उभें राहून बोलण्याचा, आणि आपल्या देशाची जमाबंदी आणि इतर हितसंबंध यांत कोणी गडबड करूं लागला असतां त्यास तसें करूं न देण्याचा हक्क हिंदुस्थानवासी लोकांस कायद्यानें जोंपर्यंत मिळणार नाहीं, तोंपर्यंत विलायतेंतील मतदारांच्या मर्जीनुसार, हिंदुस्थानांतील लोकांच्या हिताच्या गोष्टीस हिंदुस्थान सरकारास वरचेवर खो आणावा लागेल.

हे विषय सोडून देऊन दक्षिण हिंदुस्थानांतील शेतकरी वर्गाची स्थिति सुधारण्याच्या विषयाकडे कायदे करणाराचें लक्ष लागलें आहे त्याकडे आपण वळूं या. जमीन महसुला इतका दुसरा कोणताच प्रश्न हिंदुस्थानच्या लोकांच्या दृष्टीनें महत्वाचा नाहीं. आणि धारेबंदीच्या संबंधानें आपले अभिप्राय प्रकट करून त्याप्रमाणें अंमल करावयास लावण्याचा अधिकार प्रजेच्या प्रतिनिधींना जोंपर्यंत मिळालेला नाहीं तोंपर्यंत या प्रश्नाचा समाधानकारक निकाल व्हावयाचा नाहीं. युरोपिन अधिकाऱ्यांनीं आपलें सगळें आयुष्य रिपोर्ट लिहिण्यांत घालविलें तरी एखाद्या हुषार जमीनदाराला किंवा सार्वजनिक कामांत पडणाऱ्या एतद्देशीय गृहस्थाला या विषयाची जितकी चांगली माहिती असते तितकी त्याला असत नाहीं. गोदावरी-जिल्हा सभेची जी हकीकत प्रसिद्ध झाली आहे तीवरून मद्रास इलाख्यांतील हल्लींच्या प्रतिनिधींना आपल्या इलाख्यांतील धारेबंदी कोणत्या तत्वावर ठरविण्यांत यावी हें फार उत्तम रीतीनें कळत आहेतसें दिसतें. जिल्हा-सभेच्या अध्यक्षांनीं मद्रासेकडील शेतकऱ्याच्या स्थितींत कसकसा फेर पडत गेला. त्यांचें जें ऐतिहासिकदृष्ट्या निरूपण केलें आहे त्यावरून बऱ्याच नव्या गोष्टी दिसून येतात. ४० वर्षांमागें सरकारनें असें ठरविलें होतें कीं, 'रयतवारीप्रमाणें प्रत्येक नोंदलेला खातेदार आपल्या जमीनीचा मालक आहे हें सरकारास कबूल आहे. त्यानें आपला सारा खुद्द सरकाराकडेच भरावा. आणि जोंपर्यंत त्याजकडून **मुक्रर झालेली साऱ्याची रक्कम** वसूल होत आहे, तोंपर्यंत त्याला त्या जमीनींतून काढून टाकण्याचा हक्क सरकारास नाहीं. (मद्रास इलाख्याच्या राज्यकारभारचा रिपोर्ट १८९५–९६.)

सन १८९७ सालीं मद्रास बोर्ड ऑफ रेव्हेन्यूनें सरकाराकडे पाठविलेल्या रिपोर्टांत असें लिहिलें होतें कीं, खातेदार आपले कौलकरार जोंपर्यंत बिनबोभाट पाळीत आहेत, **तोंपर्यंत त्या जमीनीवरील धारा न वाढवितां, ती यावच्चंद्र दिवाकरौ त्याच्या ताब्यांत रहावी.** या रिपोर्टाचें पर्यालोचन करितांना सरकारानें असें लिहिलें होतें कीं, कुळांकडे जमीनीच्या मालकीचा पूर्ण हक्क आहे, आणि आपल्या जमीनीवरील **नियतकर** जोंपर्यंत त्याजकडून भरण्यांत येत आहे तोंपर्यंत त्याची जमीन कोणालाही काढून घेतां येणार नाहीं. वरील वाक्यांतील मुद्याचे शब्द आम्ही जाड अक्षरांनीं छापिले आहेत. ४० वर्षांपूर्वी मद्रासेकडील धारेबंदी कायम मानली जात होती व तींत वाढ करावयाची नाहीं असें ठरलेलें होतें ही गोष्ट वाचकांनीं नीट लक्षांत ठेवावी.

लॉर्ड लॉरेन्स, लॉर्ड मेयो, लॉर्ड नॉर्थब्रुक् यांनीं अफगाणिस्थानच्या पहाडांत 'शास्त्रीय सरहद्द' शोधून काढण्याच्या भरीस न पडतां लोकस्थिति सुधारण्याच्या विषयांकडे विशेष लक्ष दिलें होतें. अखेरीस लॉर्ड रिपन साहेबांच्या कारकीर्दींत या विषयाला कायमचें स्वरूप येऊन, कायम धारेपद्धतींत किंचित फेरफार केलेली एक नवी पद्धत मंजूर करण्यांत आली. धारेबंदीच्या नियमांचें पुस्तक, सरकारच्या स्टँडिंग ऑरडर्स, आणि ॲग्रिकल्चरल कमिटीच्या रिपोर्टावरील सरकारचा ठराव, यांत असें प्रसिद्ध करण्यांत आलें कीं, **जमीनीची प्रतबंदी आणि पिकांची पहाणी यांच्या अंदाजानें** जेथील जमीनीवर योग्य सारा आकारलेला असेल **तेथील धारेबंदींत फेरफार करावयाचा नाहीं. आणि आहे ती पद्धति**

**कायम आहे** असें समजावें. पुढें कधीं फेरपहाणी करावयाची झाली तर **धान्याचा भाव वाढला असल्यास तेवढ्या एकाच गोष्टीचा विचार करण्यांत यावा.** आतां मद्रास सरकारची हल्लींची पद्धति कशी आहे याबद्दल चौकशीकरितां असें कळतें कीं, **धान्याचा भाव कमजास्त झाल्यामुळें किंवा पुनः प्रतबंदी करण्यास कांहीं कारण झालें असल्यामुळें किंवा जमीनीच्या उत्पन्नाचा अंदाज पुनः पाहून** सारा कमिजास्त करण्याचा अधिकार आपणाला आहे, असें सरकार ह्मणूं लागलें आहे.

मद्रास इलाख्यांतील धारेबंदी विषयीं स्वानुभवावरून मिळालेली किंवा मुद्दाम मिळविलेली अशी आह्मांला कांहींच माहिती नाहीं. गोदावरी-जिल्हा-सभेच्या हकीकती मधून आह्मीं वरील माहिती घेतली आहे. आणि त्याच्या संबंधानें आह्मांला कांहीं तरी जास्त माहिती मिळावी अशी आमची इच्छा आहे. सन १८९७ सालीं नोंदलेल्या प्रत्येक खातेदाराला त्याच्या जमीनीवरील सारा वाढविण्यांत यावयाचा नसून ती त्याजकडे तशीच आचंद्रार्क चालावयाची असें त्याला आश्वासन देण्यांत आलें होतें काय? सन १८८० पासून १८८४ पर्यंत लॉर्ड रिपन यांच्या कारकिर्दीत रास्त सारा आकारलेल्या जिल्ह्यांतील रयतेस लोकांस जमीनीची प्रतबंदी आणि पिकांची पहाणी यांच्या धोरणानें तुमच्या जमीनीवरील सारा वाढविण्यांत यावयाचा नाहीं असें आश्वासन देण्यांत आलें होतें काय? आणि हल्लीं प्रत्येक धारेबंदीच्या वेळीं जमीनीची प्रतबंदी, पिकाचा अंदाज आणि धान्याचा भाव, यांच्या धोरणानें सारा कमजास्त करण्याचा अधिकार मद्रास सरकारानें आपल्या हातीं घेतला आहे काय?

बंगाल्यांतील बहुतेक जमीनी जमीनदारांच्या खाजगत मिळकती झाल्या असून शेतकऱ्याची स्थिति एकेका कायद्यानें सुधारली आहे. लॉर्ड कॅनिंग यांनीं सन १८५९ त पसार केलेला कायदा हा शेतकऱ्यांचा होय. त्यांत दुरुस्ती होऊन सन १८६८ चा बंगाल सरकारचा कायदा झाला. आणि त्यावर पुनः दुरुस्ती होऊन रयतेचे हक्क कायम करून आणि वाढवून लॉर्ड रिपन यांनीं टेनन्सी बिलाचा मसुदा करून ठेविला, आणि तो लॉर्ड डफरिन यांनीं १८८५ त पास केला. या ३ कायद्यांच्या योगानें थोडेसे दाट वस्तीचे जिल्हे खेरीज करून इतर रयतेची स्थिति भरभराटीची आहे; ती चांगली समजूतदार आणि पुढची तरतूद करून ठेवणारी आहे; सारा वाढण्याचें भय तिच्या मागें नाहीं, आणि तिला आपल्या हक्काची माहिती असून त्यांचें संरक्षण तिला करितां येतें. एखादे वर्षी पिकें चांगलीं आली नाहींत तरी आपला गुजारा करण्यापुरती तिची शिल्लक असते; इतकेंच नाहीं तर दुष्काळ निवारण्या पुरते देखील सामर्थ्य तिजमध्यें असतें. मद्रासेकडील रयतेला हिंदुस्थानसरकार जमीनदाराच्या जागीं आहे. तेव्हां त्या रयतेचे हक्क आणि तिची सांपत्तिक स्थिति तशीच सुधारली आहे किंवा जमीनदाररूपी सरकारानेंच तिचे हक्क आणि तिचीं निर्वाहाचीं साधनें गिळंकृत करण्याचा क्रम गेल्या ४० वर्षांत आरंभिलेला आहे कीं काय, हें पाहिलें पाहिजे.

मद्रासेकडील लोकांची अशी समजूत आहे कीं, जमीनदार या नात्यानें रयतेशीं सरळ वर्तन न ठेवतां तिला पूर्वी मिळालेल्या कायम धारेबंदीच्या हक्कावर सरकारानें गदा आणिली आहे. नामदार मि. सुब्राव यांनीं मद्रास कायदेकौन्सि-

ळांत असें बोलून दाखविलें कीं, स्टेट सेक्रेटरीच्या हुकुमांचा भलताच अर्थ घेऊन स्थानिक सरकारानें आपलीं पूर्वींची आश्वासनें गुंडाळून ठेवून कुधारणेचा मार्ग स्वीकारिला आहे, आणि मद्रासेकडील रयतवारीपद्धति नाहींशी करून टाकण्याचा घाट घातला आहे. लॉर्ड रिपन यांच्या अमदानींत दिलेल्या वचनाचा भंग करून जमीनींची हल्लीं प्रतबंदी करण्यांत येत, आणि धान्यांच्या भावांतील फेरफेरांशिवाय इतर सबबी पुढें करून सारे वाढविण्यांत येतात.

ना. मि. सुबराव आणि गोदावरी-जिल्हासभेचे अध्यक्ष यांनीं दिलेली माहिती सर्वस्वी बरोबर नसेल; पण या प्रश्नांसबंधानें लोकमत कोणत्या प्रकारचें आहे हें त्यांनीं प्रामाणिकपणानें आणि फार सुरेख रीतीनें सरकारच्या नजरेस आणून दिलें आहे. आपल्या अंमल बजावणीच्या कामावर अशा मनुष्यांच्या अभिप्रायांचा कांहीं एक परिणाम होऊं नये असें सरकारानें करून टाकल्यामुळें सुराज्यव्यवस्थेच्या कामीं त्या योगें बिलकुल मदत होत नसून उलट अडचणी मात्र येत आहेत. हिंदुस्थानांतील लोकांचे जे विचारी, बुद्धिमान, आणि राजनिष्ठ पुढारी आहेत, त्यांना ज्याचें प्रतिनिधी होतां येईल असा हिंदुस्थानांत एक पक्ष आहे, त्यांना अवश्य मिळाले पाहिजेत असे हक्क आहेत, आणि त्यांचे हितसंबंध कांहीं तरी निराळे आहेत, आणि देशाच्या राज्यकारभाराची व्यवस्था लावण्यापैकींच एक जें अंमल बजावणीचें काम त्यांचा वांटा त्यांना नाकारून सरकारास कोणताही फायदा होणार नाहीं.

लोकांच्या नजरेस न येण्यासारख्या ठिकाणीं इंडिया आफिसांत किंवा हिंदुस्थानांतील कौन्सिलांत बसून जे गृहस्थ या गोष्टींचा निकाल लावतात ते दोन्ही बाजूंचा नीट विचार करणारे, न्यायी, माहितगार आणि हुषार असतात यांत शंका नाहीं. पण निरनिराळ्या विषयांसंबंधीं प्रजेची बाजू त्यांच्या नजरेस विशेष न येतां सरकारी अधिकाऱ्यांची बाजूच त्यांच्या पुढें विशेष जोरानें मांडण्यांत येते असें ह्मटल्यास त्या अधिकाऱ्यांस आह्मीं दूषण लावितों असें समजूं नये. हिंदुस्थानांतील लोकांच्या वतीनें एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलांत जरी कोणी नाहीं तरी त्यांचे कांहीं तरी निश्चित हक्क आहेतच. आणि त्यांचा जेव्हां एकान्तस्थळीं विचार करण्यांत येतो तेव्हां तेथें त्यांच्या वतीनें कोणीच हजर नसतो, त्यांच्या तर्फेनें कोणी बोलत नाहीं, त्यांचें कोणी महत्व दाखवीत नाहीं, किंवा त्यांचें संरक्षण करण्यास कोणी झटत नाहीं; यामुळें हिंदुस्थानच्या राज्यकारभारांत होणाऱ्या चुकांपैकीं निम्मे चुका होत असतात. स्थानिक आणि वड्या एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलांतील सभासदांपासून तों इंडिया कौन्सिलांतील सभासदांपर्यंत सर्व मोठ्या दर्जाचे अंमलदार अत्यंत हुषार, दक्ष आणि न्यायप्रिय असतात; तरी देखील कोणत्याही गोष्टीचा जेथें अखेर निकाल व्हावयाचा तेथें रयतेचे प्रतिनिधी नसल्यामुळें त्या गोष्टीचा जसा व्हावा तसा सर्व बाजूंनीं विचार होत नाहीं आणि होणें संभवनीयही नाहीं, हें अगदीं खरें आहे. 'दुसऱ्याच्या हितार्थ जपण्याचा विचार आपल्या मनांत किती कळवळ्यानें आला असला तरी त्यासाठीं दुसऱ्यांचे हात बांधून ठेवणें कधींही बिनधोक किंवा फायद्याचें होणार नाहीं, असा मानवी

व्यवहाराचा सिद्धान्त आहे' हें जॉन स्टुअर्ट मिलचें ह्मणणें अगदीं यथार्थ आहे.

एतावता हिंदुस्थानचा राज्यकारभार प्रजेस सुखप्रद होण्याकरितां कांहीं तरी अवश्य केलें पाहिजे हें उघड आहे. हिंदुस्थानसंबंधीं विषयांचा अखेरचा निर्णय करण्याचें काम हिंदुस्थानवासी लोकांच्याच हातीं दिलें पाहिजे असें नाहीं. हिंदुस्थानसंबंधीं महत्वाच्या गोष्टींचा निकाल करणारीं जीं एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलें इंग्लंडांत आणि हिंदुस्थानांत आहेत, त्यांत लोकमताचें थोडें तरी निदर्शन होण्याची तजवीज झाली ह्मणजे पुरे आहे. मद्रास येथील एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलांत ना. मि. मुदलीयार आणि ना. मि. सुबराव यांसारखे; मुंबईच्या एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलांत ना. मि. मेहेता यांसारखे, आणि बंगाल सरकारच्या एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलांत दरभंगाच्या महाराजांसारखे लोक असल्यानें राज्यकारभारांत सुधारणा होऊन त्याला बळकटीच येईल. तसेंच हिंदुस्थानांतील प्रत्येक प्रांताच्या वतीनें व्हाइसरॉयांच्या आणि स्टेट सेक्रेटरींच्या एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलांत एकेक सभासद निवडून गेल्यास हिंदुस्थानच्या राज्यकारभारांत सुधारणाच होईल. व्हाइसरॉय आणि स्टेट सेक्रेटरी यांचे मंत्रीमंडळासाठीं पांच सभासद निवडून पाठविण्याचा हिंदुस्थानांतील पांच मुख्य इलाख्यांस अधिकार असावा अशी इच्छा लोकांनीं केल्यास ती गैर नाहीं.

एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलाच्या सुधारणे बरोबरच कायदे-कौन्सिलांतही सुधारणा होणें अवश्य आहे. हिंदुस्थानांतील एकेका मोठ्या इलाख्याचे २०–४० जिल्हे केलेले असतात व यांपैकीं प्रत्येक जिल्ह्याला प्रांतिक कायदे कौन्सिलांत एक

मुकत्यार निवडून पाठविण्याचा हक्क लोकांनीं मागितल्यास तें मागणें गैर होणार नाहीं. सरकारी किंवा सरकारानें नेमलेल्या सभासदांची संख्याही पाहिजे असल्यास वाढविण्यास हरकत नाहीं. याप्रमाणें कौन्सिलांची रचना झाली ह्मणजे त्यांनीं आठवड्यांतून ३ किंवा ४ दिवस एकत्र जमून कायदेकानू आणि राज्यव्यवस्था यांची वाटाघाट करावी आणि प्रजेच्या इच्छा आणि तिचे अभिप्राय विस्तारानें आणि योग्य रीतीनें कौन्सिलापुढें मांडण्यांत यावे. सर्व कौन्सिलें याप्रमाणें लोकमत दर्शक झालीं ह्मणजे हिंदुस्थानचे राज्यकर्ते, लोकांशीं खरोखर सलोख्यानें वागत आहेत असें दिसून येईल. ब्रिटिश लोकांचें राज्य हिंदुस्थानांत लोकप्रिय होऊन त्यास बळकटीही येईल.

निरनिराळे पक्ष निरनिराळ्या दिशांनीं ओढूं लागल्यामुळें हिंदुस्थानांतील राज्यकारभारांचें काम दिवसेंदिवस अधिकाधिक घोंटाळ्याचें आणि बिकट होऊं लागलें आहे. अशावेळीं देशांतील प्रजेच्या प्रतिनिधींचें ऐक्य हें बहुमोल आहे. सर्व प्रसंगीं आणि विशेषतः संकटाच्या आणि भीतीच्या वेळीं राज्यकारभाराच्या कामीं राज्यकर्त्यांस मदत करण्याकरितां प्रजेच्या तर्फेची कांहीं कांहीं निवडक मंडळी असली तर बंगाल, वायव्यप्रांत, मद्रास, मुंबई, पंजाब, येथील मुख्य अधिकाऱ्यांस फार फायदा होणार आहे. व्हाइसरॉय आणि स्टेट सेक्रटरी यांच्या मंत्रीमंडळांत लोकांच्या वतीचे मनुष्य असून परस्परांत रोज प्रत्यक्ष दळणवळण असलें ह्मणजे लोकांचे विचार, इच्छा, आणि हितसंबंध त्यांना अधिकाधिक चांगला समजूं लागेल. दुर्दैवानें हल्लीं राज्यकर्ते आणि प्रजाजन यांमध्यें परस्परांविषयीं सहानुभूति नाहीं, ती अनायासेंच उत्पन्न होईल. कौन्सिलापुढें येणाऱ्या विषयांचा

विचार होतांना हल्लीं विशिष्ट वर्गाच्या हिताचा मात्र विचार करण्यांत येत असतो. त्या ऐवजीं नवीन व्यवस्थेनें समुदायाच्या हिताचा विचार नीट रीतीनें आणि कळकळीनें करण्यांत येईल. आणखी सभासदांस स्थानिक गोष्टींची माहिती आणि अनुभव असल्यानें कौन्सिलांस बळकटी येईल आणि कांहीं अंशीं लोकांच्या इच्छेचा उदारमनानें विचार होईल. ७० वर्षां पूर्वीं मनरो, एल्फिन्स्टन, माल्कम आणि बेन्टिक यांच्या अमदानींत फार थोडा दिसून येणारा ब्रिटिश राज्यव्यवस्थेंतील एक अत्यंत वाईट दोष हल्लीं विशेष दृष्टोत्पत्तीस येऊं लागला आहे. तो दोष हाच कीं, राज्यकर्ते आणि प्रजाजन यांच्यांत परस्पर दळणवळण मुळींच नाहीं. हा दोषही या व्यवस्थेनें नाहींसा होईल. हिंदुस्थानांतील लोकांना आपलें हित कळत नाहीं आणि आपलें कल्याण करून घेतां येत नाहीं. केवळ, दुभत्यासाठीं किंवा लोकर काढून घेण्यासाठीं जशीं जनावरें बाळगावयाचीं तसेंच त्यांना बाळगावयाचें अशी जी हल्लींच्या राज्यपद्धतींत समजूत आहे, ती नाहींशी होऊन हिंदुस्थानांतील असंख्य सुधारलेल्या आणि राजनिष्ट प्रजेस शोभण्यासारखी कुशल आणि न्यायी राज्यव्यवस्था नव्या पद्धतीनें सुरू होईल.

गेल्या दोन तीन वर्षांत इंग्रजी कारभाऱ्यांचें लक्ष हिंदुस्थानांतील राजद्रोहाकडे आणि अस्वस्थतेकडे वेधलें आहे. ब्रिटिश बादशाहीच्या इतर भागांत लोकांवर विश्वास टाकून आणि राज्यकारभारांतील कांहीं विशेष कामें त्यांजकडे सोंपवून राजद्रोहाला तेथून जसें नाहींसें करण्यांत आलें आहे त्याप्रमाणेंच हिंदुस्थानांतून देखील या बागुलबोवाला घालवून देतां येईल ही गोष्ट इंग्रज मुत्सद्दी अजून तरी कबूल करतील काय?

# हिंदुस्थान आणि चलनी नाणें.

## ( लेखक, मि. दादाभाई नवरोजी ).

इतर बाबी कायम असतां केवळ हुंडणावळीच्या चढ उतारापासून निरनिराळ्या देशांतील व्यापारास अडचणी येत नसून हुंडणावळीच्या मागणी-प्रमाणें तो आपोआप कमी जास्त होत असतो, हें व्यापारतत्व सिद्ध करण्यासाठीं लंडन टाइम्स आणि डेलीन्यूज पत्रांत मीं कांहीं पत्रें १८८६ मध्यें प्रसिद्ध करविलीं होतीं. आणि त्यांत हिंदुस्थानच्या व्यापाराची घडामोड कशी होते याचें विस्तृत विवरण केलें होतें. हीं पत्रें परिशिष्ट अमध्यें दाखल केलीं आहेत.

टांकसाळी बंद करून, किंवा सोन्याचें नाणें सुरू करून हिंदुस्थानास इंग्लंडाला 'विलायतखातीं' खर्चाबद्दल जी रक्कम द्यावी लागते, तींत एक पैही कमी होणार नाहीं, आणि होणें संभवनीय नाहीं. याचें कारण उघडच आहे. विलायत खातीं खर्चाची रक्कम दोन कोटी पौंड आहे असें आपण स्थूलमानानें धरूं. हें देणें भागविण्याकरितां हिंदुस्थानांतील लोकांना २ कोट पौंड उभे राहील, इतकें धान्य इंग्लंडांत पाठवावें लागतें. त्यांत एक छटांक कमी होतां उपयोगाचा नाहीं. मग रुपयाची किंवा हिंदुस्थानांतील चलनी नाण्याची (मग तें नाणें सोन्याचें असो किंवा चांदीचें असो) किंमत कांहीं असो. इंग्लंडाला २ कोट पौंड मिळाले पाहिजेत; मग तुह्मी तितकीं सोन्याचीं नाणीं मोजून द्या किंवा तितक्या किंमतीचें धान्य द्या. हिंदुस्थानांतील कर भरणारांवरील हा बोजा कमी होण्याला उपा-

य ह्मटला ह्मणजे हिंदुस्थानांतील धान्याची इंग्लंडांत पूर्वीपेक्षां अधिक किंमत येणें एवढाच एक होय. हिंदुस्थानांतील चलनी नाण्यासंबंधानें गारोड्याप्रमाणें हात चलाखी करून तो बोजा कमी होणार नाहीं. हिंदुस्थान सरकारानें ता. ९ नोव्हेंबर १८७८ रोजीं सिमल्याहून स्टेट सेक्रटरी यांस पाठविलेल्या खलित्यांत ही गोष्ट स्पष्टपणें नमूद केली होती. हिंदुस्थान सरकारानें ह्मटलें आहे कीं, खंडणीवजा जाणारी ही रक्कम जोंपर्यंत कायम आहे तोंपर्यंत तिच्या बदला घ्यावयाचा माल कमी होणार नाहीं हें उघड आहे. ज्या देशांत माल पाठवावयाचा तेथें त्याची किंमत अधिक येऊं लागल्यानें मात्र त्यांत फरक होईल.

सोन्याच्या किंमतीच्या मानानें पाहतां हल्लीं रुपयाची खरी किंमत ११ पेन्स आहे. टांकसाळी बंद करून रुपयाची किंमत कृत्रिम उपायांनीं वाढवून १६ पेन्स केल्यानें हिंदुस्थानांतील सरसकट कर भरणारांवर शेंकडा ४९ टक्के कर जास्त आकारण्यांत येऊन त्यांजवर गुप्त रीतीनें जुलूम करण्यांत येत आहे. त्याच प्रमाणें सरकार आपल्या कामगारांस किंवा इतरांस पगाराच्या किंवा अन्यरूपानें जो पैसा देत आहे त्याचीही किंमत त्याच प्रमाणानें वाढली आहे. त्याचप्रमाणें धनकोचा फायदा होऊन ऋणकोला तितकी जास्त रक्कम द्यावी लागणार आहे. धनको मंडळी चांगली खाऊन पिऊन सुखी असून ऋणकोच्या वर्गांत गरीब लोक विशेषतः शेतकरी लोक आहेत, यामुळें त्यांवरही जुलूम होणार आहे.

टांकसाळी बंद केल्यामुळें कसकसे परिणाम झाले आहेत त्याचा विचार स्वतंत्रपणें केला पाहिजे. त्यांत इतर गोष्टींची मिसळ

होऊन उपयोग नाहीं. १ ली गोष्ट अशी कीं, टांकसाळ बंद करणें हें गैरकायदा आणि जुलमाचें आहे. सरकार आणि कर भरणारे लोक यांच्यामध्यें देशांत अमुक एक निश्चित किंमतीचें नाणें चालू असावें, असा करार असून त्या करारावर करासंबंधीं सर्व कायदे अवलंबून असतात. इंग्लंडांत आणि हिंदुस्थानांत अशा प्रकारचा कोणता करार आहे, असा कोणी प्रश्न केल्यास त्याचें उत्तर असें देण्यांत येतें कीं, इंग्लंडांत सोन्याचें नाणें चालावें आणि हिंदुस्थानांत चांदीचें नाणें चालावें, असा सरकार आणि प्रजा यांमध्यें एका अर्थी करारच झाला आहे. आतां आपण इंग्लंडांतील नाण्याचा विचार करूं.

इंग्लंडांतील नाण्याचा हिशेब सॉव्हरिन नांवाच्या नाण्यावर बसविलेला आहे. या नाण्यांत अमुक भार सोनें असावें असा निर्बंध आहे. मग त्या सोन्याची इतर कोणत्याही पदार्थाच्या मानानें कितीही किंमत होऊ. सॉव्हरिन नाणें ह्मणजे त्यांत विशिष्ट कसाचें १२३.२७४ ग्रेन सोनें असावयाचें. त्यांत कमजास्ती होणें नाहीं. त्यावर असलेल्या छापावरून तें नाणें काय आहे हें साऱ्या जगाला कळून येतें. तसेंच तें नाणें चालू करावयाचें ह्मणजे सोन्याची खरेदी, विक्री, किंवा त्याचें नाणें पाडणें सरकारानें आपल्याच हातीं ठेवून त्याची हवीतशी वहिवाट करावयाची असें नाहीं. ठरींव कसाचें १२३.२७४ ग्रेन सोनें पाहिजे त्या मनुष्यानें टांकसाळींत नेऊन द्यावें, आणि त्याच्या बदली एक सॉव्हरिन मागून घ्यावा. सरकार सोनें खरेदी घेत नाहीं, किंवा विकीत नाहीं. त्यानें फक्त चलनी नाणें कसें आणि कोणतें असावें हे ठरवून दिलें आहे; आणि वजन आणि कस पाहून तें सोन्यावर नाण्याचा छाप मारून देतें.

विलायत सरकारही सोन्याची विक्री आणि हें नाणें पाडून देणें बंद करण्याचें जर मनांत आणील तर मला त्याचें फार आश्चर्य वाटेल. कारण सोन्याची पाहिजे तितकीं नाणीं पाडणें किंवा तीं आटवून त्यांचें सोनें करून विकणें बिनहरकत चालण्यावर नाणें पद्धतीची मदार अवलंबून आहे. लांबी मोजण्याच्या कामीं फुटाचा किंवा द्रव पदार्थ मापण्याच्या कामीं ग्यालनाचा जसा इंग्लंडांत उपयोग होतो, तसा सोन्याहून इतर पदार्थांची, चांदीची देखील–किंमत ठरविण्याच्या कामीं सॉव्हरिनचा उपयोग होतो. कर देणारांचा सरकाराशीं असा ठराव असतो कीं, ज्या नाण्यांत कराची रक्कम भरावयाची त्याच्या पुरवठ्यांत कोणत्याही कारणानें कमतरता करण्यांत येऊं नये. आणि अशा विपुल मिळणाऱ्या नाण्यांतच कर भरण्यांत यावा असें कराविषयींच्या प्रत्येक कायद्यांत एक तत्व असतें. तीच गोष्ट हिंदुस्थानासही लागू आहे.

इंग्लंडांतील सोन्याच्या नाण्याऐवजीं हिंदुस्थानांत चांदीचें नाणें आहे. १२३·२७४ ग्रेन सोन्याऐवजीं १८० ग्रेन चांदी येथील नाण्यांत आहे, आणि इंग्लंडांत दर औंसास १॥-पेन्स प्रमाणें टांकसाळेंत नाणें पाडण्याबद्दल द्यावे लागत. त्याऐवजीं दरशेंकडा २ रुपये प्रमाणें फेरफार केला ह्मणजे नाण्यासंबंधीं वर प्रगट केलेले विचार हिंदुस्थानालाही लागू पडतात. मात्र हिंदुस्थानांतील अधिकारी भावी परिणामांचा विचार न करितां हिंदुस्थानांतील लोकांस नुकसानकारक अशा गोष्टी त्यांच्या फायद्यासाठीं ह्मणून करूं लागले तर त्यांच्या पोरखेळांचें मला आश्चर्य वाटणार नाहीं.

चांदीच्या खरेदी विक्रीला किंवा तिचें नाणें पाडण्याला

कांहीं एक आडकाठी न आणितां १८० ग्रेन भार चांदी आणि ४ ग्रेन भार टांकसाळीची मजुरी मिळून १८४ ग्रेन चांदीची जी किंमत तिला रुपाया ह्मणावयाचें, ही रुपयाची खरी व्याख्या झाली. ह्या प्रमाणानें कर भरण्याला प्रत्येक कर भरणारा कायद्यानें बांधलेला आहे. रुपयाच्या नाण्यांतील जें हें मुख्य तत्व त्यांत ढवळाढवळ करणें गैरशिस्त आणि अन्यायाचें आहे.

आतां कृत्रिम रुपयाचा विचार करूं. सोन्याच्या नाण्याच्या हिशेबानें खऱ्या रुपयाची ह्मणजे १८४ ग्रेन चांदीची किंमत सुमारें ११ पेन्स बाजारभावाप्रमाणें होते असें समजूं या. आतां सरकार मध्यें पडून आपल्या अधिकाराचा दुरुपयोग करून आणि नाणें पाडण्याचें आपलें कर्तव्य एका बाजूस ठेवून रुपये दुर्मिळ करितें, आणि रुपयाला कृत्रिम किंमत देऊन सुवर्ण मानानें १६ पेनींची किंवा रौप्यमानानें ( टांकसाळीची मजुरी हिशेबांत धरून ) २६९ ग्रेन चांदीची त्याला किंमत देतें. पण एका रुपयामध्यें तितकी चांदी नाहीं हें उघड आहे. आणि असें असतांही कृत्रिम किंमत दिलेला रुपया, रुपया नसून वास्तविक पाहतां जवळजवळ दीड रुपया असतां त्यानें पहिलेंच नांव कायम ठेवून, कर भरणारांना 'बळी तो कान पिळी' या न्यायानें कर द्यावयास लावीत आहे.

आतां केवळ टांकसाळी बंद करण्याचा परिणाम काय होतो याचा आपण विचार करूं. एखादा शेतकरी आपल्या शेतांतील धान्य घेऊन तें विकण्याकरितां बाजारांत गेला असतां १८४ ग्रेन शुद्ध चांदी मिळविण्यासाठीं त्याला एक मण

तांदुळ द्यावे लागतात अशी आपण कल्पना करूं. सरकारचा सारा भरण्यासाठीं त्याला १ रुपया पाहिजे. तो मिळण्यासाठीं ही चांदीं घेऊन तो टांकसाळींत गेला, आणि तेथें १८४ ग्रेन चांदीच्या मोबदला त्याला रुपया पाडून देण्यांत आला तर ठीकच. पण हल्लींचा अनुभव पहावा तों टांकसाळेंत त्याला रुपया मिळत नाहीं. तुला रुपया हवा असल्यास २६९ ग्रेन चांदी ( सुवर्ण चलनाचे १६ पेन्स ) घेऊन ये असें त्याला सांगण्यांत येतें. याप्रमाणें निराश होऊन तो बाजारांत गेल्यास तेथें रुपयेवाला त्याला ह्मणतो कीं, जर तूं मला २६९ ग्रेन चांदी किंवा तितकी चांदी विकत घेण्यापुरतें धान्य देशील तर मी तुला रुपया देईन. एकाच बाजारांत आणि एकाच वेळीं एकमण धान्य देऊन रुपया ( ठरींव भार शुद्ध चांदी ) मिळत असतां, त्याच्या दीडपट धान्य देऊन त्याला कृत्रिम रुपया घेतल्याशिवाय गत्यंतरच नाहीं. त्या त्या पदार्थांचे बाजारभाव कांहींही असले तरी त्यांनीं वरील विवेचनाला बाध येत नाहीं.

कृत्रिम रुपयास दिलेल्या त्याच्या कृत्रिम स्वरूपामुळें तांदुळाच्या बाजारभावांत हा उतार दिसत नसला तरी, तेवढ्यावरून टांकसाळी बंद केल्यामुळें भावांत उतार झाला नाहीं असें ह्मणतां येत नाहीं. तर सुदैवानें इतर कित्येक कारणांमुळें भावांत वाढ झाली आहे, आणि तिचा फायदा टांकसाळी बंद करून सरकारानें रयतेपासून हिरावून घेतला आहे. तसें नसतें तर शेतकऱ्याला त्याच्या धान्याबद्दल आज जी किंमत येत आहे तीहून जास्त किंमत मिळाली असती. कोणींकडून तरी शेतकऱ्याचा तोटा सारखाच आहे. कारण

( खऱ्या अर्थानें ) एक रुपया मिळविण्यासाठीं त्याला १८४ ग्रेन चांदी खरेदी करावी लागत असे, तेथें कृत्रिम रुपायासाठीं त्याला २६९ ग्रेन चांदी खरेदी घ्यावी लागत आहे. एकाच बाजारांत एकाच वेळीं खऱ्या रुपयासाठीं आणि कृत्रिम रुपयासाठीं निरनिराळ्या प्रमाणानें गल्ला मागण्यांत येतो. ह्मणजे बाजार निरखांत सर्व साधारण तेजीमंदी कांहीं असली तरी खऱ्या रुपयाच्या मोबदला जितका गल्ला मागण्यांत येतो, त्याहून ४९ टक्के अधिक गल्ला कृत्रिम रुपयासाठीं मागण्यांत येतो. कृत्रिम रुपयाला जर १॥ मण गल्ला मिळत असेल, तर खऱ्या रुपयाला ह्मणजे १८४ ग्रेन चांदीला १ मण गल्ला मिळतो. हीच गोष्ट आपण दुसऱ्या तऱ्हेनें कसोटीस लावून पाहूं. या कसोटीसाठीं व्यापारी घडामोडींचा परिणाम सामान्य वस्तूंवर जसा होतो तसा ज्यांवर होत नाहीं, पण ज्यावर टांकसाळी बंद केल्यानें चांगलाच परिणाम होतो, असा या देशांतील एखादा व्यापारी-पदार्थ आपण घेऊं. अशा प्रकारचा पदार्थ म्हटला ह्मणजे सोनें हा होय. परराष्ट्रांशीं होणाऱ्या देवघेवींतच त्याची किंमत कमजास्त होते इतकेंच नाहीं, तर खुद्द हिंदुस्थानांत देखील इतर व्यापारी जिनसांप्रमाणें सोनेंही एक व्यापाराचा जिन्नस मानला जाऊन त्याची किंमत कमी जास्ती होते. उदाहरणार्थ, मजजवळ एक पौंडाचें नाणें आहे, आणि त्याच्या बदली रुपये घेऊन ते हिंदुस्थानांतच विकावयाचें आहे, परदेशीं पाठवावयाचें नाहीं. आतां जर ' रुपया ' हें नाणें १८४ ग्रेनभार चांदीच्या बाजारी किंमतीचेंच असतें तर माझ्या नाण्याबद्दल मला २२ रुपये मिळतात. पण रुपयाला कृत्रिम किंमत आल्या बरोबर ह्मणजे त्याची किंमत २६९

ग्रेनभार चांदीबरोबर होतांच माझ्या पौंडाचे १९ च रुपये कायते मिळतात. हिंदुस्थानांत सोन्याची बाजारी किंमत अशा तऱ्हेनें कमी झाली असून कृत्रिम उपायांनीं जितकी जास्त किंमत देण्यांत आली आहे त्या प्रमाणानेंच सोन्याची किंमत कमी झाली आहे. इतर सर्व वस्तूंच्या किंमतीचा प्रकारही असाच आहे. हें १८४ ग्रेन चांदीच्या किंमतीचा खरा रुपया आणि २६९ ग्रेन चांदीच्या किंमतीचा कृत्रिम रुपया यांच्या मोबदला एकाच बाजारांत एकाच वेळीं माल विकूं गेलें असतां कळून येईल.

याप्रमाणें हिंदुस्थानांतील कर देणारांवर कराचा अधिक बोजा बसविण्यांत आला असतां पेढीवाले, व्यापारी, चहा, कॉफी आणि नीळ पिकविणारे, गोरे, मेळेवाले, परदेशीय भांडवलवाले, वगैरे ज्या लोकांच्या हितार्थ ह्मणून चलनी नाण्यांत हा घोंटाळा करण्यांत आला होता तेच लोक आपलें फार नुकसान झालें अशी आतां फार ओरड करूं लागले आहेत. तरी देखील इंग्लंड आणि हिंदुस्थान या दोन्ही देशांतील अधिकारी डोळे मिटून स्वस्थ राहिले आहेत, आणि मिळालेल्या अनुभवानें सावध व्हावयाचें सोडून देऊन वेडेपणानें भलत्याच मार्गानें जाण्याचा ते आपला आग्रह सोडीत नाहींत.

इंग्लंडच्या कोशाध्यक्षांकडून २४ नोव्हेंबर १८७९ रोजीं इंडिया ऑफिसास जो खलिता पाठविण्यांत आला त्यांत असें ह्मटलें आहे कीं:—

(१) खासगी पेढ्यांना नाणें पाडूं देण्यासंबंधानें सुधारलेल्या राष्ट्रांत ज्या हरकती घेण्यांत येतात, त्याच हरकती हल्लींच्या योजनेसंबंधानें देखील घेतां येतील. त्या हरकती

अशा कीं, नवीन पद्धतीनें नाण्याची किंमत आपोआप न ठरतां सरकारास ती कायम राखण्याविषयीं खटपट करावी लागेल आणि अशा खटपटीच्या योगानें उचलून धरलेल्या नाण्याची किंमत मूळ योजिलेल्या किंमती इतकी राहत नाहीं इतकेंच नव्हे, तर त्या प्रमेयांत सरकार एकदां गुंतलें ह्मणजे त्याला अनेक तऱ्हेच्या अडचणी आणि अनेक तऱ्हेचे भूल पाडणार प्रसंग येतात.

" २. कोशाध्यक्षांस असें वाटतें कीं, हिंदुस्थान सरकारानें हल्लींची सूचना पुढें आणल्यामुळें आपल्या चलनी नाण्याची किंमत कमी करीत जाणाऱ्या राज्यकर्त्यांवर लोकांनीं जे आरोप आणिले आहेत, तेच हिंदुस्थान सरकारावर येण्याचा संभव आहे. नाण्याची किंमत कमी करण्यांत (ह्मणजे एकाच नांवाच्या नाण्यांतील चांदी किंवा सोनें उत्तरोत्तर कमी कमी करीत जाण्यांत ) आपल्या कर्जदारांचें देणें थोडक्यांत भागावें असा राज्यकर्त्यांचा हेतु असतो. प्रस्तुत सूचनेवरून असें दिसतें कीं, **कर देणारांकडून आपणांस मिळावयाची रक्कम वाढविण्याचा** हिंदुस्थान सरकाराचा विचार आहे. या कृतींत कांहीं फरक आहे असें कोशाध्यक्षांस वाटत नाहीं. " ........... आतां हिंदुस्थानांत रुपयांची किंमत कमी झाली असून हिंदुस्थान सरकारानें सुचविलेल्या युक्तीनें ती जर वाढणार असेल तर हिंदुस्थान सरकारच्या सूचनेवर असा एक आक्षेप येईल कीं, तिच्या योगानें **नक्त रक्कम देण्यासंबंधानें हिंदुस्थानांत जे करार झालेले असतील त्या करारांत फरक होईल.**

१४

" या देशांतील नाण्यासंबंधाच्या कायद्यांत अमुक वजनाचा आणि कसाचा एका विशिष्ट धातूचा तुकडा देशाचें नाणें ह्मणून मानला जात्रा, आणि सध्यांच्या व्याख्येंत ढवळाढवळ करण्याचा प्रयत्न, देशाचें विनाकारण नुकसान करणारा आहे, हें जें महत्वाचें आणि दृढरूढ तत्व झालेलें आहे, त्याशीं वास्तविक पाहिलें असतां या सूचनेचा विरोध येतो.

" आपण आपल्या खालित्यांत कलम ४१ मध्यें लिहिलें आहे कीं, ' नाण्यासंबंधीं कायदे करण्याचा मुख्य उद्देश, साधेल तितकें करून किंमतींचें कांहीं तरी एक प्रमाण नियत करण्याचा असतो, हें निःसंशय खरें आहे, पण वर नाणें शब्दाची जी व्याख्या दिली आहे, तीच धरून चालावें असें आमच्या चलनांतील एक तत्व असून नाण्याला निश्चत किंमत देण्याचा उत्तम, आणि अनुभवान्तीं खात्रीचा ठरलेला असा हाच उपाय आहे. पौंड ह्मणजे अमुक भार सोनें, आणि रुपया ह्मणजे अमूक भार चांदी, असा अर्थ ठरलेला असून त्यांत फरक करणें, अनुभवी मुत्सद्यांस आणि अर्थशास्त्रज्ञांस नापसंत आहे.

" चांदीची किंमत कमी झाल्यामुळें हुंडणावळीची हल्लींची शोचनीय स्थिति झालेली असेल तर हिंदुस्थान सरकारची सूचना अमलांत आणली असतां खालीं लिहिलेल्या मंडळीचा फायदा होईल.

(अ) विलायतखातीं पडणाऱ्या खर्चासंबंधानें हुंडणावळीमुळें होणारें नुकसान भरून काढण्यासाठीं हिंदुस्थानसरकाराला कराची फेर आकारणी करण्याची दगदग चुकेल.

(ब.) हिंदुस्थानांत नोकरीवर असलेले सिव्हिलियन किंवा उद्योग धंदा करीत असलेले इंग्रज लोक, यांस इंग्लंडास पैसा पाठविण्यासंबंधानें जास्त सवलत मिळेल. हिंदुस्थानांतील व्यापारधंद्यांत ज्यांचा पैसा गुंतला आहे अशा इंग्रज भांडवलवाल्यांस नवीन सूचना अमलांत आल्यानंतर इंग्लंडास पैसा पाठविणें फायदेशीर होईल.

" पण या मंडळीचा फायदा होईल तर दुसरीकडे हिंदुस्थानांतील रयतेचें नुकसान होऊन, त्यांचें कर्ज किंवा कराराप्रमाणें रोख द्यावयाच्या रकमा वाढतील, आणि त्याबरोबर रयतेकडे सावकाराचें जें देणें असेल तेंही वाढेल. जरी सरकाराचा एका दृष्टीनें फायदा होईल असें दाखविलें आहे; तरी दुसरी कडून हिंदुस्थान सरकारानें चांदीच्या नाण्यांत जें कर्ज काढिलें आहे तें वाढेल.

" हिंदुस्थानच्या चलनांत फेरफार करण्यास पुरेसें कारण आहे असें कोशाध्यक्षांस वाटत नाहीं. आणि तें आहे असें जरी घेऊन चाललें, तरी हिंदुस्थान सरकारानें सुचविलेले फेरफार कोशाध्यक्षांनीं त्यांसंबंधानें काढलेल्या आक्षेपांचें आणि शंकांचें निरसन झाल्याशिवाय अंमलांत आणतां येत नाहींत. ह्या आक्षेपांतील मुख्य तत्वें विद्वान लोकांनीं पुष्कळ दिवस वादविवाद करून मान्य केलीं आहेत, आणि त्यांवरच चलनाच्या पद्धतीचा पाया घातलेला आहे, असें प्रमाणभूत ग्रंथकारांनीं आणि मुत्सद्यांनीं कबूल केलें आहे.

" चलनी पद्धतीस निःसत्व करून टाकणारे नवे नवे फेरफार करणें मोठें जोखमाचें आहे, आणि ह्मणूनच आपणापुढें अभिप्रायार्थ आलेली ती योजना राणी सरकारनें

किंवा स्टेट सेक्रेटरीनीं मान्य करूं नये असा आपला अभिप्राय कोशाध्यक्षांना स्पष्टपणें कळविणें भाग आहे. आणि तो त्यांनीं कळविल्यानें हिंदुस्थान सरकाराविषयीं त्यांची पूज्यबुद्धि कमी झाली आहे असें मानण्याचें कारण नाहीं. ”

हिंदुस्थानसरकारची योजना चुकीची होती असें दाखविण्यास ह्याहून आधिक पुरावा कशास पाहिजे? हिंदुस्थानांत सोन्याचें नाणें सुरू झाल्यानें कर देणारांस 'विलायतखातीं खर्चा'-बद्दल जें धान्य पाठवावें लागतें, त्यांतील एक पैही बचत होणार नाहीं, हें पूर्वींच स्पष्ट करून सांगितलें आहे. तसें केल्यानें नाण्यांत फेरफार करण्याचा जो अवाढव्य खर्च होईल तेवढा त्यांच्या डोईवर बसून त्यांच्या विपत्तींत तितकी भर मात्र पडेल, आणखी अन्यमार्गानें त्यांचें कोणतें नुकसान होणार असेल तें ईश्वरालाच ठाऊक.

हिंदुस्थान सरकारच्या योजनेचा पाया एक गोष्ट गृहीत धरून तीवर रचलेला आहे. ती गोष्ट ही कीं, हुंडणावळींत रुपयाची किंमत कमी होऊन रयतेवरील करांचा बोजा वाढवावा लागेल. पण टांकसाळी बंद केल्या, आणि सोन्याचें नाणें सुरू केलें, म्हणजे 'विलायत' खातीं पाठवाव्या लागणाऱ्या रकमेंत अतोनात वाढ झाल्यामुळें जे कर वाढवावे लागणार आहेत, ते वाढवावे लागणार नाहींत. हिंदुस्थान-सरकारानें दुसरी एक गोष्ट गृहीत घेतली ती अशीं कीं, सोनें आणि चांदी यांच्या परस्पर किंमतींत कांहीं तरी कायमचें प्रमाण ठरवून टाकण्याची दाखविलेली अवश्यकता होय. लोकांवर कराचें ओझें अधिक पडलें असतां राजकीय संकटें उद्भवतील. तेव्हां लोकांवरील कराचें ओझें हलकें करण्याच्या आणि

राजकीय संकटांपासून सरकारास मुक्त करण्याच्या इच्छेनेंच सरकारानें हल्लींचे चलनी संबंधाचे कायदे करण्याचें काम हातीं घेतलें असें सरकारी कागदपत्रांवरून दिसून येतें. या कागदपत्रांतील कांहीं उतारे परिशिष्ट ( ब ) मध्यें दाखल केले आहेत.

चलनासंबंधीं मागें केलेल्या कायद्यांनीं किंवा हल्लींच्या योजनेनें रयतेवरील कराचें ओझें कमी करण्याचा, आणि सरकारावर येणारें राजकीय संकट टाळण्याचा, असे दोन्ही उद्देश केवळ भ्रममूलक आहेत. इतर सर्व जिनसांची किंमत सोन्या रुप्याच्या मानानें जशी सदोदित बदलत असते, तशी सोन्यारुप्याची ही परस्परांच्या मानानें बदलत असते, हा सामान्य नियम आहे. त्यांच्या विरुद्ध जाऊन सोनें आणि रुपें यांचीं परस्पर किंमत कायम ठरवूं पाहणें, हें गुरुत्वाकर्षणाच्या नियमास बाध आणूं पाहण्यासारखेंच हास्यास्पद आहे. तसेंच जोंपर्यंत सरकाराच्या हातीं परीस लागला नाहीं, किंवा त्याच्या अंगीं प्रतिसृष्टी करण्याचें सामर्थ्य आलें नाहीं, तोंपर्यंत रुपयाची किंमत सोन्याच्या मानानें ११ पेन्स किंवा ६ पेन्स देखील झाली असतां त्याची किंमत १६ पेन्स ठरविणें हेंही वेडगळपणाचें आहे. ही गोष्ट हिंदुस्थान सरकाराला माहीत नव्हती, किंवा मोठमोठ्या अर्थशास्त्रवेत्यांनीं आणि आप्तांनीं ती त्यांस कळविली नव्हती, असें नाहीं. या संबंधांत इंग्लंडच्या कोशाध्यक्षांच्या एका खलित्यांतील उतारा वर दिलाच आहे.

आपणांकडे अभिप्रायार्थ आलेल्या योजनेसंबंधानें, ती राणी सरकारानें किंवा स्टेट सेक्रटरींनीं कधींही मंजूर करूं नये, असा ठाम अभिप्राय कोशाध्यक्षांनीं दिला असतां हिंदु-

स्थान सरकारानें आणि इंडिया ऑफिसानें या प्रश्नाला निराळेंच स्वरूप देऊन तो पुनः पुढें आणिला. लॉर्ड रँडॉल्फ चर्च हिल यांनीं २६ जानेवारी १८८६ रोजीं कोशाध्यक्षांस या बाबतींत एक पत्र लिहिलें. आणि मागाऊन २ फेब्रुवारी १८८६ रोजचें हिंदुस्थान सरकाराकडून आलेलें एक पत्र १७ मार्च १८८६ रोजीं त्यांजकडे पाठविलें. द्विरुक्ति भयास्तव या पत्रांतील उतारे येथें न देतां कोशाध्यक्षांचें त्यावरील उत्तर दाखल केलें असतां बरें होईल. त्यांत हिंदुस्थान सरकारच्या अभिप्रायांचा अंतर्भाव होईलच. कोशाध्यक्षांचें उत्तर ३१ मे १८८६ रोजचें असून सर हेनरी एच फाउलर यांच्या सहीनिशीं रवाना झालें आहे; त्यांतील मतलब पुढें लिहिल्याप्रमाणें आहे:—

'चांदीची किंमत पडल्यामुळें होणाऱ्या गैरसोयींचा विचार करून हिंदुस्थान सरकारानें आपला अभिप्राय व्यक्त केला आहे. इतर प्रयत्नांचा जरी कांहीं उपयोग झाला नाहीं, तरी एक गोष्ट मनुष्यांच्या प्रयत्नाबाह्य नाहीं असें हिंदुस्थान सरकारास वाटतें. ही गोष्ट सोनें आणि चांदी यांच्या परस्पर किंमतीचें प्रमाण ठरविणें ही होय. हिंदुस्थान सरकार जी गोष्ट गृहीत धरून चाललें आहे तिच्या इतकी वादग्रस्त गोष्ट अर्थशास्त्रांत दुसरी कोणतीही नाहीं. सन १८७८ सालीं सर्व राष्ट्रांच्या प्रतिनिधींची चलनाच्या विषयाचा विचार करण्यासाठीं सभा भरली होती. तींत मि. गॉश्चेन, मि. गिब्स्, आणि सर टॉमस सेकोम यांनीं राणी सरकारचे प्रतिनिधी या नात्यानें जो अभिप्राय लिहून दिला होता, त्याशीं कोशाध्यक्षांचें वरील विधान सुसंगत आहे. सोनें आणि चांदी

यांची परस्पर किंमत कायम ठरविणें अगदीं अशक्य आहे, असेंच मि. गॉश्चन आणि इतर मंडळीचें मत पडलें होतें.

७ व्या कलमांत हिंदुस्थान सरकारानें आपला आणखी एक अभिप्राय दाखल केला आहे कीं, सोनें आणि चांदी यांची परस्पर किंमत कायमची ठरविणें शक्य आहे, आणि तसें करण्यासाठीं योग्य उपयांची योजना करण्यांत जर हयगय झाली तर, तिची जोखीम हिंदुस्थान सरकारावर आणि विलायत सरकारावर राहील; पण सोनें आणि चांदी यांच्या परस्पर किंमतीचें प्रमाण कायमचें ठरवितां येईल असें मानण्यास आधार कोणता आहे आणि तसें करण्यासाठीं कोणते उपाय योजितां येतील, याबद्दलचा खुलासा हिंदुस्थान सरकारानें केला असता तर बरें झालें असतें.

८ व्या कलमांत सन १८७८ सालीं डिसेंबरमध्यें लॉर्ड क्रॅनब्रुक् स्टेट सेक्रेटरी यांनीं कोशाध्यक्ष सर स्टॅफोर्ड नॉर्थकोर्ट यांजकडे चांदीची किंमत कमी झाल्यामुळें व्यापार मंदावून जे वाईट परिणाम झाले होते, त्यास कोणते उपाय करावे याबद्दलच्या सूचनांचे दोन खलिते हिंदुस्थान सरकाराकडून आले होते ते, त्यांवर स्वतःचा अभिप्राय दाखल न करितां तसेच पाठविले. सदर्हु दोन खलित्यांपैकीं येथें एकाचाच उल्लेख करणें पुरे आहे. या एका खलित्यांत विलायत सरकाराकडून पूर्वीं ज्या दोन सूचना गेल्या होत्या कीं, (१) हिंदुस्थानांत सोन्याचें नाणें आणि सुवर्ण चलन सुरू करण्यांत यावें, आणि (२) रुपयांतील चांदीचें वजन वाढविण्यांत यावें. या दोन्ही सूचनांसंबंधानें हिंदुस्थान सरकारानें आपली नापसंती दर्शविली होती. आणि हिंदुस्थानांतील टांकसाळींत चांदीचें नाणें पाड-

ण्याचें बंद करावें, अशी आपणांकडून सूचना केली होती. हा फेरफार करण्यांत हिंदुस्थान सरकारचा उद्देश असा होता कीं, हिंदुस्थानांतील मूळचें चांदीचें नाणें कायम ठेवून हिंदुस्थानांत सुवर्ण चलन सुरू करितां यावें; व रुपया आणि पौंड यांच्या परस्पर किंमतीचें प्रमाण आपणांला पाहिजे तसें ठरवितां यावें. हा उद्देश सिद्धीस नेण्यासाठीं, जे उपाय योजावयाचे आहेत त्यांचें खलित्यांत विस्तारानें वर्णन केलें आहे.

९ वें कलम. हिंदुस्थान सरकारच्या वतीनें लॉर्ड क्रॅनब्रूक् यांनीं आणि कोशाध्यक्ष या नात्यानें सर स्टॅफोर्ड नॉर्थकोर्ट यांनीं, हा खलिता आणि त्यांतील सूचना एका कमिटीपुढें मांडिल्या. या कमिटींत सर लुई मलेट, मि. एर्डवर्ड स्टॅनहोप, एम. पी.; सर टॉमस सेवोम, मि. ( अलीकडे नाइट पदवी पावलेले ) टॉमस फॅरर, मि. ( अलीकडे नाइट पदवी पावलेले ) रेजेनॉल्ड वेल्वी, मि. गिफेन्, आणि मि. आरथर बालफोर एम्. पी. हे होते. या गृहस्थांनीं ३० एप्रिल १८७९ रोजीं आपला रिपोर्ट सादर करून कमिटीचा असा अभिप्राय कळविला कीं, खलित्यांतील सूचनांचा विचार करून पाहतां त्या विलायत सरकारच्या मंजुरीस पात्र आहेत अशी आह्माला शिफारस करितां येत नाहीं, असें आमच्चें सर्वांचें एकमत आहे.

" यानंतर २४ नोव्हेंबर सन १८७९ रोजीं हिंदुस्थान सरकारच्या सूचनांसंबंधानें कोशाध्यक्षांकडून सविस्तर उत्तर आलें या पत्राच्या पूर्वार्धांत खलित्यांतील मजकुराचा इत्यर्थ दिला आहे. त्यांतील उतारे प्रस्तुत प्रश्नास पूर्णपणें लागू असून त्याकडे स्टेट सेक्रेटरींनीं विशेष लक्ष द्यावें अशी माझी सूचना आहे."

"नाण्यासंबंधीं कायद्यांत फेरफार करणें हें अत्यंत कठीण काम आहे, हें सांगण्याची अवश्यकता आहे असें कोशाध्यक्षांस वाटत नाहीं. तसेंच या बाबतींत तात्कालिक फायद्यासाठीं एखादा कायदा उतावळीनें पसार करणें वेडेपणाचें आहे. शिवाय हा विषय मोठा घोंटाळ्याचा असून समाजांतील प्रत्येक व्यक्तीच्या हिताहिताचा आणि रोजच्या व्यवहाराचा त्याशीं संबंध असल्यामुळें त्याचे अमुकच परिणाम होतात असें निश्चित नसतां, ते होतील अशा भीतीनें कांहीं तरी करून बसणें हेंही वेडेपणाचें आहे. नाण्यासंबंधीं हल्लींचीच स्थिति कायम राहिली तर, कर वाढवावे लागतील किंवा त्याची निराळ्या प्रमाणानें आकारणी करावी लागेल, असें जें ह्मणण्यांत येत आहे तें सिद्ध केलेलें नाहीं. कारण खर्च कमी करण्यासंबंधानें खलित्यांत कांहींच ह्मटलेलें नाहीं. जमाखर्चाची तोंडमिळवणी करण्यास कर वाढविणें हा जसा एक उपाय आहे, तसाच खर्च कमी करणें हाही दुसरा उपाय आहे. शिवाय पगाराच्या वाढीमुळें होणारा खर्च, नोकर लोकांच्या संख्येपैकीं कोण कोण कमी करितां येतील, हें काळजीपूर्वक पाहिलें असतां बहुतेक भागण्यासारखा, निदान बराच कमी होण्यासारखा तरी आहे."

" खलित्यांतील मजकूर वाचून पाहिल्यावरून आमचें असें अनुमान होतें कीं, हिंदुस्थानांत पैसे पाठविण्याचीं जीं दोन साधनें आहेत त्यांमध्यें ह्मणजे चांदी आणि सरकारी बिलें यांमध्यें, जी स्पर्धा चालू असते ती नाहींशी करावी असा हिंदुस्थान सरकारचा हेतु दिसतो. पण याप्रमाणें केलें असतां हिंदुस्थानसरकारानें आपलें ओझें दुसऱ्यांच्या खांद्यावर दिलें

एवढें मात्र होईल. याहून जास्त काय होणार आहे? व तसें झाल्यास अखेर जें नुकसान होईल तें कोणी सोसावें? आणि त्याचा परिणाम हिंदुस्थानसरकारच्या पतीवर आणि हिंदुस्थानाच्या व्यापारावर काय होईल ? "

यापुढें कोशाध्यक्षांच्या पत्रांत मी वर घेतलेलीं अवतरणें असून त्यांत असें दाखवून दिलें आहे कीं, ' सरकार आपलें नुकसान टाळूं पाहतें तें रयतेच्या कपाळीं जाऊन बसेल. '

सोन्याच्या मानाप्रमाणें चांदीची किंमत वाढविण्यासाठीं जे कृत्रिम इलाज योजावयाचे आहेत, त्यांच्या परिणामासंबंधानें सर स्टॅफोर्ड नॉर्थकोट यांनीं घालून दिलेले जे सिद्धान्त वर नमूद केले आहेत, त्यांहून निराळा अभिप्राय देण्यासारखें एकतरी कारण हिंदुस्थान सरकारानें दाखविलें आहे, असें कोशाध्यक्षांस वाटत नाहीं. *** होईल तितकें करून व्यापारी घडामोडीवर कायद्याचीं बंधनें ठेवूं नयेत आणि व्यापारी जिनसांची अदलाबदल होण्यास कोणतेही निरर्थक नियम घालून देऊं नयेत, असें आमच्या सरकारचें धोरण आहे. सोनें आणि चांदी यांची परस्पर सापेक्ष किंमत कायद्यानें ठरविली असतां या तत्वाचें उल्लंघन होईल, आणि तसें कांहींएक कारण नसतांना निसर्ग नियमांत सरकार उगीच ढवळाढवळ करीत आहे, असें लोक समजतील. ***

हिंदुस्थान सरकारच्या खलित्यांत राज्यकारभाराचा खर्च कमी करण्यासंबंधानें अवाक्षर देखील नाहीं असें १८७९ सालीं कोशाध्यक्षांनीं ह्मटलें होतें, तेंच आजच्या प्रसंगींही आह्मांस ह्मणावें लागत आहे. राज्यव्यवस्थेचा खर्च आटोक्यांत ठेवणें हें जितकें सरकारच्या हातचें आहे, तितकेंच बाजारांत

सोन्या चांदीचा दर काय असावा, हें ठरविणें त्यांच्या हातचें नाहीं.

पुढील मुद्यांकडे वळण्यापूर्वी येथें साहजिकपणें असें सांगून टेवण्यास हरकत नाहीं कीं, हल्लीं हिंदुस्थान सरकारानें ज्या सूचना पुढें आणल्या आहेत त्या सन १८७७ सालीं त्याला स्वतःलाच सम्मत नव्हत्या. आणि त्या वेळचा अभिप्राय बदलण्याला हिंदुस्थान सरकाराकडून कांहींच योग्य कारण दाखविण्यांत आलें नाहीं असें कोशाध्यक्षांचें ह्मणणें आहे. सन १८७६ सालचा हिंदुस्थान सरकारचा खलिता मजजवळ नाहीं, ह्मणून तारीख ९ नोव्हेंबर १८७८ च्या खलित्यांतून पुढील अवतरण घेतलें आहे:—

"३ वर सांगितलेल्या तारिख १३ ऑक्टोबर १८७६ च्या खलित्यासंबंधानें बऱ्याच बारकाईनें चौकशी झाली. तिचा सामान्य निष्कर्ष असा होता कीं, हिंदुस्थानांत सोन्याचें नाणें चालू करावयाचें ह्मणजे हल्लीं असलेलें चांदीचें नाणें काढून टाकावें लागेल. तसें करण्यास फार खर्च येईल ह्मणून तें शक्य नाहीं. शिवाय तसें करण्याला दुसऱ्याही नडी आहेत."

"४ इतःपर चांदीचें नाणें मुबलक पाडूं मात्र नये आणि सोन्याचें नाणें चालू करून अंगीकार करावा, ह्मणजे हुंडणावळीच्या दृष्टीनें रुपयाची किंमत वाढेल, अशा प्रकारची सूचना हिंदुस्थानच्या सरकारी खलित्यांतही दाखल केलेली आहे. पण ती त्यानीं स्वतःच नापसंत केली आहे."

बंगाल चेंबर ऑफ कॉमर्स यांस, ता० १९ जुलई १८७६ रोजीं पास केलेल्या ठरावासंबंधानें उत्तर पाठवितांना ९

फेब्रुवारी १८७७ रोजीं हिंदुस्थान सरकारानें असें ह्मटलें आहे कीं,–'कोणत्याही एखाद्या पदार्थाचा नाणें पाडण्याच्या कामीं अप्रतिहत उपयोग करण्यांत येईल असें सरकारानें कबूल केल्याशिवाय त्या पदार्थाच्या किंमतीवरून इतर पदार्थांची किंमत मापतां येणें शक्य नाहीं. ठरीव नियमाप्रमाणें चांदीचें पाहिजे तितकें नाणें पाडण्याची जर बंदी करण्यांत आली, तर चांदीच्या किंमतीनें इतर पदार्थांच्या किंमती मापतां येणार नाहींत; तर त्या कामीं दुसरेंच कांहीं तरी साधन मोजावें लागेल. तें साधन ह्मणजे हल्लीं शिलकेंत असलेल्या रुपयाला जी विशेष किंमत आली आहे ती, किंवा खोटीं नाणीं पाडणारांनीं नवे रुपये पाडल्यामुळें त्या किंमतींत फेरफार होऊन जी किंमत होईल ती होय.

पण रुपयाची किंमत हळुहळु पण निःसंशय वाढेल. टांकसाळीचें काम हिंदुस्थानांत जसें शिस्तवार चाललें आहे तसें चाललें ह्मणजे ज्या धातूच्या तुकड्यावर छाप मारिलेला असेल त्या तुकड्याची मूळ किंमतीपेक्षां नाणें पाडणावळ आणि * छापणावळ या दोन बाबतीं शिवाय इतर कोणत्याही कारणानें किंमत वाढत नाहीं. टांकसाळेच्या छापावरून धातूचें वजन आणि कस हीं मात्र समजतात. ज्या पद्धतीनें लोकांच्या गरजेप्रमाणें नाण्याचा पुरवठा होईल तीच पद्धति निर्दोष होय. प्रचारांत असलेल्या नाण्यांत किती भर घातली पाहिजे, किंवा किती नाणीं काढून घेतलीं पाहिजेत, हें ठरविणें सुधारलेल्या राज्यकर्त्यांचें

* टांकसाळींत नाणें पाडण्याकरितां जेव्हां नेतात तेव्हां राजाच्या नांवाचा शिक्का मारण्याबद्दल कांहीं भाग द्यावा लागतो, त्यास (Seigniorage) सिज्यूरेज किंवा Mintage हें नांव आहे.

काम नव्हे. तसेंच देशाला कायमचें नाणें नाहीं अशा स्थितींत त्याला थोडा वेळ देखील ठेवणें योग्य नाहीं. ज्या ज्या युरोपियन राष्ट्रांनीं चांदीचा मूल्यमापनाधिकार काढून घेतला त्यांनीं त्या ऐवजीं सोन्याचीच योजना केली आहे. त्याला अपवाद असेल असें मानणें चुकीचें आहे.

हिंदुस्थान सरकाराचा पूर्वी असा अभिप्राय असून आतां ते आपली 'सुधारणा' आणि 'निर्दोष' पद्धति विसरून गेले आहेत. आणि त्यांच्या ह्या वेडपणाचें प्रायश्चित्त गेल्या ९ वर्षांतील संकटांच्या रूपानें हिंदुस्थानांतील गरीब रयतेस भोगावें लागलें आहे इतकेंच नाहीं, तर पुढेंही त्याच विघातक मार्गानें जाण्याचा दुराग्रह सरकारानें धरलेला आहे.

आतां कोशाध्यक्षांनीं जीं उत्तरें दिल्याचें वर लिहिलें आहे त्यांकडे वळूं. हिंदुस्थान सरकारच्या सूचना कोशाध्यक्षांनीं अगदीं नापसंत ठरविल्या नंतर, हिंदुस्थानांतील अधिकाऱ्यांना कोशाध्यक्षांपुढें येण्यास तोंड राहिलें नाहीं. नंतर आपली अब्रू बाह्यात्कारें तरी राखण्याकरितां त्यांनीं एक कांहीं तरी खलिता लिहून पाठविला. आणि कोशाध्यक्षांशीं संबंध न ठेवतां आपला पूर्वी ठरलेला वेडा वांकडा आणि अविचाराचा कायदा पसार करून घेण्यासाठीं आपले नेहमींचे उपाय योजिले. विशेष आश्चर्याची गोष्ट ही कीं, ह्या कायद्याचा विचार करण्यासाठीं १८९३ सालीं जी कमिटी नेमलेली होती तिला ह्या सर्व गोष्टी माहीत असून, आणि त्या कायद्यामुळें किती भयंकर परिणाम आणि नुकसान सोसावें लागलें हें माहीत असून, कोशाध्यक्षांनीं त्या सूचना नापसंत ठरविल्या असतां, हिंदुस्थान सरकारास वाटेल तसें करूं दिलें याचें आश्चर्य वाटतें.

हिंदुस्थानसरकारच्या कृतीचें मला आश्चर्य वाटत नाहीं. एखादी गोष्ट करण्याचें त्यांच्या मनानें घेतलें ह्मणजे तिला कितीही हरकती असोत, पार्लमेंटदेखील तिला विरुद्ध असो, तें, सरकार केल्याशिवाय सोडणार नाहीं. पार्लमेंटचे ठराव किंवा कायदे आणि कोशाध्यक्षांची नापसंती हीं त्याच्या खिजगणतींत नाहींत. प्रतिकूळ अभिप्रायाला न जुमानतां आपला हेत तडीस नेण्याचा हिंदुस्थानसरकारचा मार्ग ह्मटला ह्मणजे अशा विषयांचा विचार करण्यकरितां एखादें कमिशन किंवा कमिटी नेमणें हा होय. हिंदुस्थानसरकाराला या कमिशनांत किंवा कमिटींत आपणाला हवे तसेच सभासद नेमतां येतात, आणि आपणास अनुकूल अशाच अधिकाऱ्यांच्या साक्षी घेण्यांत येतात. फार झालें तर कमिशनचें काम स्वतंत्र विचारानें चाललें आहे असें दाखवितां येण्यापुरती कांहीं तरी व्यवस्था करितात. अशीं कमिशनें बहुतकरून सरकारानें पूर्वी ठरविलेले सिद्धांतच ठरवितात; पण रयतेच्या सुदैवानें सरकारच्या अभिप्रायाविरुद्ध जर त्यांनीं कांहीं ठराव केले तर त्या कमिशनाचे हालच. त्यांचा रिपोर्ट कपाटांत दाबून ठेवण्यांत येतो, आणि त्यांतील जेवढा भाग सरकारास पसंत नसेल तेवढ्याकडे साफ दुर्लक्ष करण्यांत येतें, किंवा कधीं कधीं सगळ्या रिपोर्टाची तीच गत होते. प्रस्तुत उदाहरणांत कोशाध्यक्ष जसे हिंदुस्थान-सरकारा विरुद्ध गेले तसा कोणी विरुद्ध गेल्यास कांहीं वेळ-पर्यंत हिंदुस्थानसरकार तो नाद सोडून देतें, आणि पूर्वीपेक्षां अधिक अनुकूळ अशी संधी पाहून आपला क्रम पुनः चालू करितें; आणि आपला उद्देश सफळ होण्यास कांहीं हरकत येऊं नये ह्मणून जास्त खबरदारी घेतें. याचप्रमाणें आपल्या

नेहमीच्या पद्धतीचें अवलंबन करून पूर्वी भाकित केल्याप्रमाणें हिंदुस्थानसरकारानें रयतेस विपत्तिसमुद्रांत लोटून दिलें आहे. विशेष आश्चर्याची गोष्ट ही कीं, हिंदुस्थानसरकारच्या सूचनांसंबंधानें आपली अत्यंत नापसंती दाखविल्यानंतर तें एखादा अविचारीपणाचा आणि वेडावांकडा कायदा पसार करितें कीं काय हें पाहण्याची कोशाध्यक्षांस आवश्यकता वाटली नाहीं. हिंदुस्थान हें एक रोगी शरीर आहे; त्यावर वैद्य ह्मणविणाऱ्यानें वाटेल ते शस्त्रप्रयोग करावे, किंवा निर्दयपणानें अर्धकच्चे आणि अविचाराचे प्रयोग करून पाहावे, शरीराचें कांहीं केलें तरी कांहीं हरकत नाहीं, अशी त्यांची समजूत दिसते. कोशाध्यक्षांचें ह्मणजे इंग्लंडांतील कर देणाराचें त्यांत कांहीं नुकसान नाहीं. त्याचा सर्व चट्टा हिंदुस्थानालाच बसावयाचा असतो.

दुसरा असा प्रश्न स्वाभाविकपणें उत्पन्न होतो कीं, हुंडणावळ कमी झाल्यामुळें हिंदुस्थानाचेंच इतकें नुकसान कां व्हावें? चांदीचें नाणें वापरणाऱ्या दुसऱ्या एखाद्या स्वतंत्र देशाचें तसें नुकसान कां होऊं नये? हिंदुस्थानाला खरोखर कोणता रोग झाला आहे ह्मणून त्याच्या ह्या विपत्तींत मुळींच खंड पडत नाहीं? या प्रश्नाचें उत्तर लॉर्ड सॅलिसबरी यांनीं अगदीं थोडक्या शब्दांत दिलें आहे. तें हें कीं:—'कापट्य नीतीचा आश्रय करून हिंदुस्थानाचें रक्त पिळून काढिलें पाहिजे.'

हिंदुस्थानच्या विपत्तीचीं खरीं कारणें कोणतीं आहेत तीं सरकारी अधिकाऱ्यांच्याच शब्दांनीं मी सांगेन. लॉर्ड सॅलिसबरी यांचा वर जो अभिप्राय दिला आहे तो पुढील उता-

त्यांत स्पष्ट करून सांगितला असून, त्यांची कृतीही चांगली वर्णिली आहे. लॉर्ड सॅलिसबरी यांनीं स्वतः वरील अभिप्राय पुढील शब्दांनीं स्पष्ट केला आहे. ते ह्मणतातः— हिंदुस्थानच्या उत्पन्नापैकीं कांहींएक मोबदला न मिळतां बराच भाग परदेशीं जात असल्यामुळें हिंदुस्थानचें फार नुकसान होत आहे.

वरील वादविवादा संबंधानें जे खलिते आले व गेले त्यांतच या अभिप्रायाचें स्पष्टीकरण केलेलें आहे. माजि स्टेट सेक्रेटरी लॉर्ड रँडॉल्फ चर्चहिल यांनीं लॉर्ड सॅलिसबरी प्रमाणेंच हें रक्त शोषण्याचें—संपत्ती परदेशीं नेण्याचें—काम कसें चाललेलें असतें, आणि त्यामुळें अखेर अनर्थ कसा उद्भवणार आहे हें स्पष्ट करून सांगितलेलें आहे. तारीख २६ जानेवारी सन १८८६ रोजीं कोशाध्यक्षांकडे पाठविलेल्या खलित्यांत लॉर्ड रँडॉल्फ चर्चहिल यांनीं ह्मटलें आहे कीं:—'हिंदुस्थान सरकारास सोन्याच्या नाण्यांत पुष्कळ रक्कम इंग्लंडांत नेऊन भरली पाहिजे असा ठराव असल्यामुळें हुंडणावळ कमी झाल्यानें हिंदुस्थानच्या तिजोरीचें नुकसान होतें.' आणि पुढें हिंदुस्थानाच्या सर्व दुःखांचें खरें कारण बिनचूक शोधून काढून तें त्यांनीं अगदीं थोडक्या शब्दांत पुढें लिहिल्या प्रमाणें वर्णन केलें आहे. ते ह्मणतातः—

'कराची आकारणी आणि सरकारी खजिन्यांत पैसा आणण्याचे मार्ग यांच्या संबंधानें हिंदुस्थानाची स्थिति फार विलक्षण आहे. हा विलक्षणपणा लोकांच्या संवयी आणि नवीन फेरफारांविषयीं त्यांची अत्यंत नावड (नवीन करां-संबंधानें ही नावड विशेष प्रत्ययास येत असते.) यामुळेंच

केवळ झाला आहे असें नाहीं, तर हिंदुस्थानांतील राज्यकारभार परकी लोकांच्या हातीं असून राज्यकारभारांतील सर्व मुख्य जागा आणि सैन्याचा बराच मोठा भाग त्यांनीं व्यापला आहे. यामुळें, तो विलक्षणपणा आला आहे. देशांत परकी अंमल स्थापन झाला, आणि परदेशांत होणारा खर्च वाढला, त्यामुळें जे नवीन कर बसवावे लागणार ते जर लोकांस सहन झाले नाहींत तर त्यांपासून राज्याला धोका येण्याचा संभव आहे. हिंदुस्थानाच्या राज्यकारभाराची ज्यांना कांहीं माहिती नाहीं, अथवा, ज्यांचा त्यांशीं संबंध नाहीं अशा लोकांना हें संकट केवढें मोठें आहे त्याची कल्पना नाहीं. पण राज्यकारभाराची जबाबदारी ज्यांवर आहे त्यांस हें संकट अत्यंत भयंकर आहे, हें पुष्कळ दिवसांपासून कळून चुकलें आहे.'

हिंदुस्थानाच्या अवनतीचें खरें कारण लॉर्ड रँडॉल्फ चर्चिल यांनीं वर सांगितल्या प्रमाणें 'हिंदुस्थानांतील राज्यकारभार परकी लोकांच्या हातीं असून राज्य कारभारांतील सर्व मुख्य जागा, आणि सैन्याचा बराच मोठा भाग त्यांनींच व्यापिला आहे,' आणि 'देशांत परकी अंमल स्थापन झाल्यामुळें, आणि परदेशांत होणारा खर्च वाढत असल्यामुळें त्यासाठीं नवीन कर बसवावे लागत आहेत,' हें आहे आणि हें कारण १०० वर्षांपूर्वीं हिंदुस्थानांतील त्यावेळच्या श्रेष्ठ अधिकाऱ्यांनीं पूर्वींच वर्तवून ठेविलेलें आहे, हें विसरतां कामा नये. १७८७ सालीं सरजॉन शोअर यांनीं जो आपला प्रसिद्ध ठराव लिहिला, त्यांत लिहिलें आहे:—

'लोकांच्या श्रमानें पैदा होणाऱ्या जिनसांची मागणी वाढत चालली आहे असें गृहीत धरून त्या वाढलेल्या माग-

णीमुळें लोकांत जी उद्योगशीलता वाढली आहे तिच्या फायद्यांपेक्षां दूर देशीं राहणाऱ्या इंग्रज लोकांचा अंमल हिंदुस्थानावर बसल्यापासून तोटे अधिक झाले आहेत.'

दूर देशीं राहणाऱ्या परकी लोकांच्या अंमलामुळें जे तोटे होत आहेत ते दूर करण्यासाठीं इंग्रज राज्यकर्त्यांनीं कांहीं तरी इलाज योजले पाहिजेत.

आतां प्रस्तुत विषयासंबंधानें पहिल्यानें काय केलें पाहिजे याचा विचार केल्यास असें दिसून येईल कीं, कोशाध्यक्षांच्या सूचनांची पर्वा न करितां सृष्टिनियमांविरुद्ध १८९३ सालीं हिंदुस्थान सरकारानें जो कायदा पास केला तो रद्द केला पाहिजे. टांकसाळी बंद केल्यामुळें झालेले सर्व दुष्परिणाम टांकसाळी पुनः उघडून चांदीचें नाणें हवें तितकें पाडण्यांत येऊं लागलें ह्मणजे नाहींसे होतील. हिंदुस्थानची स्थिति सुधारण्याचा खरा मार्ग कोशाध्यक्षांनीं दाखवून दिलेलाच आहे, आणि तो राज्यकारभाराचा खर्च कमी करणें, आणि निरनिराळ्या खात्यांतील नोकरांची संख्या त्यांच्या कामाच्या प्रमाणावर ठरविणें, हा होय.

हिंदुस्थानांतील बड्याबड्या अधिकाऱ्यांचे पगार एक तृतीयांशानें कमी करण्यांत येऊन, त्यांच्या जागीं पुष्कळ सुविचारी लोकांनीं सुचविल्याप्रमाणें वरिष्ठ अधिकाराच्या जागा खेरीज करून इतर जागीं नेटिवांची नेमणूक व्हावी, आणि यूरोपांतील कामगिऱ्या, इंग्लंडच्या सार्वभौमत्वासाठीं केलेल्या लढाया वगैरे बाबतींचा जितका खर्च इंग्लंडच्याच कामासाठीं आणि फायद्यासाठीं होतो तितका खर्च इंग्लंडानें हिंदुस्थानास द्यावा, या गोष्टी दोन्ही देशांतील अधिकाऱ्यांच्या लक्षांत

येत नाहींत. आपले पगार कमी करून घेणें किंवा आपल्या जागा नेटिवांस देणें, किंवा हिंदुस्थानाच्या खर्चापैकीं वाजवी भागाचा बोजा विलायतेंतील लोकांस उचलण्यास सांगणें हें जड वाटेल खरें; पण हिंदुस्थान आणि इंग्लंड या दोन्ही देशांची भरभराटी आणि इंग्रजीअंमल कायम राखण्याचा एवढाच एक मार्ग आहे.

टांकसाळी पुन: सुरू केल्या ह्मणजे ताबडतोब मोठ्या महत्वाचे फेरफार होतील. (१) बाजारांतील नाण्याची टंचाई नाहींशी होऊन, तीमुळें व्यापाराला आलेली मंदी नाहींशी होईल. (२) राज्यकारभाराच्या खर्चांत खऱ्या कळकळीनें आणि काळजीपूर्वक काटकसर करण्यांत आली, आणि आत्मघातकी आणि निरर्थक लढाया टाळण्यांत आल्या, ह्मणजे हुंडणावळ कमी झाल्यामुळें खजिन्यांत जी खरोखर तूट येईल ती भरून काढण्याकरितां गरीब रयतेवर थोडासा जास्त कर बसवावा लागेल. पण रुपयास कृत्रिम किंमत देऊन खऱ्या रुपयाची आणि कृत्रिम रुपयाची किंमत यामधील तफावती (ही तफावत १६ उणें ६. १० पेन्सांइतकी देखील असूं शकेल.) इतकें एकंदर कराचें मान जें हल्लीं वाढविण्यांत आलें आहे त्या ऐवजीं लोक हे नवे कर खुषीनें देतील. हिंदुस्थानांतील अधिकाऱ्यांनीं, कोशाध्यक्षांनीं दिलेल्या सल्लया प्रमाणें चालून, नाण्यासंबंधी कायदा पूर्ववत् निर्दोष, आणि लोकांच्या विश्वासास पात्र होई असा करावा हें युक्त आहे.

सोन्याच्या नाण्यांचा थोडासा किंवा भरपूर सांठा करून सुवर्णचलन सुरू करण्याचा हिंदुस्थान सरकाराचा जो दुसरा विचार आहे तो त्यानें सोडून दिला पाहिजे. हा त्यांचा

विचार पूर्वी त्यांलाच पसंत नव्हता हें मागें सांगितलेंच आहे. तो हल्लींच्या काळीं अंमलांत आणणें अत्यंत गैर होईल. ह्या योजनेचा परिणाम काय होईल तो पहा. हिंदुस्थानांतील खालसा हद्दींत चांदीचा सांठा थोडा असून त्याच्या पुष्कळ पट देशी संस्थानांत आहे. ( ही सर्व चांदी बाजारांत विक्रीस येऊन तिची किंमत हल्लीं पेक्षां पुष्कळ कमी होणार आहे. आणि हा परिणाम अर्थशास्त्रांतील नैसर्गिक नियमांस अनुसरून होणारा नसून सरकाराच्या जुलमी वर्तनानें होणारा आहे. ) आणि सोन्याला फार मागणी आल्यामुळें त्याची किंमत खूप वाढून सरकाराला जें पुष्कळ सोनें खरेदी करावें लागणार आहे, त्यांत त्याचें पुष्कळ नुकसान होईल. आणि चांदी सवंग होऊन सोनें महाग झाल्यामुळें नाण्यांत फेर करितांना जें नुकसान होणार आहे तें पुनः रयतेच्या डोक्यावर बसणारच.

चांदीच्या नाण्या ऐवजीं सोन्याचें नाणें चालू करावयाचें, तें पुष्कळ खर्च केल्याशिवाय करितां येणार नाहीं; आणि तसा खर्च करावयाचा ह्मणजे हिंदुस्थानांतील अनाथ, दीनवाण्या आणि अर्थहीन लोकांवर क्रूरपणानें अत्यंत जुलूम चालविणें होय. विलायत खातीं होणारा खर्चाचा बोजा या फेरफारानें कमी होणार नाहीं असें सरकारानें एकदां कबूल केलें असतां, तो बोजा कमी होईल असें बळेंच गृहीत धरून लोकांवर हा जुलूम करण्यांत यावयाचा आहे हें विशेष आहे.

परकीय भांडवलवाले, सरकारी अधिकारी आणि इतर अधिकारी नव्हेत असे लोक, यांची या फेरफारानें एक सोय होणार आहे. याशिवाय त्यापासून अर्थशास्त्रदृष्ट्या दुसरा कोणताही फाय-

दां व्हावयाचा नाहीं. सुवर्णचलन सुरू करावयाचें असल्यास सोन्याचीं नाणीं पाडल्याशिवाय चालेल. चांदीचीं नाणीं भरपूर मिळत असलीं ह्मणजे झालें, असें कित्येकांचें मत आहे तें चुकीचें समजून हिंदुस्थान सरकारानें या पूर्वींच टाकून दिलेलें आहे. आणि कोशाध्यक्षांनींही तें चुकीचें असल्याबद्दल स्पष्टपणें कळविलें आहे.

हुंडणावळ कमी झाल्यामुळें हिंदुस्थानच्या लोकांचें हल्लीं जें नुकसान होत आहे तें वांचविण्यासाठीं हिंदुस्थानांत सुवर्णचलन सुरू करावें असें प्रतिपादन करण्यांत येत आहे. पण त्यानें इष्ट हेतू सिद्धीस न जातां हिंदुस्थानांतील दरिद्री रयतेचें अधिकच नुकसान आणि अधिकच दैना होईल. हें कसें तें मी सांगतों.

हुंडणावळ दर रुपयास २ शिलिंग प्रमाणें असतां हिंदुस्थानांतील रयतेला १ कोटी ६० लक्ष पौंड विलायतेस पाठविण्यास १६ कोट रुपयांचें धान्य पाठवावें लागत असे. हल्लीं हुंडणावळ रुपयास १ शिलिंग आहे असें स्थूलमानानें घेऊन चालल्यास हल्लीं विलायतेस पाठविण्यास लागणाऱ्या १ कोटी ९० लक्ष पौंडांबद्दल ३८ कोट रुपयांचें धान्य पाठवावें लागतें, ह्मणजे पूर्वींच्या मानानें दुप्पट झाली. वाचकांचा घोंटाळा होऊं नये ह्मणून या वादांतून चांदी हा शब्द आपण काढून टाकूं आणि त्याच्या ऐवजीं दुसरेंच कांहीं तरी योजूं. असें समजूं कीं, हुंडणावळीचा भाव २ शिलिंग असतांना विलायत खातीं खर्चाच्या १ कोट ९० लक्ष पौंडांबद्दल हिंदुस्थानांतील कर भरणारांस १० लक्ष टन धान्य पाठवावें लागत असें. पण तोच हुंडणा-

वळीचा भाव रुपयाला २ शिलिंग झाला ह्मणजे त्याला २० लक्ष टन धान्य पाठवावें लागतें. नाणें सोन्याचें असो किंवा चांदीचें, तांब्याचें असो, किंवा शिशाचें असो, तें सर्व एकच. १ कोटी ९० लक्ष पौंड विकत घेण्या पूरतें धान्य हिंदुस्थानांतील रयतेस विलायतेस पाठविलें पाहिजे. त्यांत १ छटाक कमी होतां कामां नये. सोन्याची किंमत कांहीं कमजास्त होईल तर मात्र वरील टनांच्या संख्येंत कांहीं कमी होईल. सोन्याचें नाणें सुरू केल्यानें त्याचा ज़बर खर्च मात्र रयतेवर बसणार आहे, आणि सोन्याला जास्त मागणी आल्यामुळें त्याची किंमत जास्तच वाढून विलायत ख़ातीं खर्चासाठीं रयतेला तितकें जास्त धान्य विलायतेस पाठवावें लागेल. हुंडणावळीमुळें होणारें रयतेचें नुकसान भरून काढण्याच्या गप्पा सर्व निष्फळ आहेत.

आतां, अशी, कल्पना करा कीं, १ कूळ सरकारास जमीन महसुलाबद्दल १० रुपये देत आहे. आतां सुवर्णचलन सुरू झाल्या नंतर सरकार १० रुपयांच्या ऐवजीं त्याजवळून काय घेणार? रुपयाच्या वर कल्पिलेल्या १ शिलिंगांला एक रुपया ह्या भावानें १० रुपयांचे १० शिलिंग होतात. तेवढेच सरकार घेणार कीं जुलमानें २ शिलिंगांला रुपया प्रमाणें ठरवून एक पौंड घेणार, किंवा रुपयांतील चांदीच्या किंमतीपेक्षांही जास्त रकम घेणार? ठोकळ मानानें जमीन महसुलाचें उत्पन्न ८९ कोट रुपये आहे. तेव्हां सुवर्नचलन सुरू झालें ह्मणजे सरकार कर भरणारांपासून त्या बद्दल काय घेणार? रुपयाला १ शिलिंग या भावानें होणारे सवा चार कोटीच पौंड घेणार कीं रुपयाला २ शिलिंग

प्रमाणें कर भरणारांना पूर्वीपेक्षां दुप्पट धान्य विकावयास जाऊन दुप्पट महसूल गोळा करणार? जर दुसरा प्रकार अमलांत येणार असेल तर सुवर्णचलनापासून हिंदुस्थानाच्या करभरणारांचा काडीचा तरी फायदा होईल काय?

सुवर्णचलन सुरू झालें ह्मणजे युरोपियन लोकांचा पगार कोणत्या तऱ्हेनें देण्यांत येणार? समजा एखाद्या युरोपियनाला एक हजार दरमहा आहे. तर त्याला सरकार काय निव्वळ ९० पौंडच देणार. पण ॲंग्लोइंडियनस् १००: पौंडांत एक कवडीही कमी घेणार नाहींत हें त्यांच्या चळवळी वरून उघड आहे.

युरोपियन अधिकाऱ्यांच्या अशा चळवळीपुढें हिंदुस्थान सरकार गर्भगळित होऊन जाईल, आणि नेटिव लोकांचें नुकसान होत असलें तरी यूरोपियन लोकांस आपलें औदार्य दाखवील हें मागील अनुभवावरून सिद्ध होत नाहीं काय? बिनसनदी यूरोपियन नोकरांची मागणी कबूल करून त्यांनीं (फरलो) रजा घेतली असतां रुपयाची किंमत १ शिलिंग किंवा ६ पेन्स झाली तरी देखील त्यांचा पगार दररुपयास १ शिलिंग ९ पेन्स प्रमाणें विलायतेस पोंचता करण्याचें मागेंच पत्करिलें आहे. हल्लीं निदान आपला निमा पगार दर रुपयास १ शि. ९ पे. प्रमाणें आपणांस मिळावा ह्मणून एकंदर युरोपियन नोकरांनीं खटपट चालविली आहे. रुपयाची किंमत १ शि. पर्यंत किंवा ६ पे. पर्यंत गेली तरी देखील हुंडणावळीच्या इतक्या जबर दराप्रमाणें आपला पगार उपासमार काढणाऱ्या रयतेकडून वसूल करून घ्यावा असें या अंग्लो-इंडियन मंडळीच्या मनांत खरोखरच आहे काय? या दोन

दरांमधील तफावत कोणाला द्यावी लागणार आहे? स्वतंत्र विचारी सरकार प्रजेवर पाहिजे तसा जुलूम करील, पण ब्रिटिश लोक आणि पार्लमेंट त्यांस खुशाल जुलम करूं देईल काय?

सोन्याचें नाणें सुरू व्हावें ह्मणून चळवळ करणारांत व्यापारी लोकांची सर्वांवर ताण आहे. रयतेचें नुकसान करून सोन्याचें नाणें सुरू करावयाचें तें व्यापाऱ्यांचें व्यापारांतील जोखीम नाहींसें करण्याकरितां! व्यापारांतील नफा मात्र हे आपल्या खिशांत टाकणार! पण व्यापारी भानगडींतील जोखीम मात्र रयतेनें पतकरिलें पाहिजे. ह्मणजे रयत दारिद्र्यानें गांजली तरी हरकत नाहीं, पण आपलें उखळ पांढरें करून बसलेल्या व्यापाऱ्यांना चट्टा बसतां कामानये. सोन्याचें नाणें तरी हिंदुस्थानाचें कल्याण करो ह्मणजे झालें!

हिंदुस्थानांतील लोक लॉर्ड लॉरेन्स यांच्या मताप्रमाणें अर्ध्या भाकरीवर राहत आहेत, आणि लॉर्ड क्रोमर यांच्या मताप्रमाणें दारिद्र्यानें आतिशय गांजले आहेत. अशा लोकांवर सोन्याचें नाणें सुरू केल्यानें काय परिणाम होणार आहेत ते वर सांगितलेच आहेत. त्याहून आधिक विस्तार करण्याची गरज नाहीं. हिंदुस्थानांतील गरीब लोकांच्या तोंडचें १९ कोटि किंवा त्यांहूनही अधिक किंमतीचें धान्य पगार, भत्ता, पेनशन वगैरे रूपांनीं विलायतेस दरवर्षी जात असून, देशांतील रयतेची तरतूद त्या मानानें कमी होत आहे, हें आमच्या ॲंग्लोइंडियन मित्रांनीं लक्षांत ठविलें पाहिजे. ही गोष्ट लक्ष्यांत घेऊन तिचा परिणाम हिंदुस्थाना-

वर काय होत आहे याचा त्यांनीं कधींच विचार करावयास नको काय?

विलायतेंतील कर देणारांसमोर अशाच चेष्टा करण्याचें जर तेथलें सरकार मनांत आणील तर तें कधींही चालावयाचें नाहीं. पण हिंदुस्थानांत सरकार प्रथम, अधिकारी आणि सरकारी नौकर नव्हत अशा लोकांचें हित पाहतें, आणि परकी लोकांचा हितसंबंध जेथें असेल तेथें नेटिवांच्या हिताचा विचार क्वचित् करितें. आणि तो केलाच तर मागाहून करितें.

लॉर्ड मेयो यांनीं पुढील उद्गार काढिले आहेत:—'मी जें जें कांहीं करितों त्यांत माझा एकच उद्देश असतो. हिंदुस्थानांतील लोकांसंबंधानें आपलें जें कर्तव्य आहे तें आपण बजाविलें नाहीं असें मला वाटतें. कोट्यावधि रुपये जे देशांतील रयतेस सुधारण्यास आणि सुस्थितीस आणण्यासाठीं खर्च करितां आले असते, ते राज्य मिळविणारांच्या हिताकडे लावले गेले आहेत. आह्मी आजपर्यंत बरेंच हित केलें आहे, पण आह्मांला आणखी पुष्कळ करितां येईल. आणि परकी लोकांच्या हितसंबंधाच्या कामीं कमी पैसा खर्च करून रयतेच्या हितासाठीं जास्त खर्च करूं लागल्याशिवाय तसें घडणें अशक्य आहे.' हें ह्मणणें अगदीं खरें आहे.

दुसऱ्या एका प्रसंगीं लॉर्ड मेयो साहेब ह्मणाले:—'देशांतील लोकांसंबंधानें आपणांस विचार केला पाहिजे. कारण हिंदुस्थानांतील लोकांचें कल्याण करणें हा आमचा मुख्य उद्देश आहे. आपण या देशांत राहून जर त्यांचें कल्याण करीत नाहीं तर आपण येथें मुळींच राहूं नये.'(सर डब्ल्यु. हंटरकृत 'लॉर्ड मेयोचें' चरित्र.)

सरकाराच्या हल्लींच्या आपमतलबी राज्यपद्धतींत

परकीलोकांच्या हिताचा मात्र विचार करण्यांत येतो. आणि त्यापासून इंग्लंडचें जरी कांहीं अंशीं हित होतें, तरी त्यानें हिंदुस्थानाचा फार तोटा होतो. लॉर्ड मेयो यांच्या स्तुत्य विचारास अनुसरून लोकांचें खरोखर कल्याण करण्याचा हेतू जर सरकारानें मनांत आणला तर त्या योगानें खुद्द इंग्लंडाचेंच हल्लींपेक्षां अधिक हित होईल. आणि जें हिंदुस्थान इंग्लंडास नुकतेंच शिव्याशाप देऊं लागलें आहे ( या गोष्टीकडे तुह्मी पाहिजे तितकें दुर्लक्ष करा ) तेंच इंग्लंडास दुवा देऊं लागेल आणि त्याचा फायदा होईल. लॉर्ड मेयोनीं ह्मटल्याप्रमाणें करून पहा, ह्मणजे व्यापार, कराची आकारणी, जमाबंदी, चलन, दुष्काळ, प्लेग, निरर्थक लढाया, प्रजेमधील दारिद्र्य आणि असंतुष्टता हीं नाहींशी होऊन येणाऱ्या सर्व अडचणी दूर होतील. मागें इंग्लंडच्या हातून हिंदुस्थानाचें रक्त शोषून त्यास अवनतीस आणण्याचें काम झालें आहे, हें फार वाईट झालें आहे. पुढें तरी हिंदुस्थानाची भरभराट करून त्यास सुस्थितीस नेण्याचें काम इंग्लंडाच्या हातून होवो. तसें झालें ह्मणजे अपल्या सुव्यवस्थित राज्यपद्धतीसाठीं आणि पाहिजे त्या खऱ्याखऱ्या सुधारणा करण्यासाठीं लागेल तितका पैसा खर्चण्याचें सामर्थ्य हिंदुस्थानास येईल.

लॉर्ड मेयो यांचे जे उद्गार वर दिले आहेत ते खरे असून लक्षांत ठेवण्यासारखे आहेत. हिंदुस्थानांतील सर्व वाईट गोष्टींचें आणि त्याच्या दुःखांचें कारण त्यांत आहे. तसेच राजकीय बाबतींत ज्या गोष्टींस इंग्लंडास फार भ्यालें पाहिजे, त्या गोष्टी आणि त्या निवारण करण्याचे उपाय, हेही लॉर्ड मेयो यांच्या उद्गारांत आलेच आहेत.

# कायम धारेबंदी.

(लेखक, मि. जॉन ॲडॅम्स, एम्. ए., बॅरिस्टर ॲट लॉ.)

राष्ट्रीय सभेच्या कार्यक्रमांत धारेबंदीच्या विषयास बरेंच महत्व देण्यांत आलेलें आहे, आणि तें योग्यच आहे. राष्ट्रीय सभेच्या बाळपणच्या कालामध्यें या विषयाची चर्चा याहून अधिक व्यापक अशा विषयाबरोबर होत असे. तो विषय 'हिंदुस्थानांतील लोकांचें दारिद्र्य' हा होय. हिंदुस्थानांतील लोकांचें दारिद्र्य हा शब्दप्रयोग 'हिंदुस्थानचें दारिद्र्य' या प्रचारांतील शब्दप्रयोगाऐवजीं मी मुद्दामच केला आहे. याचें कारण हिंदुस्थानदेश संपन्न आहे, त्यांत पुष्कळ संपत्ति खरो-खर भरलेली आहे, आणि त्याच्याठायीं पुष्कळ संपत्ति उत्पन्न करून 'देतां किती घेशील दों करानें' असें ह्मण-ण्याचें सामर्थ्य आहे. तूर्त प्रश्न असा आहे कीं, देश जर श्रीमंत आहे तर तेथील लोक गरीब कां आहेत? सन १७७३ पासून सन १८५८ सालीं हिंदुस्थानचा राज्यकारभार खुद्द राणी-सरकारकडे जाईपर्यंत दर २० वर्षांनीं राज्यकारभाराची जशी चवकशी होत असे, तशी या महत्वाच्या विषयाची चवकशी राणी सरकाराकडून एखादें मंडळ नेमवून त्या मार्फत आपण करवूं अशी राष्ट्रीय सभेच्या प्रतिनिधींना आरंभीं आरंभीं मोठी उमेद होती. इंडिया ऑफिसाकडे राज्यकारभाराचीं सूत्रें आल्यास एक पिढी होऊन गेली; पण तेवढ्या अवकाशांत राज्यकार-

भाराची तपासणी किंवा चवकशी कांहींच झाली नाहीं. आणि राष्ट्रीय सभेनें चवकशी होण्याची आशा देखील आज बरेच दिवस सोडून दिली आहे. यामुळेंच राष्ट्रीय सभेनें, लोक दरिद्री कां होतात आणि ते तसेच कां राहतात, याचीं मुख्य मुख्य नेमकीं कारणें दाखवून देण्याचा क्रम स्वीकारिला आहे. शेतकीच्या उत्पन्नांतून फार मोठा भाग स्वतःसाठीं घेऊन सरकार त्याचा व्यय बहुतेक अनुत्पादक कामांकडेच (निदान हिंदुस्थानच्या संबंधानें तरी) करितें हें ह्या कारणांपैकीं एक मुख्य कारण आहे असें आमचें मत आहे. आपला खर्च भागविण्यासाठीं सरकार ज्या प्रमाणें पेढ्यांवर हवाला देतें त्याप्रमाणें शेतकीच्या उत्पन्नावर सरकार हवाला देत सुटलें आहे. या हवाल्यांस कायद्याचें किंवा अर्थशास्त्राचें कांहीं बंधन नसल्यामुळें त्यांच्या रकमा सालोसाल वाढत चालल्या आहेत. या प्रकारापासून पुढें नुकसान झाल्याशिवाय राहावयाचें नाहीं. पेढीची पुंजी सरली ह्मणजे तिला हुंड्यांचा ऐवज पटावितां येत नाहीं, आणि तिचें दिवाळें वाजतें. तसाच प्रकार येथेंही आहे. सरकार पुढील उत्पन्नाच्या आशेवर हुंड्या लिहून पैसा खर्च करून बसेल; पण केव्हांना केव्हां तरी या हुंड्यांची रक्कम परत देण्याची वेळ येऊन ठेपेल. आणि त्यावेळीं नव्या हुंड्या कोणीच स्वीकारणार नाहीं. या कारणामुळेंच धारेबंदीच्या विषयास राष्ट्रीय सभेनें आपल्या कार्यक्रमांत अग्रस्थान दिलें आहे.

हा विषय फार महत्वाचा आहे असें समजून त्यावर राष्ट्रीय सभेनें सदोदित चर्चा चालू ठेविली आहे. तिच्या निरनिराळ्या बैठकींत या विषयाची कसकशी चर्चा होत गे-

ली हें दाखविण्याचा माझा विचार नाहीं. पण या विषयाकडे ज्या कित्येकांनीं लक्ष दिलें त्यांच्या अभिप्रायांपैकीं जे कित्येक विशाष महत्वाचे आहेत ते वाचकांपुढें मांडावे असें माझ्या मनांत आलें आहे. राष्ट्रीय सभेसंबंधानें पुढें येणाऱ्या निरनिराळ्या प्रश्नांचा उहापोह करणें हा या निबंधावलीचा उद्देश असल्यामुळें, राष्ट्रीय सभेचे या प्रश्नांसंबंधानें काय विचार आहेत, आणि तींत बोलणारांनीं काय ह्मटलें आहे, हें पाहणें अवश्य आहे असें मला वाटतें. हे निबंध ऐतिहासिक माहितीनें भरलेले असून त्यांत सर्व विषयांचें सार थोडक्यांत आलें आहे. त्यांत व्यक्तीशीं कोठेंही संबंध आणला नाहीं, किंवा वाद वाढविण्याचा प्रयत्न केला नाहीं. आह्माला आणि आमच्या सारख्या इतरांना नेहमीं असें सांगण्यांत येतें कीं, तुमचे विचार बरोबर आहेत; पण आह्माला राष्ट्रीय सभेचे विचार पसंत नाहींत. या आक्षेपकांना राष्ट्रीय सभेचीं मतें काय आहेत हें माहित नसतें. पण जीं मतें बरोबर आहेत असें आपण ह्मटलें तीं निराळीं, आणि राष्ट्रीय सभेचीं मतें निराळीं, असें ते घेऊन चालतात. जीं पुढें मी कांहीं मतें नमूद करणार आहें तीं माझीं स्वतःचीं ह्मणून नाहींत. या विषयासंबधानें ज्यांनीं आपले अभिप्राय प्रगट केले आहेत त्यांत ना. एस. सुब्रह्मण्य आय्यर यांचा अभिप्राय फार उत्तम आहे; आणि अगदीं थोडक्या पण मोठ्या सुंदर आणि मनोवेधक शब्दांनीं तो व्यक्त केलेला आहे. सन १८८६ सालीं कलकत्ता येथें भरलेल्या दुसऱ्या राष्ट्रीय सभेच्या बैठकीच्या वेळीं हिंदुस्थानांत लोकनियुक्त संस्था स्थापन करण्याच्या अवश्यकतेसंबंधानें ठराव पुढें आणतांना त्यांनीं पुढें लिहिल्या प्रमाणें भाषण केलें. ते ह्मणाले:—

" हिंदुस्थानांत दारिद्र्य आहे हें सिद्ध करून दाखविण्यास निदान मद्रास इलाख्याचें उदाहरण घेतलें तरी त्याविधानाची सत्यता सिद्ध करून दाखवितां येईल. कांहीं काळापूर्वी मी ज्या इलाख्यांत राहातों तेथें जमीनदारीची पद्धत चालत नव्हती. रयतवारीची पद्धत तेथें चालत असल्याबद्दल सरकारी अधिकारी मोठी फुशारकी सांगतात. रयतवारी पद्धतीचा इतिहास पाहिल्यास असें दिसून येईल कीं, जमीनदारी पद्धतींत कितीही दोष असले तरी ती पतकरेल, पण ही रयतवारीची पद्धत नको. कित्येकांस वाटतें त्याप्रमाणें जमीनदार लोक आपल्या कुळांकडून मिळेल तितका पैसा काढून घेण्याचा प्रयत्न करीत असतील; व कुळांच्या हितार्थ टेनन्सी ॲक्टासारखा एखादा कायदा करून जमीनदारांच्या जुलमास आळा घालितां येईल; पण मुलकी अंमलदारांच्या जुलमांतून रयतेस सोडविण्यासाठीं एकाही कायद्याचा उपयोग होणार नाहीं. तसेंच जमिनींवरील सारा वाढविण्याचा सरकाराचा हक्क कायद्यानें मर्यादित करावा असें ह्मणणारा एकतरी सरकारी नोकर आमच्या इलाख्यांत आढळेल कीं नाहीं याची शंकाच आहे."

अलाहाबाद येथें नुकतीच दहा वर्षांपूर्वी (इ० स० १८८८ त) चवथी राष्ट्रीय सभेची बैठक झाली. त्यावेळीं ह्या महत्वाच्या प्रश्नाचा काळजीपूर्वक व विचारपूर्वक निकाल करण्यासाठीं ठरावही पसार करण्यांत आला. तो ठराव येणें प्रमाणें:—

" मद्रास, मुंबई व इतर प्रांत ह्यांत जमिनीच्या कायम धारेबंदीच्या सुरवातीसंबंधाचा विषय तेथील स्थानिक राष्ट्रीय सभा मंडळाकडे सोंपवावा. आणि त्याचा परिणाम त्यांच्या

प्रदेशांत कसा काय होईल ह्याविषयीं माहिती इ०स० १८८९ सालीं भरणाऱ्या राष्ट्रीय सभेपुढें सादर करावी"

पण अशा तऱ्हेची माहिती सादर करण्यांत आली नव्हती. मात्र इ० स० १८८९ सालीं मुंबईस ह्या बाबतींत एक पाऊल पुढें पडलें हें पुढील महत्वाच्या ठरावावरून दिसून येईल. तो ठराव येणेंप्रमाणें:—

"पूर्णपणें वसलेल्या आणि उत्तम प्रकारची लागवड असलेल्या प्रदेशांत क्षणमात्र विलंब न होतां सरकारच्या महसूलांत चिरस्थायीपणा व कायमपणा येईल अशा तऱ्हेनें कायम धारेबंदीच्या विषयाचा व्यावहारिकरीत्या विचार व्हावा एतदर्थ सरकारची विनंति करण्यांत यावी."

वरील ठराव फारच महत्वाचा होता. कारण कीं, त्यावरून सक्त टीका करण्याचा त्यावेळचा मुद्दा किती निराळा होता आणि हल्लींचा बदललेला मुद्दा किती निराळा आहे हें ह्यावरून कळून येईल. हिंदुस्थान सरकार व स्टेट सेक्रेटरी हे नूतन 'सुधारलेली' कायम धारेबंदी करण्याच्या कामीं एक मताचे होते असें ते मानित होते; आणि त्या कायम धारेबंदीमुळें जमिनीची प्रतवारी आणि धान्याची प्रतवारी करण्याचें अगदीं बंद करण्यांत येणार होतें. वर सांगितल्याप्रमाणें स्थिति असून स्थानिक सरकारांकडून मात्र ह्या नूतन 'सुधारलेल्या' धारेबंदीची रीत सुरू करण्याच्या कामीं दिरंगाई व आळस होत होता, आणि इष्ट दिशेनें प्रयत्न होणेंच कायतें जरूर होतें, अशी लोकांची कल्पनाही झाली होती. इसवी सन १८८२ सालीं हिंदुस्थान सरकारानें ठराव प्रसिद्ध केला, तो इसवी सन १८८३ मध्यें आपल्या खलित्यांत स्टेट सेक्रेटरींनी

पसंत केला आणि मुंबई व मद्रास येथील सरकारांनीं ह्याचें विवरण केलें, ह्या ठरावामुळें विश्वास उत्पन्न झाला. हा विश्वास कोणत्या भक्कम पायावर उत्पन्न झाला होता हें खालील उताऱ्यांवरून समजून येईल. हिंदुस्थान सरकार ह्मणतें कीं,–

'पूर्ण मुदतीनें धारेबंदी करण्याची सुरू असलेली पद्धत अतिशय अनर्थोत्पादक आहे. त्यांतले ठळक ठळक अनर्थ ह्मटले ह्मणजे, अनिश्चितपणामुळें उत्पन्न होणारें अस्वास्थ, बेहद्द धारा वाढण्याचें भय, जमिनीच्या लागवडीसंबंधानें आणि उत्पन्नासंबंधानें बारकाईनें चौकशी करण्यापासून लोकांस होणारा त्रास, व सरकारास होणारा खर्च, आणि सुधाराई करण्याच्या कामीं होणारा प्रतिबंध, हे होत. कायम धारा ठरविण्यांत येऊन सरकारी धाऱ्यांत नुकसान होणार नाहीं आणि असलेले अनर्थ टळतील असें त्यावेळीं वाटलें होतें. ह्मणूनच असें ठरविण्यांत आलें होतें कीं, प्रथम जमिनीची लागवड करणारानें अथवा मालकानें जमिनींत सुधारणा केल्यास त्याचा सारा वाढवूं नये; अशा तऱ्हेचा पूर्वींचा नियम असून तो, अर्धा अर्धा भागानें सारा घेण्यांत येई यामुळें अंमलांत नव्हता, तो नियम पूर्णपणें पाळण्याचें सुरू करावें. ह्यानियमास अनुसरून, आणि अनुभवांनीं जर प्रस्तुतचा धारा विचारास धरून योग्य व न्याय असेल तर शेतकीची सामान्य पाहणी करण्याचें कारण नाहीं. धारा वाढवावयाचा तर तीन गोष्टींचा विचार करण्यांत यावा–लागवडीचा विस्तार, सरकारच्या सुधारणांमुळें झालेली उत्पन्नाची वाढ, आणि मर्यादितपणें भावांची वाढ. हीं तत्वें सामान्यतः स्थानिक सरकार व स्टेट-सेक्रेटरी यांस मान्य आहेत. आणि ह्मणून इतःपर तीं सर्व

हिंदुस्थानभर मुदती मुदतीनें होणाऱ्या धारेबंदीच्या फेरतपासणीचे वेळीं अंमलांत आणण्यांत येतील.'

मुंबईतील जमीन महसुलाच्या कायद्यांत सुधारणा करण्याकरितां इसवी सन १८८९ च्या ३ नंबरच्या मसुद्याच्या दुसऱ्या वाचनाच्या वेळीं मुंबईत जो वादविवाद झाला त्याप्रसंगीं प्रस्तुतचे इंडिया कौन्सिलचे सभासद सर जेम्स पील हे ह्मणाले:—

" स्थानिक कायद्यांत उच्चाज्ञेनें ठरविलेल्या ठरावांव्यतिरिक्त ह्याबाबतींत ह्या सरकारास कांहीं एक करतां यावयाचें नाहीं. टाळवेल तितकी नवीन प्रतबंदीही टाळिली पाहिजे. सर्व हिंदुस्थानास लागू करण्यासाठीं, शेतकीच्या सुधारणेसाठीं आणि सुरक्षितपणासाठीं, ह्मणून श्रेष्ट सरकारानें कांहीं सामान्य तत्वें ठरविलीं आहेत. .... .... .... .... .... .... ...."

इसवी सन १८८३ मध्यें हिंदुस्थानसरकारच्या मनांत पुढील उद्देश होते:—

(१) प्रत्येक प्रांतांत महसुलाची वेळ नक्की केलेली असावी. ह्या वेळेनंतर जमिनीची मोजदाद फिरून करण्यांत येऊं नये.

(२) जमिनीच्या महसुलाचा पुढील धारा अशाच नियमानुसार आणि रीतीनें घेण्याचें ठरवावें कीं, जमिनीच्या मालकांना साधारण ठोकळ मानानें आणि अधिकारी वर्गाच्या मध्यस्तीशिवाय आपला धारा किती वाढेल हें ठरवितां यावें.

(३) धारा अशा रीतीनं ठरविला पाहिजे कीं, जमीनदारांना आपल्या मालमत्तेवर (शेत जमिनींत) सुधारणा केल्यामुळें झालेला सर्व फायदा मिळवितां यावा.

मद्रास इलाख्यांत महसूल मंडळाच्या आज्ञा पत्रिकेंत खालील सूचना होत्या:—'आणखी, रयतेला ही गोष्ट समजून

सांगण्यांत येत आहे कीं, जमिनीची प्रतबंदी होणार नाहीं किंवा धान्याच्या नवीन किंमती ठरविण्यांत येणार नाहीं, तर किंमतीला धरून पूर्णपणें धान्याच्या भावाची फेर पहाणी करण्यांत येईल. सरकारापासून भांडवल घेऊन रयतेनें जर कांहीं शेतांत सुधारणा केली असली व त्यामुळें जास्त फायदा झाला तरी त्यामुळें धान्याची रक्कम वाढविण्यांत येणार नाहीं.'

आणि मद्रास सरकारानें इसवी सन १८८९ च्या जुलैच्या ४ थ्या तारखेस हुकूम केला कीं:—

'जमिनीची प्रतबंदी करण्याची सरकारची इच्छा नाहीं हें तत्व वरचेवर ठरविण्यांत आलें आहे, आणि तें व्यवस्था पत्रकांत उघडपणें स्पष्ट केलेलें आहे. व्यवस्था पत्रकांत असलेलें त्याच्या उलट विधान चुकीचें आहे.'

इसवी सन १८९० त तो मुद्दा थोडासा बदलावा लागला. इसवी सन १८८२ मध्यें झालेल्या "सुधराई व्यवस्थे"नुसार हिंदुस्थानांतील अधिकाऱ्यांचा चालण्याचा क्वचितच विचार होता. आणि लोकांचे हक्क प्राचीन आणि बळकट पायांवर उभारलेले आहेत ही गोष्ट अधिकारी वर्गास सुचविणें अत्यावश्यक होतें. वर सांगितलेली स्थिति ज्यामुळें झाली तें तत्व नवीन नव्हतें. पण अनुभवानें तें सुचविण्यांत आलें होतें. वीस वर्षांपूर्वीं हा विषय सर्वतोमुखीं झालेला होता. वीस वर्षांपूर्वींच हिंदुस्थानचा राज्यशकट हांकलणारांनीं अभिवचनें दिलीं. तीं मात्र अद्याप पूर्ण करण्यांत येत नाहींत. ह्मणूनच इसवी सन १८९० सालीं भरलेल्या कलकत्ता येथील राष्ट्रीय सभेनें पुढील ठराव पसार केला: -

'इसवी सन १८६२ सालीं महाराणी सरकाराच्या स्टेट सेक्रेटरीनीं पाठविलेल्या खलित्यानें लोकांना आशा लागली आणि इसवी सन १८६९ मध्यें प्रसिद्ध झालेल्या खलित्यांत तीं तत्वें पुन्हा एकवार कायम करण्यांत आलीं, त्यांत नुकत्याच वसाहत झालेल्या प्रदेशांत कांहीं एका प्रकारच्या अटी पूर्ण झाल्या ह्मणजे कायम धारेबंदी सुरू होईल असें अभिवचन आहे आणि त्या अटी पूर्ण होऊन बराच काळ लोटला तरी कायम धारेबंदी झाली नाहीं. ह्या सर्व गोष्टी ध्यानांत आणून राष्ट्रीय सभेकडून नम्रता पूर्वक अशी विनंति करण्यांत येत आहे कीं, हिंदुस्थान सरकारानें विलंब न लावतां आतां तरी आपला मान राखण्यासाठीं ह्मणून कायम धारेबंदीचा विषय हातीं घ्यावा, आणि २९ वर्षांहून जास्त वर्षांपूर्वी महाराणी सरकारचे स्टेट सेक्रेटरी यांणीं दिलेल्या चोख अभिवचनाप्रमाणें जमिनीच्या सरकारी वसुलांत चिरस्थायीपणा व कायमपणा येईल अशाच तऱ्हेनें त्याचा व्यावहारीकपणें निकाल करावा."

ह्या ठराव रा० रा० आर. एन्. मुधोळकर ( वऱ्हाडचे ) यांणीं पुढें आणिला व त्यावर अतिशय मजेचा वादविवाद झाला. शेतकीसंबंधी झालेली संकटसीमा शेतकरी लोकांचें जमिनीवरील दडपण, आणि तेंही विशेषत: सर्वांचें लागवड करविलेल्या जमिनीवरील दडपण ह्याचें फळ होय. अशा तऱ्हेची संकट परंपरा प्राप्त झाली ह्मणजे सरकार उदारपणानें विचार करतें व भावीकालासाठीं उदार अभिवचनें देतें. पण ती संकटाची वेळ गेली आणि ती भिती संपली ह्मणजे तीं वचनें विसरलीं जातात आणि मग किरकोळपणें नफा मिळविण्याचें धोरण

अंगीकारण्यांत येतें. इसवी सन १८६० सालीं वायव्य प्रांतांतील दुष्काळामुळें इसवी सन १८६२ सालचें काम हातीं घेण्यांत आलें होतें. त्या वर्षी पडलेल्या दुष्काळाची चौकशी करण्याकरितां एक मंडळ (कमिशन) नेमण्यांत आलें होतें. त्या मंडळाच्या अध्यक्षांनीं आपल्या खलित्यांत (रिपोर्टांत) पुढें दिल्याप्रमाणें लिहिलें आहे.

"हल्लींच्या असलेल्या व्यवस्थेपूर्वीं शेतकीची स्थिति कशी होती हें मी पूर्वींच सांगितलें आहे, आणि समाज खालावत जाई अशा कांहीं गोष्टी आहेत त्यांची क्वचितच कल्पनाही करतां येईल हें कोणीही सांगेल. सार्वजनिक कर आणि स्वतंत्र अडचणी ह्याच्या मोठ्या आणि असमान भारा खालीं सर्व दडपून गेले आहेत. तरी त्या आधीं क्वचितच भयंकर असा धारा, सहज समजले जाणारे आणि नोंदलेले हक्क, पुष्कळ काळपर्यंत टिकणारें गहाण, आणि असें गहाण चालू असे पर्यंत सर्व फायदा, ह्या गोष्टी अस्तित्वांत होत्याच. ह्या सामाजिक काटकसरी सारख्या नाजुक बाबतींत फरक पडल्याचा साहजिक झालेला परिणाम हळुहळु दृष्टोत्पत्तीस येत आहे. दुष्काळाचा भार नाहींसा करण्याकरितां जमिनीची किंमत वाढविणें हें मोठें साधन झालेलें आहे. लोकांच्या मागण्या, हक्कांचा सुरक्षितपणा, धाऱ्याविषयीं सामान्यतः नेमस्तपणा, हक्कांची नोंद, ह्यांच्या चिरस्थायीपणांत उशीर झाल्यामुळें वरील परिणाम घडून आलेला आहे. यावरून असें अनुमान निघतें कीं, ह्या परिणामांची अभिवृद्धि होण्यास व ते चिरकाळ चालण्यास त्याच हितावह व फायदेशीर मार्गानें गेलें पाहिजे. उत्तम तत्वांचा अंशतः अंगीकार केल्यानें जें हित झालें आहे त्यावरून पुढें

पाऊल टाकण्यास उत्तेजन व त्या तत्वांचा न्यायीपणा हीं दोन्ही समजून येतात. आणि सरकारचें हित आणि लोकांचें हित सारख्याच प्रमाणानें बळकट होईल व वाढेल असा अगदीं खातरीपूर्वक मार्ग ह्मटला ह्मणजे एक आहे. तो मार्ग ह्मणजे मला वाटतें पहिला आणि पहिल्या प्रतीचा आहे. जमिनीचा धारा कायम करणें आणि प्रस्तुतची व्यवस्था बदलून कायमची व्यवस्था करणें, हाच तो मार्ग होय, व त्याचा आपण विचार करावा असें मी सविनयपणें सुचवितों."

सर जार्ज एडमन्स्टोन, ना. एडमंड ड्रमंड आणि सर विल्यम मूर ह्या तिघां लेफ्टेनन्ट गव्हरनरांनीं आणि अनेक अनुभविक अधिकाऱ्यांनीं ह्या मार्गाची प्रशंसा केली. त्यावेळचे गव्हरनर जनरल लार्ड कॅनिंग यांस तो मार्ग पसंत पडला होता; इतकेंच नव्हे, तर ह्या हितप्रद मार्गास सहाय्य करण्यासाठीं त्यांनीं पड जमिनीची विक्री जमिनीवरील कर न घेतां फुकट करावी आणि जमिनीची महसुलखंडणी सोडून देण्याविषयीं परवानगी द्यावी, म्हणून सुचविलें.

"कौन्सिलदार व गव्हरनर जनरल ह्यांस दोहोंपैकीं कोणताही एक मार्ग स्विकारिला तरी परिणाम सर्व प्रकारें सुखकरच होईल असें निस्संशय वाटत आहे. पड जमिनीबद्दल तर प्रश्नच नाहीं. जमिनीचा महसुल खंडणी देऊन सोडण्याविषयींच्या परवानगीनें फायदा होईल किंवा कसें याविषयीं कौन्सिलदारांस व गव्हरनर जनरलांस थोडासा संशय आहे. त्यांस असें वाटतें कीं, सरकारच्या पैसे वसूल करणाऱ्या अधिकारी वर्गानीं घातलेल्या अडचणींतून थोडीशी मुक्तता, आणि स्थावर मालमत्तेस अधिक सुरक्षितपणा हीं आलीं ह्मणजे एक

निराळाच वर्ग उत्पन्न होईल व त्यांत भिन्न ज्ञाति आणि धर्मपंथाचे लोक असले तरी ते सार्वभौम ब्रिटिश सत्तेशीं सदोदीत प्रेमपूर्वक वागतील. ह्या मार्गानें योग्य नियमानुसार चालल्यास राष्ट्राच्या सार्वजनिक महसुलीमध्यें बरीच सुधारणा होईल."

यावरून हें उघड आहे कीं, लार्ड क्यानिंग ह्यांनीं आपल्या पूर्वीच्या व्हाईसरायाप्रमाणें–लार्ड कार्न वालिस प्रमाणें–कायम धारेबंदीची अर्थशास्त्रानुसार व राजनीतिशास्त्रानुसार योग्य किंमत ओळखिली होती. परंतु ह्या वेळेच्या स्टेट सेक्रेटरीचें मत बाहेर पडावयाचें होतें. अखेर वेळेचे स्टेट सेक्रेटरी सर चार्ल्स वुड ( जे पुढें लार्ड हालिफॅक्स झाले ) ह्यांनीं इसवीसन १८६२ च्या जुलै महिन्यांत एक खलिता लिहिला आहे. तो खलिता हिंदुस्थानांतील जमिनदारांनीं सनदेप्रमाणें अति महत्वाचा मानिलेला आहे, आणि अनेक वेळ तो मान्य करण्यांत आलेला आहे. त्यांत स्टेट सेक्रेटरी याणीं पुढीलप्रमाणें लिहिलें आहे.

"या सर्व गोष्टींचा काळजीपूर्वक विचार केल्यावर राणीसरकारचें असें मत झालें आहे कीं, ह्या मार्गामुळें ज्यांचा जमिनीशींच निकट संबंध आहे त्यांसच केवळ नव्हे, तर सामान्यत: सर्व लोकांस रास्तपणें फायदा होण्यासारखा आहे. आणि तो फायदा इतका मोठा आहे कीं, तो साधण्यासाठीं जमिनीच्या महसुलांत कांहीं थोडें नुकसान झालें तरी त्या कामीं हिम्मत करणें न्यायाचें होईल, आणि ज्या ज्या प्रदेशांत अटी पूर्ण झालेल्या आहेत किंवा होतील, त्या त्या प्रदेशांत कायम धारेबंदी सुरू करणें हेंच तत्व खऱ्या राजनीतितत्वास

अनुसरून आहे. त्याच्या योगानें हिंदुस्थानांतील सांपत्तिक स्थिति सुधारण्यास जोर येईल आणि देशांतील ( हिंदुस्थानांतील ) राणी सरकारच्या सर्व ज्ञातींच्या प्रजावर्गांमध्यें सुख आणि शांति हीं शिखरास जाऊन पोंहोंचतील."

इसवी सन १८६२ व १८६५ च्या खलित्यांत दर्शविलेल्या अटी बहुतेक सर्व देशभर पूर्ण झाल्याचें रा० मुधोळकर यांणीं सिद्ध केलें. देशाचीं शेतकी संबंधाचीं साधनें दुष्काळ आणि गरिबी ह्यांनीं वारंवार विखरून टाकिलीं असतांही अनेकवार ठरविलेल्या आणि वरचेवर न्यायी असल्याबद्दल मान्यता मिळालेल्या तत्वांनुसार चालण्याचा सरकारचा रंग दिसत नाहीं.

रा० मुधोळकर यांच्या भाषणांतील आणखी एका महत्वाच्या भागाकडे आपण लक्ष्य देऊं. त्यावरून राष्ट्रीय सभेचे पुढारी सरकारच्या विरुद्ध पक्षाचे पुरस्कर्ते नाहींत ही गोष्ट सहज दिसून येईल. ते सरकारच्या मतापुढें एकही पाऊल गेलेले नाहींत.

लार्ड कार्नवालिस साहेबांनीं बंगाल प्रांतांत जी कायम धारेबंदी केली, तिचेंच सर्वत्र हिंदुस्थानभर त्याबरहुकूम आधिपत्य व्हावें अशी राष्ट्रीय सभेची इच्छा आहे, हें विधान किंवा ह्मणणें चुकीचें आहे हें यावरून सिद्ध होतें. पण विधानाचा अज्ञानी जनसमाजावर मोठाच परिणाम होतो. रा० मुधोळकर ह्मणतातः-

'रुप्याचा भाव उतरल्यामुळें सरकारच्या मार्गांत अनेक अडचणी उत्पन्न झाल्या आहेत हें मी कबूल करितों. ह्या विषयाचा तडकाफडकी निकाल करणें कठीण आहे हेंही खरें आहे. परंतु

मुत्सद्यांची मति गुंग होईल अशा प्रकारची मात्र ती अडचण आहे असें मला वाटत नाहीं. आणि आमच्या अधिकारी वर्गांत त्या अडचणीशीं टक्कर देण्यास लागणारा मुत्सद्दीपणा नाहीं असेंही मला वाटत नाहीं. कोणत्याही प्रकारचा कायमपणा असावा आणि तो कायमपणा होतां होईतो उत्पन्नासंबंधानें असावा एवढेंच कायतें आह्मीं मागतों. जर उत्पन्नाचें आणि साऱ्याचें प्रमाण कायम करण्यांत येईल, ज्या खेड्यांत जें पीक होत असेल त्याकडे लक्ष देऊन, गेल्या पांच वर्षांचा स्थानिक भावांचा अदमास काढून, त्या मानानें पांच वर्षांकरितां तीळ, कापूस, बाजरी, गहूं, जोंधळे, ज्वारी यांच्या अमुक मणांची अमुक रुपये किंमत अमुक एका जमिनीवर दरसाल द्यावी असें जर ठरविण्यांत येईल, तर लोकांना जें पाहिजे तें मिळाल्यासारखें होऊन ते संतुष्ट होतील असें मला वाटतें. हाच दुःखनिवारणाचा मार्ग आहे. ग्रेटब्रिटनच्या लोकांना व येथील अधिकारी वर्गांना माझी सविनय प्रार्थना ही आहे कीं, त्यांनीं हें कोडें सोडविण्याचा यत्न करावा आणि त्यांनीं इंग्लंडामध्यें एका मागून एक घालून दिलेल्या तत्वांची अंमलबजावणी करावी. न्याय आणि भूतदया यांना धरून अत्यंत रास्त अशींच तीं तत्वें आहेत." यावरून बंगाल प्रांतांत असलेल्या कायम धारेबंदीचा डोळे मिटून कैवार राष्ट्रीय सभा घेत नाहीं हें उघड आहे. बंगाल प्रांतांत कायम धारेबंदी सुरू झाली त्यास लार्ड कार्नवालिस आणि टेनिंग माऊथ सारख्या लोकांचे उदार आणि मुत्सद्दीपणाचे विचार कारणीभूत होते. त्यांजवर आह्मी हवाला टाकूंच. त्यांत अंतर करणार नाहीं हें खरें आहे. पण आह्मीं त्यांवर हवाला टाकितों तेव्हां त्या ठरावांच्या बारीक

सारीक गोष्टीही ग्राह्य करितों अशांतला मात्र भाग नाहीं. ह्या मोठमोठ्या माणसांचे ह्या न्याय्य आणि हितावह तत्वांविषयीं विचार पूर्णपणें जुळत होते, ह्या तत्वांनुसार कायमपणा व चिरस्थायित्व हीं आलीं असती; पण तीं कायम धारेबंदीचीं तत्वें कोणत्या रीतीनें आणि केव्हां अंमलांत आणावीं ह्याविषयीं कोणता मार्ग व्यावहारिकदृष्ट्या सोईचा होईल, याविषयीं मात्र त्यांच्यांत मतभेद होता ही गोष्ट खरोखर विसरतां कामा नये. अनुभव घेण्यासाठीं या तत्वांचीं योजना करावी आणि थोड्या वेळानंतर ते उपाय अमलांत आणावे असें लार्ड टेनिंगमाऊथ यांचें मत होतें. नाहींपेक्षां त्यांस असें वाटत होतें कीं, परकीय राज्यकर्त्यांच्या अनुभवाच्या अभावामुळें अनिवार्य संकटें उत्पन्न होतील. आणि कदाचित् कायम धारेबंदी अति मोठ्या प्रमाणावर ठरविण्यांत येईल आणि असह्य रीतीनें जमिनीचा वसूल घेण्यांत येऊं लागेल हीच त्यांस मोठी भीति पडली होती. याच्या उलट लार्ड कार्नवालिस ह्यांचें मत होतें. तें ह्मणत कीं,सर्व विचार बाजूला-ठेऊन कायम धारेबंदी करणें हेंच अधिक फायदेशीर होईल. हिंदुस्थानांतील जमिनीसंबंधानें सुधारणा करूं इच्छिणारांनीं सतत चिंतनीय असे मि. शोअर-लार्ड टेनिंगमाऊथ यांचे शब्द नेहमीं लक्षांत ठेवावे. त्यांचा मी अनेकवार उल्लेख केला आहे. त्यांत फार खोल अर्थ भरलेला आहे. त्यांतील तीनच वाक्यें मी घेतों.

"आमच्या प्रजाजनांमध्यें विश्वास उत्पादन करणें हेंच अत्यंत आवश्यक आहे."

"अत्यंत अनिश्चितपणापेक्षां बराच विषमभाव असणें हें देखील कबूल करितां येईल."

" जें कांहीं आपणापाशीं आहे त्याची किंमत कायम राहण्यासाठीं धारा कायम ठरविला पाहिजे. "

कार्नवालीस साहेबांनीं सांगितलें कीं, " ह्या पद्धतीच्या उपयोगीपणाविषयीं त्यांचे मनांत पूर्ण खातरी होती " " कोर्ट-आफ डायेरेक्टर्सनीं कायम धारापद्धति सर्वत्र सुरू करण्यांत वेळ घालवूं नये ह्मणून त्यांनीं अति आस्थेवाईकपणें त्या पद्धतीची प्रशंसा केली. आणि तसें करण्यांत हिंदुस्थानच्या लोकांसंबंधाचें आपल्या देशासंबंधाचें आणि भूतदयेसंबंधाचें आपलें कर्तव्य आपण करीत आहोंत असें त्यांस वाटलें."

बंगालच्या कायम धारेबंदींत कांहीं दोष असतील; तरी एका गोष्टींत तिचा उपयोग फार आहे. कायम धारेबंदीनें काय फायदा होतो हें त्यावरून कळून येणारें आहे. हें हित किती आहे हें मि. वैकुंठनाथ सेन–बंगालचे जमीनदार–यांणीं समजून दिलेंच आहे. बंगालमध्यें १०० इसमांना ९९ रुपये, पंजाबमध्यें १०९, वायव्यप्रांतांत १२९, मद्रासमध्यें १३, मुंबई इलाख्यांत २३४ रुपये जमीन महसुलासंबंधानें द्यावे लागत होते, असें त्यांनीं प्रथम दाखविलेंच आहे. याकामीं महसुलाचा बंगाल प्रांतांत काय परिणाम झाला आहे पहा. कायम धारेबंदीच्या वेळीं ४०,००० चौरसमैल जागेचीच काय ती लागवड होत होती; पण आतां ४०००० चौरसमैल जागाच काय ती लागवड करावयाची राहिली आहे. ह्या मोठ्या परिश्रमाशिवाय मिळविलेल्या वाढीकडे लक्ष्य दिलें ह्मणजे सरकार भयभीत होतें, हें खरें आहे. आणि हाताला खाज सुटल्याबद्दल त्यांस क्षमाही करितां येईल. पण अखेर ह्या पैशाचें काय होतें ? सरकाराजवळ जर तो असला तर तो कोठें

खर्च होईल हें आपणास माहीत आहे. तो कोठें खर्च होतो ? त्याचा थोडासा अंश सरकाराकडे कराच्या रूपानें परत येतो. कारण सुखी लोकांना करांचीं दुसरीं साधनें फायदेशीर होतात. आणि सरकाराला ज्या ठिकाणीं खर्च करावा लागला असता त्या ठिकाणीं त्याचा मोठासा भाग सरकारच्या खर्चाखेरीज खर्चीं पडत असतो. अशा रीतीनें सरकारचा दोहीं कडून प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षरीत्या फायदा होत असतो. याचें मिस्तर सेन यांनीं एक चमत्कारिक उदाहरण दिलें आहे. पहा. "बंगालमध्यें शिक्षणाकडे ८३ लक्ष रुपये खर्च होतात. पैकीं सरकार फक्त २१ लक्ष खर्च करितें, आणि बाकीचे पैसे लोक खासगी रीतीनें भरितात. आणि ते तसे खर्चण्यास कायम धारेबंदीमुळें समर्थ असतात." मि. सेन कालिदासोक्ति काढून ह्मणतात कीं "सूर्य जमिनीवरील पाणी शोषण करून घेतो पण पर्जन्याच्या रूपानें तें सहस्रशः परत देतो." *

इसवी सन १८९१ सालची राष्ट्रीय सभा मध्यप्रांतांत भरली होती. त्या ठिकाणीं पोटाला एकसारखे चिमटे बसत होते. आणि त्याच ठिकाणीं इसवी सन १८९१ च्या सुमारास सर रिचर्ड टेंपल याणीं प्रथम सुरू केलेली कायम धारेबंदीची मुदत संपावयाची होती. त्यामुळें तो विषय लोकांच्या भाषणांत वारंवार येत होता. त्या संबंधांत रा. रा. के. एन्. देशपांडे यांच्या भाषणांतील उतारा घेण्यापेक्षां जास्त कांहीं लिहिण्यास जागाच नाहीं. आणि तो उताराही फार महत्वाचा आहे. कारण त्यांत सर रिचर्ड टेंपल आणि सर ऑकलंड कालविन ह्या दोघां हुशार, बुद्धिमान आणि प्रसिद्ध गृहस्थांचीं मतें आहेत. रा.रा. देशपांडे ह्मणाले:

* सहस्रगुणमुत्स्रष्टुमादत्ते हि रसं रविः

"राज्य व्यवस्थेचे मुख्याधिकारी या नात्यानें सर रिचर्ड टेंपल यांणीं ह्या प्रांतांतील लोकांस सरकारी धाऱ्याचें कायम प्रमाण ठरविण्याचें अभिवचन अगदीं उघड दिलें होतें. आणि ह्या माझ्या ह्मणण्याच्या समर्थनार्थ पुढील उतारा व्यवस्थापत्रकांतून वाचून दाखवितों.

"नवीन धारेबंदी प्रमाणें सरकारी धाऱ्याची कायम मुदत सर्व प्रांतांस सारखी ३० वर्षांची आहे; सरकारानें त्यास आपलें अनुमोदन दिलें आहे; आणि ज्या जमिनदारांनीं आपल्या जमिनीची लागवड उत्कृष्ट प्रकारची केलेली असेल त्यासही बहुतकाळ पर्यंत सरकारी धारा कायम ठरवून त्या प्रमाणें तो घेण्याच्या पद्धतीचा फायदा देण्याचा विचार आहे."

"आणि सरकारानें असेंही ठरविलें आहे कीं, ह्या नवीन पद्धतीच्या सुरवातीपासून तीन वर्षेंपर्यंत ज्या जमिनदारांस ही सोय करून देणें योग्य वाटेल, आणि ज्यांना सरकार देण्यासंबंधानें कायमची व्यवस्था करून घेण्याची इच्छा असेल त्यांचा कायम धारा ठरविण्यासाठीं त्यांच्या जमिनीची नवीन पहाणी करण्यांत येऊन मग तो ठरविण्यांत येईल."

ह्या नवीन पद्धतीचा फायदा काय हें सर रिचर्ड टेंपल ह्यांच्याच शब्दांनीं उत्तम प्रकारें वर्णन करून सांगतां येईल.

"त्याचा परिणाम आपल्या हिशोबाबाहेर जाईल; शेतकरी लोकांस स्वावलंबन, साहस, उद्योग हीं साधण्यास उत्तेजन येईल; आणि ज्या ठिकाणीं धारा नेमस्त आहे त्या ठिकाणीं द्रव्य संपादन आणि भांडवलाचा सदुपयोग होईल. हा मार्ग हितप्रद आहे असें जाणून लोक त्याचा स्वीकार करतील. एकपक्षीं सरकाराला सारा वाढवितां येण्याविषयींचे भावी हक्क बुडाल्यामुळें पुढें

नुकसान होण्याचा संभव आहे. परंतु दुसऱ्या पक्षीं महसुलाच्या इतर बाबतींत हळुहळु वाढ होत जाईल आणि तें नुकसान भरून येईल इतकेंच नव्हे, तर तें उत्तम प्रकारें भरून येईल."

ह्या सर्व शाखा लोकसमूहाच्या द्रव्याभिवृद्धीवर सर्वस्वीं अवलंबून आहेत आणि द्रव्याभिवृद्धि करण्याचे जे कांहीं मार्ग आहेत त्यापेक्षां कायमधारेबंदीमुळें अधिक सुख होईल. जमिनीच्या साऱ्याखेरीज महसुलाच्या इतर बाबतींत कायमधारेबंदीमुळें वाढ होईल, आणि हल्लीं ह्या प्रांतांत महसुलाच्या $\frac{1}{3}$ हून अधिक रक्कम जमीनीवरील साऱ्याशिवाय इतर कराच्या रूपानेंच उत्पन्न होत आहे. बाकीचे कर वाढत आहेत, पण जमिनीचाच सारा काय तो कायम राहणार आहे. मग तिजोरींतील पैशाच्या दृष्टीनें पाहिलें असतां या मार्गानें जमिनीवरील सारा नियमित होऊन इतर सर्व प्रकारें कर वाढत आहे तोच मार्ग सफळ होईल याविषयीं संशय नाहींच."

सर ऑकलंड कालविन यांणीं आपल्या नोंदींत वारंवार प्रतबंदी करण्यापासून होणाऱ्या अनर्थाविषयीं पुढें दिल्या प्रमाणें वर्णन केलें आहे:-

"नवा धारा नक्की होईपर्यंत मालमत्तेची किंमत उतरली, बाजारांतील पत कमी झाली, जमिनदार आणि कुळें यांत भेद पडत जाऊन चिरडखोर प्रकार घडून येऊं लागले, सरकारच्या हेतूंविषयीं संशय उत्पन्न झाला, आणि लहान सहान अनेक अधिकारी खेड्यापाड्यांभर पसरले."

रा. रा. देशपांडे हे रा. रा. मुधोळकरांप्रमाणेंच नेमस्त होते. सारा उत्पन्नाच्या वस्तूंच्या रूपानें घेण्यांत यावा असेंच त्यांचें मत होतें. ते ह्मणाले.--

टक्केच कायती वाढ होत होती. एकच पद्धत एकाच तऱ्हेनें समान स्थितीमध्यें सुरू केली असतां, एके ठिकाणीं शेंकडा ७० टक्के वाढत होते तर दुसऱ्या ठिकाणीं ३३ च होते. सरकारचीं तत्वें आणि व्यवहार ह्यांत उघड उघड दिसून येणारी ही तफावत पाहून बरीच असंतुष्टता प्रदर्शित करण्यांत आली यांत फारसें आश्चर्य नाहीं. आणि मद्रास येथें भरलेल्या राष्ट्रीय सभेंत तर ही असंतुष्टता जोरदार भाषणानें व्यक्तही करण्यांत आली होती. ही गोष्ट येथें सांगितली पाहिजे कीं, सरकारानें देखील हा फरक दृष्टोत्पत्तीस येऊं नये ह्मणून प्रशंसनीय उत्साह दाखविला; पण त्यांनीं तसें करतांना शास्त्रीय तत्वें आणि व्यवहार यांची सांगड घातली नाहीं. उलट त्यास शास्त्रीय तत्वें व्यवहारापुढें सोडून द्यावीं लागलीं. इसवी सन १८९९ च्या मे महिन्याच्या ११ व्या तारखेला एक ठराव प्रसिद्ध झाला व त्यानें पूर्वींचा हुकूम रद्द करण्यांत येऊन त्या जागीं पुढें दिलेल्या ठरावाची योजना करण्यांत आली.

" प्रत्येक धारा ठरविण्याचे वेळीं आणि प्रांताची फेरतपासणी करून धारा कायम करण्याच्यावेळीं सरकार आपल्या मर्जीप्रमाणें हा धारा घेण्याचा नियम किती वर्षें अमलांत राहावयाचा हें ठरवील; प्रांतिक ग्याझेटांत मग कलेक्टर अशी वेळ ( मुदत ) प्रसिद्ध करील; आणि ठरलेल्या मुदतींत नवीन धान्याचा भाव बदलणार नाहीं ही गोष्ट कलेक्टर रैयतेस समजून देईल. पण अशी मुदत संपली ह्मणजे सरकार त्यावेळीं त्यांस योग्य आणि न्याय वाटेल त्याप्रमाणें धान्याची फेरतपासणी करील. ती तपासणी करतांना भावाच्या चढ

उताराकडे, आणि जमिनीच्या नवीन प्रतवारीकडे आणि उत्पन्नाकडेही सरकार लक्ष देईल."

मद्रास येथें सभेपुढें जे ठराव मांडावयाचे होते, त्यांत दुसरी जागा ह्या कायम धारेबंदीच्या विषयास मिळाली होती, आणि त्या संबंधाचा ठराव मि. वैकुंठनाथसेन यांणीं पुढें आणिला होता. तो ठराव फारच व्यापक होता.

ज्या ठिकाणीं पूर्वीं कायम धारा ठरविलेला होता त्याठिकाणीं सरकार फिरवाफिरव करीत आहे ही सरकारची कृति दोषार्ह आहे, आणि त्या कृतीवरून पूर्वींच घालून दिलेल्या जुन्या तत्वांना सोडून सरकार जात आहे, ही गोष्ट त्यांनीं सरकारच्या कानीं जाईसें केलें. व आधीं होऊन गेलेल्या अधिकारी वर्गाकडून देण्यांत आलेल्या वचनाप्रमाणें चालण्याविषयीं आणि निदान ६० वर्षेपर्यंत तरी कायम धारेबंदी करण्यांत यावी हें ठरविण्याविषयीं त्यावेळीं सरकारांस विनंति करण्याचें ठरलें.

" ( मोजणीच्या कामांत आणि इतर गोष्टींत ) बंगाल्यामध्यें आणि बिहारमध्यें प्रस्तुत असलेल्या धारापद्धतीच्या संबंधांत आणि मद्रास प्रांतांतील कायम प्रतबंदी झालेल्या ठिकाणीं ज्या सनदा देण्यांत आल्या आहेत, त्या संबंधांत सरकारच्या ढवळाढवळ करण्याच्या कृतीनें महद्भीति उत्पन्न झाली आहे; व त्या योगें उत्तम, पवित्र वचनांचा भंग होत आहे; हें राष्ट्रीय दुश्चिन्ह होय; ही गोष्ट राष्ट्रीय सभा उघड सांगू इच्छिते. कायम धारेबंदीवर आणि तिच्या मालकांवर ( जमीनदारांवर ) जे प्रत्याघात होत आहेत त्यासंबंधानें वाजवी रीतीनें, व न्यायानें आह्मी हरकती आणूं आणि त्या बाबतींत पार्लमेंटाकडे अर्ज करूं" असाही त्या सभेचा ठराव झाला आहे.

"इसवी सन १८६२ व १८६९ सालीं स्टेटसेक्रेटरी-नीं खलित्यांत दिलेलीं वचनें-(ज्या ठिकाणीं कायम धारेबंदी नाहीं त्या ठिकाणीं ती सुरू करणें)-पाळण्यांत आलीं नाहींत, इतकेंच नव्हे. तर इसवी सन १८८२ आणि १८८४ सालीं हिंदुस्थान सरकारानें घालून दिलेलें आणि स्टेट सेक्रेटरीनीं मान्य केलेलें धोरण-ह्मणजे कुळवहिवाट कायम करणें आणि सारा न वाढविणें-पाळण्यांत आलें नाहीं; ह्मणून ह्या राष्ट्रीय सभेस अत्यंत वाईट वाटत आहे. आणि जमीनदारांना त्यांच्या जमिनींत सुधारणा केल्याचा उत्तम प्रकारें पूर्ण फायदा घेतां यावा ह्मणून साठ वर्षांहून कमी नाहींत इतक्या वर्षें-इतक्या अवधिपर्यंत-जमिनीचा सारा वाढूं नये, व सुधारून तयार केलेला पण निश्चित असा वहिवाटीचा प्रकार सुरू व्हावा, ह्मणून या सभेकडून सरकारची विनवणी करण्यांत येत आहे."

या विषयावर बराच वेळ सुश्राव्य व मनोरम वादविवाद झाला; पण त्याचा विशेष उल्लेख आह्मी येथें करूं इच्छित नाहीं. कारण त्याचा उल्लेख करणें ह्मणजे पूर्वींचींच विधानें पुन्हा एकवार सांगण्यासारखें आहे, आणि तसें करतांना सरकारचे ठराव फिरून एकवार सांगावे लागतील. त्यांत भिन्न प्रांतांतील नमुनेदार उदाहरणें दृष्टान्तादाखल पुढें आणावीं लागतील. शिवाय त्यानंतर झालेल्या इसवी सन १८९७ सालापर्यंतच्या प्रत्येक राष्ट्रीय सभेंतील विधानांचाही उल्लेख करावा लागेल. इ. स. १८९७ च्या दिसेंबर महिन्यांत उमरावती येथें भरलेल्या राष्ट्रीय सभेचे वेळीं प्रस्तुत लेख लिहिणाऱ्या गृहस्थांनीं (जॉन आडॅम यांणीं) पुढील ठराव पुढें आणिला होता:-

" ज्या प्रांतांत जमिनीचा धारा कांहीं काळपर्यंत ठरलेला होता तो काळ कमी करण्याचे आणि तो सारा वाढविण्याचे धोरणाविरुद्ध ही राष्ट्रीय सभा जोरानें आपली नापसंती दर्शविते. आणि तिची अशी खातरी आहे कीं, ह्या देशांतील लोकहितासाठीं अशा प्रदेशांतील धारा, कायम धारेबंदी करूनच ठरविण्यांत यावा. "

त्या वेळीं ह्या ठरावांतील थोडेच शब्द पण ते किती मुद्देसूद आहेत हें सांगून उत्तरोत्तर कसा अनर्थ वाढत आहे ही गोष्ट स्पष्ट करण्यांत आली होती. प्रतबंदीची कालमर्यादा जिकडे तिकडे कमी होत चालली आहे, व प्रत्येक ठिकाणीं फेरतपासणींत सारा वाढत आहे; ह्याबद्दल लोकांस फार वाईट वाटत आहे. शिवाय सरकारालाही त्या कामीं खर्चाकारितां रकम पुरी करणें कठीण झालें आहे. फेर तपासणीचा खर्च अनावश्यक व निरर्थक होता असें ह्या सूचनेपासून येथें आणि इंग्लंडांतही वाटूं लागलें आहे, व त्यामुळें बराच काळ निवून जाईपर्यंत सरकारी तिजोरीला हात लावण्याची पाळी येणार नाहीं अशीच योजना ठेवण्यांत आली आहे.

मुख्य गोष्टींत फरक होण्याचें, लोकांची संपत्ति धुवून नेण्याचें, निवळ व्याजच नव्हे, तर भांडवलही हिरावून नेण्याचें आणि नुसती वाढच नव्हे, तर मुख्य पुंजी लुटण्याचें कारण काय, तर "सरकारची कष्टतम दशा" होय. हें कोणी केव्हांही नाकबूल करणार नाहीं. मद्रास इलाख्यांतील महसूल मंडळानें (The Board of Revenue) तें अनेक शब्दांनीं कबूल केलें आहे. आह्मीं दाखविल्याप्रमाणें हें सरकारचें धोरण अदूरदर्शिपणाचें दर्शक आहे. त्या धोरणामुळें अखेरीस राष्ट्राचें दिवाळें निघेल. पूर्वी

केलेल्या टीकेवरून असें आढळून येईल कीं, निदान अनिवार्य परिणामाविषयीं भविष्य करण्यांत राष्ट्रीय सभेची चुकी झालेली नाहीं; आणि आपल्या राज्यकर्त्यांना सुरक्षित, पण कष्टतर मार्ग दर्शविण्यांत तिनें आपलें कर्तव्य बजाविलें आहे. तोच मार्ग मोठ्या अनुभविक माणसांच्या शहाणपणानें आणि प्रामाणिकपणानें शोधून काढिलेला आहे. आम्हांवर आतां एक नवीन व्हाईसराय आणि नवीन जमाबंदीकडील प्रधान यावयाचे आहेत. आह्मांला वाटतें आणि आशा आहे कीं, ते दुराग्रहापासून दूर राहतील व अधिकारी सांगतील तेंच केवळ खरें मानून त्याच प्रमाणें ते चालणार नाहींत. त्यांना स्वतः-विचार करतां येतो आहे आणि ते स्वतःच्या जोरावर वाटेल तें करण्यास समर्थ आहेत. त्यांचा जिकडे तिकडे विजय होत आहे यामुळें त्यांस आपल्या सामर्थ्याविषयीं आणि बुद्धीविषयीं पूर्ण भरंवसा आहे. आमची आशा आहे कीं, दुसऱ्या इतर वादग्रस्त विषयांचा निकाल त्यांनीं ज्या उमेदीनें केला आहे, त्याच उमेदीनें ते या जमिनीच्या विषयासंबंधानें विचार करतील. ह्या दोन्ही विषयांचा ह्या देशाच्या सांपत्तिक व सामाजिक स्थितीशीं अगदीं निकट संबंध आहे.

एवढयाचकरितां सांपत्तिक दृष्टया दृढतम आणि सामाजिक दृष्टया उत्तेजनप्रद अशा धोरणावर त्याचा कायमचा निकाल ते लावतील; हीच आमची आशा व इच्छा आहे.

---

# हिंदुस्थानाचें दारिद्र्य.

( लेखक, मि. आलफ्रेड नंदी, बॅरिस्टर-ॲट-लॉ.)

प्रस्तुत हिंदुस्थानाच्या कल्याणाविषयीं कळकळ वाळगणाऱ्या लोकांच्या मनांत अनेक क्लिष्ट विचार घोळत असतात. त्यांपैकीं या देशांतील लोकांच्या सांपत्तिक स्थितीचा जो विषय आहे तो अत्यंत घोंटाळ्याचा आहे, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. कित्येक ह्मणतात कीं, एकेकाळीं हिंदुस्थान दारिद्रावस्थेंत असून तेथील राज्यव्यवस्था नीट नव्हती, तें आतां श्रीमंत होऊन भरभराटीस आलें आहे. आणि कित्येक याच्या अगदीं उलट प्रतिपादन करितात. हिंदुस्थानची भरभराट सिद्ध करूं पाहणारा पक्ष आपल्या वतीनें बरीचशीं कारणें पुढें आणतो आणि त्याचें दारिद्र्य सिद्ध करण्यास विरुद्ध पक्षाची मंडळीही तितकींच बलवत्तर कारणें दाखविण्यास तयार असते. या वादांत जे मुद्दे उपस्थित करण्यांत येतात त्यांची यथार्थ कल्पना असणें आणि प्रत्येक मुद्यासंबंधानें निरनिराळा पुरावा मिळवून तो तपासून पहाणें अप्रासंगिक होणार नाहीं. आतां आपण या विषयावरील वादविवादाचे चार भाग करूं.

भाग १--प्राचीन आणि अर्वाचीन हिंदुस्थान.
भाग २—हिंदुस्थानाच्या भरभराटीबद्दलचा पुरावा.
भाग ३--हिंदुस्थानाच्या दारिद्र्याबद्दलचा पुरावा.
भाग ४--हिंदुस्थानाच्या दारिद्र्याचें कारण.

# भाग १ प्राचीन आणि अर्वाचीन हिंदुस्थान.

## सुरूढ आणि सुधारलेल्या राज्यपद्धतीचे फायदे.

या विषयावर लिहूं लागलें ह्मणजे हिंदुस्थानाच्या हल्लींच्या स्थितीसंबंधानें सरकारी अधिकाऱ्यांकडून आणि इतर लोकांकडून जो पुरावा सादर करण्यांत येतो त्यांतील विरोध आरंभींच नजरेस येणार, व तो आल्यावांचून राहणार नाहीं. अधिकाऱ्यांचे सांगण्यावर विश्वास ठेवला तर हिंदुस्थानाची प्रगति झपाट्यानें होत आहे असेंच ह्मणावें लागतें. ज्या लोकांना अधिकार नाहीं त्या लोकांचें ह्मणणें खरें मानलें तर हिंदुस्थानाच्या लोकसंख्येपैकीं बऱ्याच मोठ्या भागाला जीवयात्रा मोठ्या कष्टानें आणि निराशेंत कंठावी लागत आहे; देशाची सांपत्तिक स्थिति हळु हळु वाईट होते आहे; आणि शेंवटीं देशाचें दिवाळें निघण्याची वेळ येणार असें ह्मणावें लागतें. हेनरी फौलर हे सन १८९४त हाउस ऑफ कॉमन्समध्यें ह्मणालेः— " ब्रिटिश अमलाखालीं हिंदुस्थानाचें दारिद्र्य वाढलें नाहीं तर कमी झालें आहे, ब्रिटिश अमलामुळें हिंदुस्थानाला दारिद्र्य आलें आहे हें खरें नसून खरी गोष्ट याच्या अगदीं उलट आहे. " दुसऱ्या एका प्रसंगीं ते ह्मणालेः—" इंग्लंडनें चालविलेल्या हिंदुस्थानच्या राज्यकारभाराची हकीकत आमच्या एकंदर इतिहासांतील अत्यंत अद्भुत हकीकतीपैकीं एक आहे. आमच्या स्वतःच्या किंवा परदेशांच्या इतिहासांत तिला उपमाच आढळत नाहीं. इंग्लंडनें स्वदेशांत केलेल्या गोष्टींपेक्षां हिंदुस्थानांत ज्या

गोष्टी केल्या आहेत त्यांचाच मला इंग्रज या नात्यानें जास्त अभिमान वाटतो." इंग्लंडनें हिंदुस्थानांत केलेल्या गोष्टी विस्मयावह आहेत. विशेषतः मूठभर इंग्रज लोकांनीं कोट्यावधि लोकवस्तीचा देश आपल्या ताब्यांत ठेविला आहे, ही गोष्ट अत्यंत विस्मयावह होय. परचक्रापासून आणि अंतस्थ शत्रूपासून आपलें संरक्षण त्यांच्याच हातून होईल; ह्मणून इंग्रजांच्या सद्धेतुविषयीं शंका न धरितां त्यांचेंच राज्य आपणावर असावें अशी हिंदुस्थानवासी लोकांची इच्छा आहे, हेंही अत्यंत विस्मयावह आहे. कै. सर. टी. माधवराव यांनीं ह्मटलें आहे कीं, "आजपर्यंत आमच्यावर होऊन गेलेल्या राज्यांपैकीं इंग्रजीराज्य सर्वांत उत्तम असून त्याची दुसऱ्यां कोणाशीहीं तुलना करितां येणार नाहीं; ही सत्य गोष्ट आपण मोकळ्या मनानें आणि कृतज्ञपणें कबूल केली पाहिजे. इंग्रजी राज्य अत्यंत बलाढ्य आणि अत्यंत नेकीनें चाललेलें असल्यामुळें हिंदुस्थानांतील निरनिराळ्या जातींच्या आणि निरनिराळ्या हितसंबंधाच्या लोकांना तेंच उत्तम आहे. जित झालेल्या लोकांमध्यें जसजशी सुधारणा होत जाईल, तसतसा आपल्या राज्यपद्धतींत फरक करून वस्तुस्थितीशीं जुळून जाणारें आणि स्वतःचें रक्षण करण्याला अत्यंत समर्थ, असें तेंच एक राज्य आहे."

**हिंदुस्थानापासून इंग्लंडास होणारा नफा.**—सर. टी. माधवराव यांनीं पुढें ह्मटलें आहे कीं, स्वतःस कांहीं एक नफा नसतां हिंदुस्थानाचें संरक्षण करून तेथील राज्यकारभार चालविण्याचें अत्यंत जोखमाचें काम ब्रिटिश राष्ट्रानें पतकरावें, अशी आशा करणें म्हणजे मनुष्यस्वभावाविरुद्ध जाणें होय, ह खरें आहे. हिंदुस्थानाला इंग्लंडपासून जरी पुष्कळ फाय-

दा होत आहे, तरी इंग्लंडचाही त्यांत कमी फायदा नाहीं ही गोष्ट निर्विवाद आहे. जगांतील सर्व राष्ट्रांत इंग्रजी राष्ट्र हें पुष्कळ अंशीं हिंदुस्थानाच्याच जिवावर अत्यंत धनाढ्य बनलें आहे. कारण एक तर इंग्लंडच्या व्यापाराला तेथें विस्तीर्ण क्षेत्र मिळालेलें आहे. दुसरें, तेथें पुष्कळ इंग्रज तरुणांना उद्योग मिळून कांहीं काळ हिंदुस्थानांत घालविल्यानंतर ते स्वदेशीं जाऊन तेथील संपत्तींत भर टाकतात. हिंदुस्थानांतील खर्चाची चौकशी करण्याकरितां जें राजमंडळ (रॉयल कमिशन) बसलें होतें, त्या पुढें सर हेनरी ब्रॅकनबरी यांनीं जी साक्ष दिली, तींत ते म्हणाले कीं, "हिंदुस्थानास आपल्या अमलाखालीं ठेवण्यांत ब्रिटिश सरकाराचें अत्यंत हित आहे ही गोष्ट मला पक्की माहीत आहे. हिंदुस्थानांत हजारों ब्रिटिश लोकांना उद्योग धंदा मिळतो, तेथील व्यापारांत ब्रिटनचे कोट्यावधि रुपये भांडवल गुंतलें आहे आणि हिंदुस्थानाशीं व्यापार सुरू झाल्यापासून ग्रेट ब्रिटनचा अतोनात फायदा झाला आहे." हिंदुस्थानचे माजी सेनापति सर जॉर्ज व्हाईट हे व्हॉइसरॉय साहेबांच्या कौन्सिलांत एका प्रसंगीं पुढें लिहिल्याप्रमाणें बोलले होते:– 'हिंदुस्थानांतील सैन्याच्या योगानें इंग्लंडच्या लष्करी सामर्थ्यांत बरीच भर पडली आहे, ब्रिटिश सैन्यांतील बरेच लोक हिंदुस्थानच्या खर्चानें युद्धकला शिकलेले आहेत आणि शिलकी फौजेंत असलेली सर्व मंडळी हिंदुस्थानच्याच खर्चानें पोसली जात आहे; असें आमच्यानें ह्मणवतें." सन १८९३ सालीं लंडन चेंबर ऑफ कॉमर्सच्या मानपत्राला उत्तर देताना लॉर्ड रॉबर्टस ह्मणाले–"हिंदुस्थान आपल्या हातीं ठेवण्यावर इंग्लंडची भरभराट पूर्णपणें अवलंबून आहे ही गोष्ट आपल्या ध्यानांत

येऊन चुकली आहे, याबद्दल मला आनंद वाटतो." प्रो. लेकी यांनीं लिहिलें आहे, "आमच्या राष्ट्राच्या आंगचे उत्तम पौरुष गुण जतन करून ठेवण्याला हिंदुस्थान ही चांगली व्यायाम शाळा आहे."

"हिंदुस्थान हातचें गेलें तर इंग्लंडचें राष्ट्रत्व नष्ट होईल," असें लॉर्ड रॅंडॉल्फ चर्चहिल यांनीं आपल्या मृत्यूपूर्वी थोडेच दिवस बोलून दाखविलें होतें. आणि त्यांच्याच मताचा अनुवाद करून आपले नवे व्हाईसरॉय लॉर्ड कर्झन यांनीं सन १८९९ सालीं ह्मटलें कीं, " इंग्लंड आणि हिंदुस्थान यांच्या नशीबांची सांगड घातलेली आहे. इंग्लंडशिवाय हिंदुस्थानचें चालावयाचें नाहीं, तसेंच हिंदुस्थानाशिवाय इंग्लंडचेंही चालावयाचें नाहीं." व्हाईसरॉयच्या जागीं आपली नवीन झालेली नेमणूक स्वीकारितांना लॉर्ड कर्झन ह्मणाले कीं, " मला मिळालेल्या नवीन अधिकारावर जाण्यास मला फार आनंद होतो आणि मला त्याबद्दल अभिमान वाटतो. राजकारणाच्या दृष्टीनें पाहिलें असतां हिंदुस्थानदेश आमच्या बादशाहीचें केंद्रस्थान आहे असें मी समजत आलों आहे." हिंदुस्थानाशीं असलेल्या संबंधापासून इंग्लंडचा पुष्कळ फायदा झाला आहे आणि पुढें पुष्कळ होईल अशाविषयीं वर लिहिल्याप्रमाणें सर्वांचें एक मत आहे. तेव्हां भूतदया आणि न्याय यांचा विचार बाजूस ठेविला तरी हिंदुस्थान सुखी आणि भरभराटींत असणें हें इंग्लंडच्याच फायद्यांचें आहे. कारण हिंदुस्थानाची ज्या मानानें जास्त भरभराट होईल त्यामानानें इंग्लंडच्या मोठेपणांत आणि प्रगतींत भर पडत जाईल.

**अधिकारी वर्गाच्या पुराव्याची योग्यता**—आतां हिंदुस्थानची भरभराट होत असून तेथील लोक जीवनार्थकलहामध्यें आपला निभाव लावण्यास पूर्वीपेक्षां अधिक समर्थ होत आहेत कीं काय? याचा विचार केला पाहिजे. एखादा देशी गृहस्थ कितीही बुद्धिमान, विचारी आणि निःपक्षपाती असला तरी परकीय राज्याविषयीं त्याचें मन स्वभावतःच कलुषित होऊन त्या राज्यव्यवस्थेंतील फायदे त्याला दिसत नाहींत असा त्याजवर आरोप येतो, व त्याची साक्ष या बाबतींत कुचकामाची मानली जाते. हिंदुस्थान पहावयास येणाऱ्या खासगी इंग्रजी गृहस्थांच्या साक्षीची बहुतेक तितकीच किंमत मानण्यांत येते; कारण हिंदुस्थानाची खरी स्थिति कळून येण्यास पाहिजे असलेला अनुभव त्यांस नसून त्यांचें अंतःकरण दयाळू असल्यामुळें त्यांची विचार शक्ति एका बाजूस राहून हिंदुस्थानाची स्थिति चांगली नाहीं असें त्यांस वाटण्याचा संभव आहे असें ह्मणण्यांत येतें. राहतां राहिला सरकारी पुरावा. तो तरी विश्वसनीय आहे काय? हा एक प्रश्न आहे. त्यावर देखील आपल्या नोकरीच्या नात्यामुळें खरी गोष्ट काय आहे हें पाहण्यास सरकारी अधिकारी नाकबूल किंवा असमर्थ असतात, असा आक्षेप येणें शक्य नाहीं काय? कारण खरें काय आहे तें पहावें तर त्याला आपले धनी जें सरकार त्याच्या विरुद्ध हटकून जावें लागणार, आणि तसें बोलून दाखवावें तर, सरकार आपली शिस्त मोडली, असें समजून त्याला टपका देणार, किंवा अन्य तऱ्हेनें त्याला शिक्षा देणार. सरकारी अधिकारी कितीही हुषार, अनुभवी, आणि दयाळू असले तरी ते स्वतंत्र नाहींत. देशस्थितीसंबंधाची खडा-

नखडा माहिती त्यांस असते खरी, पण त्यांनीं तोंड उघडणें धोक्याचें असतें. माझ्या बऱ्याच दिवसांच्या अनुभवांत पुष्कळ अधिकाऱ्यांची माझी गांठ पडली आहे, त्यांपैकीं एक गृहस्थ वायव्येकडील प्रांतांत सनदी नोकर होते. त्यांनीं, १८७६ सालीं तिकडे दुष्काळ पडला असतां स्थानिक सरकार जाणून बुजून डोळ्यांवर कातडें ओढून घेऊन बसलें आहे असें पाहून, त्या प्रांतांतील वाढलेल्या मृत्युसंख्येकडे लोकांचें लक्ष लाविलें. त्यांनीं एवढें दयाळूपणाचें काम वेळींच केल्यामुळें लाखो लोकांचे जीव वांचले असतील; पण त्या पायीं त्यांच्या बढतीस खो येऊन त्यांच्या पुढील आयुष्यक्रमाची नासाडी मात्र झाली. मध्यप्रांतांत त्यांची बदली करण्यांत येऊन त्यांच्या नांवावर एक काळी फुली मारून ठेवण्यांत आली. अखेर आपल्या खालचे लोक एकामागून एक वर जाताहेत असें पाहून त्यांनीं कंटाळून आपल्या नोकरीचा राजिनामा दिला. राजकीय पक्षाचे प्रमुख नायक मि. डिझ्राएली हे सन १८७६ सालीं कॉमन्स सभेंत ह्मणाले—"हिंदुस्थानांतील लष्करी आणि सनदी नोकरींत वाढलेले लोक मोठे हुषार आणि चांगले माहितगार असतील, पण दोषपद्धतींत त्यांचा जन्म गेला असल्यामुळें त्यांस त्या दोषांची कल्पनाही नसते. आणि अशा मनुष्यांकडे सर्व सत्ता असल्यामुळें इंग्लिश राज्यापासून लोकांना जें संरक्षण मिळालें पाहिजे तें त्यांना मिळेलच असें कोणालाही खात्रीनें सांगतां यावयाचें नाहीं." लॉर्ड हार्टिंग्टन ( हल्लीं ड्यूक ऑफ डेव्हेंनशायर )हे सन १८८३ सालीं कॉमन्स सभेंत ह्मणाले—' ॲंग्लोइंडियन अमलदारांचे अंगीं कितीही गुण असले ( त्यांच्या अंगीं

कांहीं गुण आहेत खरे) तथापि शांतपणें विचार करणें हा गुण त्यांचें अंगीं नाहीं." इंग्लंडचे सर्व श्रेष्ठ मुत्सद्दी मि. ग्लॅडस्टन यांनीं सार्वजनिक कामांतून आंग काढण्यापूर्वी हिंदुस्थानांतील सरकारी अधिकाऱ्यांच्या अभिप्रायासंबंधानें काढलेले पुढील उद्गार ध्यानांत ठेवण्यासारखे आहेत. ते ह्मणाले:—"स्वतःला माहितगार समजणाऱ्या सरकारी अधिकाऱ्यांच्या अभिप्रायांवरच या बाबतींत सर्वांशीं किंवा मुख्यांशीं देखील अवलंबून राहूं नये, ही गोष्ट मला कबूल केली पाहिजे. असें ह्मणणें बरोबर नाहीं खरें, पण ज्यांना अधिकाराच्या योगानें सर्वांत अधिक आणि खरी माहिती असावयास पाहिजे, त्यांनीं दुराग्रहामुळें अगदींच कोती आणि भ्रामक माहिती मिळवून ठेवलेली असते. सरकारी अधिकाऱ्यांच्या अभिप्रायांवरच शेवटपर्यंत अवलंबून राहण्याचा माझा तरी विचार नाहीं." पण आपल्या चमत्कारिक आणि अडचणीच्या स्थितींत देखील कित्येक इंग्रज अधिकाऱ्यांनीं देशाची खरी खरी स्थिति वर्णन करून लोकांचें दारिद्र्य दूर करण्यासाठीं कांहीं तरी तजवीज न केल्यास लवकरच कांहीं तरी संकट येणार आहे अशी सूचना देण्यासाठीं आपले अभिप्राय स्पष्टपणें कळविले आहेत, ही गोष्ट त्यांस भूषणास्पद ह्मणून नमूद केली पाहिजे. अशा मंडळीचे बरेच अभिप्राय प्रस्तुत निबंधांत दाखल करण्यांत येतील.

**हिंदुस्थानची पूर्वीची स्थिति.**—सर हेनरी फाउलर आणि त्यांच्या मताची कांहीं मंडळी, हिंदुस्थानांतील दारिद्र्य **नाहींसें** होत आहे असें ह्मणतात. त्याचा अर्थ त्यांच्यामतें असा **आहे कीं,** हल्लीं पेक्षां हा देश पूर्वी जास्त दरिद्री होता. उलट पक्षीं **हिंदुस्थान** अधिकाधिक दरिद्री होत चाललें **आहे, असें जे**

ह्मणतात त्यांच्यामतें येथील लोकस्थिति पूर्वी अधिक चांगली होती असें आहे. यासाठीं इंग्रज लोक हिंदुस्थानांत येण्यापूर्वीं येथील लोकस्थिति कशी होती त्याची सत्य माहिती मिळविणें आवश्यक आहे. 'हिंदुस्थानांतील अगणित' संपत्तीला भुलून युरोपियन राष्ट्रें इकडे आलीं. सिंधूनदीच्या पूर्वेस असलेल्या हिंदुस्थानाच्या भागाची माहिती खिस्ती शकापूर्वीं ३२७ व्या वर्षी शिकंदर बादशहाच्या स्वारीबरोबर आलेले इतिहासज्ञ आणि शास्त्रज्ञ लोक यांच्या द्वारें युरोपखंडास पहिल्यानें झाली. शिकंदराची स्वारी परत गेल्यानंतर युरोपचे पूर्वेकडील देशांत हिंदुस्थानचें थोडें दळण वळण होतें; तथापि ग्रीक आणि आरब लोक हिंदुस्थानाशीं बराच व्यापार चालवून इतरत्र पैदा न होणाऱ्या जिनसांचा युरोपाला पुरवठा करीत असत. आरब लोकांनीं हिंदुस्थानाच्या किनाऱ्यावर लहानशीं ठाणीं वसवून जहाजांतून किंवा उंटांवरून हिंदुस्थानांत मुबलक तयार होणारे जिन्नस भूमध्यसमुद्राच्या किंवा काळ्या समुद्राच्या काठीं नेऊन व्हेनिशियन किंवा जिनोई लोकांस विकण्याचा क्रम चालविला होता. इटाली देशांतील समुद्रकांठचीं कित्येक शहरें ऐश्वर्याच्या शिखरास चढून बाकीच्या सर्व युरोपखंडास असूयोत्पादक होऊन बसलीं होतीं, तीं केवळ हिंदुस्थानच्या व्यापाराच्या जोरावरच. थाडशी प्रवाशांखेरीज इतरांस हिंदुस्थान अद्यापही फारसें माहीत नव्हतें. एखाद दुसरा प्रवाशी हिंदुस्थानांतून परत जाऊन इकडील बलाढ्य राज्यांच्या आणि त्यांच्या अपार संपत्तीच्या गोष्टी तिकडे सांगत. त्यांच्या प्रवासवृत्तांवरूनच हिंदुस्थानासंबंधाची त्या वेळची हकीकत आम्हाला कळते. आणि ती बऱ्याच अंशीं विश्वसनीय आहे. एल्फिन्सटन साहेबांनीं

अस्सल कागद पत्रांवरून हिंदुस्थानचा जो अमूल्य इतिहास लिहिला आहे, त्यांत १५ व्या आणि १६ व्या शतकांत हिंदुस्थानांत येऊन गेलेल्या बऱ्याच प्रवाशांचे अभिप्राय दिलेले आहेत. त्यांपैकीं कांहीं खालीं दिले आहेत.

**हिंदुस्थानाच्या सद्यःस्थितिसंबंधाच्या पुराव्याची एकवाक्यता कां होत नाहीं.**--इंग्रज लोक हिंदुस्थानांत येण्यापूर्वींची येथील स्थिति कशी होती ती पहा. हिंदुस्थान सर्व जगाची व्यापारपेंठ होऊन बसलें होतें, आणि येथें उत्पन्न होणाऱ्या जिनसांस युरोप, आशिया आणि आफ्रिका खंडांत सारखीच मागणी असल्यामुळें येथील लोकांनीं ते पैदा करून व विकून खूप संपात्ति मिळवून ठेविली होती. त्याच हिंदुस्थानाची स्थिति आज कशी आहे, याविषयीं मतभेद पडला असून एकपक्ष हिंदुस्थानाची भरभराट होत आहे असें ह्मणत आहे, आणि दुसरा उलट पक्ष हिंदुस्थान दरिद्री होत आहे असें ह्मणत आहे. एकमेकांच्या मनांतील आशय काय आहे याची कल्पना बरोबर न झाल्यामुळेंच हा बहुतेक घोंटाळा उत्पन्न झाला आहे. लोकसंख्येची वाढ, अवाढव्य आयात आणि निर्गत व्यापार, आगगाड्या, तारायंत्रें, आणि किंचित घोंटाळ्याची पण शास्त्रीय पद्धतीनें चाललेली राज्यव्यवस्था, यांकडे बोट दाखवून तीं देशाच्या भरभराटीचीं द्योतक आहेत असें एक पक्ष प्रतिपादन करता. पण सुधारलेल्या राष्ट्रांत सुरू होऊन अगदीं पूर्णतेस गेलेल्या आणि त्याच्या भरभराटीच्या द्योतक अशा पुष्कळ संस्था हिंदुस्थान सारख्या देशाच्या उपयोगी नाहींत हे ह्या पक्षाच्या लक्ष्यांत येत नाहीं. शिवाय पुष्कळ गोष्टी मूळच्या चांगल्या असून आणि सद्धेतूनें केल्या असून

त्यांपासून लोकांचें कल्याण करण्याचा उद्देश सिद्धीस जात नाहीं हेंही ते विसरतात. एखाद्या लहानशा गांवांत सरकारानें विजेचे दिवे सुरू केले आणि त्यांच्या खर्चासाठीं गांवकऱ्यांवर कर बसविला अशी आपण कल्पना करूं. आतां याचा परिणाम काय झाला, तर तें गांव एखाद्या सुधारलेल्या देशांतील गांवासारखें दिसूं लागलें. सरकारास ही गोष्ट भूषणास्पद आहे; पण दुसऱ्या बाजूनें विचार केला असतां असें दिसून येईल कीं, लोकांवर कराचा जो बोजा पडला आहे तो त्यांच्या सामर्थ्यापलीकडे आहे. इंग्रज लोकांचें हिंदुस्थानांतील राज्य सर्वांत उत्कृष्ट आहे असें दाखविण्याकरितां ज्या गोष्टींकडे मोठ्या उल्हासानें बोट दाखविण्यांत येतें, त्यांपैकीं बऱ्याच वरील तऱ्हेच्या आहेत. त्या देशस्थितीला अननुरूप आणि फार महागाईच्या आहेत. अतएव सुराज्यव्यवस्था, पूर्णावस्थेंत गेलेले कायदे, व पौर्वात्यपद्धतीच्या विचारांत गढून गेलेल्या हिंदुस्थानासारख्या देशांत सुरू केलेल्या पाश्चात्य संस्था, यांच्या योगानें या देशाचें कल्याण अवश्य होत असलें पाहिजे, असें अनुमान काढणें म्हणजे शुद्ध जुलूम आहे.

हिंदुस्थान दिवसेंदिवस दरिद्री होत चाललें आहे, असें प्रतिपादन करणारी मंडळी, देशाच्या भरभराटीची खरी परीक्षा तेथील सामान्य लोकांच्या स्थितीवरूनच केली पाहिजे असें म्हणतात व लोकांकडे बोट दाखवितात. क्षुधाग्रस्त रयत खायाला भाकरी नाहीं म्हणून रडत आहे, तिला तारेच्या खांबाचा काय उपयोग? अथवा एखाद्या शेतकऱ्याचीं मुलें अर्धे पोटीं राहिल्यामुळें आजारी पडून मृत्युपंथास लागलीं असलीं तर त्यांजपुढें आगगाड्यांचे फायदे वर्णन करून काय उपयोग?

सावकार लोक त्यांचें नुकसान करून आपल्या अन्यायार्जित दौलतींत भर टाकीत आहेत किंवा बाहेर देशांशीं व्यापार करणारे देशांतील मुख्य पोषक द्रव्य विकून खूप नफा मिळवीत आहेत, याचें त्याला काय होय? शिवाय एकंदर लोकसंख्येच्या मानानें असे नशीबवान लोक कितीसे आहेत? अगदींच थोड. आगगाड्या व तारायंत्रें आणि मूठभर मंडळीची चलती, एवढ्याच गोष्टी एखाद्या राष्ट्राच्या भरभराटीच्या निदर्शक आहेत असेंच जर मानावयाचें असेल तर हिंदुस्थानही श्रीमंत असून भरभराटींत आहे असें ह्मणूं. पण सामान्य लोकसमूहाची स्थिति देशाच्या सांपत्तिक प्रगतीची द्योतक जर असेल तर हिंदुस्थानाची स्थिति चांगली नाहीं असें ह्मणावें लागतें.

**हिंदुस्थानांतील लोकसंख्येचा बराच मोठा भाग शेतकींत गुंतलेला आहे**-हिंदुस्थानांतील हल्लींच्या बहुजनसमाजांत कोणते लोक येतात, या बाबतींत मतभेद नसून बहुजन समाज शेतकऱ्यांचा बनलेला आहे हें सर्वांस कबूल आहे. सन १८२८ सालीं, कॉमन्स सभेपुढें बजेट सादर करितांना लॉर्ड जॉर्ज हॅमिल्टन म्हणाले–'हिंदुस्थान बहुतेक शेतकीवर चाललेला देश आहे'–'हिंदुस्थानांतील लोकांच्या उद्योगधंद्यांत शेतकीचा धंदा इतका व्यापक आहे कीं–मोठाल्या गांवांतून–व्यापारी आणि कारागीर यांच्या स्वतःच्या मालकीच्या जमीनी असून त्यांवर आपल्या कुटुंबांस पुरेल इतकें धान्य ते पिकवितात' असें सर वुइल्यम हंटर यांनीं म्हटलें आहे. निर्वाहासाठीं जमीनीवर अवलंबून असलेल्या लोकांचें प्रमाण किती आहे हें दुष्काळ मंडळाच्या रिपोर्टावरून दिसून येतें. या विषयावर पुष्कळ पुरावा गोळा करून त्या मंडळानें असा

निर्णय केला आहे कीं, खेड्यांतील लोकसंख्येपैकीं शेंकडा ९० अथवा एकंदर लोकसंख्येपैकीं शेंकडा ८० हून जास्त लोक शेतीवर सर्वस्वी अवलंबून आहेत. तेव्हां ठोकळ मानानें पहातां हिंदुस्थानाची भरभराट होत आहे किंवा नाहीं, याचा निर्णय करावयाचा ह्मणजे शेतकरी वर्गाची स्थिति कशी काय आहे हें पाहणें अत्यंत अवश्य आहे, असें दिसून येईल. सध्यां हिंदुस्थानाची लोकवस्ती शेतकरी वर्गाचीच आहे असें धरून चालण्यास हरकत नाहीं आणि त्यांची स्थिति जर शोचनीय असेल तर बाकीच्यांची भरभराट जमेस धरण्या-सारखी नाहीं. प्रख्यात अर्थशास्त्रज्ञ ॲडॅम स्मिथ यांनीं ह्मटलें आहे.—"एखाद्या समाजांतील पुष्कळ लोक दरिद्री आणि विपत्तिग्रस्त असले तर तो समाज सुखी आणि भरभराटींत आहे असें ह्मणतां येणार नाहीं." दुसरा एक ग्रंथकार ह्मणतो, "आमचे जमीनदार, व्यापारी आणि कारखानदार ह्या वरील वर्गांच्या हातीं अलोट संपत्ती असली ह्मणजे एकंदर राष्ट्र-समृद्ध आहे असें समजावयाचें नाहीं, तर मध्यम आणि मोल-मजुरी करणाऱ्या वर्गास अन्नाची ददात नसून त्यांजजवळ बैल, मेंढरें, आणि इतर जनावरें पुष्कळ असून, कोठारांत गल्ला पुष्कळ असला आणि निर्वाहाच्या इतर सर्व वस्तूंची वखारींत समृद्धी असली ह्मणजे तीच राष्ट्राची खरी सुसंप-न्नावस्था ह्मणावयाची. ह्या सर्व गोष्टी असून राज्यकर्ते शहाणे आणि देश स्वतंत्र असला ह्मणजे, तेथें कोणत्याही प्रकारचे बखेडे होऊन लोकांच्या शांततेचा भंग होण्याची भीति नाहीं"

**हिंदुस्थानाची सद्यःस्थिति**—कित्येक बाबतींत हिंदु-स्थान सुदैवी आहे खरें. त्याच्या एकंदर इतिहासांत इतकें

चिरस्थायी आणि सुविचारी सरकार त्याला मिळालें नव्हतें. हल्लींच्या सरकारानें देशांत जिकडे तिकडे पूर्ण शांतता स्थापिली असून बाहेरून परचक्राची भीति मुळींच ठेविली नाहीं. सर्व प्रतींच्या लोकांमध्यें शिक्षणाचा प्रसार हळू हळू होत आहे आणि युरोपियन कलांचें आणि शास्त्रांचें ज्ञान या देशांत थोडें बहुत अमलांत आलें आहे. शहाण्या आणि सुधारलेल्या राज्यकर्त्यांच्या हातीं कारभार असला ह्मणजे ते सुधारणा करितात. याचा दाखला आगगाड्या, तारायंत्रें, दवाखाने आणि जलाशय यावरून समजतो. पण या सर्व गोष्टी कृतज्ञतापूर्वक कबूल केल्या तरी एकंदर लोकस्थिति कशी आहे याचा विचार राहिलाच. एकंदर लोकांची--शेतकरी वर्गाची-स्थिति कशी आहे याचा विचार राहिलाच. प्रस्तुत लेखकानें स्वतःच्या अनुभवाच्या गोष्टी किंवा ठळक नेटिव गृहस्थांचे अभिप्राय येथें दाखल केल्यास ते दुराग्रहमूलक आहेत असा आक्षेप येण्याचा संभव आहे. सबब या वर्गाची स्थिति किती शोचनीय आहे, हें दाखविण्याकरितां सरकारी कागदपत्रांतून व प्रसिद्ध अँग्लोइंडियन कामगारांच्या अभिप्रायांतून आणि इंग्लंडांतील विख्यात मुत्सद्यांच्या भाषणांतून कांहीं गोष्टी येथें सादर करितों. दुष्काळ मंडळांमधील सभासद सर जेम्स केअर्ड आणि मि. सलिव्हन यांनीं हिंदुस्थानाच्या दुःस्थितीसंबंधानें जें शब्दचित्र रेखिलें आहे, त्याहून अधिक यथार्थ माहिती देतां येणार नाहीं; ह्मणून त्यांच्याच शब्दांनीं आह्मी ती माहिती देतों:--

" लोकसंख्या वढत आहे; धारण महाग होत आहे; धान्याची पैदास फारच थोडी वाढली आहे; असें

निर्यात व्यापारावरून दिसत आहे. आणि इकडे मजुरीवर निर्वाह करणारी स्वतःच्या मालकीची थोडीशी देखील जमीन नसलेली प्रजा सारखी वाढत असून शेतकीशिवाय इतर धंदे नसल्यामुळें मजुरांचा पुरवठा गरजेपेक्षां अधिक वाढत आहे. इतर देशांतील मजुरीच्या मानानें आणि धान्याच्या किंमतीच्या मानानें हिंदुस्थानांतील मजुरीचा दर अगदींच कमी आहे. अमेरिकेंतील दक्षिणेकडील संस्थानांत स्वातंत्र्य मिळालेले आफ्रिकन मजूर खपत असतात, तेथें धान्याचा भाव साधारण मानानें हिंदुस्थानांतील दरा इतकाच ह्मणजे दर रुपयास २९ पासून ३० पक्के शेर इतका आहे. पण आफ्रिकन मजुरास मिळणारी मजूरी २ पासून २। शिलिंग आहे. ती हिंदुस्थानांतील मजुरास मिळणाऱ्या ३ आणे मजुरीच्या ८।९ पटीनें जास्त आहे. दोन्ही ठिकाणीं हवामान सारखेंच असल्यामुळें कपडालत्ता आणि रहाण्याची जागा हीं सारखींच लागतात. हिंदुस्थानांतील मजुरांच्या दारिद्र्यासंबंधानें ही गोष्ट मोठ्या महत्वाची आहे. राष्ट्र नवीन बनावयास लागलें ह्मणजे सतत पडणारे दुष्काळ रोगरूपानें त्याच्या पाठीस लागून त्याची वाढ खुंटवितात. राष्ट्र या दृष्टीनें हिंदुस्थानचे बाळपणचे दिवस कधींच निघून गेले आहेत; आणि हिंदुस्थान सरकारनें निरनिराळे धंदे वाढीस लावून हिंदुस्थानाची अवनती होऊं देऊं नये हें त्याचें कर्तव्यकर्म आहे. ' देशस्थितीची चौकशी करण्याच्या खास कामावर नेमलेल्या गृहस्थांनीं जें कांहीं पाहिलें त्यांचें सार वर लिहिलेल्या प्रकारचें आहे, आणि या विधानांची सत्यता आपणांस पुढें पदोपदीं आढळून येईल.

# भाग २ रा. हिंदुस्थानच्या भरभराटी बद्दलचा पुरावा.

**लोकसंख्येची वाढ.**–हिंदुस्थानची भरभराट होत आहे असें सिद्ध करण्यास उत्सुक असलेली मंडळी या विषयाचा विचार किती चमत्कारिक तऱ्हेनें करते हें पाहण्यासारखें आहे. ते ह्मणतात "हिंदुस्थानची भरभराट होत आहे." "कशावरून" तर "त्याची लोकसंख्या किती तरी वाढत आहे ती पहा" असें त्यांचें उत्तर येतें. आतां या मंडळीचा दुसरा एक सिद्धांत घेऊं. तो कोणता ह्मणाल तर "हिंदुस्थानाची भरभराट होत आहे, पण जितकी भरभराट व्हावयास पाहिजे तितकी होत नाहीं." यांवर कां? असा प्रश्न केल्यास, "तेथील लोकसंख्या किती झपाट्यानें वाढत आहे पहा," असें उत्तर पुन: ठेवलेलेंच आहे. एतावता ही लोकसंख्येची वाढ कधींकधीं देशाच्या भरभराटीच्या पुराव्यादाखल आणि कधीं कधीं देशाच्या दारिद्र्याच्या पुराव्या दाखल उपयोगी पडते. सर वुइल्यम यांजबरोबर झालेल्या एका वादांत हात टेंकण्याचा प्रसंग आला असतां, हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी यांनीं देखील वरील भ्रामक कोट्या पुढें आणल्या. १८९७ सालच्या फेब्रुवारीमध्यें राणी सरकारास सादर करावयाच्या मानपत्रावर वादविवाद चालला असतां लॉर्ड जॉर्ज हॅमिल्टन ह्मणाले:–'हिंदुस्थानाला एकंदरीनें कोणतीही कसोटी लावून पाहिली तरी तुह्माला असें आढळून येईल कीं, त्या देशाची भरभराट झाली असून तेथील बहुजनसमाज २० वर्षांपूर्वी होता त्यापेक्षां आज अधिक चांगल्या स्थितींत आहे. ब्रिटिश हिंदुस्थानची लोकसंख्या गेल्या २० वर्षांत ९ को-

टींनीं वाढली आहे हें कदाचित कॉमन्स सभेला माहीत नसेल. गेल्या २० वर्षांत हिंदुस्थान सरकारानें आपला कारभार चांगल्या रीतीनें चालविल्यामुळें तेथें जितकी लोक-संख्या वाढली आहे, तितकी सगळ्या दुनियेंत दुसरीकडे को-ठेंही वाढली नाहीं." हेच स्टेट सेक्रेटरी साहेब ६ महिने लोट-ल्यानंतर कॉमन्स सभेंत जमाखर्चाचा खर्डा रुजू करितांना ह्मणाले, "लोक संख्येमध्यें बेसुमार वाढ झाल्यामुळें प्रत्येक व्यक्तीच्या भरभराटीस व्यत्यय येतो ही गोष्ट मला कबूल केलीच पाहिजे."

"हिंदुस्थानांत जितकी लोकसंख्या वाढली आहे, तितकी सगळ्या दुनियेंत दुसऱ्या कोठेंही वाढली नाहीं" हें लॉर्ड जॉर्ज हॅमिल्टन साहेबांचें म्हणणें तरी बरोबर आहे कीं काय, हें पा-हिलें पाहिजे. गेल्या खानेसुमारीच्या रिपोर्टाच्या ७३ व्या पृष्ठाकडे जर ते वळून पहातील तर लोकसंख्येच्या वाढीच्या प्रमाणा-वरून हिंदुस्थानाचा नंबर २० वा लागतो असें त्यांस आढळून येईल. खानेसुमारी करणारे कमिशनर म्हणतात, "ठोकळ आंक-ड्यांनीं दाखविलेली वाढ जरी मोठी दिसते, तरी लोकसं-ख्येशीं तिचें प्रमाण पाहातां ती अगदींच साधारण बेताची आहे असें दिसून येईल. रिपोर्टांतील कोष्टकांवरून ती नेहमीचीच साधारण वाढ आहे आणि त्या वाढीप्रमाणें २८ देशांत हिंदुस्थानाचा नंबर २०वा लागतो असें दिसून येईल" यावरून लोकसंख्या पुष्कळ वाढल्यामुळें हिंदुस्थानाची भर-भराट होत आहे या म्हणण्यास पुरावा नाहीं असें ठरतें. पण लोकसंख्येंत ती वाढ देशाच्या अभिवृद्धीची द्योतक ह्मणून मा-नलीच पाहिजे असें जर लॉर्ड जॉर्ज हॅमिल्टन यांचें म्हणणें असेल तर १८८१ पासून सन १८९१ पर्यंत ब्रिटिश हद्दींत जी वाढ

लागत आहे कीं, या बाबतीसंबंधानें सर वुइल्यम हंटर आपल्या हिंदुस्थानच्या इतिहासांत लिहितात, 'हिंदुस्थानाच्या कित्येक भागांत शेतकीच्या लायक जमीन आणि शेतकरी लोक यांचें प्रमाण आमच्या देखत उलट झालें आहे. गेल्या शतकांत रयतेला पाहिजे होती तितकी जमीन लागवडींत होती व बंगाल प्रांताशिवाय इतर व शेतकीच्या उपयोगी अशी पुष्कळ पडीत जमीन होती. इंग्रजांच्या अमदानीचीं १०० वर्षे होत आहेत तोंच हें प्रमाण व्यस्त होऊन हल्लीं कित्येक जिल्ह्यांत लागवडीच्या जमीनीस पुरून उरतील इतके शेतकरी लोक झाले आहेत. देशांतील रानें तोडून जमीनी वाढविल्या आहेत. इतकेंच नाहीं, तर पुष्कळ जिल्ह्यांतील कुरणें लागवडीस आणल्यामुळें जनावरांस चाऱ्याची पंचाईत पडली आहे. अशा जिल्ह्यांतील रयतेला हल्लीं जमीन पड टाकतां येत नाहीं किंवा जनावरांकरितां गवतासाठींही राखून ठेवितां येत नाहीं.

दुष्काळ मंडळाच्या सभासदांनीं सन १८८० सालींच पुढील अनुमानें काढून ठेविलीं होतीं. "बंगाल्यांत पाटणा आणि बरद्वान, बनारस, वायव्य प्रांतांत मध्य, खालचा आणि दुआब, रोहिलखंड आणि अयोध्या यांतील कांहीं भाग, पंजाबांतील दाट वस्तीचे २।३ जिल्हे आणि या सारखेच हिंदुस्थानांतील इतर जिल्हे, यांत लोकवस्ती इतकी दाट आहे कीं, ती आपल्या निर्वाहाच्या साधनांना अगदीं चिकटून असते. या जिल्ह्यांतील हल्लींची शेतकीची पद्धति सुधारून दर एकरास अधिक उत्पन्न होण्याची कांहीं तरी खटपट झाल्याशिवाय वाढत्या लोकसंख्येचा गुजारा होण्यासारखा नाहीं. हे जिल्हे वजा केले ह्मणजे, इतरत्र बहुतेक खेड्यांतून हळु हळु अधिक

जमीनीची लागवड करितां येण्यासारखी आहे. शिवाय खे-ड्याच्या हद्दीबाहेर लागवडीस योग्य अशी कमजास्त मानानें पुष्कळ जमीन आहे. पण या जमीनीपैकीं बहुतेक जमीन चांगली पिकाऊ नाहीं. आणि जेथली जमीन पिकाऊ आहे तेथली हवा रोगोत्पादक असल्यामुळें किंवा तेथील परिस्थिति भिन्न असल्यामुळें दाट वस्तीच्या जागेंतील लोक तेथें येऊन वसाहत करण्यास तयार होणार नाहींत."

वरील लेख १८८० सालीं लिहिण्यांत आले. तेव्हांपासून आतांपर्यंत निदान ४ कोटींची वाढ लोकसंख्येंत झाली आहे. ह्मणजे वर वर्णन केलेली विपत्ति पुष्कळच वाढली आहे.

**हिंदुस्थानांतील कराचें प्रमाण**--हिंदुस्थानांत दर माणशीं कराचें प्रमाण अगदीं थोडें आहे, असें मोठ्या जोरानें प्रतिपादन करण्यांत येत आहे. आपल्याजवळचा सर्व पुरावा सरून जाऊन आतां कांहीं चांगलेसें प्रमाण सांगण्यास उरलें नाहीं ह्मणजे मंडळी या मुद्यावर येते. हा लाडका कोटीक्रम लढविण्यांत आजपर्यंत कोणत्याही स्टेट सेक्रेटरीनें कधीं हयगय केली आहे असें मला माहीत नाहीं; पण सर वुइल्यम वेडरबर्न आणि दादाभाई नवरोजी यांनीं हिंदुस्थानच्या भरभराटी संबंधाच्या कल्पनांस आधारभूत असें हें विधान अनेक प्रसंगीं खोडून टाकिलें आहे. सन १८९४ सालीं सर हेनरी फाउलर हिंदुस्थानच्या वतीनें स्टेट सेक्रेटरी होते. ते हिंदुस्थानच्या जमाबंदीची चौकशी करण्या संबंधानें कॉमन्स सभेंत वादविवाद झाला, त्या वेळीं ह्मणाले:—"उत्पन्नाचा विचार करूं लागलें असतां तद्विषयक आंकड्यांवरून आपणाला सर्व माहिती पूर्णपणें मिळते. इंग्लंडांत दर माणशीं

कराचें प्रमाण २ पौंड ११ शिलिंग ६ पेन्स आहे. स्कॉटलंडांत २ पौं. ८ शि. १ पे. आणि आयर्लंडांत १ पौं. १२ शि. ३ पे. आहे. हिंदुस्थानच्या जमाखर्चाचा खर्डा उद्यां आपणांपुढें रुजू व्हावयाचा आहे, त्यावरून आपणांस दिसून येईल कीं, हिंदुस्थानांत कराचें प्रमाण दर माणशीं सुमारें २ शि. ६ पे. ह्मणजे ब्रिटिश राज्याच्या मानानें $\frac{१}{२०}$ आणि आयर्लंडच्या मानानें $\frac{१}{१२}$ आहे." यावर मि. सॅम्युएल स्मिथ यांनीं विचारलें कीं, 'या हिशेबांत जमीनीवरील कर बाद करण्यांत आला आहे कीं नाहीं?' त्यास फाउलर साहेबांनीं 'होय' असें उत्तर देऊन ह्मटलें कीं, 'रुपयाची किंमत १३ पेन्स धरून हिंदुस्थानांतील कराची आकारणी २$\frac{१}{३}$ शिलिंग पडते.'

आतां हें आंकडे खरे आहेत असें जरी धरून चाललें, तरी त्यांवरून एवढेंच अनुमान काढतां येईल कीं, एखादा देश भरभराटीस चढत आहे असें मानलें असून तेथील कराचें मान जर इतकें भिकार असलें, तर तो देश खरोखरच दरिद्री असला पाहिजे. ब्रिटिश अमलांत हिंदुस्थानाची जर ही स्थिति, तर पूर्वीच्या मोंगलाईंत कर फार कमी असल्यामुळें त्या वेळची स्थिति फारच भयंकर, कल्पनातीत, असली पाहिजे. आणि ही गोष्ट खरी मानिली तर हिंदुस्थानाशीं व्यापार करण्यास इकडे प्रथम आलेले व्यापारी इकडील गरीब लोकांचें दुःख दूर करण्यासाठीं आले, किंवा इकडील संपत्तीच्या लोभामुळें आले, असा प्रश्न सहज विचारावासा वाटतो.

कोणताही मनुष्य एखादें ओझें वाहून नेतो तें आपल्या शक्तीच्या मानानें नेत असतो. असा सिद्धांत मानण्यास हरकत नाहीं. अत्यंत भिन्न परिस्थितींत असलेल्या इंग्लंड आणि

हिंदुस्थान यांसारख्या देशांतील कराच्या प्रमाणाची जर तुलना करावयाची असली तर प्रत्येकाचें उत्पन्न ह्मणजे कर देण्याचें सामर्थ्य किती आहे ह्याचाही आपणांस विचार केला पाहिजे. राष्ट्राच्या उत्पन्नांशीं कराची तुलना करून जें प्रमाण निघेल तेंच कराचें खरें प्रमाण मानिलें पाहिजे, असें मि. मलहाल यांनीं ह्मटलें आहे. इंग्लंडाचें दरमाणशीं उत्पन्न ४० पौंड, आणि कराचें मान २ पौं. ११ शि. ८ पे. यांची तुलना केली असतां कराचें प्रमाण दर शेंकडा ६.५ पडतें. लॉर्ड क्रोमर आणि सर डेव्हिड बारबर यांनीं काढिलेले हिंदुस्थानसंबंधानें तेच आंकडे पाहतां कराचें खरें प्रमाण शेंकडा ९ पडतें. ह्मणजे पुष्कळ उत्पन्नाच्या मनुष्याच्या मतानें अगदीं भिकार उत्पन्नाच्या मनुष्याला जवळ जवळ शेंकडा ४० प्रमाणें अधिक कर द्यावा लागतो. शिवाय वरील प्रमाणांत जमीनीवरील कराचा हिशेब धरण्यांत आलेला नाहीं. आणि तो अंशतः तरी हिशेबांत कां धरूं नये, हेंही आह्मास समजत नाहीं.

**जमीन धाऱ्याचें वास्तविक स्वरूप.**—मिल आणि फॉसेट यांनीं सरकाराला जमीनदार बनवून रयतेनें जमीनीबद्दल त्याला जें द्यावयाचें त्याला जमीनधारा अशी संज्ञा दिली आहे खरी. पण या देण्यापैकीं थोडा बहुत अंश तरी जमीन धाऱ्यांतच गणिला पाहिजे हें कबूल आहे; तथापि व्यवहारांत नेहमीं असें दिसून येतें कीं, जमीन धारा ह्मणून जितकी रक्कम सरकाराला रयतेवर आकारितां येईल तीही रक्कम रयतेकडून उकळण्याचा प्रयत्न सरकार करीत असतें. सरकारदस्त ह्मणून साधारण मानानें जमीनीचें निम्में उत्पन्न घेण्यांत यावें असें सर चार्ल्स वुड यांनीं सन १८६१ त ठरविलें;

पण हल्लीं त्या प्रमाणें वहिवाट होत नाहीं. मुंबई इलाख्यांतील जमीन धान्याचे ३ प्रकार मानितां येतील असें सर बार्टल फीअर यांनीं ह्मटलें आहे. (१) खऱ्या साऱ्या पैकींच कांहीं तरी कमी जास्त घेण्याचें ठरवून अनुमानधक्यानें ठरविलेली धारेबंदी, (२) भरपूर दस्त देऊन रयतेला केवळ मजुरी आणि भांडवलाचें व्याज सुटेल अशा हिशेबानें केलेली धारेबंदी (३) आणि भांडवलाचें व्याज आणि मजुरी यांत देखील जीमुळें छाटा छाट करावी लागते अशी धारेबंदी. ह्या ३ प्रकारांच्या भरीस सर लुई मालेट ह्यांनीं एक प्रकार आणून घातला आहे. ते असें ह्मणतात कीं, 'लागवडीचा खर्च मात्र ज्या जमीनींतून वसूल होतो, पण ज्यांना साऱ्याची भरपाइ करितां येत नाहीं, पण ज्यांवर सरकार सारा घेतें, असा जमीनीचा एक चौथा वर्ग आहे, असें मला समजलें आहे.' सर वुइल्यम वेडरबर्न यांनीं आणखी एक वर्ग काढला आहे. ते ह्मणतात, 'वरील चार वर्गांच्या भरीस आणखी एक वर्ग घालण्याची पाळी दुर्दैवानें माझ्यावर आली आहे. या वर्गांतील जमीनीचें उत्पन्न तिच्या लागवडीच्या खर्चासच पुरत नसून तिजवर सारा बसविण्यांत आला आहे, तो रयतेला दुसरीकडे कोठें तरी मजुरी करून किंवा सावकाराचें कर्ज काढून द्यावा लागतो.' सन १८९४ सालीं बजेटावरील वादविवाद पार्लमेंटांत चालू असतां सर वुइल्यम वेडरबर्न यांनीं स्टेट सेक्रेटरी साहेबांस जी इत्थंभूत माहिती दिली तिच्या योगानें अत्यंत संशयी अशा सरकारी अधिकाऱ्यांचें देखील समाधान झालें पाहिजे. हिंदुस्थानांतील रयतेकडून सरकारास जो दस्त देण्यांत येतो त्याचें खरें खरें स्वरूप काय आहे हें, दुष्काळ मंडळाच्या

रिपोर्टाच्या पहिल्या भागांत १८३ व्या पृष्ठावर विस्तृत विवेचन करून दाखविलें आहे. हा भाग दुष्काळ मंडळामधील एक सभासद मि. सलिव्हॅन यांनीं लिहिला असून मि. वुइल्सन यांनीं हिंदुस्थानांतील जमीनीपासून सरकारला मिळणारें उत्पन्न कराच्या रूपानें वसूल केलेलें नसून साऱ्यांच्याच रूपानें आहे, असें दाखविण्यासाठीं जो कोटिक्रम योजिला आहे तो अगदीं गैर आहे असें त्यांनीं सांगितलें आहे. त्यांनीं असा सिद्धान्त काढिला आहे कीं, सरकार जमीनीचें मालक नाहीं; सबब रयत त्याची कुळें होऊं शकत नाहीं, आणि सरकारची गरज भागण्यासाठीं आपल्या उत्पन्नाचा जो अंश रयत सरकारास देते त्याला सारा असें नांव देतां येत नाहीं; ह्मणून जमीनीचा सारा हा एक कर असून कराच्या प्रमाणाचा हिशेब करितांना तो हिशेबांत धरिला पाहिजे. इतर प्रमाणभूत मानिलेले ग्रंथकार हाचप्रकार खरा मानितात. हें मि. मलहाल यांनीं केलेल्या आंकडे-विषयक सर्व-संग्रहावरून समजेल. त्यावरून हिंदुस्थानांत दरमा-णशीं कराचें प्रमाण ९ शि. आहे असें लिहिलेलें आहे. तें कसें हीं असो; जमीनधाऱ्यापैकीं थोडा तरी अंश कराच्या स्वरूपाचा आहे असें मानून कराची आकारणी करितांना तो हिशेबांत धरला तर उत्पन्नाच्या मानानें धनाढ्य इंग्लंड देशांतील लोक शेंकडा जितकी रक्कम कराच्या रूपानें आपल्या सरकारास देतात तिच्या दुप्पट हिंदुस्थानांतील लोक देतात असें आढळून येईल. रयतेच्या दारिद्र्याच्या कारणांचा विचार आपणांस पुढें करणें आहे, त्या वेळीं धारेबंदीच्या सक्तीमुळें रयत बऱ्याच अंशानें दरिद्री झाली आहे असें दाखविण्यांत येईल.

**सोनें व चांदी यांची जबर आयात.** हिंदुस्थानांत सोनें आणि चांदी यांचे ढीगाच्या ढीग येऊन पडत आहेत. हें हिंदुस्थानाच्या भरभराटीचें एक ठरींव कारण आहे. हिंदुस्थानच्या खर्चाची चौकशी करण्याकारितां नेमलेल्या मंडळाचे एक सभासद सर जेम्स पील यांनीं १८९२ च्या मार्चमध्यें संपलेल्या ३० वर्षांत हिंदुस्थानांत ३९६ कोटी रुपयांची चांदी आणि सोनें येऊन गडप झालें, असें सांगितलें; त्यावरून त्या मंडळाचे अध्यक्ष लॉर्ड वेल्बी ह्मणाले कीं, ' हिंदुस्थानांत इतकी संपत्ति येऊन पडत आहे यावरून एकंदरीनें असें दिसतें कीं, हिंदुस्थानाच्या संपत्तीची पिछेहाट होत नाहीं.' हे आंकडे खरे आहेत असें धेऊन चाललें, तरी, त्यांवरून खरोखर काय अनुमान निघतें हें पाहिलें पाहिजे. वरील ठोकळ रक्कम दिसण्याला अगडबंब दिसते खरी; पण ज्या लोकांमध्यें ती वांटून द्यावयाची आहे, त्यांची संख्या-ही कांहीं कमी नाहीं. वरील सोनें चांदी ३० कोट लोकांना वांटून द्यावयाची आहे, त्याचा विचार केला म्हणजे दर माणशीं दरसाल ९।६ आण्यांची सोनें चांदी एकेकाच्या वांटणीस येते. अर्थात् एकंदर देश धनाढ्य आहे असें सिद्ध करण्यास वरील पुरावा कांहींच उपयोगी पडणार नाहीं. त्यांतूनही या आयात चांदीसोन्यांतून थोडिशी धातू तरी सरहद्दीपलीकडील देशांतून आमच्याकडे येणाऱ्या मालाचा मोबदला म्हणून तिकडे जात असली पा-हिजे. देशी संस्थानिकांनाही परदेशांस पैसे पाठवावयाचे नस-ल्यामुळें त्यांनीं पाठविलेल्या अफु, धान्य आणि इतर जिनसां-बद्दल त्यांनां, खरेदी केलेल्या मँचेस्टरच्या कापडाची किंमत वजा करून रोख सोनें चांदी घ्यावी लागते. यामुळें खालसा

मुलुखापेक्षां त्यांच्या वांट्यांला जास्त सोनें आणि चांदी जाते. ब्रिटिश मुलखांत राजे, नबाब, जमीनदार, महाजन, व्यापारी आणि धंदेवाले लोक जें चांदी सोनें आपल्या स्वतःच्या उपयोगास लावण्यासाठीं दागिन्यांच्या किंवा गटांच्या रूपानें ठेवितात, त्याचाही विचार केला पाहिजे. सोन्या चांदीचा विनियोग वर दर्शविलेल्या प्रकारांनीं होतो तेव्हां शेतकऱ्याच्या पदरांत काय पडतें ? आणि इतकी पुष्कळ सोनें चांदी या देशांत आल्याचा त्याला काय फायदा ? वरील सर्व गोष्टी हिशेबांत धरितां, बहुजन समाजाच्या म्हणजे शेतकऱ्यांच्या वांटणीस (शेतकऱ्याच्या स्थितीचा मात्र आतां आपणांस विचार कर्तव्य आहे,) किती किमतीचें सोनें रुपें येतें हें पहा. वरील हकिगतीवरून कांहीं थोडी मंडळी सोनें आणि चांदी जमा करून ठेवीत आहे, पण बाकीचे बहुतेक लोक दारिद्र्यांत खोल रुतत चालले आहेत, असें जर अनुमान काढिलें तर तें चुकीचें होईल असें आह्मास वाटत नाहीं.

**व्यापाराची वाढ**—सन १८९५ च्या मार्च महिन्यामध्यें कॉमन्स सभेंत बोलतांना सर हेनरी फाउलर यांनीं हिंदुस्थानचा व्यापार वाढत असून तो त्याच्या सुसंपन्नतेचा द्योतक आहे असें सांगून आपला आनंद व्यक्त केला. ते ह्मणाले, "हिंदुस्थानांतील आयात आणि निर्गत मालाचा विचार करितां असें दिसून येतें कीं, १८९२।९३ सालीं ( हें साल ह्मणण्यासारखें सुबत्तेचें नव्हतें. ) हिंदुस्थानानें ७ कोटि ९० लक्ष पौंडांचा माल विकत घेतला, आणि १८ कोटि ३० लक्षांचा माल विकला." हे आंकडे बरेच मोठे दिसत असून ते हळूहळू वाढतच आहेत. १८९५–९६ त आयात मालाची किंमत

८२६७६३८० पौंड झाली, आणि निर्यात मालाची किंमत ११,८४९९,४४१ पौंड झाली. पण ही वाढ अशी आहे कीं, अर्थशास्त्राचें अध्ययन करणारा विद्यार्थी तर राहोच एका बाजूला, एखादा छोटेखानी व्यापारी देखील देशाच्या संपन्नतेची आणि भावी कल्याणाची ती वाढ द्योतक नाहीं असें सांगूं शकेल. आपण अशी कल्पना करूं कीं, एखादा व्यापारी दर वर्षास १०० पौंडांचा माल विकीत असून त्याच्या मोबदला त्यास ७० पौंडच मिळतात. तो आपल्या जमाखर्चाची तोंडमिळवणी कशी करणार आणि शहाजोग किती दिवस राहणार? हिंदुस्थानची स्थिति पण अशीच आहे. सर हेनरी फाउलर यांनीं सांगितल्याप्रमाणें, १८९३ सालीं हिंदुस्थानानें बाहेर पाठविलेल्या मालाबद्दल त्याला जी किंमत मिळावयाची तीपेक्षां ३ कोटि ४० लक्ष पौंड कमी मिळाले. सरकारचे आंकडेशास्त्री मि. ओकोनेर यांनीं प्रसिद्ध केलेल्या माहितीप्रमाणें हा फरक १८९९ सालीं ३ कोटि ६० लक्षांवर गेला होता. ही इतकी रक्कम गेली कोणीकडे? त्या रकमेचा कांहीं भाग 'विलायत खातीं खर्चा'साठीं खर्च झाला, कांहीं सोन्याच्या नाण्यांत काढलेल्या कर्जाच्या व्याजाबद्दल गेला आणि कांहीं व्यापारी आणि खासगी लोक यांची स्वतः मिळकत विलायतेंत पोंचविण्याकडे खर्च झाला. हा देश कर्जानें पुष्कळ नाडला गेल्यामुळें गहाण टाकल्यासारखा झाला आहे. हिंदुस्थानचे स्वतःचे असे कारखाने मुळींच नाहींत, तेव्हां कर्जाच्या फेडीसाठीं त्याला जमीनीचें उत्पन्न विकावें लागतें, कधीं

कधीं त्याला वार्षिक हप्त्याची भरपाई करणेंही मुष्कील होतें. अशी वेळ आली ह्मणजे सरकार परोकारबुद्धीनें पुढें होऊन हिंदुस्थानच्या नांवानें धनको देशाकडून कर्ज काढवून तेवढी वेळ कशी तरी मारून नेतें. पण त्यायोगानें धनकोचें कर्ज तितकें वाढून, वर्षानुवर्ष व्याज वाढत जातें आणि अधिक कर्जबाजारी व्हावें लागतें. निर्यात होणाऱ्या मालापैकीं जमीनीच्या कित्येक प्रकारच्या उत्पन्नाचें महत्व संपत्तिदृष्ट्या बरेंच आहे. कारण त्या उत्पन्नांत नीळ, चहा, बुंद, ताग वगैरे जिन्नस येत असून देशांत त्यांचा जितका खप आहे त्याहून ते अधिक उत्पन्न होतात. पण निर्वाहाचीं धान्यें बाहेर पाठविण्यांत येत असतात यांत देशाचा फायदा नाहीं, असें ह्मणावें लागतें. लोकांना खावयाला यथेच्छ मिळत असून, त्यांना नको असलेलें, आणि त्यांनीं कोठारांत भरून शिल्लक राहिलेलें धान्य जर बाहेरदेशीं जात असतें, तर कांहीं हरकत नव्हती. पण तसा प्रकार मुळींच नाहीं. यासंबंधानें दुष्काळमंडळामधील सर जेम्स केर्ड आणि मि. एच्. ई. सलिव्हन् या दोघां सभासदांनीं सन १८८० सालीं आपला अभिप्राय खालीं लिहिल्याप्रमाणें नमूद करून ठेविला आहे:—

"गेल्या १० वर्षांत तांदुळांशिवाय इतर जातींचीं जीं धान्यें प्रत्येकवर्षी बाहेरदेशीं गेलीं आहेत, तीं इतकीं थोडीं आहेत कीं हिंदुस्थानांतील धान्याहारी लोकसंख्येस १ दिवस देखील पुरणार नाहींत. यावरून असें दिसतें कीं देशांत पुरून उरेसें धान्य कधींच

शिल्लक नसतें. आणि दुष्काळांत धान्याचा तोटा आला असतां ज्या ठिकाणीं दुष्काळ नाहीं अशा जिल्ह्यांतून रोजच्या खर्चासांठीं धान्य आणविल्याशिवाय लोकांस गत्यंतरच नसतें. या योगानें दुष्काळग्रस्त नसलेल्या जिल्ह्यांतील धान्याचा पुरवठा कमी होतो, त्याची किंमत वाढते, आणि दुष्काळाचा अंमल जास्त प्रदेशावर पसरून दुष्काळाची तीव्रताही वाढते. परदेशांतून हिंदुस्थानांत धान्याचा पुरवठा होणें अशक्यच आहे." दुष्काळ मडळाचा रिपोर्ट. भाग १ ला. पृ० ६७.

सर जेम्स कॅर्ड यांनीं १८७९ च्या ऑक्टोबरच्या २१ तारखेस सरकारी नात्यानें जो रिपोर्ट लिहून स्टेट सेक्रेटरींकडे पाठविला त्यांत असें ह्मटलें आहे कीं, 'साधारण मानानें उत्पन्न होणारें जमीनीचें वार्षिक पीक हल्लींच्या लोकसंख्येला पुरेल न पुरेल इतकें आहे. आणि एखादेवेळीं दुष्काळ पडल्यास त्याची तरतूद हल्लींच्या उत्पन्नांतून मोठ्या शिकस्तीनें लावितां येईल. या स्थितीमुळें महागाई आणि दुष्काळ हीं अधिकाधिक प्रत्ययास येऊं लागलीं आहेत.'

हें लिहून गेल्याला सुमारें २० वर्षें झालीं. आणि तेव्हां पेक्षां आतां हिंदुस्थानाला ९ कोटि लोक अधिक पोसावे लागत आहेत. ह्मणून धान्याची ही निर्यात स्वाभाविक आणि देशाला हितकर आहे, किंवा परिस्थितीमुळें देशाला तितकें धान्य बाहेर पाठविणें भाग पडत असून तें लोकांच्या हितास बाधक आहे, याचा विचार केला पाहिजे.

# भाग ३ रा.–हिंदुस्थानाच्या दारिद्र्याबद्दलचा पुरावा.

## इंग्रजी मुत्सद्यांचे आणि सरकारी अधि-काऱ्यांचे अभिप्राय.

**जॉन ब्राइट**–यांनीं १८५३ मध्यें कॉमन्स सभेंत हिंदुस्थानासंबंधानें बोलतांना पुढें लिहिल्याप्रमाणें अभिप्राय प्रगट केला होताः–

'हिंदुस्थानांतील लोकांस माझ्या मार्फत कांहीं गाऱ्हाणें कळवावयाचें असतें तर तें कोणतें असेल असें तुह्मांला वाटतें? त्यांचें गाऱ्हाणें असें आहे कीं, बहुतेक सर्व इलाख्यांतून आणि विशेषतः ज्या इलाख्यांत इंग्लंडचा अंमल सर्वांत अधिक काळपर्यंत चालू आहे, त्या इलाख्यांत हिंदुस्थानांतील रयतेचा बराच मोठा भाग ह्मणजे शेतकरी लोक, अगदीं कंगाल आणि कष्टमय स्थितीस जाऊन पोंचले असून भावी स्थिति मनांत येऊन ते अत्यंत उदास झाले आहेत.'

**लॉर्ड लॉरेन्स**–यांनीं १८६४ त पुढील अभिप्राय लिहून ठेविला आहेः–'एकंदरीनें पाहतां हिंदुस्थान देश अगदीं गरीब स्थितींत आहे. तेथील पुष्कळ लोकांची निर्वाहाचीं साधनें अगदीं अल्प आणि अपुरीं आहेत. याच आशयाचें लॉरेन्स साहेबांचें आणखी एक वाक्य आहे, 'हिंदुस्थानांतील पुष्कळ लोक इतक्या दरिद्री आणि कष्टप्रद स्थितींत राहत आहेत कीं, त्यांजपाशीं निर्वाहाचीं धड साधनें देखील नाहींत.'

**लार्ड मेयो** ( १८७० ) यांचा अभिप्राय पुढें लिहिल्याप्रमाणें आहे:—‘ विस्ताराच्या आणि महत्वाच्या मानानें तुलना करून पाहतां इतर देशांपेक्षां हिंदुस्थान पुष्कळच दरिद्री आहे ही गोष्ट मला कबूल आहे. अशा लोकांवर कराचें ओझें लादणें ह्मणजे त्यांना चिरडून टाकणें किंवा त्यांजवर जुलूम करणें आहे, तें प्रमाण राजकीय दृष्टया अहितकारक आणि अन्यायाचें आहे अशी माझी खात्री झाली आहे.’

**मि. ग्रँट डफ्.**—यांनीं कामन्स सभेंत एक सुरेख भाषण सन १८७० त केलें. त्यांप्रसंगीं त्यांनीं, ‘ इंग्लंडच्या जमाबंदीपेक्षां हिंदुस्थानाच्या जमाबंदीची स्थिति फार निराळी आहे ’ असें ह्मटलें आहे तें खरें आहे. मि. ग्रँट डफ् यांनीं ह्मटलें आहे कीं, ‘ हिंदुस्थानाच्या मानानें इंग्लंडांतील लोक चांगले सधन आहेत. ब्रिटिश राष्ट्रांची एकंदर वार्षिक आवक ८० कोटि पौंड आहे, असा साधारण अंदाज केलेला आहे. हिंदुस्थानाची वार्षिक आवक सुमारें ३० कोटि पौंड आहे. यावरून इंग्लंडांतील प्रत्येक इसमाचें वार्षिक उत्पन्न जवळ जवळ ३० पौंडपर्यंत पडतें; पण, हिंदुस्थानांतील प्रत्येक इसमाचें उत्पन्न केवळ २ पौंड पडतें.’ मि. ग्रँट डफ यांनीं जें विधान केलें आहे तें चांगलें साधार आहे, असें मला वाटतें. यासंबंधानें मला एवढेंच सांगावयाचें आहे कीं, युरोपांतील राष्ट्रांशीं तुलना करून पाहतां ‘हिंदुस्थानदेश गरीब आहे हें आह्मी पूर्णपणें जाणून आहों.

**सर जेम्स केर्ड**—( १८७९ ) यांनीं आपला अभिप्राय पुढें लिहिल्याप्रमाणें प्रगट केला होता:—‘हल्लींच्या लोक वस्ती-

ला जेमतेम पुरेल; आणि क्वचित् दुष्काळ पडला तर त्याची तरतूद करितां येईल इतकें धान्य साधारण मानानें दरवर्षी हिंदुस्थानांत पिकतें. शेतकी खालावत चालली आहे, आणि लोकसंख्या वाढत आहे, यामुळें एखादेवेळीं कठीण प्रसंग येईल.'–दुष्काळ मंडळाचा रिपोर्ट.

**मि. एच्. सी. अरमू**–बंगाल सिव्हिल सर्व्हिस यांनीं 'गार्डन ऑफ इंडिया' नांवाच्या पुस्तकांत सन १८८० त पुढीलप्रमाणें लिहिलें आहे.

'लाखों लोकांचे जीव सदोदित भुकेनें तळतळत असतां त्यांना पोटाच्या काळजींतून मुक्त न करितां, रमणीय अशा कायद्यांनीं किंवा इतर कोणत्याही उपायांनीं त्यांची स्थिति सुधारण्याचा प्रयत्न करणें जर सुकर असेल, तर पिरॅमिड नांवाच्या मनोऱ्यांस देखील त्यांच्या शिरोबिंदूवर उभें करितां येईल.'

**मि. ए. ओ. ह्यूम**–यांनीं १८८० त शेतकीखात्याकडील हिंदुस्थान सरकारच्या सेक्रेटरीची जागा कमी करण्यासंबंधानें जो रिपोर्ट लिहिला होता त्यांत पुढील मजकूर आहे.

'एखादे वर्षी पीक चांगलें आलें तर गोष्ट निराळी. पण एरवीं पुष्कळ लोकांना वर्षांतून कित्येक महिनेपर्यंत आपला आणि आपल्या कुटुंबांतील माणसांचा निर्वाह होण्यापुरतें देखील धान्य मिळत नाहीं. त्यांची अगदीं उपासमार होते असें नाहीं, पण त्यांस आपली भूक मारून राहवें लागतें. वास्तविक त्यांना जितकें पाहिजे असतें, तितकें अन्न त्यांस मिळत नाहीं.'

**मि. रॉबर्ट नाइट**–यांनीं हिंदुस्थानांत ३० वर्षें घालविलीं असून, ते अँग्लोइंडियन पत्रांचे चालक ह्मणून प्रसिद्ध

असें दिसतें. बहुतेकांजवळ कांहींच शिल्लक नसते. इतकेंच नाहीं, तर त्यांची त्याहूनही अधिक वाईट स्थिति असते; ह्मणजे ते सावकाराच्या कर्जांत बुडून गेलेले असून, आपण कधींतरी ऋणमुक्त होऊं अशी देखील त्यांस आशा नसते.'

हिंदुस्थानांतील ४ कोटि लोक अर्धपोटीं राहतात असें जें विधान सर वुइल्यम हंटर यांनीं केलें होतें त्याकडे पार्लमेंटचें लक्ष्य जाऊन स्टेट सेक्रटरी साहेबांनीं रयतेच्या स्थितीबद्दल चौकशी करण्यास हिंदुस्थान सरकारास फर्माविलें. सरकारानें जिल्हा कामगारांमार्फत चौकशी करविली, आणि प्रांतिक सरकारांनीं आपापले अभिप्राय सादर केले; आणि त्या सर्वांचें समालोचन करून २४ ऑक्टोबर १८८८ रोजीं हिंदुस्थानसरकारानें एक ठराव काढिला. हे सर्व रिपोर्ट केव्हांच छापिले असून त्याचें 'ब्ल्यूबुक' पार्लमेंटास सादर केलेलें आहे. सदरहू रिपोर्टांत सर वुइल्यम हंटर यांच्या अभिप्रायाचें समर्थन करणारी पुष्कळ माहिती आहे. पण स्थलसंकोचास्तव येथें ती माहिती दिली नाहीं.

**शेतकरी वर्गाचा कर्जबाजारीपणा**—एखादा मनुष्य शहाजोग आहे किंवा नादार आहे हें पाहून त्याच्या प्रापंचिक स्थितीचें आपणांस बिनचुक अनुमान करितां येतें. एखादा मनुष्य कर्जांत आहे, आणि त्याचें कर्ज नित्य वाढत आहे, असें जर आपणांस आढळून आलें तर तो भरभराटींत आहे असें आपण ह्मणूं काय? कधीं ह्मणणार नाहीं. जी गोष्ट व्यक्तीची तीच समाजाची. जमीनीच्या उत्पन्नावर निर्वाह करणाऱ्या लोकांचें प्रमाण हिंदुस्थानांत शेंकडा ९० आहे हें वर सागण्यांत आलेंच आहे. हा सगळा वर्ग कर्जांत बुडालेला

आहे किंवा कर्जमुक्त आहे हें पाहिलें पाहिजे, आणि त्या कामीं आपण सरकारी पुराव्याचीच मदत घेऊं. कमिशनरांनीं आपल्या रिपोर्टांत असें लिहिलें आहे:—

" हिंदुस्थानाच्या निरनिराळ्या भागांतून मिळालेल्या माहितीवरून असें दिसतें कीं, जमीन वहिवाटणाऱ्या लोकांपैकीं एक तृतियांशाहून अधिक लोक कर्जांत बुडून गेले असून ते वर येण्याची आशा नाहीं. आणि जवळ जवळ तितक्याच लोकांना कर्ज झालेलें आहे. पण ते कर्जमुक्त होण्याची आशा अगदींच नाहींशी झालेली नाहीं. " मुंबई इलख्यांतील रयतेसंबंधानें कमिशनरांचें ह्मणणें असें आहे कीं, शेतकरी कर्जांतून मुक्त होण्याची आशा जसजशी कमी होऊं लागली, त्या मानानें सावकारलोकांनीं कायदेशीर इलाजांचें अवलंबन केलें. रयतेसही आपल्या आवडत्या जमिनींवरील आपला हक्क गेला असें आढळून येऊन कित्येक वेळां वैतागून जाऊन तिनें लुटालुट आणि दंगे केले. कर्जांत बुडालेल्या रकमेची संख्या मुंबईइलाख्यांत शेंकडा ३० हून अधिक नाहीं, असें दिसतें. तथापि इतर प्रांतांच्या मानानें तेथील रयतेचें कर्ज उत्पन्नाच्या मानानें भारी आहे. आणि एकंदर कर्जाच्या दोन तृतियांशासाठीं जमीनी गहाण लावून दिल्या आहेत.'

सन १८७९ सालीं मुद्दाम नेमिलेल्या एका कमिशनरच्या शिफारशीवरून कुळाला सावकाराच्या जाचांतून सोडविण्याकरितां सरकारानें ' डेक्कन ॲग्रिकल्चारिस्टस् रिलीफ ॲक्ट' ( दक्षिणेंतील शेतकऱ्यांस ऋणमुक्त करण्याचा कायदा ) या नांवाचा एक कायदा केला. सन १८९२ सालीं या कायद्याची अंमलबजावणी कशी काय चालली आहे याची

चौकशी करण्याकरितां दुसरें एक मंडळ नेमण्यांत आलें होतें, त्यांतील कमिशनरांनीं असा रिपोर्ट केला कीं, रयतेची स्थिति जरी कांहीं अंशीं आशा करण्यासारखी आहे तरी शेतकरी लोकांच्या हातून दिवसेंदिवस पुष्कळ जमीन, व्यापारी आणि इतर लोकांच्या हातांत जात आहे. सर वुइल्यम वेडरबर्न यांनीं कॉमन्स सभेंत विचारिलेल्या एका प्रश्नास लॉर्ड जॉर्ज हॅमिल्टन यांनीं कांहीं महिन्यांपूर्वीं जें उत्तर दिलें, त्यांत मद्रास कडील रयत कर्जानें किती ग्रासलेली आहे या बद्दलचे आंकडे दिलेले आहेत. ते येणें प्रमाणें:—

| | १८८७–९४ (७ वर्षांत) | १८९४–९६ (२ वर्षांत) |
|---|---|---|
| सारा न पटल्यामुळें किती कुळांची जमीन विकली गेली. | ९६,६४८ | १४,४११ |
| सारा न पटल्यामुळें किती कुळांची खासगी मालमत्ता विकली गेली. | ९९,७७२ | ६,७१७ |

राज्यकारभाराच्या रिपोर्टांवरून असें दिसून येतें कीं, सन १८८२–८३ आणि १८९१–९२ यांच्या दरम्यान ४४,९९,४३२ शेतें गहाण टाकण्यांत आलीं किंवा विकण्यांत आलीं. १८८२–८३ सालीं ही संख्या ३१४,९४८ होती ती १८९१–९२ सालीं ६०८,९०७ पर्यंत गेली, यावरून हें मान दरसाल किती वाढत होतें तें दिसून येईल. १८९६–९७ सालीं लहान मोठ्या जमीनमिळकतींची संख्या ३३,७६,७२९ असून ९८,१६,२२६ कुळांवर सरकार देण्यासाठीं फिर्यादी कराव्या लागल्या होत्या. २ लक्ष

३० हजार ४८७ खटल्यांत मिळकत जप्त करावी लागली होती. आणि साऱ्याची मागील बाकी वसूल करण्याकरितां २१,४६७ एकर जमीन विकावी लागली होती.

मध्यप्रांतांत शेतकऱ्यांचा कर्जबाजारीपणा इतका वाढला आहे कीं, हिंदुस्थानसरकाराला त्यांच्यासाठीं एक नवीन कायदा करावा लागला आहे, आणि त्यांत एक नवीन कलम घालून जमिनी दुसऱ्यांस लावून देण्याचा कुळांस मिळालेला हक्क काढून घ्यावा लागला आहे. मध्यप्रांताचे चीफ् कमिशनर यांनीं २८ आक्टोबर १८९६ रोजीं असें लिहिलें होतें कीं, धान्याचा सांठा सरून गेला आहे, पिकें चांगलीं आलीं नाहींत, आणि कित्येक वर्षेपर्यंत ऋतुमान शेतकीच्या कामास अनुकूळ असें झालें नाहीं, या योगानें शेतकऱ्यांवरील कर्जाचा बोजा भारी जरब झाला आहे. अशा स्थितींत शेतकरी लोकांचीं मनें अतिशय उदास—निराशेनें व्याप्त—व्हावीं, आणि ज्यांना वहिवाटीला मुळींच जमीन नाहीं अशा लोकांची स्थिति सरकारास काळजी करण्यासारखी वाटावी, यांत कांहीं आश्चर्य नाहीं.'

वायव्यप्रांतांत साऱ्यासाठीं झालेल्या फिर्यादींची संख्या ७१ हजारांवरून १८९४-९५ सालीं ७,५०,००० वर गेली. आणि साऱ्याच्या बाकीबद्दल जप्त केलेल्या मिळकतींची संख्या ७०१६ वरून ९६४२ वर गेली. साऱ्याच्या कायद्यान्वयें झालेल्या फिर्यादी आणि अर्ज यांची संख्या, २७१,५९२ ह्मणजे १८९२-९३ पेक्षां शेंकडा ३ टक्के अधिक होती व पूर्वीं कधींही ही संख्या इतकी मोठी झाली नव्हती. फिर्यादीपैकीं शेंकडा ९० हून जास्त मागील वर्षाप्रमाणेंच साऱ्याच्या

बाकीबद्दल होत्या. वऱ्हाडांत ही संख्या शेंकडा ९० नीं वाढली आहे. आदले वर्षी फिर्यादींची संख्या १०,३२४ होती ती या वर्षी १९,६३८ झाली.

आतां असें ह्मणण्यांत येत असतें कीं, लग्न वगैरे समारंभाच्या प्रसंगीं शेतकरी लोक उधळपट्टीचा खर्च कारितात, यामुळें ते कर्जग्रस्त झाले आहेत. या ह्मणण्यांत कितपत खरेपणा आहे तो दक्षिणेंतील दंग्याची चौकशी करण्यासाठीं जें मंडळ नेमलेलें होतें, त्याच्या रिपोर्टांतील पुढील उताऱ्यावरून दिसून येईल:—

'मंडळानें केलेल्या चौकशी वरून असें दिसतें कीं, लग्नें आणि इतर उत्सव या संबंधीं होणाऱ्या फाजील खर्चामुळें रयत कर्जबाजारी झाली आहे, असें एक विधान करण्यांत येत असून त्याला विनाकारण महत्व देण्यांत येत असतें. रयतेच्या ऐपतीच्या मानानें पाहिलें असतां अशा प्रसंगीं होणारा खर्च उधळेपणाचा दिसतो खरा, पण असे प्रसंग क्वचितच येत असून, कैक वर्षांनीं एकदां सामाजिक आणि प्रापंचिक सुखासाठीं त्याला जो पैसा खर्च करावा लागतो, तो त्याच्या स्थितींतील मनुष्यानें गैरवाजवी खरचला. असें ह्मणतां येणार नाहीं. ( रिपोर्ट, पृष्ट १९,क० ९९४.)

सर डेव्हिड बारबर यांनीं, हिंदुस्थानाच्या खर्चाची चौकशी करण्यासाठीं जें मंडळ बसलें होतें त्यापुढें दिलेल्या साक्षींत असें ह्मटलें होतें कीं, 'हिंदुस्थानांतील लोक अगदीं काटकसरीनें वागणारे आणि बेतानें खर्च करणारे आहेत '

'फॉर्ट्नाइट्ली रिव्ह्यू' नामक पाक्षिक पुस्तकाच्या आगष्ट १८९७मध्यें प्रसिद्ध झालेल्या एका लेखांत मि. रमेशचंद्र दत्त यांनीं

असें लिहिलें आहे कीं, 'हिंदुस्थानांतील शेतकऱ्याच्या विपत्तीचें कारण त्याला पुढील तरतूद करावयाची समजत नाहीं, किंवा तो निर्व्यसनी किंवा हात राखून खर्च करणारा नाहीं हें नव्हे; तर पृथ्वीवरील एकंदर शेतकरी लोकांपेक्षां हिंदुस्थानांतील लोक अधिक मितव्ययी, निर्व्यसनी आणि दूरदर्शी आहेत. प्रत्येक धारेबंदीच्या वेळीं शेतकऱ्याकडून घ्यावयाची साऱ्याची रक्कम वाढविण्यांत येत असून, संग्रह करण्याचें त्यांचें सामर्थ्य उत्तरोत्तर कमी होत आहे हें त्यांच्या दैन्याचें कारण होय. जवळ शिलकेंत कांहींच नसल्यामुळें अडीअडचणीच्या प्रत्येक वेळीं त्याला सावकार बघावा लागतो, आणि मुलकी कोर्टांच्या सक्तनियमामुळें तो सावकाराच्या जाळ्यांत अधिकाधिक गुंततो हें त्याच्या दैन्याचें कारण आहे. दिवाणी किंवा फौजदारी लहानसहान खटल्यांसाठीं देखील त्याला लांबच्या गांवीं जावें लागतें, आणि खर्चांत पडावें लागतें. तसेंच सर्व एशियामध्यें इंग्लंडचें वर्चस्व राखण्यासाठीं जो खर्च होतो तो त्यालाच द्यावा लागतो. यामुळें त्याची दैना उडाली आहे.'

शेतकऱ्याचा कर्जबाजारीपणा आणि दारिद्य यांच्या कारणांचा विचार पुढें विस्तारानें करण्यांत येईलच.

**उत्पन्न थोडें आणि मजुरी पहिल्या इतकीच.** वेल्बी कमिशनापुढें साक्ष देतांना हिंदुस्थानाचे माजी फडनीस सर डेव्हिड बारबर यांनीं हिंदुस्थानाची सांपत्तिक स्थिति कशी आहे हें समजण्यासाठीं कित्येक प्रमाणें सांगितलीं होतीं. ते ह्मणाले, 'हिंदुस्थानांतील लोकांचें उत्पन्न—ह्मणजे दरमाणशीं सरासरीं उत्पन्न—अगदीं थोडें आहे, याबद्दल जर कोणाला खात्री करून घ्यावयाची असली, तर हिंदुस्थान सरकार मजु-

रीच्या दराचे निरनिराळे तक्ते छापीत असतें त्याकडे, आणि प्राप्तीवरील करापासून जो वसूल होतो त्याकडे, त्यानें नजर फेंकावी; ह्मणजे तेथील लोकांचें उत्पन्न अगदींच थोडें आहे अशी त्याची खात्री होईल. तें तसें असल्याविषयीं माझी तर खात्री झालेली आहे.' हिंदुस्थानांतील प्रत्येक मनुष्याचें सरासरी उत्पन्न २७ रु. आहे, असा लॉर्ड क्रोमर यांचा अभिप्राय पूर्वीं दिलेलाच आहे. 'इन्स्टिटयूट ऑफ् बँकर्स' नांवाच्या एका संस्थेपुढें सर रिचर्ड टेंपल यांनीं एक निबंध वाचला होता, त्यांत हिंदुस्थानांत दरमाणशीं उत्पन्न १० रुपये आहे असें लिहिलें होतें. सर रिचर्ड टेंपल यांच्या या विधानावरून या विषयाचा विचार करण्याची आपणांस स्फूर्ति झाली असें सर डेव्हिड बारबर ह्मणतात. त्यांनीं केलेल्या हिशेबावरून हिंदुस्थानांत दर माणशीं २७ रु. उत्पन्न पडतें असें सिद्ध झालें. आणि हाच आंकडा त्यांनीं त्या वेळचे फडनीस लॉर्ड क्रोमर यांस दिला होता. आतां, या बाबतींत दुसऱ्या कित्येकजणांचें काय ह्मणणें आहे तें पाहूं. दुष्काळ मंडळांतील एक सभासद एच. एस्. कनिंगहॅम यांचा अंदाज असा आहे कीं, हिंदुस्थानांत मजूर लोकांस रोज २ पेन्स किंवा कित्येकांस दरमहा ३ किंवा ४ शिलिंग मिळतात.

मद्रास सरकारचे शेतकीखात्याचे रिपोर्टर मि. रॉबर्टसन हिंदुस्थानांतील शेतकऱ्यासंबंधानें असें ह्मणतात कीं, सुकाळामध्यें शेतकऱ्याचें आणि त्याच्या कुटुंबाचें उत्पन्न रोज ३ पेन्सपेक्षां अधिक असत नाहीं. दुष्काळांत तर त्यांची स्थिति अत्यंत शोचनीय असते.

हिंदुस्थानसरकारचे हल्लींचे महसूलखात्याचे सेक्रेटरी मि. होल्डरनेस यांनीं वायव्य प्रांतांत अधिकारावर असतांना असें लिहिलें आहे कीं, ' एक शेतकीवरील मजूर, त्याची बायको आणि दोन मुलें यांचें सर्वांचें मिळून उत्पन्न दरमहा ३ रुपयांहून अधिक नसतें. धारण साधारण असून त्यांना सतत काम मिळतें आणि कुटुंबांतील सर्व माणसांची प्रकृति निकोप असते, तेव्हां एवढ्या रकमेंत त्यांना दिवसांतून एक वेळ जेवायला मिळतें. तसेंच त्यांना राहयाला एक झोंपडी, आच्छादनासाठीं हलकें (जाडेभरडें) सुती कापड, आणि क्वचित् एखादें कांबळें इतकें मिळतें. स्वतः थोडीशी शेती करणाऱ्या मनुष्याची स्थिति याहून किंचित बरी असते तरी त्याला नेहमींच पोटभर खावयाला मिळतें असें नाहीं. उबदार कपड्यांचा तर त्यांना विटाळच नसतो. '

हिंदुस्थानचे माजी फडनीस सर ऑकलंड कॉलव्हिन १८८९ सालीं कौंसिलांत असें ह्मणाले कीं, ' लोकवस्तीपैकीं पुष्कळ मोठी संख्या अशा स्थितींत आहे कीं, तिची राहणी अगदीं साधी आहे आणि तिचें उत्पन्न धड निर्वाहास पुरे इतकें देखील नाहीं. '

शेतकीच्या कामावरील मजुरांसंबंधानें लिहित असतांना बहार प्रांतांतील पाटना जिल्ह्याचे कलेक्टर यांनीं १८८७ त असें लिहिलें आहे कीं, 'मजुरांना' जी मजुरी देण्यांत येते ती बहुशः धान्याच्या रूपानें देण्यांत येते. मोठ्या मनुष्याला जें धान्य देण्यांत येतें, तें दोन पासून अडीच शेर पर्यंत असून तें अगदीं हलक्यादराचें आणि निःसत्व असतें. त्याची किंमत सुमारें २¼ आणे ह्मणजे २¼ पेन्स होते. बायकांना याच्या निम्मे

मजुरी मिळूनही रोज नित्य सारखें काम मिळत नाहीं. साधारण पणें मजुरी करणाऱ्या पुरुषांना वर्षांतून ८ महिन्यांहून अधिक दिवस काम मिळत नाहीं. यावरून असें अनुमान काढलें पाहिजे कीं, शेतकींत गुंतलेल्या लोकांपैकीं बऱ्याच जणांना ह्मणजे सुमारें शेंकडा ४० जणांना पोटभर अन्न देखील मिळत नाहीं, मग वस्त्रपात्र आणि घरदार यांची गोष्टच बोलावयास नको.'

आणखी अभिप्राय येथें नमूद करण्याची आतां कांहीं आवश्यकता राहिली नाहीं. प्राप्तीवरील कराचें सरकारास जें उत्पन्न मिळतें त्याचे आंकडे पाहिले असतां हिंदुस्थान किती दरिद्री असलें पाहिजे हें दिसून येईल. ग्रेटब्रिटन आणि आयर्लंडमध्यें प्राप्तीवरील कर एक पेन्स असून त्याचें उत्पन्न २९ लक्ष पौंड आहे. हिंदुस्थानांत दसपट लोकवस्ती असूनहीं १ पेन्स प्रमाणें कर आकारणी झाली तेव्हां ३० लक्ष रुपये उत्पन्न झालें. शिवाय इंग्लंडांत कराच्या माफीची मर्यादा १९० पौंड ह्मणजे आजच्या (१९००)भावानें २०९० रुपये असून हिंदुस्थानांत ती फक्त ९०० रु. होती हें लक्षांत ठेविलें पाहिजे. आतां कोणी असें ह्मणेल कीं, मजुरीचे दर आतां वाढूं लागले आहेत; व व्यापारधंद्याच्या मुख्य मुख्य ठिकाणीं कारखाने सुरू होऊन स्थानिक उद्योग जारीनें सुरू झाले आहेत. तेव्हां हा प्राप्तीवरील कर त्यांस जड नाहीं. त्यांस उत्तर इतकेंच कीं, शेतीवर कमाई करणाऱ्या मजुरांच्या संख्येच्या मानानें ह्या कामकऱ्यांची संख्या अति कमी आहे. दुष्काळमंडळांतील एक सभासद सर जेम्स केर्ड यांची या बाबतींत झालेली साक्ष अधिक महत्वाची आहे. ते ह्मणतातः—

'उद्योग धंद्यांच्या मुख्य ठिकाणीं मजुरीचे दर जरी वाढले आहेत, तरी जेथें केवळ शेतकीचीं कामें चालतात अशा भागांत मजुरीचे दर वाढलेले नाहींत. अशा ठिकाणीं मजुरांना मागील पिढींत जी भिकार मजुरी मिळत असे तितकीच आतां मिळते. या लोकांची संख्या अधिकाधिक वाढत असून दर दहा वर्षांनीं त्यांची स्थिति अधिक कष्टप्रद होत चालली आहे.'

अबूल फाझलकृत 'ऐनी अकबरी'मध्यें मजूर, कारागीर, आणि शिपाई यांच्या रोजमुऱ्याचे जे तक्ते दिलेले आहेत, त्यांवरून असें दिसून येईल कीं, ३०० वर्षांपूर्वी जे मजुरीचे दर होते तेच आज आहेत. आतां मोंगल बादशहांच्या वेळीं धारणेचें जें मान होतें त्याच्या तिप्पट आणि चौपट हल्लीं झालें आहे, ही गोष्ट सर्वांस कबूल आहे. दर दहा वर्षांनीं धान्याचे भाव बरेच चढत आहेत. वड्या कौन्सिलांतील लष्करी खात्याचे प्रतिनिधी जनरल ब्रॅकनबरी १८९५ सालीं जमाखर्चाच्या खर्ड्यावरील वादविवादाच्या वेळीं असें ह्मणाले कीं, '१८८४ आणि १८९२ यांच्या दरम्यान मद्रास आणि रंगून येथें तांदुळाची किंमत शेंकडा ३८ नीं वाढली आहे. सात ठिकाणच्या गव्हांच्या भावावरून सरासरी काढतां १८८४ आणि १८९२ च्या दरम्यान गव्हांची किंमत शेंकडा ७२ टक्यांनीं वाढली आहे. जव हें धान्य घोड्यांस खावयास घालीत असल्यामुळें आमच्या दृष्टीनें तें अत्यंत महत्वाचें असून वरील आठ वर्षांत त्याची किंमत शेंकडा ८९ टक्के वाढली आहे. कानपूर, दिल्ली, रावळपिंडी, आणि कराची येथील भावांची सरासरी काढतां हरभऱ्याची किंमत शेंकडा ४९ टक्यांनीं वाढली

आहे. ' या प्रमाणें धान्याच्या किंमती तिप्पट वाढल्या असतां मजूर आणि कारागीर लोकांचें उत्पन्न किंवा त्यांचे मजुरीचे दर जितक्यास तितके कायम राहिले. यावरून त्यांची किती दुर्दशा होत असेल तिची आपणांस कल्पना करितां येईल.

**जमाबंदी वाढवितां येत नाहीं:**—मोंगल बादशहांच्या वेळीं रयतेजवळून साऱ्याच्या रूपानें पूर्वीं फार पैसा काढला जात असे, असें सांगण्यांत आलें आहे. पण त्यावरून काय समजावयाचें ? हल्लीं लोकसंख्या दुप्पट वाढली आहे, लागवडींत असलेल्या जमीनींत पुष्कळ भर पडली आहे, आयात निर्यात मालाचे आंकडे सपाटून फुगले आहेत, राज्यव्यवस्था कायम ठरली असून भूतदयेच्या तत्त्वांनुसार राज्यकारभार चालला आहे, लोकांची भरभराट होत आहे असें अधिकारी मंडळी कंठरवानें सांगत आहे. मोंगल बादशहाच्या वेळीं जो पैसा जुलमानें घेण्यांत येत असे त्याहून कमी वसूल इंग्रज सरकार घेत आहे, तरी देखील नवीन कर बसवून लोकांजवळून अधिक पैसा काढण्याची आतां मर्यादा राहिली नाहीं, असें चांगली चांगली तत्त्वज्ञ मंडळी ह्मणत आहेत, या गोष्टीचा आपणांस विचार केला पाहिजे. पूर्वींपेक्षां लोकांची स्थिति आज जर खरोखर चांगली असेल तर अधिक करभार सहन करण्याची ताकद त्यांच्यांत असलीच पाहिजे. पण वस्तुस्थिति अशी आहे कीं, लोकसंख्या जरी पूर्वींपेक्षां दुप्पट झाली आहे, तरी ती सरकारास पूर्वी इतका पैसा देत नाहीं, आणि शिवाय तिची स्थिति इतकी वाईट आहे कीं, तिजपासून अधिक पैसा काढणें मुळींच

साध्यही नाहीं. पुढें जे पांच सात अभिप्राय दिले आहेत त्यावरून हिंदुस्थानची जमाबंदी वाढविणें कितपत संभवनीय आहे हें कळून येईल.

बर्मिंगहॅम येथें १८७९ मध्यें भाषण करितांना मि. **जॉन ब्राईट** ह्मणाले, ' हिंदुस्थानांतील कराचें प्रमाण भारी आहे असें मीं ह्मटलें आहे; तें इतकें असह्य आहे कीं, आतां तुह्माला कर बिलकुल वाढवितां येणार नाहीं, आणि जर तुह्मीं कांहीं वाढ केली तर उत्पन्नांत कांहीं तरी तूट येईल इतकेंच नव्हे तर याहून एखादें अरिष्ट न आलें ह्मणजे मिळविळी असें तुह्मी समजा!'

**मि. फॉसेट यांचा अभिप्राय**:—'हिंदुस्थानांतील लोकांपैकीं पुष्कळ लोक इतक्या दरिद्रावस्थेंत आहेत कीं, नवीन कर बसवून अधिक वसूल गोळा करण्याची जर हिंदुस्थान सरकाराला पाळी आली, तर तो गोळा होण्याची मोठी पंचाइत पडेल.

**लार्ड रिपन यांचा अभिप्राय**:—'सरकार जुलम करीत आहे असें वाटूं न देतां नवे कर कोणते बसवावे हें एक कोडें आमच्यापुढें सदोदित पडलेलेंच आहे. हिंदुस्थानांत नवीन करांच्या द्वारें सरकारानें पैसा वसूल करणें साध्य नाहीं; आणि हल्लींच्या करांचें उत्पन्न विशेष वाढेल असें मानण्याला आधार नाहीं! '

**सर डेव्हिड बारबर यांचा अभिप्राय**:—'ज्या करावर मोठमोठे आक्षेप येणार नाहींत किंवा जो बसविला असतां लोकांत असंतोष उत्पन्न होणार नाहीं, असा पुष्कळ उत्पन्नाचा कर एकही राहिला नाहीं. देशांत गडबड होऊं न देतां

जितका कर, बसविणें साध्य आहे, तितका आह्मीं बसवून चुकलों आहों असें माझें मत आहे.'

**लॉर्ड जॉर्ज हॅमिल्टन यांचा अभिप्रायः**—'पण हिंदुस्थानाचें उत्पन्न हिंदुस्थानच्या खर्चास पुरेसें नाहीं, आणि हिंदुस्थान सरकारानें एकही कर बसवावयाचा शिलक ठेविला नाहीं.'

**लंडन टाईम्सचा अभिप्राय** (सप्तेंबर १८९६):—'हिंदुस्थानांतील छोट्या आणि बड्या कौन्सिलांतील फडनिसांच्या मतें येथील कराचें मान देशाला धोक्यांत घालण्यासारखें असून त्यांतल्यात्यांतच आपली अब्रू संभाळून, देशांत शांतता राखण्यासाठीं आणि त्याची भरभराट करण्यासाठीं त्याला पैसा खर्च केला पाहिजे हें आपण लक्षांत ठेविलें पाहिजे.'

**पायोनीयर पत्राचा अभिप्राय** (१२ एप्रिल १८९८):—'कर वसूल करण्याचे बहुतेक सर्व मार्ग आह्मीं योजून चुकलों आहों. आह्माला नीट आठवण असेल तर २० वर्षांत नऊ वेळां आमच्या जमाखर्चांत तूट आली आहे. आणि गेल्या १० वर्षांत राज्यकारभाराचा खर्च ज्या प्रमाणानें वाढत आहे त्याचप्रमाणानें पुढें वाढत गेल्यास हल्लीं जी थोडीशी शिल्लक राहते ती नाहींशी होईल आणि आमचा खर्च कसा भागेल तेंच आह्मांला समजत नाहीं. अखेरीस आमच्या जमाखर्चाची तोंडमिळवणी होणार नाहीं आणि १८८० त आह्मांस ज्याप्रमाणें पार्लमेंटाकडून मदत घ्यावी लागली होती, त्याप्रमाणेंच पुनः मदत घेण्याची पाळी येईल.

**जमीनीचा मगदूर कमी होऊन ती निःसत्त्व झाली आहे.**—२० वर्षांपूर्वी सर जेम्स केर्ड यांनीं जमीन निःस-

त्व झाल्यापासून अरिष्ट कसें उद्भवेल याकडे सरकारचें लक्ष वळविलें आहे. दुष्काळमंळाच्या रिपोर्टांत त्यांनीं असा अभिप्राय लिहून ठेविला आहे कीं, 'जमीन पडीत न टाकतां तींतून एकामागून एक पिकें काढून घेण्यांत येत आहेत, या योगानें शेतकीजमीनीचा फडशा मात्र उडूं लागला आहे.' सृष्टिनियमांचें साधें कार्य कोणत्या तऱ्हेनें घडून येत आहे हें शेतकऱ्याला कळत नाहीं, किंवा तो तिकडे लक्ष देत नाहीं, हा त्याचाच अपराध आहे असें कोणी म्हणेल; पण तो आपल्या हातानें आपला नाश करून घेत आहे, असा जर तुम्ही त्याजवर आरोप कराल, तर तो असें उत्तर देईल कीं,'असें केल्यावांचून मला गत्यंतरच नाहीं. माझें जें कृत्य तुम्हांस वेडगळपणाचें वाटतें, तें स्वतःच्या पोटांत आग पडल्यामुळें आणि बायका मुलें उपाशी मरतांना पाहून त्यांची कींव आल्यामुळें मला करावें लागतें. सरकार देणें वक्तशीर पटलेंच पाहिजे, असा सक्त निर्बंध असल्यामुळें मला सावकाराकडून कर्ज काढलें पाहिजे हा एक, किंवा जमीनींतूनच होईल तितकें उत्पन्न काढलें पाहिजे हा दुसरा, असे दोनच मार्ग आहेत.' हिंदुस्थान सरकारचे शेतकीखात्याचे सेक्रेटरी मि. ए. ओ. ह्यूम, यांनीं १८७० सालीं जमीन निःसत्त्व होत चालली असल्याबद्दल पुढील कडक टीका केली आहे:—

'हिंदुस्थानांतील शेतकीचा धंदा म्हणजे सृष्टीच्या संपत्तीवर दरोडे घालण्याचाच एक धंदा उत्तरोत्तर होत चालला आहे' असें मि. लीबिग हे ह्मणतात. शेतकऱ्याच्या गजव्यांत पैसे अगदीं खोल गेले असतील, आणि हिंदुस्थानांतील जमीन चांगली सुपीक असेल तरी तींतून पुष्कळ संपत्ती सतत काढून घेत-

ल्यानें, आणि तिची चांगली मशागत न केल्यानें एखादे वेळीं असा प्रसंग येईल कीं, शेतकऱ्याच्या गजव्यांत कांहीं राहणार नाहीं आणि जमीनींतही कांहीं राम राहणार नाहीं. सतत पिकें काढून घेण्यांत कसा तोटा होतो हें हिंदुस्थानांतील शेतकऱ्यांस थोडेंबहुत तरी समजतें; पण केवळ नाईलाजास्तव आपल्या अन्नदात्या जमीनीस तो लुबाडीत असतो, आणि हा लुबाडण्याचा प्रकार अगदीं अलीकडेच विशेष ज्यारीनें चालू झाला आहे. ९० वर्षांमागें रानें आणि कुरणें पुष्कळ असत, जनावरांची संख्या पुष्कळ मोठी असे, आणि लांकुडफांटा मुबलक मिळत असे, हल्लींपेक्षां पुष्कळ अधिक खत मिळत असे, आणि तें ज्या जमीनींत घालावयाचें ती जमीनही हल्लींपेक्षां कमी असे. पण आतां वस्तुस्थिति भिन्न झाली आहे. अरिष्ट वाढत असून पुढें तें फारच भयंकर होणार आहे. मोठमोठ्या कारणांचें कार्य जसें हळुहळु घडत असतें तसेंच त्या अरिष्टाचेंही कार्य घडत आहे. तें जरी दृष्टोत्पत्तीस येत नाहीं तरी या देशांतील शेतकीचें ज्यांनीं कित्येक वर्षे अवलोकन केलें आहे, त्यांना हे परिणाम चोहोंकडे दिसून आल्याशिवाय राहणार नाहींत. आणि ज्यांना या विषयाची माहिती आहे त्यांना हे परिणाम उत्तरोत्तर अधिकाधिक भयंकर होत जातील याविषयीं शंकाही राहिली नाहीं. सरकार आपल्याच जमीनीचा मगदूर कमी होऊं देत आहे आणि आपल्याच जमाबंदीचें नुकसान करून घेत आहे. आमच्या जवळ ‘ सोन्याचें अंडें घालणारी हंसी ’ एवढीच आहे, तिची आमच्या समक्ष उपासमार होत आहे, आणि आह्मी चैनींत राहून पुढें ओढवणारें संकट टाळण्यासाठीं ह्मणण्यासारखा कांहींच प्रयत्न करीत नाहीं. ’

# भाग ४ था.–हिंदुस्थानच्या दारिद्र्याचें कारण.

**उद्योग धंद्यांची धूळधाणी.**–हिंदुस्थानास अलीकडे केवळ शेतीवर अवलंबून राहवें लागत आहे. पण ही स्थिति अलीकडेच प्राप्त झाली आहे.

**सर वुइल्यम हंटर** ह्मणतात.–‘ अगदीं प्राचीनकाळापासून हिंदुस्थानाचा परदेशांशीं व्यापार चालू आहे. नैसर्गिक संपत्ति आणि लांबलचक बंदरपट्टी यांमुळें आशियाखंडांतील इतर देशांपेक्षां हा देश प्रसिद्धीस आला, त्याहून तेथील लोकांच्या औद्योगिक हुशारीमुळें तो अधिक प्रसिद्धीस आला. ’

**सर आलफ्रेड लायेल** ह्मणतातः–‘ रोमन लोकांच्या काळापासून तों आमच्या अमदानीपर्यंत हिंदुस्थानानें यूरोपांतील सोनें आणि चांदी यांचा पाट आपणांकडे वळविला होता. ’ हिंदुस्थानाचा हा व्यापार धान्य किंवा शेतीचें इतर उत्पन्न यांचा नव्हता, पण देशांत उत्पन्न होणाऱ्या कलाकौशल्याच्या वस्तूंचा व्यापार चालत होता, आणि त्या वस्तू त्या काळीं एकट्या हिंदुस्थानांतच पैदा होत असत.

‘कोळ्याच्या जाळ्याप्रमाणें तलम डाका येथील मलमल, काश्मीरांतील सुंदर शाली, आणि दिल्ली येथील किनखाबी रेशमी वस्त्रें, रोमन बादशाहांच्या दरबारांतील सदर्प युवती परिधान करीत असत, त्यावेळीं इंग्लडांतील लोक रानटी स्थितींत असून ते आपलीं शरीरें रंगवून घेत असत. हिंदुस्थानांत धातूचें केलेलें उठाव नकशीचें आणि तारेचें जाळीदार काम,

हस्तिदंत, शिसवी आणि चंदन यांवरील बारीक नकशी काम, भपकेदार रंगाचीं चिटें, हिरे मोत्याचें सुंदर जडावाचें काम, मखमालीवरील कलावतुकाम; गालीचे, उत्तम पोलादी हत्यारें वगैरे, मातीचीं सुबक भांडीं, परिपूर्ण दशेस जाऊन पोंचलेली नौकाबंधन विद्या, हीं सर्व सुधारलेल्या लोकांस कित्येक शतकेंपर्यंत आश्चर्यचकित करून सोडीत आणि ज्या वेळीं लंडन अस्तित्वांत देखील नव्हतें, त्यावेळीं हिंदुस्थान हें सर्व जगांत अत्यंत धनाढ्य बाजारपेठ होतें.' (मार्टिनकृत इंडियन एम्पायर. भाग १ पृ. ५०८.)

इंग्रज लोक येईपर्यंत हिंदुस्थानानें कलाकौशल्यासंबंधीं आपलें वर्चस्व कायम राखून ठेविलें होतें. पण तेथील उद्योगधंदे आणि कारखाने आतां कोठें आहेत? जगभर प्रसिद्ध असलेलें तेथील रेशमी आणि सुती कापड आतां कोठें आहे? सर वुइल्यम हंटर ह्मणतात:—

'हिंदुस्थानांतील उद्योगधंद्यांना धक्का पोंहोंचण्याला पुष्कळ गोष्टी कारण झाल्या; गेल्या शतकांत हिंदुस्थानांतील कापड आपल्याकडे येऊं नये ह्मणून इंग्लंडानें जकात बसविली इतकेंच नाहीं तर तें देशांत आणण्याची अजीबात बंदी केली. गुलामांचा व्यापार बंद झाल्यानंतर वेस्ट इंडिज बेटांतील लोकांच्या पेहरावांत फरक झाल्यामुळें हिंदुस्थानाचें एक चांगलें गिऱ्हाईक नाहींसें झालें. शिवाय यांत्रिक सुधारणा होऊन लँकॅशायरमध्यें स्वस्त कापड उत्पन्न होऊं लागलें. आणखी एक कारण असें झालें कीं, अमेरिकेंत लढाई चालू असतां कापसाचा दर वाढून शेतकऱ्यांचा नफा झाला तरी पण त्या योगानें कापूस पिकविणाऱ्या प्रांतांत जागोजागीं जे कोष्टी लोक

होते त्यांचा धंदा साफ बसला. दूरवर प्रसिद्ध असलेल्या डाका आणि अरनी येथील मलमली, आतां नामशेष झाल्या आहेत. या शतकाच्या आरंभीं ३६ लक्ष रुपये किंमतीचें सफाईदार कापड सुरतेहून दरसाल बाहेरदेशीं रवाना होत असे. तें कमी होतां होतां १८७४ त ६३,३२० रुपयांवर आलें. देशीराज्यें नष्टदशेप्रत जाऊन कारागीर लोकांचा एका बाजूनें आधार तुटला, आणि दुसऱ्या बाजूनें इंग्रज भांडवलवाले नैसर्गिकशक्तींचें साहाय्य घेऊन त्यांच्याशीं झुंजण्यास आले. खेड्यापाड्यांतील कारागिरांनीं अजूनही त्यांच्याशीं चढाओढ चालविली आहे; पण त्यांना यश येण्याची आशा नाहीं. विपरीत काळापुढें कोष्ट्यांला आपला माग फेंकून देऊन नांगर हातीं धरावा लागला आहे, आणि इतर लहान सहान धंदेही पुष्कळ बुडाले आहेत.'

सन १८९४–९५ सालीं कापसाचें सूत आणि कापड मिळून नक्की आयात २९ कोट रुपयांची झाली. आणि रेशमी कापड व कच्चें रेशीम मिळून २ कोटींची झाली. हें सर्व रेशमी आणि सुती कापड जर हिंदुस्थानांतच तयार झालें असतें तर किती लोकांना काम मिळालें असतें, याची कल्पना करितां येत नाहीं. हिंदुस्थानांतून कारागिरीचा माल बाहेरदेशीं जावयाचा तो जाईनासा झाला आहे इतकेंच नाहीं, तर दुर्दैवानें स्वतःच्या उपयोगासाठीं देखील हिंदुस्थानांतील लोकांना परदेशांतील करखानदारांवर अवलंबून राहावें लागत आहे, आणि देशांतील कारखानदारांकडून त्यांच्या गरजा भागत नाहींशा झाल्या आहेत. पूर्वी लोकांस लागणारे हरतऱ्हेचे जिन्नस हिंदुस्थान आपले आपणास पुरवीत असे,

लोकांच्या गरजेपुरतें धान्य येथें पिकत असे. मीठ पूर्वी आणि हल्लीं देखील पाहिजे तितकें मिळतें. मात्र हल्लीं त्यावर जबर जकात आहे. पूर्वी लाखों माग चालत असून देशांतील लोकांस पुरून उरण्याइतकें सुती आणि रेशमी कापड पैदा होत असे. हिंदुस्थानांतील प्रचंड लष्कराला आणि सामान्य लोकांना देखील (कारण त्यावेळीं हल्लींप्रमाणें हत्यारें वापारण्याची मनाई नव्हती) लागणारीं हत्यारें, दारूगोळा आणि सर्व सरंजाम येथल्या येथेंच तयार होत असे, आणि ऐषआरामांत गर्क होऊन गेलेल्या वरील प्रतीच्या लोकांस लागणाऱ्या शेकडों प्रकारच्या जिनसा देशी कारागीरच तयार करीत असत; पण हल्लींच्या यांत्रिक आणि वाफेच्या शक्तीनीं कामें करून घेण्याच्या दिवसांत सुबकपणांत त्यांच्या कामांच्या तोडीचें काम कोणालाही साधलेलें नाहीं.

**हिंदुस्थानांतील लोकांचा धंदा बुडाला**—हिंदुस्थानांत इंग्लिशांचा अंमल सुरू झाल्यापासून या देशास अगदीं परक्या अशा पुष्कळ लोकांस नोकऱ्या देण्याची सरकारास अवश्यकता वाटली. हिंदुस्थान जिंकणारे इतर लोक आणि इंग्रज यांमध्यें जो फरक आहे तो हाच. इतर लोक या देशांत आले, आणि त्यांनीं येथें कायमची वस्ती केली. राज्यकारभाराच्या कामांत ते हिंदु लोकांना खुशाल घेत, आणि सर्वांत श्रेष्ठ मुलकी आणि लष्करी आधिकार देखील त्यांना देत. अकबराचा मुख्य प्रधान आणि त्याचे कित्येक अत्यंत शूर सरदार हिंदू होते, त्याच्या सैन्यांत या देशांतील लोकांचीच भरती करण्यांत येत असे. आतां इंग्रजी राज्यांतील स्थिति कशी आहे ती पहा. राज्यकारभारासंबंधीं हजारों श्रेष्ठ जागांवर जे

एतद्देशीय लोक होते त्यांच्या जागा काढून घेतल्या आहेत, आणि ज्या लाखों लोकांना पूर्वी एतद्देशीय राजांच्या हाताखालीं शिपायाची किंवा आश्रिताची नोकरी मिळाली असती त्यांना आतां उद्योग नाहींसा झाला आहे. ह्या सर्वांना आतां पोटासाठीं शेतकीकडे वळावें लागलें आहे. मोंगल बादशाहांचें प्रचंड उत्पन्न कसें खर्च होत असे याचें बर्निअर नामक प्रवाशानें पुढें लिहिल्याप्रमाणें फार सुरेख वर्णन केलें आहेः—

"केवळ राजाकडून मिळणाऱ्या पगारावर आपल्या उदरनिर्वाहासाठीं अवलंबून असलेल्या लोकांची लक्षवारीनें संख्या पाहून पुष्कळ मंडळी आश्चर्यचकित झालेली आहे हें मला माहीत आहे; राज्याचें उत्पन्न कितीही असलें तरी असल्या बेसुमार खर्चाला तें कसें पुरेल असें ते विचारीत. मला वाटतें मोगलबादशाहाची संपत्ति किती आहे याचा त्यांना कांहीं अंदाजच नव्हता. तसेंच हिंदुस्थानावर राज्य करण्याची तऱ्हाही त्यांना माहीत नव्हती. जहागीरदार वगैरे मंडळीची शिबंदी धरून बादशाहाच्या भोंवतीं ३९ पासून ४० हजार पर्यंत सैन्य सदोदित असे. शिवाय राज्यांत इतरत्र सैन्य असे तें धरल्यास घोडेस्वारांची संख्या २ लाख होई. बादशाहाची स्वारी राजधानी सोडून महिना दोन महिने दुसरीकडे राहावयाची असली ह्मणजे त्याच्या भोंवतीं लष्कर आणि बाजारबुणगें मिळून २ पासून ३ लाख पर्यंत पायदळ असे. बादशाहाच्या जवळ असलेल्या लष्करापेक्षां दूर असलेल्या लष्कराची बडेजाव कांहीं कमी नव्हती. शिवाय त्या लष्कराची संख्या अधिक असे तें निराळेंच, दरएक जिल्ह्यांत उमराव, मनसबदार, शिबंदी, पायदळ आणि तोफखाना याप्रमाणें

सैन्य असतें. पायदळांतील शिपायाला दरमहा १० पासून २९ रुपयेपर्यंत तनखा मिळे. शिबंदींतील लोकांना दरमहा २९ रुपये आणि तोफखान्यावरील लोकांना दरमहा ३९ रुपये मिळत. मोंगललष्करांत प्रत्येकाचें लग्न झालेलें असे. तो बायका, मुलें आणि गुलाम यांचा आपल्या पदरीं मोठा सरंजाम बाळगी. उमराव, दरबारांतील ऐट आपल्या कचेरीला आणीत. आणि जनाना, नोकर, चाकर, घोडे, उंट यांच्या, आणि मेजवान्यांच्या अवाढव्य खर्चाखालीं कर्जबाजारी होत. "

हल्लीं ह्या सर्व कामगिऱ्या नाहींशा झाल्या आहेत इतकेंच नाहीं, तर परकीय राज्यसत्ता सुरू झाल्यामुळें मोठमोठ्या पगाराच्या जागा परकीय लोकांच्या वांट्यास जाऊन ते आपला शिल्लक टाकलेला पैसा आणि आपलें पेनशन परमुलुखांत खर्चीत आहेत.

**युरोपियनांस नोकऱ्या देणें**—सुमारें १९ वर्षांपूर्वी मि. ब्राइट यांनीं हिंदुस्थानांत नोकरीवर असलेल्या यूरोपियन लोकांचा एक तक्ता मागविला होता. त्यानंतर १८९२ सालीं मि. सीमोर के. यांनीं त्या सालापर्यंत तो तक्ता वाढवून घेतला, आणि कित्येक वेळां कॉमन्स सभेंत त्याचा उपयोग केला. या तक्त्यावरून असें दिसून येतें कीं, त्यावर्षी हिंदुस्थानांत २८ हजार यूरोपियन लोक दरसाल १० हजार किंवा त्याहून अधिक रुपये मिळवीत होते, आणि त्यांचा एकंदर वर्षाचा पगार १९ कोटि ४० लक्ष रुपये झाला होता. या रकमेपैकीं १० कोट रुपये ह्मणजे वरील रकमेपैकीं शेंकडा चाळीस इंग्लंडांत पेनशनच्या रूपानें पाठविण्यांत आले होते. त्याच तक्त्यावरून असें दिसून येतें कीं, दरसाल १००० किंवा

त्याहून अधिक रुपये पगार मिळविणाऱ्या देशी लोकांची संख्या १७ हजार असून त्यांच्या एकंदर पगाराच्या रकमेची बेरीज दरसाल ३ कोट २० लक्ष रुपये होते. ह्मणजे कांहीं एक काम न करितां इंग्लंडांत स्वस्थ बसून पेनशन खाणाऱ्या माजी सरकारी नोकरांनींच नोकरींत असलेल्या नेटिव्ह लोकांच्या दुपटीनें कमाई केली असें झालें. युरोपियन लोकांस हिंदुस्थानांत नेमण्यांत येत असल्यामुळें जो अवाढव्य खर्च होतो, त्याचे दुष्परिणाम स्टेट सेक्रेटरींच्या नजरेस पूर्वींच आले असून १८८६ सालीं कोशाध्यक्षास लिहिलेल्या पत्रांत त्यांनीं असें लिहिलें आहे:——(हा मजकूर पूर्वींच पृष्ठ १७२–१७३ मध्यें आलेला आहे. ह्मणून त्याची फिरून द्विरुक्ती केलेली नाहीं.)

**देशांतून दरसाल बाहेर जाणारी संपत्ति**—हिंदुस्थानाची भरभराट न होण्याचीं जीं कारणें आहेत, त्यांत हिंदुस्थानांतील संपत्तीचा प्रवाह एकसारखा परदेशीं वाहात आहे हें मुख्य आहे.

प्रो० थोरॉल्ड रॉजर्स ह्मणतात, देशाची जर भरभराट होत असेल तर तेथें निर्यात मालाच्या किंमतीपक्षां अधिक किंमतीचा आयात माल आला पाहिजे. आयात मालापेक्षां हिंदुस्थानांतून निर्यात माल अधिक होत असून त्यापासून देशाचें अहित होत आहे. व्यापारी आंकडे पाहिले असतां असें दिसून येतें कीं, येथें निर्यात मालापेक्षां बहुशः अधिक माल आयात होतो, तो असा:—

| देश | शें. टक्के. | देश | शें. टक्के. |
|---|---|---|---|
| इंग्लंड | ३२ | डेन्मार्क | ४० |
| स्विट्झर्लंड | २८ | नॉर्वे | ४२ |
| फ्रान्स | २२ | स्वीडन | २४ |
| बेलज्यम | ७ | स्पेन | ९ |

वरील आंकडे पाहिले ह्मणजे हिंदुस्थानाची काय वाट? असा प्रश्न साहजिक होतो, एका काळीं हिंदुस्थानांतून जो माल बाहेर देशीं रवाना होत असे त्याच्या मोबदला त्याला सोनें आणि चांदी मिळत असे. ब्रिटिश अंमल सुरू झाल्या-नंतर देखील निर्यात झालेल्या सगळ्याच मालाच्या मोबदला सोनें चांदी मिळाली नाहीं तरी निदान कांहीं मालाबद्दल तरी ती मिळत होती. फॉसेट साहेबांनीं अर्थशास्त्रावरील आपल्या पुस्तकांत ( पृष्ठ ४९७ ) ह्मटलें आहे कीं,' पूर्वीं इतर देशांपेक्षां हिंदुस्थानांत अधिक चांदी जात होती. १८६७ सालापूर्वीं ८ वर्षांत हिंदुस्थानांतून जितकी चांदी बाहेर गेली तिच्यापेक्षां दीडकोटि पौंड किंमतीची चांदी दरवर्षी अधिक हिंदुस्थानांत आली. पुढील चार वर्षांत चांदीचें आयात प्रमाण कमी होऊन त्याची वार्षिक सरासरी ७० लक्ष पौंड झाली. आणि तें प्रमाण गेल्या दहा वर्षांत ४९ लख पौंडांवर आलें आहे. या आंकड्यांवरून असें दिसून येतें कीं, जगांत दरसाल उत्पन्न होणाऱ्या चांदी पेक्षांही अधिक चांदी हिंदुस्थान खपवीत होतें, आणि ती चांदी चांदीचें नाणें वापरणाऱ्या फ्रान्स देशांतून येत होती.'

आलीकडे बाहेर देशीं जाणाऱ्या मालाची किंमत जरी हळुहळु वाढत आहे, तरी सोन्यारुप्याच्या रूपानें किंवा व्यापारी मालाच्या रूपानें हिंदुस्थानाला जो मोबदला मिळत आहे, त्यांत तितक्या प्रमाणानें वाढ झालेली नाहीं.

**देशांतून दरसाल संपत्ति बाहेर जात असल्याचा परिणाम.**—आयात मालापेक्षां निर्यात माल अधिक होऊं लाग-ल्यामुळें कोणते परिणाम होतात हें जॉन स्टुअर्ट मिल यांच्या

अर्थशास्त्रावरील ग्रंथांतून घेतलेल्या पुढील उताऱ्यांवरून नीटपणें कळून येईल:—

'एखाद्या देशास, परदेशास जास्त माल द्यावा लागत असला ह्मणजे जितका माल जास्त द्यावा लागतो तितकें त्याचें नुकसान होतेंच. पण परदेशाच्या मालाच्या मोबदला, आपला माल कमी किफायतशीर भावानें विकावा लागल्यामुळें त्याचें तितकें अधिक नुकसान होतें.'

'कोणत्याही दोन राष्ट्रांत व्यवहार होऊन त्याचा मोबदला पैशाच्या किंवा मालाच्या रूपानें न मिळाला, तर एका राष्ट्रानें दुसऱ्यास खंडणी दिल्यापासून जे परीणाम होतात तेच ह्या व्यवहारापासून होतात.'

'ऋणको देश धनको देशांकडून जितका माल मागवील तितक्याबद्दल त्या ऋणको देशाला वाजवीपेक्षां जास्त किंमत द्यावी लागेल आणि धनको देशाला आपली खंडणी मिळून शिवाय ऋणको देशाला जो माल बाहेर पाठवितां येत असेल तो माल वाजवीपेक्षां कमी दरानें घ्यावयाला सांपडेल.'

एतावता हिंदुस्थान इंग्लंडास बरीच जबर रक्कम खंडणी-दाखल देत आहे. व हिंदुस्थानची स्थिति गरीबीची असल्यामुळें या खंडणीचे परिणाम अधिकच वाईट होत आहेत. हिंदुस्थानची औद्योगिक दिशेनें भरभराट झालेली असती तर हें नुकसान त्याला इतकें जाणवलें नसतें. जर्मनी बरोबर झालेल्या मोठ्या खर्चाच्या युद्धानंतर फ्रान्सला कित्येक अब्ज रुपयांची खंडणी जर्मनीस देणें भाग पडलें, पण संपत्ती उत्पन्न करण्याची यांत्रिक आणि शास्त्रीय सर्व साधनें फ्रान्सला अनुकूल असल्यामुळें फ्रान्सचे हातपाय

मोडल्यासारखे झाले नाहींत. हिंदुस्थानची स्थिति तशी नाहीं. हजार वर्षांपूर्वी शेतकीची जी पद्धत होती तीच आज चालत असून तींत सुधारणा करण्याचें कोणालाही सामर्थ्य नाहीं आणि इच्छाही नाहीं. त्यामुळें ही खंडणी हिंदुस्थानास आपल्या रुधिराशयांतील रक्ताप्रमाणें झाली असून दिवसें दिवस तें अधिकाधिक अशक्त होत चाललें आहे. आणि तेथील लोकांना पोटभर खावयास न मिळाल्यानें ते अगदीं वाळून चालले आहेत! मि. जे. एम्. मॅक्लीन एम्. पी. हे अगदीं पक्के कॉन्सरवेटिव्ह असून ते राष्ट्रीय सभेच्या प्रतिकूळ पक्षांतले आहेत. त्यांनीं वृत्तपत्रकार या नात्यानें मुंबईत पुष्कळ वर्षें काढिलीं आहेत. यामुळें हिंदुस्थानासंबंधीं त्यांस चांगली माहिती झाली आहे. त्यांनीं १८९९ सालीं जमाखर्चाच्या अंदाजपत्रकावरील वादविवादाच्या वेळीं हिंदुस्थानाच्या स्थितीचें पुढें लिहिल्याप्रमाणें चित्र काढिलें होतें:—

'हिंदुस्थानांतील एकंदर करांचें उत्पन्न, देशांतील उद्योग धंदे करणारे आणि व्यापारी यांजपासून मिळालेलें आहे, आणि तें बहुतेक त्यांजपासून दूर अशा ठिकाणीं खर्च करण्यांत येतें. पांच कोटि पौंड वसुलापैकीं निम्मी रक्कम इंग्लंडांत जाते आणि बाकी राहिलेल्या रकमेचा बराच भाग सरहद्दीवरील स्वाऱ्या आणि लष्कर यांची भर करण्याकडेच जातो, म्हणजे वसुलापैकीं कर भरणारांस कांहींच परत मिळत नाहीं. हिंदुस्थानचे माजि स्टेटसेक्रेटरी यांनीं यंदां जें पत्रक स्पष्टीकरणार्थ हजर केलें आहे, त्यांतील हिशेब कसे भ्रामक आहेत हें माझ्या वरील म्हणण्यावरून समजून येईल. हिंदुस्थानांत कराचा बोजा अगदीं थोडा आहे, असें सदर्हु नामदार गृहस्थांनीं या पत्रकांत

म्हटलें आहे. हा बोजा लहान वाटत असेल, पण हिंदुस्थानांत आणि इंग्लंडांत रयतेवर जो कर आहे, त्या संबंधानें एक गोष्ट नहमीं लक्षांत ठेविली पाहिजे. ती ही कीं, इंग्लंडांतील दरोबस्त वसूल देशांतील उद्योगधंद्यांस उत्तेजन देण्याकडे खर्च करण्यांत येतो, आणि हिंदुस्थानांत वसूल केलेल्या रकमेपैकीं $\frac{3}{4}$ रक्कम देशाबाहेर खर्च करण्यांत येते. याचें कारण इंग्लंडांत सर्व खात्यांवर कोशाध्यक्षांचा अधिकार चालतो, आणि हिंदुस्थानांत फडनीसास कोणीच विचारीत नाहीं. हिंदुस्थान सरकार म्हणजे केवळ लष्करी बादशाही होय, देशावर जुलूम करणारे अधिकारी होत. खजिन्याची नीट व्यवस्था ठेवण्याची जबाबदारी कौन्सिलांतील फक्त एका सभासदाकडे आहे. सार्वभौमसत्ता वाढविण्याच्या धोरणास अनुसरून जेव्हां एखादा मुद्दा उपस्थित होईल, तेव्हां इतर सर्व सभासद एक मतानें चालावयाचे हें ठरलेलेंच असतें. व्यापार धंदा करणाऱ्यांच्या तर्फेनें किंवा देशांतील बुद्धिमान व सुशिक्षित लोकांच्या वत्तीनें कौन्सिलांत एकही सभासद नाहीं. कौन्सिलाचे सभासद वर्षांतून बरेच दिवस सिमल्यासारख्या पर्वतशिखरावर राहत असतात व लोकमत कसें आहे हें त्यांत मुळींच कळत नाहीं. ऑलिंपस पर्वतावरील देवतांप्रमाणें मनुष्यजातीविषयीं बेफिकीर राहून एकमेकांच्या समागमांत ते आपले दिवस स्वस्थपणें घालवितात. हिंदुस्थान हातीं आल्यापासून आपलें अपरिमित हित झालें आहे हें खरें आहे; पण तेथील लोकांवरील कराचा बोजा हलका व्हावा, आणि जमाबंदीची व्यवस्था नीट रहावी ह्मणून आपण जर दक्षता ठेविली नाहीं, तर तें आपल्या हातीं किती दिवस टिकणार आहे?"

हिंदुस्थानचे माजी गव्हर्नर जनरल **लार्ड कार्नवालीस** ह्यांनीं इ. स. १७९० तच एक खलिता लिहिला आहे. त्यांत त्यांनीं असें ह्मटलें आहे कीं, " खासगी रीतीनें जें द्रव्य पाठविण्यांत आलें आहे आणि ईस्ट इंडिया कंपनीनें अलोट संपत्ती नेण्याचा जो क्रम धरिला आहे, त्या ' दोंहोंमुळें हिंदुस्थानचा व्यापार आणि शेतकी हीं अगदीं निकृष्टावस्थेस जाऊन पोंचलीं आहेत. "

दुसऱ्या पक्षीं, मोंगलबादशहांची सत्ता जरी एका शतकाहून अधिक वर्षें ह्या देशांत होती आणि ब्रिटिश सरकारपेक्षां जबरदस्त रकमा ते कराच्या रूपानें वसूल करीत असत, तरी तो पैसा देशांतल्या देशांतच राहत असे; आणि लोकांकरितांच तो खर्च करण्यांत येई. ह्यामुळें लोक पैशाची मागणी केल्याबरोबर रकमा देत असत. जहानगीर (१६०५-१६२७) आणि औरंगझेब (१६५८-१७०७) यांचे कारकीर्दींत बर्नीर नांवाच्या एक इंग्लीश प्रवाशी हिंदुस्थानांत आला होता, व त्यानें सर्व हिंदुस्थान भर प्रवास केला होता. तो ह्मणतो—" जरी बलाढ्य मोंगल बादशहा महसुलाच्या रकमा भरपूर वसूल करीत, तरी त्या रकमा तशाच प्रमाणानें खर्च होत. ह्यामुळें लोकांना वाटतें तितका द्रव्यसंचय होत नसे. तुर्कस्थानच्या **मोठ्या सत्ताधीश सुलतानाच्या** आणि इराणच्या बादशहाच्या एकत्र उपन्नापेक्षां त्यांचें उत्पन्न मोठें असेल हें ह्मणणें मला कबूल आहे. पण जर त्यांना श्रीमंत ह्मणावयाचें असेल तर त्याच न्यायानें एखाद्या कोठवळ्यालाही तो एका हातानें रकम घेऊन दुसऱ्या हातानें देऊन टाकतो ह्मणून श्रीमंत ह्मणतां येईल."

**देशी संस्थानांतील पैसा अर्थशास्त्रदृष्ट्या बाहेर जात नाहीं:**—देशी संस्थानिकांना खंडणीच्या रूपानें हिंदुस्थान सरकाराला थोडीशी रक्कम द्यावी लागते हें पूर्वीच सांगण्यांत आलें आहे. पण निर्यात मालाबद्दल जें उत्पन्न होतें तें सगळें त्यांसच मिळतें. शिवाय दुसऱ्यांच्या कर्जाबद्दल त्यांस व्याज द्यावें लागत नाहीं, इतकेंच नव्हे तर कांहीं संस्थानिक—उदाहरणार्थ ग्वाल्हेर—बाहेर ठिकाणीं रकमा व्याजीं लावतात. ब्रिटिश सरकारच्या सुरक्षित ठेवीमध्यें देशी संस्थानांतील अनेक लोकांनीं पैसे भरलेले आहेत आणि त्यांस त्यांबद्दल व्याजही मिळत आहे. संस्थानचें उत्पन्न संस्थानांतील प्रदेशार्थच खर्च करण्यांत येतें. शिवाय ब्रिटिश सरकारप्रमाणें परकीय नोकरांना पेन्शन देण्यांत त्यांचा पैसा खर्चीं पडत नाहीं. तटस्थपणें कदाचित् संस्थानांतील लोकांवर राज्य चालविण्यांत येत असेल, पण कोणताही सरकारी आंग्ल अधिकारी ब्रिटिश प्रजेपेक्षां त्यांजवर चांगल्या तऱ्हेनें राज्य चालविण्यांत येतें ही गोष्ट कबूल करणार नाहीं. तरी पण उघड उघड विशेष लक्षांत ठेवण्यासारखी ही गोष्ट आहे कीं, इंग्रजी अंमलाखालीं असलेल्या प्रजाजनांपेक्षां देशी संस्थानांतील प्रजा चांगल्या स्थितींत आहे. लोकसंख्येच्या वाढीचें प्रमाण आपण जरी धरून चाललों तरी ब्रिटिश प्रदेशांतील लोकांच्या जवळ जवळ दुप्पटीचें प्रमाण मांडलिक संस्थानांत आहे हेंही पूर्वीच दाखविण्यांत आलें आहे. म्हैसूरसारख्या ( देशी ) संस्थानाचें उदाहरण डोळ्यांपुढें ठेवून तेथील कराची आकारणी कशी करण्यांत येते ती पहा. म्हणजे इंग्रजी अंमलाखालीं असलेल्या प्रदेशांत आणि संस्थानच्या अंमलाखालीं असलेल्या प्रदेशांत

काय स्थिति आहे तें लक्ष्यांत येईल. हिंदुस्थानांतील स्थिती-संबंधानें चौकशी करण्याविषयीं प्रश्न उपस्थित झाल्यावेळीं इ० स० १८९४ मध्यें सर हेनरी फाउलर ह्मणाले कीं:—

" हिंदुस्थानावरील इंग्लंडचें राज्य फार खर्चाचें आणि असह्य आहे त्या ऐवजीं देशी राज्यव्यवस्था काटकसरीची आणि लोकप्रिय होईल असें प्रतिपादन करण्यांत येतें. हिंदुस्थानच्या आग्नेयेस ह्मैसूरचें संस्थान आहे, तें भरभराटीस आलेल्या आणि अतिवजनदार संस्थानांतलें एक आहे. त्याच्या सभोंवर मद्रास इलाखा आहे. दोन्ही प्रांतांतील लोकांची स्थिति बहुतेक एकच आहे. ह्मैसूरची लोकसंख्या पन्नास लक्ष आहे व मद्रासची लोकसंख्या सातपट अधिक ह्मणजे साडेतीन कोटी आहे. शिवाय ह्मैसूरचा राज्यकारभार उद्योगप्रिय आणि शक्तिमान लोकनियुक्त मंडळाच्या हातांत आहे. आतां ह्मैसूरसंस्थानांत जमीन महसूलाचें उत्पन्न धरून लोकांना दरमाणशीं तीन रुपये कर द्यावा लागतो. पण मद्रास इलाख्यांत तो सारा सव्वा दोन रुपये आहे. १८९२–९३ मध्यें पुऱ्या होणाऱ्या अकरा वर्षांत ह्मैसूरमध्यें कराची वाढ, १०१ लाखा पासून १९३ लाखापर्यंत झाली. ह्मणजे शेंकडा ९२ टक्के वाढ झाली. पण मद्रासमध्यें ७३९ लाख होती ती ८८४ लाख झाली, ह्मणजे शेंकडा २१ टक्केच कायती वाढ झाली. "

ज्या मुद्यासंबंधीं हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी यांनीं हें वरील भाषण केलें आहे, त्याबद्दल त्यांची गैर समजूत झालेली दिसते. हिंदुस्थानची राज्यव्यवस्था 'खर्चाची आणि असह्य' आहे, असें जें प्रतिपादण्यांत येतें त्याचा विचार, हिंदुस्थानची अति दरिद्रावस्था मनांत आणून केला पाहिजे. वर सांगितलेलें ह्मैसूर

हें सधन आहे व कदाचित् राज्यव्यवस्थेसाठीं अधिक पैसा खर्च करण्यास समर्थ आहे. ब्रिटिश हिंदुस्थानापेक्षां अधिक भरभराटीस आलेलीं ह्मसूर खेरीज आणखीं संस्थानें आहेत. ह्मसूरची " अवर्णनीय प्रगति " कशी झाली आहे हें दाखवून १८९३ मध्यें हिंदुस्थानच्या जमाखर्चाच्या खर्ड्यावर वादविवाद करीत असतां सर चार्लस डाईक ह्मणाले कीं, " पंजाबमधील संस्थानेंही त्याचप्रमाणें भरभराटीस आलेलीं आहेत. आणि पंजाबच्या प्रगती संबंधानें मि. टूपर यांणीं एक ग्रंथ लिहिला आहे. मि. टूपर हे पंजाब सरकारचे मुख्य सेक्रेटरी आहेत. ज्या राज्यकर्त्यांच्या हाताखालीं राहावयाचें आहे त्यांविषयीं नीटपणें लिहिल्याशिवाय हिंदुस्थानांतील कोणत्याही मनुष्यास उच्च पदवीस चढतां यावयाचें नाहीं असें ना. बॅरोनेट सर डब्ल्यु वेडरबर्न यांचें ह्मणणें आहे. त्याचें उत्तम खंडण मि. टूपर यांच्या पुस्तकानें होणार आहे हेंही मी सांगून ठेवतों. मि. टूपर यांनीं असें स्पष्ट ह्मटलें आहे कीं, थेट ब्रिटिश अधिकाराखालीं असलेल्या प्रदेशांपेक्षां देशी संस्थानांची प्रगति झपाट्यानें होत आहे. या गोष्टींचें समर्थन त्यांनीं उत्तम प्रकारें आणि विस्तृतपणें केलें आहे. आणि हिंदुस्थान सरकारच्या बड्या अंमलदारांकडून ज्या अर्थीं अशा गोष्टी पुढें येत आहेत, त्याअर्थीं आपण त्या विचारांत घेतल्याच पाहिजेत. "

देशी संस्थानांतील लोक कमी दरिद्रि आहेत हें गेल्या खानेसुमारीच्या वेळीं असलेले कमिशनर मि. बेन्स यांच्या ह्मणण्यावरून उघड समजून येणार आहे. त्यांचें या बाबतींतील ह्मणणें विशेष महत्वाचें आहे. " देशी संस्थानांपेक्षां

ब्रिटिश प्रदेशांतच जमीनदार लोक सावकारीचा धंदा करणारे अधिक आहेत ही चमत्कारिक गोष्ट खानेसुमारीच्या आंकड्यांवरून दिसून येणारी आहे. असें त्यांनीं स्पष्ट म्हटलें आहे."

**मुलकी आणि लष्करी खर्चाची वाढ झाली आहे.**— १८४२ सालीं प्रसिद्ध लेखक मेकाले यांणीं सर चार्लस नेपियर ह्यांस लिहिलें कीं, " हिंदुस्थानच्या जमाखर्चाच्या विषयासंबंधानें इंग्लिश वाचकांस तृप्त करणें हें केवळ दुरापास्त आहे. " पन्नास वर्षांपूर्वी जितकें ह्या विधानांत सत्य होतें तितकेंच आजही आहे. जमाखर्चाच्या खर्ड्यांवरील आरंभींचे विचार प्रदर्शित होतांच हाऊस आफ् कामन्स मधील सभासद उठून जाऊं लागतात आणि तो खर्डा मग निर्जन सभागृहापुढें ठेवण्यांत येतो. हिंदुस्थानचा जमाखर्च समजण्यासारखा नसेल किंवा मनोहर नसेल, पण हिंदुस्थान सरकारचा खर्च सदा वाढत चालला आहे, आणि ही वाढ तर गेल्या दहा वर्षांत बरीच झालेली आहे, ही गोष्ट अगदीं उघड आणि साधी आहे. व त्याबद्दल मतभेद कोणाचाही नाहीं. ब्रिटिश कांग्रेस कमेटीचे सभासद मि. मार्टिनवुड यांनीं एक फार महत्वाचा आणि अत्युपयोगी तक्ता केला आहे, आणि तो तक्ता लार्ड वेल्बी यांच्या कमिशनपुढें चौकशीच्या सुरवातीलाच सादर करण्यांत आला होता. तो तक्ता सन १८९६ च्या ' इंडिया ' पत्राच्या ३४४ पृष्ठावर प्रसिद्ध झालेला आहे. त्यावरून १८६४–६५ पासून १८९४-९५ पर्यंत हिंदुस्थानच्या निर्यात मालाचें आयात मालापेक्षां आधिक्य, होमचार्जिस-(विलायतखातीं खर्च) कौन्सिलखात्याचा हिशोब, सार्वजनिक कर्ज आणि खर्च इत्यादि प्रकरणीं हळूहळू वाढ झालेली आहे हें दिसून येईल.

ह्या खर्चाच्या वाढीचा हिशोब कसा दाखवितां येईल? अधिकारी वर्गाची सबब ही आहे कीं, हुंडणावळीच्या वटावामुळें हा सर्व खर्च वाढलेला आहे, आणि तो लष्करी खर्चामुळें वाढला ही गोष्ट ते उडवाउडव करून मुकाट्यानें गाळून टाकतात. जमाखर्चाच्या तराजूचा कांटा लवण्यास हुंडणावळीचा वटाव हें एक कारण असेल, पण जमाखर्चाच्या वाढीचें कारण वटावच आहे असें नाहीं. कारण गेल्या तीन वर्षांत वटावाच्या बाबतींत बरीच सुधारणा झालेली आहे. आणि अधिक कर घेण्यांत आल्यामुळें महसूल सहजगत्या वाढलेला आहे. शिवाय दुष्काळाप्रीत्यर्थ जी रकम खर्च करण्यांत आली ती वजा घातली तरी हिशोबाचा कांटा कसा तो समतोल रहात नाहीं. हिंदुस्थानच्या जमाखर्चाचे माजी प्रधान सर आक्लंड काल्व्हिन हे, ही वाढ सर्व लष्करी खर्चाच्या वाढीमुळें झाली असें ह्मणतात. इ. स. १८९४ सालीं त्यांनीं असें लिहिलें आहे कीं, “ माझ्या आठवणीप्रमाणें इ. स. १८८९ पासून पुढें हिंदुस्थानच्या जमाबंदीच्या मुत्सद्यांनीं लष्करी खर्चाच्या वाढीसंबंधानें आपलें ह्मणणें मुळींच बदललेलें नाहीं. ते नेहमीं, अगदीं स्पष्टपणें असें ह्मणतात कीं, ‘ हिंदुस्थानच्या उत्पन्नापेक्षां लष्करी खात्याकडे जास्त खर्च करणें हें अत्यंत जरूरीचें आहे. ” लंडन टाइम्स आणि इंडिया आफिसांतील मंडळ यांमध्यें उहापोह झाला, त्यावेळीं सर आक्लंड काल्व्हिन यांनीं पुढील मुद्दे स्थापित केले. (१) लढाईबद्दल आणि अपवादादाखल झालेला खर्च वजा जातां इ. स. १८८७–८८ आणि १८९३–९४ ह्या काळामध्यें हिंदुस्थानांतील लष्करी खात्याचा खर्च नेहमींपेक्षां

अधिक झालेला आहे. शिवाय ( २ ) ही वाढ हुंडणावळीच्या वटावामुळें होणाऱ्या वाढीपेक्षां जास्त आहे.

सरकारचें सरहद्दीसंबंधाचें धोरण कोणत्या प्रकारचें आहे ह्याचा विचार करण्याला हें स्थळ योग्य नव्हे. तथापि देशांतील पैशाचा कितवा भाग त्या कामीं खर्च होतो हें जाणणें बोधप्रद आहे. वायव्य सरहद्दीवरील आणि पलिकडील प्रदेशानिमित्त गेल्या २० वर्षांत हिंदुस्थानचे साडेसात कोटी रुपये खर्ची पडले आहेत. यासंबंधाची साद्यंत माहिती कर्नल एच्. बी. हॅना यांनीं प्रसिद्ध केलेल्या ' Indian Problems ' ( हिंदुस्थानच्या भानगडी ) नामक ग्रंथांत सांपडणार आहे. ज्या बाबींकरितां वरील रकम खर्च झाली त्या बाबी ह्मटल्या ह्मणजे:—

| बाब | रुपये |
|---|---|
| अफगाणिस्तानची लढाई (१८७८-८०)- | २२३००००० |
| लष्करासाठीं रेल्वे .... .... .... | १६४००००० |
| क्वेटा ( १८८९ ) .... .... .... | २३०००००० |
| विशेष रक्षणाचीं कामें.... .... .... | ३०००००० |
| सैन्याची वाढ ( १८८६ ) .... .... .... | १६३००००० |
| चित्रळची मोहीम .... .... .... | २१५००००० |
| अमीराला ( मित्रत्व राखण्यासाठीं दिलेला ) कर व लांच मिळून | २३०००००० |
| किरकोळ खर्च .... .... .... | ६७०००००० |
| ( १८९७ ) सरासरी. | ३५००००,०० |
| एकंदर | ७५००००००० |

**सध्यांच्या धारेबंदीपासून होणारा जाच व जुलूम:—** येथवर ज्या कारणांचा विचार केला, त्यांच्या तर्फे एक गोष्ट सांगतां येण्यासारखी आहे. ती ही कीं, त्यांचा प्रतिकार करणें सरकारच्या आटोक्याबाहेर होतें. कारण, तीं कारणें कांहीं अंशीं, आरंभींच्या राज्यपद्धतींतील चुकीच्या धोरणामुळें व कांहीं अंशीं, प्रतिकूल दैवयोगानें जमून आलेल्या अपरिहार्य अनिष्ट परंपरेनेंच उद्भवलीं. तेव्हां त्याबद्दल सरकारास फारसें जबाबदार धरितां येत नाहीं. परंतु आतां, प्रजाजनांच्या निकृष्ट दशेच्या ज्या कारणांचा आपल्यास विचार करावयाचा आहे, त्याविषयीं सरकारास अशी सबब पुढें आणतां यावयाची नाहीं. हिंदुस्थानांतील शेतकरी वर्गास सध्यांची निकृष्ट दशा येण्यास, जें कारण बऱ्याच अंशीं साधनीभूत झालें आहे, तें कारण ह्मणजे सध्यांची धारेबंदीची पद्धत हें होय. सरकारी अधिकाऱ्यांनीं, या बाबतींत आरंभींच थोडी दक्षता, कर्तबगारी व मनाची समबुद्धि दाखविली असती तर, या कारणाचा उद्भवच झाला नसता, असें आह्मीं खात्रीनें सांगूं शकतों. पण वस्तुतः सरकारी अधिकाऱ्यांना देखील या बाबतींत तादृश दोष देतां येत नाहीं. कारण ज्या सरकारच्या कृतींवरून पाहतां, त्याच्यावर कांहीं अंशीं गर्हणीय बेपर्वाईचा व जुलमीपणाचा आरोप येण्याचा संभव आहे, अशा सरकारच्या हातांतीलच हे सरकारी अधिकारी केवळ बाहुलीं असल्यामुळें, त्यांना तसें करावयास सांपडलें नाहीं, असें मानणेंच विशेष सयुक्तिक व वस्तुस्थितीस धरून दिसतें. खुद्द इंग्लंडांतील लोकांस व तेथील पार्लमेंटास हिंदुस्थानाविषयीं कितीही आस्था व

कळकळ वाटत असली तरी, कृषिवर्गासंबंधानें हिंदुस्थानसरकारानें राज्यपद्धतीचें जें चुकीचें व घातुक राज्यधोरण स्वीकारिलें, त्याचा त्यांनीं प्रतिकार केला नाहीं—किंवा, त्यांना करितां आला नाहीं ह्मणा वाटेल तर—ही गोष्ट निर्विवाद खरी आहे. आणि, अशा प्रकारच्या धोरणानें, हिंदुस्थानांतील शेतकरी वर्गास कालें-करून निकृष्ट दशा येईल, हें त्याच वेळीं ताडण्यास विशेष दूरदृष्टीची अवश्यकता होती असें नाहीं.

हिंदुस्थानांतील इंग्रजी अमलाचा अगदीं आरंभींचा इतिहास पाहिला तर, त्यावेळचे सरकारी अधिकारीच स्वतः जुलमी व पैसेखाऊ होते असें दिसून येतें. अर्थात, त्यावेळच्या महसुलासंबंधानें जिकडे तिकडे अव्यवस्था, अन्याय व जुलूम यांचेंच साम्राज्य असे. सुदैवानें, तशी स्थिति आतां राहिली नाहीं. तथापि, हल्लींच्या अधिकाऱ्यांमध्यें वरिष्ठ सरकारच्या हुकुमांच्या धोरणानेंच—कां होईना, पण धारेबंदी ठरविण्याच्या कामांत एक प्रकारची—बेफिकिरी व बेपर्वाई दिसून येते, ही सध्यांची बेफिकिरी व बेपर्वाई देखील इंग्रजी अव्वलींतील अधिकाऱ्यांच्या जुलमी व भ्रष्ट वर्तना इतकीच गर्हणीय व शोचनीय आहे असें ह्मणावें लागतें. या संबंधानें विस्तारानें लिहूं लागल्यास, ग्रंथच्या ग्रंथ होतील; पण सध्यां येथें फक्त त्या बाबतींत, हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांतील कांहीं वजनदार गृहस्थांचे निवडक अभिप्राय नमूद करितों; ह्मणजे त्यावरून आमच्या विधानाची सत्यता चांगली दिसून येईल.

**मुंबईः—**

" आमच्या ( दक्षिणेकडील ) कडील आरंभींच्या कलेक्टरांनीं या प्रांताच्या वकूबाचा फाजील अदमास करून, त्याप्रमाणें त्यांनीं जबर

धारेबंदी बसविली. त्या योगानें, शेतकीस आवश्यक लागणारी सामुग्री या प्रांतांतून पार नाहींशी झाली आहे; आणि तेव्हांपासून, इकडील कृषिवर्गास जें अधिकाधिक दारिद्र्य व निकृष्टावस्था येत चालली आहे, त्यांचेंही मुख्य कारण हेंच होय. हल्लीं जिकडे तिकडे दारिद्र्याचीं चिन्हें स्पष्ट दिसून येतात. यांपैकीं बऱ्याच अनिष्ट परिणामांचें खरें कारण ह्मणजे **वाजवीपेक्षां फाजील कर**–धारेबंदी–हेंच होय–" (दक्षिणेंतील दंग्याची चौकशी करण्याकरितां नेमलेल्या कमिशनच्या कामाच्या हकीकतीचें सरकारी पुस्तक पृ. १०)

**सर, ऑक्लंड कॉलव्हिन** हिंदुस्थान सरकारचे माजी फडणीस, यांचा अभिप्रायः– " पुणें व त्याच्या आजुबाजूचे प्रांत यांतील ऋणको व धनको ( शेतकरी आणि सावकार ) यांच्यामध्यें वाढत जाणाऱ्या बेबनावाचें मुख्य कारण ह्मणजे **जबर धारेबंदी** हीच होय, असें नमूद करणें मला अगदीं अवश्य व न्याय्य वाटतें. "

मुंबई कायदे कौन्सिलांत १८७९ सालीं, 'डेक्कन रिलीफ' कायद्याचा मसुदा पुढें आणतांना, **सर थिओडर होप** हे ह्मणाले, " रयतेच्या कर्जबाजारी स्थितीस, आमची धारेबंदीची पद्धती अंशतः तरी कारणीभूत झाली आहे, हें आह्मांला प्रांजळपणें कबूल केलें पाहिजे. "

**मद्रासः—**

**मि. फुलरटन** त्यावेळचे एक मद्रास कायदे कौन्सिलचे सभासद यांनीं मद्रास इलाख्यांत 'रयतवारी' पद्धत सुरू झाल्यानंतर थोड्याच दिवसांनीं तेव्हांच्या तिच्या अंमल बजावणीचें हुबेहुब वर्णन पुढील प्रमाणें केलें आहे.

रयतवारी पद्धत मद्रास इलाख्यांत चालू झाल्यानंतर थोड्याच दिवसांत, तेथील कौन्सलचे सभासद फुलरटन यांनीं

त्या पद्धतीच्या व्यवहारीक स्वरूपाचें हुबेहुब वर्णन खालील प्रमाणें केलें आहे:–

" समजा कीं, ग्रेटब्रिटन मधील तमाम जमीनदार वर्ग, सर्व भांडवलवाले व शेतकरीसुद्धां पृथ्वीच्या पाठीवरून नाहींसे केले; समजा राज्यांतील प्रत्येक शेताची धारेबंदी सर्व **सामान्यतः** त्याच्या वकूबापेक्षां अधिक प्रमाणानें ठरविली; समजा गांवकरी लोकांना प्रत्येकीं त्याच्या गुराढोरांच्या व आउतांच्या ऐपतीप्रमाणें प्रत्येक माणशीं ४० पासून ५० एकर जमीन वाटून दिली. समजा तसेंच खातेदाराच्या स्वतःच्या शेतीचें उत्पन्न अथवा त्याची खासगी मालमत्ता या संबंधानें स्वतःच्या विचारानें ठरविलेल्या अंदाजाप्रमाणें हा ठरविलेला सारा वसूल करणें, अथवा त्याची सूट देणें हें काम एक लक्ष मुलकी अधिकाऱ्यांकडे सोंपविलें आहे; आणखी समजा कीं, प्रत्येक शेतकऱ्याला आपणावर अधीक सारा बसूं नये ह्मणून आपल्या शेजाऱ्याचें उत्पन्नाचें मान हेराप्रमाणें सरकारास कळविण्याची लालूच दाखविली आणि असेंच प्रत्येक गांवांतील प्रत्येक शेतकऱ्यांवर, ज्या दोघा किंवा तिघांकडून पैसा आला नसेल, ती तूट भरून देण्याची जबाबदारी लादण्यांत आली; व समजा जास्त साऱ्याच्या कचाट्यांतून होईल तितकें आपण सुटावें हा शेतकऱ्याचा मोह असतो तो मोह नष्ट करण्यास, साऱ्याचा बोजा सारख्या प्रमाणानें सर्वांवर वाटला जावा या तत्वावर मंडळीच्या हुकमाखालीं कामगार लोक काम करूलागले; व जे या कचाट्यांतून सुटण्याकरितां पळून जातील. त्यांना पकडून हे अधिकारी एक मेकाकडे परत पाठवित आहेत; आणखी समजा कीं, जिल्ह्याचे विशिष्ट अधिकारी काय ते एक कलेक्टर साहेब व हेच काय ते न्याय देणारे प्रत्यक्ष झालेल्या जुलमांची तक्रार यांच्याचकडे न्यावयाची, ती व यांच्याच मार्फत ही वरीष्ट कोर्टाकडे जावयाची. आणखी समजा, प्रत्येक हलक्या दर्जाचा वसुली कामदारसुद्धां पोलीस कामदारही आहे. आणि कोणत्याही आरोपावर फिर्यादीकडून शपथ न घेतां, व चालू कामांत शपथेवर कोणत्याही

पुराव्याची जरूर न ठेवतां, आपल्या हद्दींतील कोणत्याही माणसास दंड करणें, अटकेंत ठेवणें, पायखोडा देणें, अथवा फटके मारणें वगैरे अधिकार त्यास दिलेले आहेत. या सर्व कल्पना केल्या ह्मणजे 'रयतवारी' पद्धतीच्या स्वरूपाची थोडीबहुत कल्पना होईल.

कौन्सिलरसारख्या जबाबदार हुद्द्याचें काम बजाविलेल्या, व राजकर्त्यांच्याच जातीच्या गृहस्थानें केलेलें वरील वर्णन आहे. ह्मणून त्याच्याविषयीं, अतिशयोक्तीचा किंवा असत्य प्रतिपादनाचा आरोप येणें शक्य नाहीं. वरील पद्धतीच्या अमल बजावणीनें मद्रास इलाख्यांत अनन्वित अशा जुलमांचा व जाचांचा प्रादुर्भाव झाला असेल, तर यांत आश्चर्य करण्यासारखें तें काय आहे ? या पद्धतीच्या नांवाखालीं साऱ्याची वसुली करितांना रयतेवर इतके कांहीं घोर व क्रूर रीतींचे जुलूम आणि जाच होऊं लागले कीं, शेवटीं इ. स. १८५४ त खुद्द ब्रिटिश लोकांची न्यायबुद्धि जागृत होऊन वरील प्रकरणाची चौकशी करण्या-करितां 'टॉर्चर (जाच) कमिशन' नांवाचें कमिशन नेमण्यांत आलें. या कमिशनपुढें उघडकीस आलेल्या घोर व अनन्वित प्रकारांची साद्यंत हकिकत जर कोणा आस्थेवाईक जिज्ञासूस पहावयाची असेल तर, ती त्यास **मि. के.** यांच्या 'ईस्टइंडिया कंपनीच्या अमदानीचा इतिहास' या ग्रंथाच्या २२३ व्या पृष्ठांत सांपडेल. सररास व बेकायदेशीर जुलूम होण्याचे दिवस निघून गेले, हें खरें आहे. तथापि, त्याच्या ऐवजीं हल्लीं विशेष कायदेशीर जुलूम होत असतो, इतकाच काय तो फरक ! हें मागें एके ठिकाणीं, सारा न दिल्यामुळें शेतांतून हांकलून दिल्या जाणाऱ्या लोकांची संख्या देऊन सिद्ध करून दाखविलेंच आहे. पूर्वीं कारण, सबब न सांगतां, एकदमच उच्चाटन होत असे. हल्लीं 'मागतों तेवढा सारा देववत

नसेल, तर चल निघ शेतांतून ' असें सांगण्यांत येतें. हें काय तें दोन काळांतील अंतर! सारांश, हल्लींची कृषिवर्गांची स्थिति, त्यांच्या पूर्वींच्या स्थितीपेक्षां कितपत सुधारली आहे, किंवा अधिक सुखकर झाली आहे, या प्रश्नांचें निश्चयात्मक उत्तर देणें कठीण आहे.

## अयोध्या आणि वायव्यप्रांतः—

" आरंभीं आरंभीं जी धारेबंदीची सक्ति झाली त्यासंबंधाचा खुलासा अशा प्रकारें केला आहेः—

( ईस्ट इंडिया कंपनी ) कंपनी सरकारचा प्रांत काबीज करण्यांत खर्च झालेला पैसा भरून काढण्याकडेच कंपनीचें सदा लक्ष असे; व शिवाय नवीन नवीन राजकारणें उद्भवत गेल्यामुळें, लष्करी खर्चही अधिकाधिक वाढत चालला. एखादा प्रांत काबीज केल्यावर, त्याचा कारभार पहाण्याकरितां प्रथम ज्या अमलदारांची नेमणूक होई, त्यास अर्थातच तेथील नैसर्गिक स्थितीची व लोकांच्या रीतिभाती वगैरेची मुळींच माहिती नसे. त्यामुळें, कांहीं कालपर्यंत, त्यांनां सर्वस्वीं हाताखालच्या नेटिव लोकांवर अवलंबून राहावें लागे. हे नेटिव लोक साधारणतः शिरजोर व लाचखाऊ असत; त्यामुळें सर्व कारभार अंदाधुंदीनें व एक तर्फी चाले. दुसरी गोष्ट अशी कीं, एखाद्या प्रांताची धारेबंदी ठरवितांना, एकंदरच देश, जवळ जवळ एक शतक भर, अंदाधुंदीच्या अमलानें व अंतस्थ दंग्याधोप्यांनीं अगदीं जर्जर होऊन गेला आहे; या गोष्टीकडे तादृश लक्ष न पोहोंचवितां, ते वाटेल तसे सारे बसवीत ! उदाहरणार्थ, **अलाहबाद** हा जिल्हा **अयोध्ये**च्या नवाबाच्या मागून, तो आपल्या ताब्यांत आला. पण अयोध्येच्या नवाबांना **अलाहबादे**पासून जो वसूल मिळे, त्याच्यापेक्षां १०,००० रु अधिक वसूल आह्मीं आरंभींच त्या प्रांतापासून उकळूं लागलों ! याचा परिणाम असा झाला कीं, थोडयाच कालांत, त्या भागांतील वसूल देणाऱ्या जमीनींपैकीं ½ जमीनींचा लिलांव झाला.

याच सुमारास, बोर्ड ऑफ कमिशनर्स यांनीं **कानपूर प्रांता**संबंधानें पुढील अभिप्राय दिला आहे:–

" या प्रांतांची आरंभीं जी त्रैवार्षिक जमाबंदी–धारेबंदी–झाली, त्याचवेळीं या प्रांतावर वाजवीपेक्षां फाजील आकारणी करण्यांत आली, असें आह्मांस सकारण वाटतें; व अजून देखील, त्या अपायकारक मोजणीचा दुष्परिणाम या प्रांतास भोगावा लागत आहे, अशी आमची समजूत आहे. तेव्हां, व इतर कांहीं प्रांताच्या धारेबंदीकडे पाहतां, त्यांच्यावर आकारणी करितांना, वसूल देण्याच्या त्यांच्या वास्तविक वकूबापेक्षां त्यांच्यापासून अधिक उत्पन्न एकदम काढण्याविषयीं सरकारी अधिकाऱ्यांची फाजील हांव असल्याचें दिसून येतें. त्यामुळें अर्थात् फेर तपासणीचे वेळीं पूर्वीच्या आकारणींत पुष्कळ सूट द्यावी लागली; परंतु अशी सूट देऊन देखील, कित्येक जमिनीवरची आकारणी प्रस्तुत जबरच राहिली आहे. " ( **हिंदुस्थानांतील वायव्य प्रांत बुइल्यम क्रुक** बी. सी. एस. १८९७. पृ. ३०५ ).

सन १८६१ च्या जमीन मोजणीनें वाढविलेल्या धारेबंदीच्या दुष्परिणामाचें वर्णन, १८७२च्या **अयोध्या** प्रांतांतील जमीन महसूल वसुलाच्या रिपोर्टांत पुढीलप्रमाणें केलें आहे:–

" मोठमोठे तालुके वगळले तर, ज्या खेड्यांतील जमीनदार कर्जबाजारी नाहींत अथवा ज्यांतील जमिनी कोणत्याना कोणत्या तरी –गहाण, बेचन वगैरे–रूपानें गुंतल्या नाहींत, असें एक देखील खेडें सांपडणें मुष्कील आहे. इतकेंच नव्हे तर, मी असेंही खात्रीपूर्वक सांगूं शकतों कीं, दरएक जमीनदारानें एक वर्षांत कर्जाऊ काढलेली बहुतेक रक्कम—फक्त सारा भरण्याकरितांच मुद्दाम काढलेली असते. सारांश, ही वाढविलेली आकारणी देण्यास जमीनदार पहिल्यापासूनच असमर्थ होते व अजून आहेत. धारा भरून पोटास राहिलेलें उत्पन्न, शेतकऱ्यानें जमिनीच्या मशागतींत केलेल्या श्रमाच्या किंमतीपेक्षां देखील कमी असतें ! त्यांतही, या प्रांताला इतर प्रांतांपेक्षां विशेष अशा २।४ फायदेशीर गोष्टी आहेत. एक

तर, त्या जमिनीस **गंगा** आणि **यमुना** या दोन्ही नद्यांचें पाणी मिळण्याची सोय आहे. **ईस्ट इंडिया रेलवे** या प्रांतांतून गेली आहे; आणि त्या कांहीं भागांमधून **गंगेचा** कालवाही वहात गेला आहे. परंतु, इतके सर्व फायदे व सोयी असूनही येथील साधारणतः बहुतेक शेतकऱ्यांची स्थिति अत्यंत शोचनीय, कर्जबाजारीपणाची व असंख्य कष्टयातनाची आहे. याचें कारण येथील जमिनीची किंमत पांच वर्षांच्या वसुला इतकी आहे. ( **१८७९ त कानपूर** प्रांतांतील धारेबंदीविषयीं तेथील कलेक्टर यांनीं केलेला रिपोर्ट ).

मध्यप्रांताच्या शेतकी संबंधानें शोचनीय स्थितीचें वर्णन, अशा तशा गृहस्थानें केलें नसून खुद्द त्या प्रांताचे चीफ् कमिशनर यांनींच आपल्या एका रिपोर्टांत केलें आहे; व त्यांतीलच वर दिलेला हा एक उतारा वर दिला आहे.

त्याचप्रमाणें १८९७ च्या मार्च महिन्यांत, हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी यांनीं, पार्लमेंटाचे एक सभासद **मि० स्मिथ** यांस या संबंधानें कांहीं माहिती दिली होती. त्यावरून असें दिसून येतें कीं, या प्रांतांतील जमीन महसुलाचें उत्पन्न १८८३-८४ सालीं ६२ लक्ष होतें, तें ९६ सालीं, ७६५०००० झालें. ह्मणजे १२ वर्षांच्या अवधींत, तें शेंकडा २५ या प्रमाणें वाढलें ! तथापि, नुक्त्याच झालेल्या फेर धारेबंदीचे परिणाम स्पष्टपणें दिसून येण्यास आणखी वर्षें गेलीं पाहिजेत; म्हणजे त्यावेळीं जमीन महसुलाचें उत्पन्न शेंकडा ५० च्या प्रमाणानें वाढलेलें दिसेल. असें जर आहे, तर आमच्या शेतकऱ्यांना, दर्पेंचीं वर्षें विपत्तींत व टंचाईंत काढावीं लागतात, दिवसानुदिवस त्यांचा कर्जबारीपणा वाढत जाऊन त्यांना अधिकाधिक दैन्यावस्था येत आहे व हाच क्रम सुरू राहिल्यास, कालेंकरून त्यांच्यावर

उपासमारीनें मरण्याचा देखील प्रसंग येईल, यांत आपल्याला आश्चर्य तें काय वाटावयाचें! या त्यांच्या दैन्यावस्थेबद्दल आपल्याला कींवच आली पाहिजे!

**कायमची धारेबंदी नसल्यामुळें होणारे अनिष्ट परिणाम.**—असो. तर, **बंगाल** खेरीज, बहुतेक प्रांतांतील धारेबंदीविषयीं आपण विचार केला. वरील विवेचनांत **बंगालचा** समावेश न करण्याचें कारण काय? असा कोणाच्याही मनांत प्रश्न सहज उभा राहील. तेथील धारेबंदीची पद्धति इतर प्रांतांपेक्षां भिन्न आहे काय? व असेल तर ती भिन्न कां म्हणून? ( कारण, एकाच राज्याखालीं असणाऱ्या सर्व प्रांतांस जमीन महसुलाची एकच पद्धत असणें न्याय्य व इष्ट आहे, ) असेही प्रश्न विचारतां येण्यासारखे आहेत. या प्रश्नांचीं उत्तरें आम्हीं देण्यापेक्षां, यासंबंधांत सरकार तर्फेच्याच लोकांच्या अभिप्रायांनीं काय निर्णय होतो, त्याचें आपण दिग्दर्शन करूं.

" **बंगाल्यांतील कायम धारेबंदीच्या** पद्धतीनें सारा आकारलेल्या जमीनीचा वसूल, आज वर्षेंच्या वर्षें अगदीं नियमानें व वक्तशीर होत आहे. आतां कधीं कधीं, पिकें न उगवल्यामुळें, रोगाच्या साथीमुळें, तुफानानें होणाऱ्या विध्वंसानें किंवा अशाच कांहीं ऋतुपरत्वें येणाऱ्या अरिष्टांनीं थोडें बहुत नुकसान होतें, हें खरें आहे. तथापि एकंदरींत पाहिल तर, या पद्धतीनें, सरकारचा ठरीव सारा देऊनही दर वर्षास जमीनदारांस बरीच शिल्लक पडत असल्यामुळें, एखाद दुसऱ्या अत्यंत खडतर वर्षाला देखील, त्यांना सरकारचें देणें वक्तशीर व फारशी गैरसोय न होतां, देतां येतें," (**सर जॉर्ज कँबेल** यांचा **बंगाल्यांतील** राज्यकारभाराचा वार्षिक रिपोर्ट १८७२–७३.)

" या प्रांतांतील शेतकऱ्यांच्या स्थितींत अलीकडे फारच समाधानकारक सुधारणा झाली आहे, हें मला ठाऊक आहे. तथापि, मी प्रथम

या देशांत आलों त्यावेळची त्यांची जी स्थिति माझ्या अवलोकनांत आली होती, त्या स्थितींतून निघून, इतक्या अल्पावकाशांत, ते एक-दम इतक्या भिन्न व समाधानकारक स्थितीप्रत येऊन पोहोंचतील अशी माझ्या मनांत कल्पना देखील आली नाहीं. त्यावेळीं, त्यांची अगदीं निकृष्टावस्था होती, व त्यांच्यावर फार जुलूम होत असे. विशेष मेहनत घेऊन, जमिनीचा पिकाऊपणा व उत्पादनसामर्थ्य वाढवावें, अशी त्यांच्या ठिकाणीं ईर्षा व उमेद उत्पन्न करणारी कोण-तीच गोष्ट नव्हती. परंतु, आतां पहातों तों, त्यांची भरभराट होऊन, त्यांना स्वातंत्र्याची व सौख्याची स्थिति प्राप्त झाली आहे; आणि माझ्या मतें, जगांतील कोणत्याही संपन्न राष्ट्रांतील कृषिवर्गाच्या बरोबरीचे ते होऊन बसले आहेत. त्यांना आतां वस्त्र प्रावर्णाची ददात राहिली नसून, स्वतःच्या श्रमाचीं फळें उपभोगण्याची, व स्वतःची जिंदगी संभाळण्याची पूर्ण मोकळीक मिळाली आहे; आणि थोडी देखील इजा किंवा अपकार झाल्यास त्याची दाद लागलीच मिळणें त्यांना सुलभ झालें आहे." ( **कलकत्ता** येथें १८७७ सालीं, **सर अश्ाबी एडन** यांनीं केलेलें भाषण. )

"**बंगालप्रांताचीं** हल्लींची स्थिति व १७९३ तील स्थिति यांच्यामध्यें आश्चर्यचाकित करून टाकणारें महदंतर पडलें आहे! अलीकडे **कायमधारेबंदीच्या** पद्धतीनें या प्रांताची संपत्ति आणि सुबत्ता फारच झपाट्यानें–किंबहुना त्याच्या इतिहासांत अश्रूत-पूर्व अशा प्रमाणानें–वाढली आहे." (बर्द्वानच्या कमिशनरांचा रिपोर्ट, गॅझेट ऑफ् इंडिया, २० अक्टोबर १८८३. )

असो: तर ज्या प्रांतांत, हिंदुस्थानांतील इतर प्रांतां-पेक्षांही लोकसंख्येचा भर सर्वांत अधिक आहे,* अशा प्रांतांतील लोकस्थितीचें सरकारतर्फेंचेंच हें वर्णन

* निरनिराळ्या इलाख्यांतील लोकसंख्येचें प्रमाण दर चौरस मलास असें आहेः–बंगाल ४७१, मद्रास २५२; मुंबई २०७; संयुक्त प्रांत ४६६, आणि मध्यप्रांत १२५.

आहे. मद्रास इलाख्याचा सुद्धां एक लहानसा भाग कायम धारापद्धतीनें वसविला आहे. त्या इलाख्यांतील बाकीं-च्या भागांत सरकारला वारंवार वसुलीची सूट जरी द्यावी लागते किंबहुना वसूल होणेंही अशक्य होतें, तरी ज्या भागांत कायम धारापद्धती चालू आहे, त्या भागांत सरकारला कधींच तूट सोसावी लागत नाहीं.

“ १८७६-७७ त मद्रासचें जमीन महसुलाचें उत्पन्न सरकारी रिपोर्टांत ३२,९६,५७५ पौंड इतकें दाखल केलेलें आहे; व तें ७५-७६ या सालांतील उत्पन्नापेक्षां १२,४८,४३८ इतक्या पौंडांनीं कमी आहे. याचें कारण, पुष्कळ जमिनी नांगरल्या न गेल्यामुळें व पिकेंही चांगलींशीं न आल्यामुळें, साऱ्याची सूट वरीच द्यावी लागली हें होय. परंतु **कायमधारेबंदीनें ठरविलेल्या वसुलांत मुळीं-च सूट द्यावी लागली नाहीं.** ” ( हिंदुस्थानची नैतिक आणि आधिभौतिक १८७६ पृ० २८ ).

**रॉयल कमिशननें** नमूद केलेल्या पुराव्यांत, वरील बाबतींत, आणखी कांहीं विशेष चमत्कारिक गोष्टी निद-र्शनास आल्या आहेत. **इंडिया ऑफिसच्या** हिशे-बाप्रमाणें, १८९९ पर्यंतच्या मागील २० वर्षांत (१८७९-९९) बंगाल्यांतील जमीनदारांनीं आपल्या जमिनींवरील भाडें सरासरी शेंकडा १७ या प्रमाणानें वाढविलें; ह्मणजे दर सात वर्षांस, शेंकडा ६ असें प्रमाण बसलें. परंतु तेंच, ९९ पर्यंतच्या मागील ७ वर्षांची सरासरी घेतली तर, **पंजा-बांत,** ( जेथें कायम धारेबंदी नाहीं ) **जमीन महसुलाच्या** वाढीचें प्रमाण शेंकडा १२ पडलें; आणि **मध्य** आणि **वायव्य** या दोन प्रांतांतील **भाड्यांच्या** वाढीचें प्रमाण **अनुक्रमें शेंकडा** १९ व ४८ असें पडलें ! अशी स्थिति

असल्यामुळें, बंगाल्यांतील शेतकऱ्यांच्या स्थितींत व इतर प्रांतांतील शेतकऱ्यांच्या स्थितींत पुष्कळ फरक असणें स्वाभाविकच आहे.

**उपसंहार:**—आतां, थोडक्यांत उपसंहार करून, हा निबंध पुरा करितों. या निबंधांत, हिंदुस्थानची सध्यांची सांपत्तिक स्थिति कशी आहे, याचा निर्णय करण्याचा मी अल्प यत्न केला आहे; आणि त्याच्या विवेचनांत मी जो इतका साधक बाधक पुरावा दाखल केला आहे, त्याची कोणी जर निःपक्षपातानें मीमांसा करील तर मला वाटतें, त्याला स्पष्ट दिसून येईल कीं, हिंदुस्थानची स्थिति पूर्वीपेक्षां निकृष्ट झाली आहे. इतकेंच नव्हे तर, त्या निकृष्टावस्थेचीं कारणें हल्लींच्या आमच्या सरकारास थोड्या बहुत मानानें दूर करितां येण्यासारखीं आहेत; व त्याचे अनेक मार्ग आहेत. स्थानिक हुन्नर कलाकौशल्यांना उत्तेजन देऊन, देशांतील उत्पादक सामुग्रीची अभिवृद्धि करून, देशीलोकांच्या बुद्धिमत्तेचा हल्लींपेक्षां अधिक प्रमाणानें उपयोग करून घेऊन, मुलकी आणि लष्करी—विशेषतः लष्करी—खात्यांतील खर्च कमी करून, आणि धारेबंदी संबंधानें होईल तितकी दयार्द्र दृष्टि ठेवून, किंवा शक्य तेथें कायम धारेबंदीची पद्धत सुरू करून, सरकारास प्रजेची निकृष्टावस्था बऱ्याच अंशानें दूर करितां येण्यासारखी आहे. आतां, विवेचन करितांना, सरकार तर्फेची बाजू जर विशेष प्रतिकूल व कृष्णमय स्वरूपानें दाखविली गेली असेल, तर त्यास कारण एकच आहे. तें हें कीं, कोणत्याही सुधारलेल्या व भूतदयाशील सरकारच्या शासनपद्धतींत भूषण मानण्यासारख्या, त्यांचें औदार्य दर्शविणाऱ्या, आणि एकंदरींत मनास बोध व

उन्नतत्व देण्यासारख्या कांहीं गोष्टी असल्याच पाहिजेत. हें तत्त्व स्वयंसिद्ध व परोक्षगृहीतच आहे. त्यासंबंधानें मुद्दाम उल्लेख करण्याचें प्रयोजन नाहीं. शिवाय, अशा उज्वल गोष्टींपेक्षां, कृष्णमय गोष्टी अधिक असून, त्यांच्या तिमिर छायेनें त्या ( उज्वल ) कधीं कधीं अगदीं लोपून जात असतात, हेंही निर्विवाद आहे. त्या त्या गोष्टींच्या कृष्णमय छायेनें केवळ सरकारच्याच उज्वल वैभवास लांछन येतें असें नाहीं, तर त्यांच्या त्या उदासवाण्या व उद्वेगजनक पटलांत हिंदुस्थानांतील असंख्य प्रजाजनही वेष्टून जात आहेत. तेव्हां अशा लांछनास्पद गोष्टींचें निवारण करणें हें सरकारचें आद्य कर्तव्य आहे.

# हिंदुस्थानांतील कायदे करण्याचीं धोरणें.

( लेखकः—पी. एस्. शिवस्वामी अय्यर,
बी. ए., बी. एल्., मद्रास युनिव्हर्सिटीचे फेलो, व ' मद्रास लॉ जर्नल ' चे संपादक. )

पल्या देशांतील शासनपद्धतीचा इतिहास ज्यांनीं लक्षपूर्वक अवलोकन केला असेल, त्यांना अलीकडे कांहीं वर्षांत तरी, कायदे करण्याच्या बाबतींत, कांहीं विशिष्ट गोष्टी व प्रवृत्ति अगदीं ठरून गेल्यासारख्या व प्रमाणभूत झाल्यासारख्या आहेत, असें दिसून येईल. गेल्या कांहीं वर्षांतील कायदेकानूंसंबंधाचें दप्तर जर आपण चाळून पाहिलें तर, बहुतेक कायदे हिशेबी बाबतींसंबंधानें नवीन उपायांविषयीं अथवा त्या खात्यांतील अंतर्व्यवस्थेसंबंधीं, कांहीं कायांच्या अंमल बजावणीच्या शिस्तीविषयीं; आणि बरेच पूर्वीच्या कायद्यांत दुरुस्ती व फेरफार करण्याविषयींच झालेले आहेत, असें आपल्यास दिसून येईल. परंतु, मूळ कायद्याच्या तत्त्वांतच बदल करणारे असे नवीन कायदे झालेले फार थोडे आढळतील. ह्मणूनच, नवीन कायदे होण्याचें घाटत असतांना, साधारण जनसमूहास त्यांतील विषयांसंबंधानें तादृश महत्व किंवा जिज्ञासा बहुधा वाटत नाहीं. अर्थात, या विधानाला, **लॉर्ड एल्जिन** यांच्या अमदानींतील कौन्सिलची शेवटची बैठक अपवाद आहे हें सांगणें नकोच. त्यावेळीं, होऊं घातलेल्या काय-

यांतील विषयासंबंधानें लोकांमध्यें जिज्ञासा जागृत झाली होती इतकेंच नव्हे, तर, जिकडे तिकडे एक प्रकारें 'जिज्ञासाक्षोभ' उसळला होता, असें ह्मणणें जास्त सयुक्तिक होईल. असो.

वर ज्या कित्येक विशिष्ट गोष्टी व प्रवृत्ति ह्मणून सांगितल्या, त्यांपैकीं मुख्य प्रवृत्ति म्हटली म्हणजे, कित्येक बाबतींत व कित्येक दिशांनीं, कायदे करण्यासंबंधानें सरकारची दिसून येणारी नाखुषी अथवा भीरुता ही होय. त्याचप्रमाणें, अशा बाबतींत कायदे करण्याचें जेव्हां सरकार मनावर घेतें किंवा धैर्य दाखवितें, त्यावेळीं देखील, त्या कायद्याच्या स्वरूपासंबंधानें लोकांस कुरकुर करण्यास बरीच जागा असते. किंबहुना, काळजीपूर्वक, मुद्देसूद व गोंडस असे कायद्याचे मसुदे करण्याच्या कलेचा, आमच्या सध्यांच्या कायदे कौन्सिलांत फार शोचनीय अभावच आहे, असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें. प्रचारांत असलेल्या कायद्यांत हल्लीं ज्या सुधारणा करण्यांत येतात, त्या अगाऊ नीट विचार न करितां धांदली धांदलीनें व कामचलाऊ करण्यांत येतात. त्या सुधारणा करितांना, त्या सामील केल्यापासून, मूळ कायद्याच्या इतर कलमांना कांहीं बाध येईल कीं काय, अथवा उद्दिष्ट सुधारणा त्यांच्याशीं विसंगत दिसेल कीं काय, याकडे मुळींच लक्ष पोहोंचविण्यांत येत नाहीं. हें विधान कित्येकांस जरा कडक व आवेशाचें वाटेल, हें आम्हीं जाणून आहों. तथापि, त्याच्या सत्यतेविषयीं अनेक उदाहरणें दाखवितां येतील. त्यांपैकींच एक दोन येथें सांगतों. **दरखास्ती** बजावण्याचेंच उदाहरण घ्या. या बाबतींत सुधारणा होण्यापूर्वी, **अलाहाबाद** हायकोर्टानें, इतर फिर्यादींसंबंधानें असणारा कायदा दरखास्ती संबंधानें

ही सरसकट लावण्याचा क्रम स्वीकारला होता; त्या योगानें फिर्यादी लोकांचें अतोनात नुकसान होऊं लागलें. हें नुकसान टाळण्या-करितां म्हणून सरकारानें 'सिव्हिल प्रोसिजर'च्या ६४७ व्या कल-मांत सुधारणा करण्याचें मनांत आणलें. "या कलमांत सांगितले-ला नियम, साध्या फिर्यादी आणि अपिलें यांच्याखेरीज इतर कोणत्याही प्रकारच्या दिवाणी कामांस लागू करावा," असें तें कलम आहे. त्यास सरकारानें पुन्हां एक खुलासा जोडून, त्यांत 'हें कलम दरखास्तीच्या अमल बजावणीस लागूं नाहीं' असें नमूद करून टाकलें. या दुरुस्तीचा परिणाम असा झाला आहे कीं, 'सिव्हिल प्रोसीजर' मधील, १९ व्या भागांत ज्या प्रकरणाविषयीं प्रत्यक्ष नियम घालून दिलेले सांप-डत नाहींत, अशा प्रकरणासंबंधानें, अमल बजावणीच्या कोर्टाचा अधिकार काय आहे, व त्यांनीं त्या बाबतींत कशा-रीतीनें वागलें पाहिजे, याविषयीं ठरीव नियम सि० प्रो०मध्यें कोठेंच नाहींत! हें एक उदाहरण झालें. मूळच्या कायद्यांत केले-ल्या संशयोत्पादक दुरुस्तीचें दुसरें उदाहरण म्हणजे, १८९० चा 'पालक आणि अज्ञान' यांच्या विषयींच्या कायद्यांतील कलम ३० हें होय. 'बंगाल्यांतील अज्ञानासंबंधीं' कायद्याअन्वयें असें ठरविण्यांत आलें होतें कीं, कोर्टाची आगाऊ मंजुरी न घेतां, जर अज्ञानाची जिंदगी गहाण टाक-ण्यांत आली, तर तें 'गहाणखत' **मुळांतच** बेकायदेशीर व रद्द होय. परंतु, पुढें कायदे करणाऱ्यांस असें वाटलें असावें कीं, अशा तऱ्हेचें गहाणखत मुळांतच रद्द ठरविण्याऐवजीं, —पुढें मागें, तो व्यवहार अज्ञानाच्या अहितास कारण झाला अशाविषयीं पुरावा आल्यास—तो, **'रद्द होण्यास पात्र'**

आहे असें ह्मटल्यानें देखील, अज्ञानाच्या हिताचें संरक्षण चांगल्या रीतीनें होणार आहे. कारण, बऱ्याच वेळां, असा व्यवहार अज्ञानास फायदेशीर होण्याचा संभव आहे. अर्थात, वयांत आल्यावर, तो अज्ञान, पूर्वीचा व्यवहार कायदेशीररीतीनें मंजूर करण्याची साहजिकच इच्छा करील. हा हेतु साधण्याकरितां, वर सांगितलेलें ३० वें कलम 'पालक आणि अज्ञान' यांच्या कायद्यांत दाखल करण्यांत आलें. त्यांत असें नमूद केलें आहे कीं, "वर सांगितलेल्या प्रकारच्या व्यवहारांत, जर (अज्ञाना खेरीज) इतर कोणाचें, हितानहित त्यांत असेल व त्यानें जर त्याविषयीं आपण होऊन तक्रार केली तर, मात्र सदर्हू व्यवहार रद्द होण्यास पात्र होईल." कलमाच्या भाषेवरूनच पाहिलें तर, असा अर्थ निघतो कीं, सदर्हू व्यवहार, अज्ञाना खेरीज इतर व्यक्तीच्या तर्फे मात्र रद्द करण्यास पात्र होईल; पण अज्ञानास मात्र तसें करितां यावयाचें नाहीं. परंतु, वर सांगितलेला कायदे करणारांचा हेतु लक्षांत आणला ह्मणजे, त्या कलमाचा वरवर दिसणारा अर्थ अगदीं विपर्यासाचा आहे. एक प्रकारें त्या योगानें अर्थाचा अनर्थच होतो. तेव्हां, अशा ठिकाणीं, कलमाचा अर्थ करावयाचा तो, त्याच्या उघड उघड शब्दरचनेवरून करावयाचा नसून, तें कलम करण्यांत कायदे करणाऱ्यांच्या हेतूच्या धोरणानें करावा लागतो. अशा रीतीनें, कायद्यांतील भाषा स्पष्ट नसल्यामुळें, अर्थाविषयीं घोंटाळा उत्पन्न होतो.

कायद्याच्या तत्त्वांतील व शाब्दिक रचनेंतील दोषांचीं जीं एक दोन ठळक उदाहरणें आह्मीं वर निर्दिष्ट केलीं आहेत, तीं केवळ कुत्सित बुद्धीनें, अथवा कायदे करतांना,

सरकाराला ज्या अनेक अडचणी येतात व जी अनेक प्रकारची प्रतिकूल परिस्थिति असते, तिचा विचार न करितां दिलीं आहेत, असें कोणीं समजूं नये. इतक्या अडचणींशीं व प्रतिकूल परिस्थितीशीं झगडूनही, कायद्याच्या बाबतींत सरकारच्या हातून जी अनेक प्रकारची प्रजेस सुखकर अशी कामगिरी बजावली गेली, त्याविषयीं आह्मी सरकारास कृतज्ञतेनें पूर्ण दुवा देतों. तथापि, कायदे करण्याच्या पद्धतींत व त्याच्याखालीं घ्यावयाच्या विषयासंबंधानें बरीच सुधारणा करण्याची आवश्यकता आहे हें दर्शविण्याचा, व यापुढें या देशांतील कायदे कोणत्या धोरणावर करण्यांत यावे, त्याची मार्गदिशा सुचविण्याचा या निबंधाचा उद्देश आहे.

आतां, कायदे करण्याच्या बाबतींत सरकारास ज्या अनेकविध अडचणी येतात व त्यांना जी प्रतिकूल परिस्थिति असते ह्मणून सांगितलें, त्यांपैकीं बऱ्याच गोष्टी अपरिहार्य आहेत, हें आह्मांला कबूल आहे. उदाहरणार्थ, कित्येक बाबती अशा आहेत कीं, ज्यांच्याविषयीं कायदे करण्याचें सरकारच्या मनांत पुष्कळ वेळां येत असेल; परंतु, तसें केल्यानें कदाचित् त्या लोकांचे अनादिकालागत दृढमूल ग्रह व समजुती दुखावल्या जातील, अशा दहशतीनें सरकार तसे कायदे करण्यास धजावत नाहीं. उलट पक्षीं, दुसऱ्या कित्येक बाबती अशा आहेत कीं, त्यांच्याविषयीं कायदे केल्यास, विलायतेंतील लोकांचीं मनें कदाचित् नाखुष होतील अशा धाकानें, त्या बाबतींत तटस्थ मौनवृत्ती धारण करणें हेंच सरकार आपलें कर्तव्य समजतें. कित्येक बाबतींत, एखादा कायदा एखाद्या विशिष्ट प्रांताला सुखकारक होईल अशी सरकारची खात्री असूनही, केवळ इतर

भागांस तो फायदेशीर होणार नाहीं, किंवा तो एकाच भागांत सुरू केल्यामुळें, बाकीच्या भागांत असमाधान उत्पन्न होईल; अशा भीतीस्तव तो कायदा ते करण्यास असमर्थ असतें. आतां, अशा गोष्टींस सरकारानें मुळींच महत्व देऊं नये, असें कोणासही ह्मणतां यावयाचें नाहीं. तथापि, बऱ्याच प्रसंगीं, सरकार अशा गोष्टींस वाजवीपेक्षां फाजील महत्व देतें, इतकेंच सांगण्याचा आमचा हेतु आहे. अशा गोष्टींस सरकारानें कितपत महत्व द्यावें, किती मर्यादेपर्यंत त्यांस मान द्यावा व कोणत्यावेळीं त्यांस दूर झुगारावें, हें जर यथायोग्य रीतीनें सरकारास कळून घ्यावयाचें असेल, तर या बाबतींत, देशांतील लोकमताचे प्रतिपादक व पुढारी या लोकांपासून सरकारास फार महत्वाची मदत मिळण्यासरखी आहे. सध्यांच्या आमच्या कायदे कौन्सिलांची रचना सरकारानें जर किंचित् विस्तृत केली व त्यांच्या सद्यःस्थितींत अवश्य त्या थोड्याबहुत सुधारणा जर केल्या, तर प्रत्येक बाबतींसंबंधानें खरें लोकमत कळून येण्याचीं साधनें सरकारास अधिक सुलभ होतील. परंतु, मोठ्या दुःखाची गोष्ट आहे कीं, अलीकडे, बड्या अधिकारावर असलेल्या सरकारी अमलदारांची प्रवृत्ति पाहिली तर, साधारणतः सुशिक्षित लोकांच्या मतांविषयीं अविश्वास किंवा तिरस्कार दर्शविण्याकडे असलेली दिसते! ज्या आमच्या सरकारानें इंग्रजी पद्धतीनुरूप हिंदुस्थानवासीयांस शिक्षण देण्याविषयीं इतके पराकाष्टेचे प्रयत्न केले, आणि इंग्रजी इतिहास, इंग्रजी कायदे, इंग्रजी न्यायपद्धती व ब्रिटिश सरकार यांच्याविषयीं हिंदुस्थानवासी सुशिक्षितांच्या मनांत आदर आणि कौतुक-बुद्धि बिंबविण्याचें जंगीं श्रेय संपादिलें, त्याच सरकारानें

आतां, त्यांनीं नांवारूपास व अस्तित्वांत आणलेल्या अशा सुशिक्षित लोकांवर उठावें, आणि त्यांना ज्या गोष्टी शिकविण्या पढविण्यांत आल्या, त्यांच्यापेक्षां त्यांच्यांत अधिक कांहीं गुण दिसत नाहीं ह्मणून त्यास नांवें ठेवावीं— इतकेंच नव्हे, तर त्यांना मिळालेल्या शिक्षणामुळेंच, त्यांची व साधारण जनसमूहाची फारकत झाली, ह्मणून प्रजेचीं गाऱ्हाणीं समजून घेण्यास, व तीं लोकांच्या वतीनें राज्यकर्त्यां-पुढें मांडण्यासही ते सर्वस्वी नालायक आणि अपात्र आहेत, असें त्यांस त्यांच्या तोंडावर धडधडीत सांगावें—हें सरकारास अत्यंत अनुचित व लांछनास्पद होय! समजा, उद्यां एखादा हिंदुस्थानवासी माणूस विलायतेस जाऊन, तेथेंच एखाद्या सरकारी आफिसांत बरेच दिवस काम करीत राहिला! व अशा रीतीनें **इंग्लंड** देशाशीं इतके वर्षं आपला निकट संबंध जड-ल्यामुळें, **ऑक्सफर्ड** किंवा **केंब्रिज** मधील पदवीधरांपेक्षांही, **इंग्लंडांतील** प्रजापक्षाचें मत सरकार दरबारीं प्रविष्ट करण्याचा आपल्यास विशेष अधिकार आहे, असें जर सदर्हू हिंदी म-नुष्य ह्मणूं लागला तर, त्याला वेडे पीर समजून तिकडे त्याची चांगलीच संभावना होईल! इकडील सुशिक्षित वर्गापेक्षां, थोडे वर्षं येऊन राहिलेल्या उपऱ्या अधिकाऱ्यांनाच, देशांतील लोकस्थितीविषयीं अधिक माहिती असते, हें ह्मणणें देखील वरच्याच पंक्तींतलें आहे! पण येथें मात्र इंग्रज अधिकाऱ्यांचा उपहास होत नाहीं, किंवा त्यांस वेडेपीर ह्मणण्याची कोणाची छाती होत नाहीं! सारांश, लोकांच्या सुशिक्षित पुढाऱ्यांविषयीं अविश्वास दर्शविण्याचें जें सध्यांच्या राज्यपद्धतीचें धोरण दिसतें, त्याचा त्याग करून सरकार जर लोकांच्या पुढाऱ्यां-

विषयीं अधिक आदर बुद्धि दाखवूं लागेल, तर हल्लींपेक्षां प्रत्येक बाबतीबद्दल खरें लोकमत जाणून घेण्याचें व त्या धोरणावर कायदे कानूंची जंत्री राखण्याचें एक सुलभतर साधन त्यांनीं आयतेंच मिळविल्यासारखें होईल! कारण, कोणत्याही देशांत, त्या देशांतील सुशिक्षित लोक हेच एकंदर जनसमूहाच्या मतांचे व हितानहिताचे खरे मार्गदर्शक असतात. तेव्हां, हिंदुस्थानांतील अशा वर्गाच्या लोकांचीं ( सुशिक्षितांचीं ) मात्र मतें, त्यांना दरखेपेस टोलेजंग जाहीरसभांचा पाठिंबा मिळाल्याशिवाय–एकंदर प्रजेचीं नव्हेत, असें मानणें फार घातुक, चुकीचें व शोचनीय आहे.

लोकपक्षीय पुढारी ज्या गोष्टींविषयीं आज बरेच दिवस आक्रोश करीत असूनही, ज्यांच्याकडे सरकार फारसें लक्ष देत नाहीं, अशा गोष्टींपैकीं कांहींचा येथें थोडक्यांत उल्लेख करितों. ह्मणजे त्यावरून, आमच्या वरील ह्मणण्याच्या खरेपणाविषयीं चांगली खात्री होईल. उदाहरणार्थ, हिंदु लोकांतील देवस्थानें, धर्मखातीं, वगैरेकडे दिलीं असलेलीं वर्षासनें व देणग्या यांचीच गोष्ट घ्या.

अशा देणग्यांची व्यवस्था बरेच दिवसांपासून फार असमाधानकारक रीतीची आहे, असें सर्वत्र आढळून आलें आहे. तथापि, त्यांच्याविषयीं सध्यांचा जो कायदा आहे, त्याच्या योगानें वरील गोष्टींचा प्रतिकार मुळींच होऊं शकत नाहीं. तेव्हां त्यांत सुधारणा करावी, अशी देशांतील सर्व ठिकाणच्या पुढाऱ्यांची ओरड चालू आहे. या बाबतींत विशेष सक्तीचा कायदा झाल्याखेरीज, धार्मिक संस्थांच्या देणग्यांची स्थिति सुधारण्याची मुळींच आशा दिसत नाहीं. निदान

दक्षिण हिंदुस्थानांत तरी, या बाबतींत सुधारणा होण्याच्या आवश्यकतेसंबंधानें सर्वांचें एक मत आहे. इतकेंच नव्हे, तर सरकाराकडे वेळोवेळीं निरनिराळ्या ठिकाणांहून या बाबतींत अनेक अर्ज व सूचना गेल्या आहेत; परंतु त्या तशाच दप्तरीं दाखल करून ठेवण्यापलीकडे सरकारानें त्या बाबतींत कांहींच केलें नाहीं ! तेव्हां या संस्थांची सुधारणा होण्याचा सुदीन लवकर उगवेल, अशी आशा दिसत नाहीं. अशा स्थितींत सरकारची या कामीं दिसून येणारी अनास्था व बेपर्वाई हीं, केवळ तें अन्यधर्मीय असल्यामुळें, त्यांस इकडील लोकांच्या धार्मिक बाबतींत तादृश आस्था व सहानुभूति नाहीं यामुळेंच होय, अशी जर लोकांची समजूत झाली, तर त्यांत कांहीं नवल नाहीं. या देशांतील धार्मिक संस्थांना प्रत्यक्ष द्रव्य-द्वारा मदत करणें सरकारास कदाचित् न्याय्य वाटत नसेल, तथापि, ज्याप्रमाणें खाजगी जिंदगीच्या अफरातफरीचा किंवा अव्यवस्थेचा प्रतिकार करण्यास सरकार कोर्टद्वारा तयार असतें; त्याचप्रमाणें, निरनिराळ्या धर्मांतील उदार लोकांनीं आपल्या धार्मिक संस्थांना ज्या देणग्या दिल्या आहेत, त्यांचाही दुरुपयोग किंवा अपव्यय न होईल अशाविषयीं दक्षता राखणें हें सरकारचें अवश्य कर्तव्य आहे. हिंदु लोकांस धर्मासारखी प्राणाहून प्रिय अशी दुसरी कोणतीच गोष्ट नाहीं. तेव्हां, त्यांच्यावर जे अमल चालवितात त्यांनींही खाजगी जिंदगी प्रमाणेंच, धार्मिक संस्थांना दिलेल्या देणग्या पवित्र व रक्षणीय मानल्या पाहिजेत. धार्मिक संस्थेंत खरी सुधारणा करणारा असा कायदा करण्याचें सरकारानें मनांत आणलें तर, त्यास लोकही मनःपूर्वक संमति देतील यांत मुळींच शंका नाहीं. ह्मणून, केवळ लोकांचीं मनें कदाचित् दुखविलीं

जातील अशा काल्पनिक भीतीनें, सरकारानें या बाबतींत सुधारणा करण्याचें अंगाबाहेर टाकूं नये अशी आमची त्यास सविनय सूचना आहे. कायदे करण्याच्या धोरणांची ही एक बाब झाली.

कायद्याच्या शक्तीचा, जिच्यासंबंधानें चांगला उपयोग करून घेतां येईल, अशी दुसरी बाब म्हटली ह्मणजे एतद्देशीयांच्या व्यक्तिक हक्कांची होय. अर्थात्, या बाबतींत कायदे करणें ते फार सावधगिरीनें केले पाहिजेत. हिंदुधर्मशास्त्रास अर्वाचीन पद्धतीवर एकत्रित स्वरूप देण्याचा काल अजून आला नाहीं हें आह्मांसही मान्य आहे. तथापि, त्या शास्त्रांमध्यें असे कित्येक भाग आहेत कीं, ज्यांस हल्लींच पूर्णावस्था प्राप्त झाली असून, भावी निबाड्यांनीं त्यांच्यामध्यें फारसा फरक होणार नाहीं; व कित्येकांत सुधारणा केली असतां लोकांना ती मान्य होण्याचा संभव आहे; अशा भागांना जर आतांपासूनच कायद्याचें स्वरूप देण्यांत आलें तर, भावी संकलनाच्या कामीं त्याचा फार उपयोग होणार आहे. उदाहरणार्थ, **मद्रास** कायदे कौन्सिलांत नामदार **भाष्यम् आय्यंगर** यांनीं दोन कायद्यांचे मसुदे आणले आहेत, तेच घ्या. हे मसुदे ह्मणजे, हिंदु धर्मशास्त्रांतील, 'ज्ञानोपार्जित धना'च्या कायद्याचा एक, व दुसरा मयताच्या भगिनीसंबंधाचा. यांपैकीं पहिला मसुदा, हल्लीं कोर्टांत तत्संबंधीं जे निकाल देण्यांत येतात, त्यांच्या आधारावर तयार केलेला आहे. कित्येक वेळां असें घडतें कीं, एखाद्या माणसानें स्वतःच्या विद्येवर पैसा मिळविलेला असतो, पण त्याच्या अविभक्त कुटुंबांतील मंडळी, त्याच्या विद्येला लागलेला पैसा कुटुंबाच्या एकत्र जिंदगींतूनच खर्च करण्यांत आला, या सबबीवर त्याच्या ज्ञानोपार्जित धनाची

वांटणी मागण्यास पुढें येतात. हा प्रकार ह्मणजे ' आयत्या बिळावर नागोबा बळी ' अशांतलाच आहे. त्या योगानें आलस्याला मात्र उत्तेजन मिळतें. हे दुष्परिणाम टाळण्याचा वरील कायद्याचा उद्देश आहे. विद्येसाठीं खर्च झालेला पैसा कोणत्याही द्वारानें प्राप्त झालेला असो, तरी केवळ विद्येवर मिळविलेला पैसा फक्त संपादन कर्त्याचाच होय, त्याच्यावर कुटुंबांतील कोणाही मंडळीचा हक्क चालणार नाहीं, असें वरच्या मसुद्यांत नमूद केलें आहे. दुसऱ्या मसुद्याचा उद्देश मृत्युपत्र न कारितां जे मयत होतील, त्यांच्या पाठीमागें वारसदारीकरितां पुढें येणाऱ्या हक्कदारांत, मयताच्या बहिणीला अधिक लायकी देण्याचा आहे. हल्लींच्या कायद्यांत मयताच्या बहिणीला, मयताच्या सख्या किंवा चुलत पुरुषवारसांच्याही खालच्या दर्जाची मानलेली आहे. अर्थात् सध्याच्या कायद्यांत वरच्यासारखी सुधारणा झाल्यास लोकांना ती सर्वथैव मान्य होईल. पण मुख्य गोष्ट ही ध्यानांत ठेविली पाहिजे कीं, हिंदुधर्मशास्त्रांतील कोणतीं अंगें परिपक्व होऊन त्यांस संकलित रूप देण्याच्या स्थितीस आलीं आहेत, व कोणत्या अंगांची वाढ अजून होणें आहे, याविषयीं निर्णय करणें फार नाजूक व दूरवर विचाराचें काम आहे. उदाहरणार्थ कित्येक अंगांना अजून निश्चित स्वरूप प्राप्त झालेलें नाहीं. अशांना कायद्याचें स्वरूप देण्यापासून फार अनिष्ट परिणाम ओढवतील. तथापि यासंबंधांत, अनुभविक व निपुण अशा हिंदुधर्मशास्त्रज्ञ कायदेपंडितांची वेळोवेळीं सल्ला घेतल्यास, वरील काम बरेंच सुलभ होण्यासारखें आहे. ज्यामध्यें कायद्याच्या साहाय्याची विशेष आवश्यकता आहे, अशी तिसरी बाब ह्मटली ह्मणजे, ठळक

ठळक व महत्त्वाच्या कायद्यांची पुन्हा पूर्ण दुरुस्ती करणें ही होय. अशा कित्येक कायद्यांमध्यें, त्यांची अमलबजावणी व्हावयास लागल्यापासून, बरेच दोष दृष्टोत्पत्तीस येत गेले आहेत. अशांपैकीं विशेष महत्वाचे कायदे ह्मणजे, '**सिव्हिल प्रोसिजर**' '**लिमिटेशन (मुदतीचा) ॲक्ट**' व '**ट्रॅन्सफर ऑफ प्रॉपर्टी ॲक्ट**' हे होत. तेव्हां, यांची पुन्हा दुरुस्ती करून, त्यांत अनुभवांतीं दृष्टोत्पत्तीस आलेले दोष काढून टाकले पाहिजेत. परंतु, या दोषांची दुरुस्ती करावयाची सध्यांची पद्धत ह्मटली ह्मणजे, ज्या मुद्यासंबंधानें, निरनिराळ्या हायकोर्टांत मतभेद असेल, त्या मुद्या संबंधानें त्या कायद्यांत वेगवेगळीं दुरुस्तीचीं कलमें गोंवणें हें होय. पण, आरंभीं सांगितल्याप्रमाणें, या दुरुस्त्या साधारणतः फारशा सूक्ष्म विचाराअंतीं बनविलेल्या नसतात, त्यांची भाषा-सरणीही स्पष्ट व सुबोध नसते; आणि कधीं कधीं, सुधार-लेल्या कायद्यांतील इतर भागांशीं या दुरुस्त्यांचा विरोध येतो. कायद्याचा मसुदा तयार करणें हें विशेष विद्वत्तेचें व चतुराईचें काम आहे. परंतु अशा तऱ्हेच्या विद्वत्तेचा व चातुर्याचा वरिष्ट कायदेकौन्सिलांत अभाव असलेला पाहून मनास फार वाईट वाटतें. तसेंच कायद्याच्या ज्या बाबतींत दुरुस्ती करण्याविषयीं सरकारास आवश्यकता वाटते, त्या बाबतींविषयीं निश्चित माहिती मिळविण्याकरितां ह्मणून सरकार जी पद्धत स्वीकारतें, तीहि सर्वथैव चुकीची असून तिच्या योगानें उद्दिष्ट हेतु साध्य होणें शक्य नसतें. सरका-रची पद्धत साधारणतः अशी असते कीं, ज्या बाबतींत हायकोर्टांचा मतभेद होत असेल असे मुद्दे प्रथम शोधून काढावयाचे; व मग तो कायदा सर्वांस लागू

होण्याकरितां, त्यांच्यांत दुरुस्ती करणें इष्ट व अवश्य आहे कीं काय, याविषयीं हायकोर्टांच्या जज्जांचे अभिप्राय घ्यावयाचे. परंतु, इकडील हायकोर्टांच्या जज्जांना इतर कांहीं सरकारी अधिकाऱ्यांपेक्षां कामाचा फारच ताण पडत असतो. तेव्हां अर्थात, त्यांच्या कामा बाहेरच्या अशा गोष्टी त्यांजकडे अभिप्रायार्थ धाडल्या असतां त्यांच्याविषयीं देखील खुलासेवार व समाधानकारक अभिप्राय देण्यास त्यांस फुरसत नसते. मग ज्या मुद्याविषयीं त्यांचें मत विचारलें नाहीं, अशा दुरुस्तीच्या कायद्यांतील इतर बाबतींसंबंधानें ते आपण होऊन सूचना करतील, हें मुळींच संभवनीय नाहीं, हें सांगणें नकोच. हें एक झालें. दुसरी गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे, ती ही कीं, एखाद्या कायद्याच्या अमलबजावणींतील खरे दोष व अडचणी जाणण्यास, जज्जांपेक्षां प्रत्यक्ष काम करणारे वकील लोक हे अधिक पात्र आहेत. हल्लींच्या पद्धतीपासून होणाऱ्या परिणामांचें उत्तम उदाहरण ह्मणजे इसवी सन १८९८ च्या आरंभीं '**क्रिमिनल प्रोसिजर**' ची जी फेरदुरुस्ती झाली, ती होय. पूर्वींच्या कायद्यांत, प्रजेस विशेष जाणवणारीं अशीं कांहीं कलमें होतीं. त्यांचें आविष्करण करण्याची या फेरदुरुस्तीच्यावेळीं प्रजापक्षाकडील बऱ्याच लोकांनीं संधि साधली. तथापि, लोकांनीं केलेल्या सूचनांचा सरकारानें क्वचित्‌च आदर केलेला दिसतो; आणि व्यक्तिस्वातंत्र्यासंबंधानें पहातां, सध्याच्या कायद्यानें पूर्वींच्या कायद्यांत मुळींच दुरुस्ती झाली नाहीं. उलट, झाली असल्यास, क्वचित् ठिकाणीं अधिक हानि मात्र झाली आहे असें ह्मणावें लागतें. कारण, सरकाराजवळ त्यांचे कायदेपंडित **सर हेन्री प्रिन्सेप** होते, मग त्यांना इतरांची काय

जरूर? या दुरुस्तीचा प्रत्यक्ष परिणाम थोडक्यांत सांगावयाचा ह्मणजे, सरकारची पोलिसशक्ती अधिक प्रबल झाली हा होय. कोडांची दुरुस्ती उत्तम रीतीनें करण्याचा सर्वमान्य मार्ग ह्मटला ह्मणजे, प्रत्येक इलाख्यांतून एकेक या प्रमाणानें तीन चार निष्णात इंग्रजी कायदेपंडित व तीन चार नेटिव कायदेपंडित यांचें कमिशन नेमणें हाच होय. त्याचप्रमाणें संरकारानें सामान्यतः 'बार असोसिएशन' (वकिलांच्या सभा किंवा वकील मंडळें ) यांची,—कायदेकौन्सिलांत जे कायद्याचे मसुदे प्रविष्ट झाले असतील किंवा प्रविष्ट होण्याचा विचार घाटत असेल,—अशा मसुद्यांबद्दल सल्लामसलत विचारणें देखील अत्यावश्यक आहे. बार किंवा वकील या शब्दाचा अर्थ सर्वप्रकारचे वकिली चालविणारे कायदेपंडित असा घ्यावयाचा. यावर सरकारतर्फे असें ह्मणण्यांत येईल कीं, निरनिराळ्या वकील लोकांच्या सभा व प्रत्येक वकील, यांस आपआपले अभिप्राय कौन्सिलकडे पाठविण्यास पूर्ण मुभा आहे, व ठरीव नियमांप्रमाणें सरकार त्यांचा योग्य विचार करील. परंतु सरकारानें लिहून विनंति केल्यावर आपलें मत देणें व सरकार विचार करील या आशेनें आपण होऊन आपलें मत देण्याची आगांतुकी करणें, ह्यांत महदंतर आहे. आपल्या मतांना मान मिळणार नाहीं अशी खातत्री असतां आपलें मत स्वतः होऊन देण्यास कोणीही पुढें येणार नाहीं. हायकोर्टांतील न्यायाधिशांस कायद्यांच्या बाबींविषयीं सरकारानें सल्लामसलत विचारावीच, असा कांहीं कायदा नाहीं. तरी पण आह्मांस वाटतें कीं, त्यांचे अभिप्राय बहुतकरून विचारण्यांत येतात. तेव्हां, कायदेकौन्सिलांत सादर करण्याचें घाटत असलेल्या एखाद्या कायद्याबद्दल आपला सल्ला देण्यास, व अस्तित्वांत असलेल्या कायद्याची दुरुस्ती

करण्याविषयीं सूचना करण्यास, वकीलमंडळास सामान्येंकरून सरकारानें कां विनंती करूं नये, ह्याला कांहीं कारण दिसत नाहीं. कायद्यांची प्रत्यक्ष अमलबजावणी करितांना ज्या अडचणी व त्रास सोसावा लागतो, यांचें ज्ञान होण्यास वकीलमंडळास हायकोर्टांतील जज्जांपेक्षां अधिक सोयी नसतात असें मानलें तरी, कायद्याच्या बाबींविषयीं हायकोर्टांतील न्यायाधीशांप्रमाणें सल्ला देण्यास आह्मांस योग्यता आहे असें वकीलमंडळांनीं ह्मटल्यास धाष्टर्य होणार नाहीं. या पद्धतीचा अवलंब केला असतां कायद्यांच्या पुस्तकांतील उणीवा दूर होतील व आपल्या कायद्यांच्या रचनेंत व स्वरूपांतही खात्रीलायक सुधारणा होईल. आह्मीं वर दर्शविलेल्या विषयांबद्दल कायदे केले असतां लोकांच्या कल्याणांत भर पडण्याचा संभव आहे.

# हिंदुस्थानांतील ज्यूरीची पद्धति.

## ( सोराब पेस्तनजी एन्. वाडिया. )

"कोणाही स्वतंत्र मनुष्यास, त्याच्या समानपदवीयांनीं किंवा देशांच्या कायद्यांनीं गुन्हेगार ठरविल्यावांचून धरण्यांत येणार नाहीं, कैदेंत घालण्यांत येणार नाहीं, किंवा त्यास त्याच्या जिंदगीला मुकण्यास लावण्यांत येणार नाहीं, किंवा त्यास 'कायद्या बाहेर' करण्यांत येणार नाहीं, किंवा हद्दपार करण्यांत येणार नाहीं; अथवा आह्मीं त्याच्यावर चालून जाणार नाहीं, किंवा त्याच्यावर चालून जाण्यास कोणास धाडणार नाहीं."

**मॅग्नाचार्टा** ( राजकीय स्वातंत्र्यदायी सनदे ) मुळेंच इंग्लंडला मोठेपणा प्राप्त झाला. शुद्ध आणि उदात्त विचार, अत्युच्च प्रकारचें शहाणपण व दूरदृष्टि, परमावधीची व अत्युदात्त अशी विश्वसहानुभूति आणि सदाचारप्रीति वगैरे सर्व कांहीं आपल्यास त्या सनदेंत सांपडतें. इतक्या शतकांच्या वावटळी येऊन गेल्या; तथापि त्या सर्वांतूनही पार पडून तीं उदात्त तत्वें होतीं तशींच उज्वल व अबाधित राहिलीं आहेत, आणि त्यांच्याच योगानें **ग्रेट ब्रिटनला** समुद्रांवर आधिपत्य व पृथ्वीच्या बऱ्याच भागाचें साम्राज्य प्राप्त झालें आहे. पृथ्वीच्या कोणत्याही भागांत असणाऱ्या प्रत्येक इंग्रजांमध्यें जें एक प्रकारचें सात्विक स्वातंत्र्यप्रीतीचें पाणी खेळतांना दिसतें, तें वरील सनदेच्याच द्वारें त्यांच्या रक्तांत उतरलें आहे.

एखाद्या प्रांतावर आपला अंमल सुरू करण्यापूर्वीं, तेथें प्रथम आपलें शांततेचें व स्वातंत्र्याचें निशाण फडकविण्यास

इंग्लंड जें नेहमीं तयार असतें, तें वरील उदात्त पूर्वपीठिकेस अनुसरूनच होय.

**जॉन** राजाला **रनीमीड** ओढ्याच्या कांठीं १२१६ त " आह्मी प्रत्येक स्वतंत्र माणसाची चौकशी, त्याच्या समान पदवीयांच्या मतानेंच करूं " या कलमावर सही करावयास लावणारा मॅग्नाचार्टाचा जनक, पुढें मागें साऱ्या ब्रिटिश राज्यांत ज्यूरीपद्धत सुरू होण्यास साधनीभूत होईल, असें एक कलमच तयार करून ठेवित होता ह्मणावयाचें.

हल्लीं जी ज्यूरीच्या मदतीनें चौकशी करण्याची पद्धत आहे, ती कायमची अशी इंग्लंडांत केव्हां रूढ झाली, याविषयीं बराच वाद आहे. *इतकेंच नव्हे. तर किंबहुना, ही पद्धत अमक्याच एका देशांत मूळ उद्भूत झाली असेंही निश्चित सांगणें कठीण आहे. कारण, पद्धतीच्या तत्वावर उभारलेल्या परंतु निरनिराळ्या स्वरूपाच्या अशा अनेक न्यायसंस्था, **स्वित्झर्लंड, इंग्लंड, फ्रान्स, ईजिप्त** वगैरे देशांच्या इतिहासांत नमूद केलेल्या आपल्यास आढळतात. आपल्याकडील फार प्राचीन काळापासून आजदिनपर्यंत प्रचलीत असलेली ' **पंचायत** ' पद्धति हीही वरील संस्थांच्या पंक्तींतील होय.

सध्यांची ज्यूरीच्या साहाय्यानें चौकशी करण्याची पद्धत ही केवळ २०।२९ वर्षांच्या वाढीनें उत्पन्न झालेली नसून, अनेक शतकांपासून सतत व संथपणें चालू असलेल्या सुधा-

* फ्रान्सांत १७९१ मध्यें, स्कॉलंडांत १८१५, रशियांत १८८६ आणि स्पेनमध्यें १८८८ पासून ही पद्धत सुरू झाली, असें साधारणतः मानण्यांत येतें.

रणेचेंच तें फळ आहे. अशा तऱ्हेचें हें प्रबल न्यायकवच आमच्या दयाळु आंग्लप्रभूंनीं उदारपणानें आमच्या स्वाधीन केलें, याबद्दल सर्व हिंदुस्थान त्यांस दुवा देत आहे.

आमच्या इकडे ज्यूरीपद्धत अगदीं प्रथम सुरू झाली. ती इंग्लंडचा राजा तिसरा जार्ज याच्या कारकीर्दीत होय. "इ. स. १७७४ चा १३ कायदा" या नांवाचा एक कायदा त्यावेळीं इंग्लंडांतील पार्लमेंटानें मंजूर केला; व त्यांत आरंभीं 'युरोप व हिंदुस्थानांतील ईस्ट इंडिया कंपनीचा कारभार सुव्यवस्थेनें चालण्यासाठीं ठरविलेल्या नियमांचा कायदा' असें त्या कायद्याचें स्वरूप निर्दिष्ट केलें होतें.

या कायद्याअन्वयें कलकत्त्यास एक 'वरिष्ठ न्यायसभा' ह्मणून स्थापण्यांत आली. व सदर्हू कायद्याच्या ३४ व्या कलमांतच, "सदर्हू वरिष्ठ न्यायसभेमध्यें, जे जे बेकायदेशीर वागणुकीचे व शिक्षास्पद अपराधांचे खटले दाखल होतील, व ज्यांची त्या सभेपुढें चौकशी होईल, त्या सर्वांची चौकशी, कलकत्त्यांत राहणाऱ्या ब्रिटिश प्रजेपैकीं कांहीं जणांच्या 'पंचायती'च्या (ज्यूरी) साहाय्यानेंच करण्यांत येईल; त्या-खेरीज नाहीं" असें ठरवून टाकलें. अशा तऱ्हेची दुसरी वरिष्ठ न्यायसभा मद्रास येथें इ. स. १८०० त स्थापण्यांत आली. या नंतर २४ वर्षांनीं चौथा जॉर्ज याच्या खुद्द शिक्का मोर्तबाच्या हुकमावरून मुंबईस, 'जेलडिलिव्हरीचें व ऑयर आणि टर्मिनर यांचें कोर्ट' म्हणून स्थापण्यांत आलें. हें कोर्ट-वरील दोन न्यायसभांच्याच धर्तीवर होतें.

याप्रमाणें खुद्द राजाच्या शिक्कामोर्तबाच्या सनदांनीं हिंदु-स्थानांतील तिन्ही इलाख्यांच्या प्रमुख शहरीं ज्यूरीपद्धत अमलांत आली. यानंतर अगदीं अलीकडे म्हणजे इ० स०

१८६६ त **अलाहाबादेस** हॉयकोर्ट स्थापन होऊन त्यासही हा महत्वाचा अधिकार देण्यांत आला. खुद्द महाराणी साहेबांखेरीज ( ह्म० खुद्द नृपती खेरीज ) दुसऱ्या कोणासही तो हक्क काढून घेतां येणार नाहीं.

हिंदुस्थानांतील प्रत्येक माणसाला आपल्या सजातीयांच्या किंवा समानपदवीयांच्या ज्यूरीनें ( पंचामार्फत ) कायदेशीर चौकशी होऊन निकाल मिळण्याचा हक्क असावा, अशा बद्दल इ० स० १८९२ त **इंडिया कौन्सिलमध्यें** कायद्याचा मसुदा आला होता. परंतु, तो पसार झाला नाहीं.

९७ सालच्या बंडानंतर थोड्याच दिवसांनीं, हिंदुस्थानाकरितां कायदे करण्यासाठीं नेमलेल्या कमिशनर लोकांनीं, फौजदारी काम चालविण्याच्या कायद्याचा मसुदा तयार केला. तो या देशाच्या विशिष्ट स्थितीस उत्तम लागू पडण्यासारख आहे, अशा विषयीं, **सर बार्न्स पीकॉक, माडग्युअंट वेल्स, सर सी. जॅक्सन** वगैरे नामांकित पंडितांचेंही अनुकूल मत पडलें. तेव्हां १८५९ त, तो मसुदा मंजुरीसाठीं **इंडिया कौन्सिल**पुढें आला; व त्यास मंजुरी मिळून, इ० स० १८६१ चा २५ वा कायदा म्हणून तो चालू झाला. या कायद्यांत प्रांतिक सरकारांनीं आपापल्या प्रांतांत ज्यूरीपद्धत योग्य रीतीनें व लवकर सुरू करण्याविषयीं व्यवस्था करावी, असें फर्माविलें होतें. त्याप्रमाणें, लागलीच **बंगाल्यांतील** सात व **मद्रास** इलाख्यातील नऊ जिल्ह्यांत ही पद्धत एकदम अमलांत आली. **मुंबई** इलाख्यांत मात्र आतांपर्यंत, फक्त सहा जिल्ह्यांतच कायती ही पद्धत रूढ झाली आहे.

या मुद्दयाचा सविस्तर विचार करण्यापूर्वी, आपल्या इकडील '**पंचायती**'च्या संस्थेबद्दल कांहीं सांगणें जरूर आहे.

कारण चमत्काराची गोष्ट ही कीं, हिंदुस्थानांत इतक्या उलाढाली व राज्यक्रांत्या होऊन गेल्या तरी त्या सर्वांतूनही निभावून, ही संस्था देशाच्या सर्व भागांत कमी अधिक मानानें अजून चालू आहे. **सिलोन** अथवा सिंहलद्वीप येथें '**गांवसभा**' नांवाची संस्था अजून रूढ आहे. व हीच कायती त्या द्वीपाच्या प्राचीन सुधारणेची खूण अवशिष्ट राहिली आहे. गांव असो, खेडें असो, प्रत्येक ठिकाणीं पंचांच्या मार्फतीनें खटले मिटविण्याची कांहींना कांहींतरी विशिष्ट पद्धत असलेली आढळते. सारांश, **पंचायत** ही तत्वतः **ज्यूरीचेंच** संकोचित स्वरूप आहे. परंतु ती ज्यूरीसारखी बऱ्याच खर्चाची किंवा यातायातीची पद्धत नाहीं, हा तिच्यामध्यें विशेष फायदा आहे. प्रथम '**पंचायती**'च्या प्राचीन इतिहासाचें संक्षेपानें अवलोकन करूं.

**याज्ञवल्क्य स्मृतींत**[1] पाहिलें तर असें आढळून येतें कीं, राजाच्या न्यायसभेच्या मुख्य न्यायाधिशाचें काम **प्राड्विवाक्** नांवाच्या अधिकाऱ्यांकडे असे. त्यास त्या वेळची '**प्राड्विवाका**' ह्मणत. त्याचप्रमाणें प्रजाजनांपैकीं सर्व वर्गांमधून निवडून काढलेल्या अशा मुखत्यारांचें एक मंडळ असे. या मंडाळांतील लोकांना 'सभासद' असें ह्मणत.

विषम संख्येच्या प्रमाणावर ( ३,५,७ इ० ) कांहीं सभासद घेऊन त्यांच्या मदतीनें प्राड्विवाक अथवा सर न्यायाधीश

१ ही स्मृति मनुस्मृतीचा सारांश असून इ० स० ५०० च्या सुमारास रचण्यांत आली, असें मानतात. त्याकालानंतर पांचशें वर्षांनीं विज्ञेश्वरभट्टानें लिहिलेली या स्मृतीवरील टीका आहे. वारसदारीचा कायदा, करार, वगैरे कायद्यांच्या प्रश्नांचा निकाल या टीकेच्यां आधारानेंच हिंदु लोक करितात.

आपलें चौकशीचें काम चालवी. ह्याच पद्धतीपासून, पुढें पंचायतीची पद्धत अस्तित्वांत आली. तेव्हां **पंचायत** ह्मणजे हिंदुस्थानांतील 'पांच* जणांची ज्यूरीची पद्धत' असें ह्मणण्यास हरकत नाहीं. या पंचां पैकीं, चार जण, प्रत्येक पक्षानें आपापल्या तर्फे निवडून दिलेले दोन दोन मिळून असत. व मग हे चार गृहस्थ आपल्या तर्फे 'अग्रेसर' ह्मणून एकास निवडीत असत. या पांचांनीं मिळून खटल्याची नीट चौकशी करून, सत्यनिर्णय करावयाचा, हें त्याचें कर्तव्य असे. **सर जॉर्ज कँबेल** यांनीं आपल्या 'अर्वाचीन हिंदुस्थान' नामक पुस्तकांत, पंचायतीच्या पद्धतीसंबंधानें असे उद्गार काढले आहेत:—"ही पद्धत, देशांतील अनेक रूढींपैकीं विशेष लक्षांत येण्यासारखी असून, सर्वांत अत्यंत प्रबल असें जें लोकसंमतीचें पुष्टीकरण तेंही तीस पूर्णपणें आहे." हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासांत, बुद्धिविषयक प्रगतीचा जो काल होऊन गेला, त्यामध्यें पाहिलें तर, **बौद्ध** लोकांच्या **विहार**संस्था किंवा **मठ**-संस्थांत ही पद्धत प्रचलित होती, असें कळून येतें. मठवासी बौद्ध लोकांमध्यें, लहान सहान बाबतींत नेहमीं मतभेद उत्पन्न होत. अशा वेळीं, वादाचा निर्णय करण्यासाठीं बौद्ध लोकांचा धर्मग्रंथ जो त्रिपिटक ह्मणून प्रसिद्ध आहे, त्यामध्यें कांहीं नियम सांगितले आहेत. त्यांपैकीं एकांत असें स्पष्ट म्हटलें आहे कीं, अशा प्रसंगीं, वादाचा मुद्दा एखाद्या त्रयस्थ पंचायती पुढें ठेवून, त्यांच्यापैकीं बहुमतांचा जो अभिप्राय पडेल,

---

* पांच हा आंकडा हिंदु लोकांना विशेष पवित्र व पूज्य वाटतो, [ आपल्यांतील 'पांचामुखीं परमेश्वर' ही सर्वश्रुत ह्मण वरील समजुतीचेंच दर्शक आहे. भा० क० ]

तो उभयपक्षांनीं मान्य केलाच पाहिजे. त्या उताऱ्याचा गोषवारा असा आहेः—

" हे भिक्षूहो, असल्या वादाचा निर्णय, पंचांच्या बहुमतानें करण्याविषयीं मी तुह्मांस आज्ञा करितों. जो भिक्षु पुढील पांच गुणांनीं युक्त असा असेल, त्यासच अभिप्राय गोळा करण्यास नेमावें. ते गुण ह्मणजे (१) जो पक्षपातानें वर्तत नाहीं. (२) ज्याच्यांत मत्सर वास करीत नाहीं. (३) ज्याला कशाचेंही ( निष्कारण ) भय वाटत नाहीं. आणि दुसरे असेच दोन हे होत.

हें भिक्षुहो ! अशा तऱ्हेच्या पंचां मार्फत वादग्रस्त मुद्दयाची चौकशी चालली असतां, जर उगाच वाष्कळ आणि निरर्थक भाषणें होऊं लागतील किंवा त्यांच्यापैकीं एकाच्याही ह्मणण्याचा उमज पडणार नाहीं तर दुसऱ्या एका पंचायती मार्फत तुह्मीं त्याचा निर्णय लावून घ्यावा, अशी माझी तुह्मांस आज्ञा आहे; आणि मघांशीं सांगितल्याप्रमाणें, पंचांच्या अंगीं सरळता, निःपक्षपातीपणा, बहुश्रुतपणा वगैरे दहा गुण असले पाहिजेत. "

हा बौद्ध ग्रंथांतील उतारा येथें जरा विस्तारानें देण्याचें कारण इतकेंच कीं, त्यावरून आमच्या इकडे ज्यूरीपद्धत सुरू झाली, ती अगदीं नवी व अश्रुतपूर्व नव्हती, हें आपल्यास दिसून येईल. ज्या वेळीं पश्चिमेकडील देशांत सुधारणासूर्याचा अरुणोदय देखील झाला नव्हता, त्याच्याही अगोदर हजारों वर्षांपूर्वीं ही पद्धत आमच्यांत रूढ होऊन समाजाच्या अगदीं अंगवळणीं पडून गेलेली होती.

ही प्राचीन काळची गोष्ट झाली. त्या नंतर, अगदीं अलीकडील गतकाळाकडे पाहिलें तरी, ही पद्धत आमच्या लोकांच्या अगदीं हाडीं मासीं खिळून गेली होती असें दिसतें. कारण निरनिराळ्या समाजांत पंचायत, महाजन, जमाती – किंबहुना ज्ञातिभेद देखील—वगैरे अर्वाचीन संस्था आहेत, त्या

बऱ्याच अंशीं ज्यूरी पद्धतीचींच विस्तृत स्वरूपें आहेत, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. तेव्हां इ. स. १७९९ सालीं मुंबईचे गव्हर्नर डंकन साहेब, यांनीं दिवाणी कामांत ज्यूरीची पद्धत सूरू करण्याविषयीं जो कायदा केला, त्या योगानें त्यांनीं आमच्या पूर्वापार चालत आलेल्या पंचायतीपद्धतीस सरकार दरबारांत राजरोस रिघाव दिला, असें ह्मटल्यास चालेल. याच्या पूर्वीं ६० वर्षांपासून ही पद्धत बंगाल व मद्रास या दोन इलाख्यांत चालू झाली होती. तेथें या पद्धतीची उपयुक्तता उत्तम रीतीनें निदर्शनास आल्यामुळेंच, सरकारानें ती मुंबई इलाख्यांत सुरूं करण्याचें योजिलें. पंचायत किंवा **असेसरची** पद्धत फक्त दिवाणी कामा पुरतीच लागू केली होती; व इ. स. १८२७ सालीं, ती फौजदारी कामांसही लागू करण्यांत आली. इ. स. १८३२ सांतही ती फौजदारी कामांत अमलांत येऊं लागली; आणि पुढें १८४३ त मद्रास इलाख्यांतील कांहीं जिल्ह्यांना हा हक्क मिळाला. तथापि, ही ज्यूरीचीपद्धत सुरू करितांना, आमच्या इकडील 'पंचायत' वगैरे संस्थांचें जें मूळ स्वरूप होतें त्यांत बरेच फेरफार करण्यांत आले. त्यांपैकीं विशेष महत्त्वाचा फरक ह्मटला ह्मणजे वादग्रस्त बाबतीविषयीं स्वतः निर्णय करून त्यासंबंधानें आपला अभिप्राय सांगण्याचा जो पंचांचा मुख्य हक्क, तो नाहींसा केला हा होय. **असेसर** नेमावयाचे ते फक्त, साक्षी वगैरे घेण्याच्या कामांत, त्यांच्या शंकांचा, व प्रश्नांचा जज्जास उपयोग व्हावा, अथवा "खटला चालला असतांना, त्यांनीं हजर राहून, कोणत्या दिशांनीं चौकशी करावी याविषयीं सूचना कराव्या, व खटल्याच्या शेवटीं त्यांचा काय अभिप्राय आहे तो त्यांनीं जज्जास नुसता सादर करावा" इतक्याच करितां असतात.

त्यांच्या अभिप्रायाप्रमाणेंच जज्जानें निकाल केला पाहिजे, अशी जज्जावर सक्ति नाहीं.

सन १८६१ तील २५ व्या कायद्यानें, ज्यूरीची पद्धत तीन इलाख्यांतील कांहीं प्रांतांत सुरू झाली, असें वर सांगितलें आहे. सन १८२७ सालीं, त्यावेळचे मद्रासचे गव्हर्नर **सर टॉमस मनरो** हे फौजदारी खटल्यांस लागू करण्याकरितां एक '**ज्यूरी ॲक्ट**' ह्मणून तयार करीत होते. परंतु, दुर्दैवानें त्याच वर्षीं कालग्यानें त्यांचा अंत झाला. त्यांच्या मागून, **सुलिव्हन ग्रीम** हे थोडे दिवस गव्हर्नर होते. त्यांनीं तो 'ज्यूरी ॲक्ट' मंजूर केला, व इलाख्यांतील सर्व भागांत तो सुरू झाला.

फौजदारी खटल्याचें काम लांबणीवर न पडतां लौकर व्हावें, लोकांची दानत सुधारावी व फौजदारी न्याय देण्याच्या कामीं अधिक नेटिव लोक नेमल्यामुळें खटल्यांतील पुराव्यांतील सत्य गोष्टींची निवड करण्यास सुलभ पडावें, ह्मणून ही ज्यूरीची पद्धति उपक्रमांत आणणें सरकारास वाजवी दिसतें, असें त्या कायद्यांत नमूद केलें आहे. सन १८६१ सालचें क्रिमिनल प्रोसिजर कोड अस्तित्वांत येईपर्यंत, या कायद्यानें जेथें जेथें ज्यूरीपद्धत सुरू करण्यांत आली, तेथें तेथें तिची अंमलबजावणी फार समाधानकारक व फायदेशीर होत असल्याचें दृष्टोत्पत्तीस येत असे. पण क्रिमिनल प्रोसिजरचा अमल सुरू झाल्यापासून ही स्थिति बदलली. फक्त मद्रास इलाख्यांत कायती **गोदावरी** व **विजगापट्टण एजन्सी ट्राक्टस** खेरीज करून मद्रासेंतील बाकीच्या सर्व सेशन कोर्टांत कांहीं फौजदारी खटल्यांत ज्यूरीचा फायदा मिळत असून, बाकीच्या खटल्यांत २।३ असेसर नेमलेले असतात. परंतु

मद्रास इतकें देखील, विचाऱ्या मुंबई आणि बंगाल या इलाख्यांचें सुदैव नाहीं! या इलाख्यांतील फौजदारी कामाच्या चौकशीची कांहीं निराळीच कहाणी आहे!

प्रथम, मुंबई इलाख्यांत पाहिलें तर ही पद्धत, पुणें, सुरत, कराची, बेळगांव, अमदाबाद आणि ठाणें या सहा जिल्ह्यांतच मुंबई सरकारास सुरू करितां आली. बाकीच्या जिल्ह्यांत, न्यायबजावणीचें काम, कांहीं असेसरांच्या मदतीनें व कांहीं न्यायखात्यांतील अधिकाऱ्यांच्याच मदतीनें कसें तरी रेटण्यांत येतें. सरकारास, या सहा जिल्ह्यांतील लोक ज्यूरर होण्या इतके सुशिक्षित झाले आहेत, असें मोठ्या कष्टानें व विलंबानें कळून आलें. तरी देखील, ज्यूरीच्या पद्धतीचें काम चांगलेंसें चालत नाहीं व त्यापासून इष्ट ते हेतु साध्य होत नाहींत, अशी ओरड करणारे सरकारी अधिकारी कमी होते, असें नाही. परंतु, उलटपक्षीं पाहिलें तर सदर्हु पद्धतीची अमल बजावणी कशी काय चालली आहे, याविषयीं सरकारानें वेळोवेळीं हायकोर्टाच्या जज्जांचे रिपोर्ट मागविले आहेत. त्यांनीं त्यामध्यें आपला अनुकूल अभिप्राय दिला आहे. माजी **चीफ जस्टिस सर चार्लस सार्जंट** यांनीं आपलें मत असें दिलें आहे:—' सदर्हू पद्धतीच्या सध्याच्या अमलबजावणीनें, देशांतील न्यायबजावणीच्या कामास कोणत्याही रीतीचा अपाय घडत नाहीं. तसेंच त्याविषयीं लोकांची जरी थोडी संशयबुद्धि असली, तरी तिला सार्वत्रिक असंतोषाचें स्वरूप मिळण्याइतकी नाहीं." ह्मणून, "या पद्धतीच्या सध्यांच्या अमलबजावणींत कोणी फेरफार करण्याचें योजूं लागल्यास, त्याचा अवश्य निषेध केला पाहिजे." सन १८८९ सालीं, सातारकरांनीं आपल्या जिल्ह्यांत ही पद्धत

सुरू करावी अशी सरकारास विनंति केली होती. पण ती सरकारानें मान्य केली नाहीं, व आणखी लवकरच ती मान्य होण्याचा संभव दिसत नाहीं. वरील सहा जिल्ह्यांखेरीज, इलाख्यांतील इतर जिल्ह्यांसही ही पद्धति (जी कोणत्याही राष्ट्राला अत्यन्त महत्वाची असून, फौजदारी खटल्यांत ती अमलांत आणल्यास कोणताही देश दास्यत्वाला पोंचणार नाहीं व जिच्याशिवाय कोणताही देश स्वतंत्र आहे, असें ह्मणवत नाहीं.) लागू करण्यास कांहीं हरकत होती, किंवा त्यापासून कांहीं नुकसान झालें असतें असें मुळींच नाहीं. पण, अलीकडे, सरकारी अधिकाऱ्यांची अशीच चमत्कारिक वृत्ति झालेली दिसते कीं, ज्या गोष्टी लोक आपल्या हक्काच्या मागत असतील, त्या होतां होईल तों दाबून टाकायाच्या!! शिक्षण व विशेषतः उच्चप्रतीचें शिक्षण (अशा शिक्षणास निवळ बडबड्या किंवा माथेफिरु मंडळीनें मिल्ल, मिल्टन, मेकॉले यांचे गोळीबार ह्मणावें पाहिजे तर) इंग्रेज सरकारच्या ताब्यांतील सर्व भागांत पसरत आहे; व हिंदुस्थानांतील इंग्रेजी राज्याचें मुख्य धोरण, पाश्चिमात्य विचार, आचार व तऱ्हा सर्व लोकांनीं अवगत कराव्या व उत्तम नागरिक व उत्तम राजनिष्ट बनावें ह्मणून सामान्यजनांस शिक्षण देण्याचेंच आहे. सध्याच्या राज्यकर्त्यांच्या अमलाखालीं हिंदुस्थानवासी लोकांची थोडी देखील प्रगति झाली नाहीं असें विधान हिंदुस्थानराज्यपद्धतीचें बदनाम व सरकारची अब्रुहानि करणारें आहे.

**बंगाल्यांतील** हायकोर्ट जज्ज न्या० मू० मि० **बीव्हर्ली** यांनीं तर या संबंधानें असें ह्मटलें आहे:—

फौजदारी खटल्यांत ज्यूरर नेमण्याची पद्धत लोकांस **फौजदारी कायद्याची माहिती करून देण्याच्या कामीं चांगली उपयोगी पडते**; व अर्थात् अशा माहितीचा अधिकाअधिक प्रसार होत गेल्यास गुन्ह्यांचें प्रमाण त्यामानानें कमी होत जाईल, असें मानण्यास हरकत नाहीं. "

आतां, बंगाल इलाख्याविषयीं विचार करूं. त्या इलाख्यांत ज्यूरीपद्धतीकडे लोकांचें बरेंच लक्ष लागलेलें दिसतें. ही पद्धत सन १८६२ त त्या इलाख्यांतील डाका, हुगळी, बर्द्वान, नडिया, मुर्शिदाबाद, पाटणा या जिल्ह्यांत आणि इतर २४ परगण्यांत प्रथम सुरू झाली; व अजूनही, ती फक्त त्या भागांतच चालू आहे. ह्मणजे आज जवळ जवळ ३९।४० वर्षें होत आलीं. इतक्या काळांत, या प्रांतांतील न्यायवजावणीचें काम ज्यूरीपद्धतीच्या मदतीनें बिनबोभाट चाललें आहे. असें असूनही ती पद्धत इतर भागांत अजून कां सुरू करण्यांत येत नाहीं हा मोठा विचारणीय प्रश्न आहे. इतकेंच नव्हे, तर, अगदीं सन १८७४ सालींच, कटक, मिदनापूर, चितागांग आणि इतर तीन जिल्हे हे सदर्हू हक्कास लायक आहेत, अशी कांहीं सरकारी अधिकाऱ्यांनीं शिफारस केली होती. परंतु तो हक्क मिळण्याइतकेंही बिचाऱ्यांचें दैव अजून उघडलें नाहीं! याचें कारण काय असेल तें असो. वर सांगितलेल्या सात जिल्ह्यांत ही पद्धत सुरू झाल्यावर पांच वर्षांनीं, तिचें काम कसें काय चाललें आहे, याविषयीं सरकारानें चौकशी करविली. त्यावेळीं चौकशीचा निकाल त्या पद्धतीस अनुकूलच पडला. त्यानंतर बंगालचे उदारधी प्रसिद्ध लेफ्टनंट–गव्हरनर **सर सेसिल बेडन** यांनीं आपल्या प्रयाणसमयीं, बंगाल्यांतील ज्यूरीविषयीं फार तारीफ केली; व ज्या जिल्ह्यांत ती पद्धत सुरू

नव्हती, त्या जिल्ह्यांत सुरू करण्याविषयीं त्यांनीं हिंदुस्थान सरकारास शिफारसही केली. परंतु, त्या सुमारास त्यांच्या अधिकाराची मुदत बहुतेक पुरी होत आल्यामुळें, त्या प्रकरणाचा शेवट लावण्यास त्यांना सवड मिळाली नाहीं. नाहींतर, त्याच वेळीं, बंगाल्यांतील बाकीच्या ३९ जिल्ह्यांतही ही पद्धत सरसकट सुरू झाली असती. त्यावर, सन १८८१ सालीं प्रसिद्ध उदार महात्मा **लॉर्ड रिपन** यांनीं कोणकोणतीं ठिकाणें सदर्हु हक्कास लायक आहेत याविषयीं चौकशी करविली. परंतु त्यावेळीं, न्या० मू० **सर रोमेशचंद्र मित्र, नॉरिस** आणि **घोस** या त्रयीखेरीज, बाकीच्या सर्व हायकोर्ट जज्जांचें मत इतर प्रांतांस ही पद्धत लागू करण्याइतकी लायकी त्यांच्यांत अजून आली नाहीं, असें पडलें. याच्या अगोदर नुक्तेंच दोन वर्षांपूर्वीं क्रिमिनल प्रोसीजर कोडची दुसऱ्यानें फेरतपासणी होऊन, तो १८८२ चा **जादा** कायदा म्हणून मंजूर करण्यांत आला होता. या दुरुस्तीच्या वेळीं, सदर्हू कोडांतील २६९ व्या कलमांत एक नवीन फेरफार केला. त्या योगानें, कांहीं गुन्हे जूरी नेमण्याच्या लायकींतून कमी करण्याचा अधिकार प्रांतिक सरकारास देण्यांत आला. त्यावेळचे बंगाल्याचे लेफ्टनंट—गव्हर्नर प्रसिद्ध **सर चार्लस इलीयट** हे होते. त्यांना हें कलम केवळ नामशेष रहावें हें बरें वाटलें नाहीं. त्यामुळें, १८९२ च्या आक्टोबरच्या २० व्या तारखेच्या दिवशीं कलकत्त्यांतील लोक उठून पहातात, तों दैनिक पत्रांत एक अद्भुत नवल वर्तमान त्यांच्या दृष्टीस पडलें ! ज्या गुन्ह्यांची चौकशी जवळ जवळ ३० वर्षांपासून ज्यूरीच्या मदतीनें चालत आली होती, अशा कांहीं गुन्ह्यांसंबंधानें ज्यूरीचा हक्क काढून घेण्याचा सरकारचा—

अर्थात गैरवाजवी व नुकसानकारक–विचार असल्याचें त्यांत जाहीर केलें होतें. अर्थात, अशा तऱ्हेची आपल्या हक्कांची पिछेहाट झालेली पाहून, लोकांत एकच चळवळ व अस्वस्थता उडून गेली; आणि सर्वांनीं मिळून सदहू कृतीविरुद्ध दाद मागण्याविषयीं खूप ओरड केली. या ओरडीचा इंग्लंडांतील स्वतंत्र व वजनदार पत्रांवर बराच परिणाम झाला; व त्यांनींही "या कृतीनें बंगाल्यांतील कांहीं शिरजोर व गर्विष्ट अधिकारी मंडळाचा एकंदर मानवी स्वातंत्र्यावर अघोर घाला घालण्याचा विचार आहे," असें आपलें जोरदार मत दिलें. **ग्रेट ब्रिटनच्या** पार्लमेंटानेंही आपल्या पूर्वापार गाजत आलेल्या पवित्र ब्रीदास जागून, या प्रकरणाविषयीं नीट चौकशी करण्याविषयीं फर्मावून, त्या कामाकरितां **'ज्यूरी कमिशन'** नेमिलें. या चौकशीचा परिणाम असा झाला कीं, प्रसिद्ध केल्यापासून १९४ दिवसांच्या आंतच, बंगाल सरकारास आपला तो अन्यायी व लांछनास्पद जाहीरनामा रद्द करावा लागला, आणि पूर्ववत् व्यवस्था सुरू झाली !! त्यावर, अजून देखील जरी कांहीं परपुष्ट ॲंग्लो–इंडियन पत्रकारांची या पद्धतीविरुद्ध मधूनमधून टुरटुर चालू आहे, तरी त्याचा कांहीं एक परिणाम न होतां, ती पद्धत पूर्वीप्रमाणेंच बिनधोक व सुरळीतपणें चालू आहे.

पंजाबामध्यें ही पद्धत बऱ्याच सढळ हातानें सुरू केलेली आहे. पण, पुन्हां **वायव्य प्रांत** आणि **अयोध्या** यांमध्यें तशी स्थिति नाहीं. त्या प्रांतांपैकीं, अलाहाबाद, बनारस आणि लखनौ इतक्याच ठिकाणीं ती चालू आहे. मध्यप्रांतांत मात्र, ही पद्धत नागपूर, जबलपूर, सागर, रायपूर आणि हुशंगाबाद या जिल्ह्यांत प्रचलित असून, स्वातंत्र्य रक्षणाच्या

कामीं होत असलेल्या तिच्या बिनमोल कामगिरीचीं फळें तेथें चांगलीं दृष्टोत्पत्तीस येत आहेत. सरसकट ज्यूरीपद्धतीच्या हक्काचा लाभ अनुभविणारा असा एक भाग्यशाली प्रांत ह्मणजे **आसाम** होय.

नामांकित कायदे पंडित, बहुश्रुत वजनदार गृहस्थ, व उच्चप्रतीचे सरकारी अधिकारी व प्रसंग विशेषीं खुद्द राज्यकर्ते सुद्धां–यांचीं जीं वेळोंवेळीं या पद्धतीच्या युक्तायुक्ततेसंबंधानें अनेक अनुकूल प्रतिकूल मतें प्रसिद्ध झालीं आहेत, त्यांची जर आपण काळजीपूर्वक तुलना केली, तर, संख्येच्या व अंतर्महत्त्वाच्या दृष्टीनें, या पद्धतीस अनुकूल असणारीं मतें प्रतिकूल मतांपेक्षां खात्रीनें किती तरी जास्त व अधिक योग्यतेचीं निघतील! हिंदुस्थानच्या राज्यकारभारांचीं सूत्रें जर नेहमींच मिंटो, मनरो, मेयो, कार्नवालिस, क्यानिंग, रिपन, रे अशा सारख्या उदार महात्म्यांच्या हातीं रहातील, तर राजद्रोहाविषयीं किंवा राजकीय उलाढालीविषयीं तक्रारीचा चकार शब्दही कधीं ऐकूं येणार नाहीं. सरकारी अधिकाऱ्यांच्या जातीजातींत पंक्तिप्रपंच करण्याच्या प्रवृत्तीस, व त्यांच्या बेपर्वाईच्या उद्दाम वर्तनास, प्रजाजनांची सुशिक्षितता व राजकीय उन्नति यांनीं चांगलाच वचक बसेल. खुद्द ज्यूरीपद्धत देखील पक्षपातीपणा व बेपर्वाई यांच्या संसर्गापासून मुक्त नाहीं, हेंही येथें मीं नुसतें सांगून ठेवतों. याविषयीं सविस्तर विचार आपल्याला पुढें करावयाचाच आहे.

ज्या जिल्ह्यांत ज्यूरीपद्धत रूढ नाहीं, त्या ठिकाणीं दुसरी एक पद्धत कायद्यानें मान्य केलेली आहे. ही पद्धत ह्मणजे **असेसरां**च्या मदतीनें चौकशी करणें होय. अर्थात हिचेंही मूळ बीज पंचायतीच्या संस्थेंतच आहे. तेव्हां ज्यूरीपद्धतीची

ही धाकटी बहीण आहे, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. सदहू पद्धतींतील मुख्य तत्त्व हें आहे कीं, दोषारोप ठेवलेल्या गुन्ह्याचें व त्यापासून होणाऱ्या परिणामांचें स्वरूप भयंकर आहे असें ज्या ठिकाणीं वाटेल, त्या ठिकाणीं आरोपीस "खुल्या चौकशीचा" फायदा द्यावयाचा. ह्मणजे, कांहीं ठरीव दिवसांत असल्या खटल्यांची चौकशी करावयाची, व त्यास 'सेशन' असें ह्मणावयाचें. ह्या वेळीं, तें कोर्ट ज्या टापूंत असेल, त्या टापूंतील निरनिराळ्या जातींतील सुशिक्षित व पुढारी लोक असतील त्यांच्यापैकीं कांहींची सोडतीनें निवड करून, त्यांस सेशन जज्जानें, चौकशीच्या वेळीं आपल्या मदतीस घ्यावयाचें. अशा तऱ्हेचें सेशन बहुतेक ठिकाणीं दर महिन्यास मोठ्या गंभीरपणानें व बडेजावानें भरविण्यांत येतें. व त्या ठिकाणीं **असेसरां**च्या मदतीनें चौकशी होण्यासारख्या गुन्ह्यांचा आरोप असलेल्या लोकांची चौकशी होते. ज्यूरी पद्धतींत जितक्या काळजीनें व जशा प्रकारचे लोक निवडण्यांत येतात, अशाच तऱ्हेचा नमुना **असेसरां**च्या निवडणुकीचा असतो. त्याचप्रमाणें काम चालविण्याची पद्धत ही ज्यूरीपद्धती सारखीच असते. पण दोहोंमध्यें महत्त्वाचा फरक ह्मटला ह्मणजे हा कीं, **असेसरां**नीं आपला अभिप्राय दिल्यावर जज्जाचा कल जर दुसऱ्या बाजूकडे असेल, तर **असेसरां**चें मत गुंडाळून ठेऊन, त्यास आपल्या कलाप्रमाणें चालतां येतें. असेसरांचा अभिप्राय त्यानें मान्य केलाच पाहिजे, अशी त्यावर सक्ति नाहीं. "सभ्य गृहस्थहो, आपण घेतलेल्या तसदी त्रासाबद्दल आपले आभार आहेत. परंतु आपला अभिप्राय चुकीचा आहे. तेव्हां आपल्या अभिप्रायास गुंडाळून ठेवून आपल्या शहाणपणाचा अपमान करण्याचा कायद्यानें

मला जो हक्क दिला आहे, त्याच्या जोरावर मीच या खट-ल्याचा शेवट लावीन. आतां आपण यावें." अशा रीतीनें त्यानें असेसरांची संभावना केली तरी चालण्यासारखें असतें. जज्ज त्याला वाटेल त्याप्रमाणें निकाल सांगतो, कीं खटल्याचें काम आटोपलें! खरोखर, अशा रीतीनें न्याय करण्याची पद्धत फारच उपहासास्पद व शोचनीय आहे! किंबहुना, 'खुल्या चौकशी'च्या नांवाखालीं, न्यायपद्धतीचें तें एक घातुक ढोंग माजलें आहे, असें ह्मटल्यास चालेल. तेव्हां त्याच्यांत जितकी लवकर सुधारणा होईल तितकी बरी.

हल्लींच्या कायद्याप्रमाणें, सेशनजज्ज व ज्यूरी यांचीं मतें भिन्न पडल्यास, तो खटला हायकोर्टाकडे निकालाकरितां जातो, व तेथील अपील ऐकणारा जज्ज ज्यूरीच्या मताचा नीट विचार करून त्या खटल्याचा निकाल सांगतो. हाच नियम, असेसरांच्या मदतीनें चौकशी होणाऱ्या खटल्यांतही लागू कां करूं नये, तें समजत नाहीं. आमच्या सेशनजज्जां-च्या ज्ञानाच्या व अनुभवाच्या 'तत्त्वमसी' कडे नजर दिली ह्मणजे, त्यांच्या अधिकारास कांहीं तरी बाह्य नियन्त्रण असणें अवश्य आहे; वाटेल तसें स्वेच्छ, एककल्ली व शिरजोर वर्तन करण्याची त्यास मुभा ठेवून उपयोगाचें नाहीं, असें आपल्यास दिसून येईल. हें आह्मींच ह्मणतों असें नाहीं. हायकोर्ट जज्जां-सारख्या वजनदार गृहस्थांनीं पुढल्यासारखे उद्गार काढले असतांही, त्यांचें सरकाराकडून कधीं खंडन झालेलें नाहीं. यावरून खुद्द हिंदुस्थान सरकारास देखील, आपल्या हाताखा-लील अरेरावी, गर्विष्ठ अधिकाऱ्यांचा लहरीपणा व अवगुण पूर्णपणें ठाऊक असला पाहिजे. पण निरुपायानें त्यास त्या बा-

बतींत मौन धरणें भाग पडत आहे, असें अनुमान साहजिकच निघतें.

वर सांगितलेले हायकोर्ट जज्जांचे कांहीं उद्गार खालीं देतों:—

मुंबईचे माजी हायकोर्ट जज्ज सर जॉन जार्डिन:—*

" मुंबई सरकारनें ज्यूरी पद्धतीवर टीका करितांना, असें स्पष्ट ह्मटलें आहे कीं, सेशन जज्जांना ज्यूरीची चांगलीशी माहिती नसते; व तिला खटला नीट समजाऊन देण्याची हतोटी पुष्कळांस साधत नाहीं. "

दुसऱ्या एका ( मद्रासेकडील ) + न्यायमूर्तींचा असा अभिप्राय आहे:—

" ज्या बाबतींसंबंधानें ज्यूरीचा अभिप्राय सेशन जज्ज स्वतः विषयींच्या फाजील घमेंडीनें मान्य करीत नाहींत, अशा बहुतेक बाबतींत ज्यूरीचाच अभिप्राय बहुधा योग्य असतो, असें आढळून येतें.

अशाच प्रकारचे गौरवाचे उद्गार, बंगाल्यांतील कटकचे सेशनजज्ज मि० **बूगन** यांनीं **असेसरां**विषयीं ( १८८४ त ) काढले आहेत. ते ह्मणतात:—

---

* सदर्हु उतारा, सर जॉन जार्डिन यांनीं ' ज्यूरी पद्धतीचा प्रश्न ' यावर इंग्लंडांतील ईस्ट इंडियन असोसिएशन नामक सभेपुढें ( १८९३ त ) एक निबंध वाचला होता त्यांतला आहे.

\+ मि० बेनसन, सध्यां मद्रासहायकोर्टांतील एक जज्ज; व माजी अर्काटचे सेशनजज्ज. सदरहू अभिप्राय १८९० सालीं, ज्यूरीपद्धतीच्या अमलबजावणीविषयीं जी सर्वसाधारण चौकशी झाली, त्यावेळीं

"मला साधारणतः असें आढळून आलें आहे कीं, बहुतेक असेसरांना त्यांच्यापुढें चालू असलेल्या खटल्याचें स्वरूप व मर्म चांगलें कळतें. व त्यांना त्या खटल्यांत स्वतःच्या अभिप्रायाचें महत्व व उपयुक्तता जितक्या स्पष्ट रीतीनें निदर्शनास आणून देतां येईल, तितकी आणून देण्याचा माझा नेहमीं प्रयत्न असतो; आणि माझ्या असेंही पण प्रत्ययास आलें आहे कीं, ज्या कित्येक खटल्यांत त्यांचा आरोपीला सोडून देण्याकडे कल दिसला, आणि मी त्यांच्या कलाविरुद्ध निकाल दिला, असे खटले हायकोर्टांत अपिलाकरितां गेले असतां, असेसरांच्याच मताचा हायकोर्टानें स्वीकार केलेला आहे."

इतकेंच नव्हे तर ही गोष्ट बहुतेक निर्विवाद ठरल्यासारखीच झाली आहे कीं, सेशनजज्ज व ज्यूरी यांच्या मतभेदामुळें जे खटले हायकोर्टाकडे क्रि० प्रो०च्या ३०७ व्या कलमावरून ( हें कलम ७२ च्या पाहिल्या दुरुस्तीचे वेळीं सामील करण्यांत आलें ) निवाड्याकरितां जातात, त्यांतील बहुतेकांत ज्यूरीचाच अभिप्राय हायकोर्टाकडून ग्राह्य ठरविला जातो. असो.

असेसरांच्या मदतीनें चौकशी करण्याच्या पद्धतीचा जर खरा उपयोग व्हावा असा सरकारचा हेतु असेल, तर त्यांच्या मताला मान मिळण्याविषयीं त्यांनीं अगोदर तजवीज केली पाहिजे. सध्यांची पद्धत ह्मणजे एखाद्या माणसाला असेसर ह्मणून बोलवावयाचें, त्याला त्याचा स्वतंत्र अभिप्राय देण्यास कायद्यानें भाग पाडावयाचें, आणि शेवटीं त्याच्या मताचा धिक्कार करावयाचा ! हा, कायदेशीर व संभावितपणानें एखाद्याचा अपमान करण्याचाच मार्ग ह्मणावयाचा. यापेक्षां सध्यांची पद्धत मुळींच बंद पाडली तर फार बरें होईल ! कारण ह्या पद्धतीमुळें लोकांच्या डोळ्यांत धूळ टाकली जात आहे ! जो हक्क देण्यास सरकार वस्तुतः नाखुष आहे, त्याचे हक्काचा

आपण या पद्धतीनें उपभोग घेत आहों, अशी सुखकारक भुरळ सरकारानें त्यांच्या डोळ्यांवर पसरली आहे. आतां खुद्द सरकारचे ह्मणून जे खटले उपस्थित होतात, त्यांत ही पद्धत तर केवळ हास्यास्पद व अप्रयोजक दिसते. कारण त्या ठिकाणीं सरकारच पक्षकार असल्यामुळें, असेसरांचें मत घेणें ह्मणजे केवळ थट्टा करण्यासारखें असतें ! ज्यूरीपद्धतीसंबंधानें पाहिलें तरी, क्रि० प्रो० मधील ३०७ वें कलम हें तिला जरा गौणत्व आणणारें आहे. कारण मतविरोधाचा प्रश्न आला असतां, खटल्याचा ज्यूरीच्याच मताप्रमाणें निकाल करण्या ऐवजीं तो निकालाकरितां हायकोर्टाकडे पाठविणें हें तत्त्वच मुळीं सदर्हू संस्थेस अपायकारक व कमजोर करणारें आहे. फौजदारी खटल्यांत बरोबर न्याय करण्याचें काम जगांतील सगळ्याच राष्ट्रांना फार कठीण व दुर्घट वाटत आहे. " दहा अपराधी सुटले तरी हरकत नाहीं, पण एकाही निरपराधी माणसाला शिक्षा होऊं नये " हें जें कायद्याचें सर्वत्र संमत तत्त्व रूढ झालें आहे, त्यावरून वरील अडचणीची चांगली कल्पना होते. त्यांत आमच्या हिंदुस्थान संबंधानें आणखी एक विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. ती ह्मटली ह्मणजे जीवनसामुग्रीची क्षुद्रता व ( सामान्यतः ) पापभीरुत्वाचा शोचनीय अभाव ही होय. आमच्या देशांत फारच थोड्या खर्चीत निर्वाह होत असल्यामुळें, दहा पांच रुपयांसारख्या क्षुल्लक रकमेकरितां, दारिद्र्यानें जर्जर झालेल्या मनुष्याच्या हातून कधीं कधीं घोर खूनही होतात* ! हिंदुस्थानांतील कोर्टांचे जे

* उलट जगांतील सुधारलेल्या देशांपेक्षांही हिंदुस्थानांत गुन्ह्यांचें प्रमाण कमी आहे. वरील विधान अगदीं कनिष्ट प्रतीच्या लोकांसंबंधानेंच फक्त लागू आहे. तेव्हां त्यावरून हिंदुस्थान गुन्ह्यांचें अगदीं माहेरघर

रिपोर्ट प्रसिद्ध होतात ते वाचले असतां, किंवा गुन्हे शोधून काढण्याकरितां पोलीसाकडून जे अनन्वित प्रकार होत असतात ते लक्षांत घेतले असतां, वरील ह्मणण्याची सत्यता तर चांगली दृष्टोत्पत्तीस येईल. पोलीसच्या लांचखाऊ, जुलमी आणि क्रूर वर्तनावर सेशन्स जज्जांकडून नेहमीं कशी खरमरीत टीका करण्यांत येत असते, हें सगळ्यांना ठाऊकच आहे. तथापि, त्या खात्यांत सुधारणा करण्याचें काम, सरकार घ्यावयास पाहिजे तितकें मनावर घेत नाहीं, ही मोठी शोचनीय गोष्ट आहे!

तेव्हां, पोलिसानें आणलेला पुरावा विश्वसनीय मानण्यापूर्वी, ज्यूरीनें त्याच्या युक्तायुक्ततेविषयीं अगदीं बारकाईनें चिकित्सा करणें, व जज्जानें तिच्या मतास वजन देणें, हें न्यायाच्या दृष्टीनें अत्यंत इष्ट व आवश्यक आहे. बंगाल्यांत पूर्वी **सर रिव्हर्स टॉमसन** ह्मणून एक बडे अमलदार होऊन गेले. त्यांना सेशन्स जज्ज या नात्यानें जो अनुभव आला, त्यावरून त्यांनीं वरच्याच सारखा आपला अभिप्राय नमूद केला आहे. पुरावा निर्माण करण्याच्या कामीं पोलीसची अलौकिक चतुराई व शिताफी सर्वप्रसिद्धच आहे. वरिष्ठ कोर्टाचे कोणत्याही वर्षाचे रिपोर्ट घ्या, त्या प्रत्येकांत, पोलिसनें एखादा गुन्हा उपस्थित करून, त्याच्या शाबितीकरितां वाटेल तसा (अर्थात खोटा) पुरावा उठविल्याबद्दलचा व त्यावर वरिष्ठ कोर्टानें झणझणीत टीका केलेला असा एक तरी खटला सांपडतोच *

असें अनुमान कोणीं काढूं नये. युरोपांतील निरनिराळ्या देशांत तुरुंगांत असणाऱ्या लोकांचें प्रमाण पुढील आकड्यांवरून दिसून येईल. तेथें दर लक्षास ९०, फ्रान्सांत १५८, इटलींत २३०, युनायटेडस्टेट्समध्यें १२०, जपानांत १६० आणि हिंदुस्थानांत फक्त **अडतीस** !!

* अशाच तऱ्हेचा ठाणें जिल्ह्यांतील एक खटला मुंबई हाय

दुसरी गोष्ट ह्मणजे खुद्द सेशन्स जज्ज यांचीच! यांच्या नेमणूका करण्याची कांहीं विलक्षणच तऱ्हा आहे. सरकार ज्यांना सेशन्स जज्ज नेमतें, ते लोक बहुधा **सिव्हिल सर्व्हिसम-** धले असल्यामुळें, वकीली करून मिळणारें कायद्याचें अनुभविक ज्ञान त्यांस नसतें. शिवाय आज मुंबई इलाख्यांतील मराठी, दक्षिणी लोकांबरोबर सहवास, तर १।२ वर्षांनीं कराची हैद्राबादेकडील सिंधी लोकांबरोबर सहवास, अशी त्यांची सदा त्रिस्थळी यात्रा चाललेली असते. त्यामुळें एखाद्या प्रांतांतील स्थानिक रीतींचें, व आचाराविचारांचें पूर्ण ज्ञान होण्यास त्यांस अवकाशच मिळत नाहीं.

कायद्याच्या ज्ञानाची व स्थानिक परिस्थितीच्या ज्ञानाची गोष्ट क्षणभर बाजूला ठेविली, तरी वयमानानें येणारा अनुभव व व्यावहारिक ज्ञान त्यांना असतें काय? मुळींच नाहीं. २०-२२ वर्षांचे अननुभाविक तरणे बांड, एकदम वैभवशाली व दैदीप्य **सिव्हिल सर्व्हिस** मालिकेंतील नक्षत्रें ह्मणून चमकत चमकत येतात, आणि हजारों दीन मुक्या प्रजाजनांच्या नशीबाचे हवालदार होऊन बसतात!! आपल्यास ती उच्च पदवी प्राप्त करून देणाऱ्या स्वतःच्या ज्ञानाबद्दलच्या घमेंडी-शिवाय व प्राप्त झालेल्या वैभवाच्या उद्दाम अभिमानाखेरीज लोकांच्या रीतीभाती, जातिवर्णाचा आचार विचार वगैरे कशा-चीही त्यांना दाद नसते! हेच विद्वान् पुढें सेशन्स जज्ज बनणार! आणि याच गृहस्थांना स्थानिक ज्यूरीच्या मताला

कोर्टाकडे कांहीं वर्षांपूर्वीं आला होता. त्यामध्यें ज्याचा खून झाला असें ह्मटलें होतें, त्याच्या आस्थि ह्मणून जीं हाडें पोलिसाकडून पुराव्यांत दाखल करण्यांत आलीं होतीं, तीं खरोखर मगरीचीं हाडें होतीं असें बाहेर आलें!!

प्रसंगविशेषीं गुंडाळून ठेवण्याचा व आपल्या मताप्रमाणें निकाल देण्याचा सरकारानें अधिकार दिला आहे!

राजद्रोह, बदमाषगिरी, खून, खोटे दस्तऐवज, सह्या बनविणें, विश्वासघात, खोटी शपथ, बळजबरी, जुलूम, धमकावणी, गैरवर्तणूक वगैरे सर्व अपराधांची चौकशी फक्त इलाख्यांतील मुख्य शहरीं, ज्यूरीच्या साहाय्यानें चालविण्याचा अधिकार दिला आहे. परंतु इतर ठिकाणीं ज्यूरीच्या मदतीनें चौकशी होणाऱ्या गुन्ह्यांची संख्या मर्यादित आहे; आणि कोणते खटले ज्यूरीच्या मदतीनें चालविण्यास लायक आहेत, हें वेळोवेळीं ठरविण्याचा अधिकारही सरकारानें आपल्याकडेच ठेविला आहे. [या संबंधानें येथें एक सूचना करावीशी वाटते. ती ही कीं, ज्याप्रमाणें 'समरीज्यूरीसुडिक्शन ॲक्टा' खालीं, विशेष गंभीर खटल्यांत युरोपियन आरोपितास सजातीयांची बनविलेली ज्यूरी मागण्याचा हक्क आहे, तशाच तऱ्हेचा हक्क एतद्देशीयांस देणारें एखादें कलम 'पीनलकोड' मध्यें घालण्यांत यावें.] परंतु, हे गुन्हे अशा प्रकारचे असतात कीं, आरोपित आणि गुन्हा घडल्या वेळची परिस्थिति यांचें नीट ज्ञान असलें तरच सत्यनिर्णय होऊन योग्य निकाल सांगता येतो. अर्थात हें काम चांगलें बजावण्यास सर्वथा लायक म्हणजे फक्त स्थानिक ज्यूरीच होय.

परंतु ज्यूरीविरुद्ध असा एक आक्षेप येतो कीं, हिंदुस्थानांतील साधारण दर्जाचा माणूस घेतला तरी, त्यावर शिक्षणादिकाचा व विचारप्रागल्भ्याचा संस्कार झालेला नसतो; आणि त्याच्या ठिकाणीं बरेंच अज्ञान असतें. शिवाय त्याच्या अंगीं एक प्रकारचा भितरेपणा वास करीत असतो; व त्याचें मत कांहीं ठरीव धार्मिक आणि सामाजिक

दृढ कल्पनांनीं कायमचें कलुषित झालें असल्यामुळें, एखाद्या खटल्यांत साधक बाधक गोष्टींचा नीट विचार करून आपलें निःपक्षपाती व सयुक्तिक मत बनविण्यास तो सर्वथा अपात्र असतो. हा आक्षेप कितपत यथार्थ आहे तें पाहूं.

याच्या खंडनार्थ एकच गोष्ट सांगितली ह्मणजे पुरें आहे. ज्यूरीसंबंधानें ज्या लोकांवर एकदां अज्ञानाचा व अपात्रतेचा आरोप करण्यांत येतो, त्याच लोकांविषयीं वरचेच आक्षेपक इतर वेळीं त्यांची राजकीय बाबतींत फार प्रगति झाली आहे, आणि एतद्देशीयांत उच्च प्रतीच्या शिक्षणाचा प्रसार अधिकाधिक झपाट्यानें होत आहे, वगैरे मुद्यांनीं गौरव करीत असतात. हें ध्यानांत ठेविलें ह्मणजे वरचा आक्षेप किती स्वार्थी व पोकळ आहे, तें दिसून येईल.

खुनाच्या खटल्यांत एतद्देशीय लोक आरोपीविषयीं वाजवी पेक्षां फाजील दयार्द्रबुद्धि दाखवितात, असा दुसरा एक आक्षेप सध्यांच्या पद्धतीविरुद्ध येत असतो; याचाही विचार करूं. देहान्त शिक्षा द्यावी कीं नाहीं, व ती कोणत्या प्रकारच्या अपराधशाबितीस द्यावी, हा एक मोठा वादग्रस्त प्रश्न आहे; आणि जोंपर्यंत जगांत भूतदया वसत आहे, तोंपर्यंत तो तसाच रहाणार. इतकेंच नव्हे तर, खुनाच्या खटल्यांत सेशन्स जज्जानें आरोपीस फांशीची शिक्षा दिलीच पाहिजे असें नाहीं. वाटलें तर त्यानें योग्य कारणें दाखवून त्यास जन्मटेपेचीही शिक्षा द्यावी, असें खुद्द हिंदुस्थान सरकारानेंच कायद्यांत कलम घालून ठेविलें आहे. फांशीचीच शिक्षा देणें असेल तर, त्या खटल्याची हायकोर्टांतील दोन अपील जज्जांनीं नीट चौकशी केल्याशिवाय ती कधींही अगोदर अमलांत यावयाची नाहीं, असेंही त्यांनीं ठरवून

टाकिलें आहे. सारांश, देहान्त शिक्षा अमलांत येण्यास, सरकारानें देखील इतकी मर्यादा व सावधगिरी राखली आहे. ( आणि गर्भित रीतीनें आपली भूतदयाशील वृत्ति व्यक्त केली आहे. ) तर मग देहान्त शिक्षेच्या क्रूरपणाबद्दल जन्मतःच ज्यांचे धार्मिक ग्रह दृढ झाले आहेत, अशा आमच्या इंडियन ज्यूरीनें कधीं कधीं डळमळीत अभिप्राय दिल्यास व आरोपीवर दया करण्याची शिफारस केल्यास, त्यांत कांहीं गर्हणीय किंवा असाहजिक आहे असें कोणीही समंजस मनुष्य ह्मणणार नाहीं.

ज्यूरीपद्धतीच्या योगानें नीट न्याय होत नाहीं ह्मणून सरकारी अधिकाऱ्यांची नेहमीं ओरड असते. परंतु, असें होण्याचें खरें कारण काय, हें मात्र त्यांनीं कधीं स्पष्ट केलेलें नाहीं. बरें, सध्याच्या पद्धतींत कोणत्या धोरणावर सुधारणा करणें इष्ट आहे, त्याविषयींही त्यांचेकडून सूचना येत नाहींत. फक्त, " ही पद्धत अजीबात नाहींशीं करून टाका " हीच कायती यांची जोराची हाकाटी चालू असते. सारांश, स्वातंत्र्याच्या आगरांत वाढलेल्या व जात्या अस्सल इंग्रज असणाऱ्या अधिकाऱ्यांची, हिंदुस्थानचें हवापाण्याचें व अधिकारवैभवाचें वारें लागल्याबरोबर कशी दृष्टि फिरून जाते, यांचें हें उत्तम प्रत्यंतर आहे. तथापि ही स्थिति फार दिवस न रहातां, त्यांना स्वतःच्या आकुंचित दृष्टीची व अविचारीपणाची लवकरच साक्ष पटेल; व ज्या मनाच्या समतेबद्दल ब्रिटिश लोकांची यथार्थ ख्याति आहे, ती मनाची उदारता पूर्ववत् येथें दृष्टोत्पत्तीस येऊं लागेल, अशी फार आशा वाटते.

सन १८९० सालीं या पद्धतीच्या अमलबजावणीविषयीं हिंदुस्थान सरकारानें सर्व साधारण चौकशी करविली होती, हें मागें एके ठिकाणीं सांगितलेंच आहे. त्यावेळीं बहुतेक हायकोर्टांचें मत तीस अनुकूल असेंच पडलें. त्या अभिप्रायांत अनेक विचारणीय मुद्दे पुढें आले; व त्यावरून इतकें निर्विवाद सिद्ध झालें कीं, ज्यूरीपद्धतीच्या वाढीस हिंदुस्थानची भूमि चांगली मानवण्यासारखी आहे. यासंबंधानें, मुंबई हायकोर्टाचे माजी सुप्रसिद्ध चीफ जस्टिस **सर चार्लस फॅरन** यांचा अभिप्राय येथें नमूद करितों.

"ज्यूरी आणि जज्ज यांचें काम सुरळीतपणें चालून (आणि तें बहुधा तसेंच चालतें.) जज्ज जर पुराव्याची नीट मीमांसा करून, ज्यूरींपुढें दोन्ही पक्षांचें ह्मणणें समतेनें व व्यवस्थितपणें मांडील, तर त्या प्रकरणीं ज्यूरीचा अभिप्राय प्रसंगविशेषीं जज्जापेक्षां अधिक योग्य असण्याचा संभव आहे. अर्थात, जज्जास असलेल्या कायद्याच्या ज्ञानानें व तर्कशास्त्रानें कुशाग्र झालेल्या विचारशक्तीच्या साहाय्यानें तो त्या खटल्याचा विचार करील. परंतु त्याविषयीं खरा अभिप्राय बनविण्याचें यथायोग्य साधन ह्मणजे, जें एतद्देशीयांच्या परिस्थितीचें त्यांच्या आचारांविचारांचें पूर्ण ज्ञान असणें, त्यांच्यांशीं तादात्म्य पावून त्यांचें मर्म जाणणें, हें त्यांस बिलकुल अनुकूल नसतें. ह्मणून या कामीं जज्जांपेक्षां ज्यूरीच्या अभिप्रायाची योग्यता अधिक असते. त्यांना स्वतःच्या देशबांधवांच्या आचाराविचारांची, आजुबाजूच्या सर्व गोष्टींची पूर्ण माहिती असल्यामुळें, आरोपीची व येणाऱ्या साक्षीदारांची खरी स्थिति ताडण्यास व खरें मत बनविण्यास तेच अधिक लायक असतात."

अशा तऱ्हेचा निस्पृह व उदार अभिप्राय देणाऱ्या महात्म्यास विदेशीं आलेल्या अकालिक मरणामुळें, सर्व एतद्देशीयांस अत्यंत दुःख व्हावें हें अगदीं साहजिक आहे.

वर सांगितलेली स्थिति फक्त एतद्देशीय लोकांसंबंधानें आहे. या देशांत जन्मणाऱ्या व कायमची वस्ती करून रहाणाऱ्या गोऱ्या ब्रिटिश प्रजेची स्थिति तशी नाहीं. क्रिमिनल प्रोसिजरांतील अनेक निरनिराळया कलमांनीं त्यांचे असे कांहीं स्वतंत्र हक्क ठरवून टाकिले आहेत, व त्यांचा त्यांना उपभोग घेतां यावा, याविषयीं सरकार दक्षही असतें. अर्थात हे हक्क गैरवाजवी आहेत, किंवा त्यांस इतकें महत्व देणें योग्य नाहीं, असें कोणाही हिंदी माणसाच्या स्वप्नीं देखील यावयाचें नाहीं.

कारण, जो कायदा केवळ या देशाच्या विशेष परिस्थितीला धरून बनविण्यांत आला आहे, तोच कायदा भिन्नपारिस्थितीला धरून येणाऱ्या गोऱ्या आरोपितांस लागू केल्यास त्यांना तोटा सोसावा लागेल, हें कोणीही कबूल करील. हा उद्देश मनांत घेऊन राज्यकर्त्यांच्या जातीचा गुन्हेगार असल्यास, त्याची चौकशी चालण्यासंबंधानें त्यांनीं कांहीं विशेष नियम ठरविले आहेत. त्यांपैकीं क्रि० प्रो० मधील ४५१ कलम हें आहे. त्यामध्यें असें नमूद केलें आहे कीं, आरोपित ब्रिटिश प्रजेपैकीं असून युरोपियन असल्यास स्वतः-ची चौकशी देशी गृहस्थांच्या ज्यूरी मार्फत न होतां, समाज-धर्मपंथीयांकडून किंवा निदान सवर्ण सजातीयांकडून व्हावी असें मागणें करण्याचा त्यास पूर्ण हक्क आहे; आणि ज्या ठिकाणीं असें बनण्यासारखें नसेल तेव्हां अनुकूल ठिकाणीं आपला खटला बदलून घेण्याचाही त्यास हक्क दिला आहे. याविषयीं तत्त्वतः तरी कोणास तक्रार करितां येणार नाहीं. कारण, ज्यूरींची पद्धत ही मूळ इंग्लंडांतील संस्था होय. तेव्हां हिंदु-स्थानसारख्या अठरापगड जातींच्या व अनेक भाषांच्या

देशांत ब्रिटिश माणसांच्या जान मालाची सुरक्षितता रहाण्या-साठीं, त्याच्यावर एखादी तोहमत आली असतां, त्याला निःप-क्षपाती योग्य व सजातीय ज्यूरी मार्फत न्याय मिळणें हें अगदीं अवश्य आहे. ज्या कायद्यानें एखाद्या आरोपितास 'खुल्या चौकशी'चा (अर्थात सजातीयांकडून) हक्क दिला आहे, त्या कायद्यास कोणीही नांवें ठेवणार नाहीं. या दृष्टीनें वरील कलमाचा उद्देश स्तुत्य आहे, यांत शंका नाहीं. याच प्रकारचें दुसरें कलम २७९ वें होय. यामध्यें असें सांगितलें आहे कीं, आरोपित युरोपियन किंवा अमेरिकन नसेल, आणि त्याची इच्छा जर ज्यूरींतील अर्धे अधिक लोक युरोपियन अथवा अमेरिकन नाहींत असे असावेत अशी असेल, तर सेशन कोर्टांत त्यास तशी ज्यूरी मिळाली पाहिजे. हें कलम अविचारी मतास किंवा पक्षपाती अभिप्रायास चांगला आळा घालणारें आहे; हें सर्व खरें. परंतु दुःखाची गोष्ट ही कीं, ४९१ हें कलम जसें सर्व प्रकारच्या ज्यूरीमार्फत चालणाऱ्या खट-ल्यांस लागू करण्यांत येतें; तसें २७९ वें कलम मात्र कांहीं विशेष खटल्यांशिवाय अमलांत येत नाहीं! वस्तुतः पाहिलें तर ज्या तत्त्वावर पहिल्या कलमांतील सवलत सरसकट देण्यांत आली आहे, तेंच तत्व दुसऱ्या कलमासंबंधानें सर्वथैव लागू पडतें. उलट सर्व काम परकीय भाषेंत चालत असल्यामुळें, २७९ व्या कलमांतील सवलत युरोपियन खेरीज इतर वर्णाच्याही लोकांस— ह्मणजे आह्मां एतद्देशीयांस—देणें फार आगत्याचें व इष्ट आहे. निदान, राजकीय खटल्यांत तरी ही सवलत देणें अत्यंत आवश्यक व न्याय्य आहे. कारण, अशा खटल्यां-त, राज्यकर्त्यांच्या उच्च इभ्रतीची व त्यांच्या धवलकीर्तीची किंमत होण्याचा संभव असतो. ह्मणून, जेणेंकरून ज्युरीमध्यें

सरकारतर्फेच्या माणसांची भरती न होतां ती जितकी समतोल निःपक्षपाती व आरोपिताची ( ह्मणजे त्याच्या सजातीयांची ) स्थिति समजून घेण्यास लायक बनवेल तितकी बनविण्याची सरकारानें फार दक्षता ठेविली पाहिजे. अर्थात आरोपित युरोपियन नसतांना, ज्या ज्यूरींतील अर्धे अधिक लोक युरोपियन आहेत, अशी ज्यूरी त्या आरोपीची खरी स्थिति समजून घेण्यास व त्याच्याविषयीं आपला अभिप्राय बनविण्यास लायक आहे असें मानणें अगदीं चुकीचें व वेडगळपणाचें आहे. विशेषतः राजकीय धामधुमीच्या व वर्णावर्णांतील वैमनस्याच्या काळीं, अशा ज्यूरी बनविणें ब्रिटिश लोकांच्या समानत्वाविषयींच्या उज्वल कीर्तीस फारच गौणत्व आणणारें आहे; आणि एकप्रकारें आरोपिताच्या निसर्गजात हक्कांची पायमल्ली करण्यासारखें आहे.

देशी ज्यूरीची गोष्ट घटकाभर बाजूला ठेवूं. परंतु, खून वगैरे सारखा आरोप आलेल्या युरोपियनाच्या खटल्यांत, * खुद्द युरोपियन ज्यूरीची न्यायबुद्धि देखील कित्येक वेळां पूर्ण अंधळी व भ्रष्ट झालेली दिसून येते, ही किती शोचनीय गोष्ट आहे ! हा लांछनास्पद प्रकार अलीकडे तर इतका फैलावूं लागला आहे कीं, नुक्तेंच बंगाल्याच्या नवीन चीफ जस्टीसानां आपल्यापुढें आलेल्या एका युरोपियन ज्यूरीला,

* [ आणि अगदीं अलीकडील- गोऱ्या माणसांच्या हातून ( ब्रि० सोल्जर लोकांकडून ) देशी लोकांचे प्राण गेल्याच्या किंवा भयंकर इजा होणाऱ्या–खटल्यांत, असेंही ह्मटल्यास चालेल. परंतु, त्यांतल्या त्यांत आमचे हल्लींचे उदार व कर्तृत्ववान् व्हाइसराय या संबंधानें विशेष खबरदारीचे उपाय योजित आहेत ही मोठी समाधानाची व अभिनंदनीय गोष्ट आहे. भा० क० ]

' तुह्मीं आपल्या शपथेस जागा; आणि आरोपी तुमचे जात-भाई आहेत वगैरे विचारांनीं मनाची समता ढळूं न देतां, योग्य तो न्याय सांगा. ' असें मुद्दाम बजावून सांगण्याची आवश्यकता भासली !

राजकीय खटल्यासंबंधानें ज्यूरीपद्धतींत दुसरी एक सुधारणा अवश्य व्हावयास पाहिजे. ती ही कीं, ज्यूरर्स संबंधानें हरकत घेण्याचा जो सरकार तर्फेच्या वकिलास हक्क आहे, तो काढून घेतला पाहिजे. या हक्काचा वस्तुतः कांहींही उपयोग नसून आरोपीस विनाकारण त्रास देण्याचें मात्र काम या हक्कानें सरकार तर्फेच्या माणसास आयतेंच करावयास सापडतें. जज्जानें मुद्दाम बोलाविलेल्या लोकांपैकींच त्यास वाटतील ते लोक घेऊन त्यांची ज्यूरी बनते, तेव्हां, त्यांत आरोपीला आपल्यास अनुकूल असे ज्यूरर्स निवडण्यास संधि सापडेल, असा संभव मुळींच नसतो.

परंतु, सध्यांच्या ज्यूरीपद्धतींतील सर्वांत मोठा दोष ह्मटला ह्मणजे ज्युरर्सची यादी करण्याची ( हल्लींची ) रीत ही होय. कारण ती यादी कशी करावी या विषयीं कांहीं ठरीव असे नियम नाहींत. त्या यादी कशातरी करण्यांत येतात, त्यामुळें सध्यांच्या पद्धतींत अनेक चुका व उणीवा राहिल्या आहेत. आतां, ज्यूरर्सची निवड करण्यासंबंधानें कांहीं नियम आहेत, हें खरें आहे. परंतु, त्यांची व्हावी तशी सक्तीनें अमलबजावणी होत नाहीं, असें अनेकदां दिसून येतें. त्यामुळें, ते नियम असून नसून सारखेच आहेत. इंग्लंडांत दर खटल्यांतील ज्यूरर्सना प्रत्येकीं एक गिनी देण्यांत येते. तेव्हां या देशांतही चांगले ज्यूरर्स मिळावे, अशी सरकारची खरी इच्छा असल्यास, त्यांना त्यांच्या श्रमाबद्दल योग्य

(हल्लींपेक्षां अधिक) तनखा देण्याच्या प्रश्नाचा सरकारानें नीट विचार केला पाहिजे शिवाय, सध्यांच्या अनिश्चित पद्धती-प्रमाणें, प्रसंगविशेषीं खटला बरेच दिवस लांबल्यास, बाहेर गांवच्या व कामधंद्याच्या ज्यूरर्सना फार यातायात व नुकसान सोसावें लागतें. सारांश, हल्लींच्या स्थितींत, ज्यूररचें काम ह्मणजे बिगाऱ्यासारखें त्रासदायक व भाडोत्री झालें आहे. ह्मणूनच कित्येक समंजस व विद्वान् लोक आपलें नांव ज्यू-रर्सच्या यादींत न पडण्याविषयीं जपत असतात.

याप्रमाणें, सध्यांच्या ज्यूरीपद्धतींतील ठळक ठळक दोष आहेत. याविषयीं सविस्तर विचार प्रस्तुत लेखकाच्या तत्सं-बंधीं स्वतंत्र त्रोटकांत केलेला सांपडेल. तथापि, उपसंहारादा-खल, त्यांत केलेल्या एका विधानाचाच येथें अनुवाद केल्या-शिवाय त्याला रहावत नाहीं. तें हेंच कीं, ज्यूरीपद्धत ही कोणत्याही स्वतंत्र शासनपद्धतीस मूलभूत असलेल्या तत्त्वां-पैकींच एक प्रमुख आहे. तेव्हां ज्या राष्ट्राच्या स्वातंत्र्य-प्रियतेचा व मनौदार्याचा डंका साऱ्या जगावर दुमदुमत आहे, अशा इंग्लंडला तर ही पद्धत अजीबात नाहींशी करून टाकणें कधींही शोभणार नाहीं; किंवा आपल्या अफाट राज्यविस्ता-रांतील कोणत्याही एखाद्या भागांत तिचें नांव देखील राहूं द्याव-याचें नाहीं, असाही संकल्प त्यांच्यापैकीं कोणीं केल्यास तो जयास जाणार नाहीं. अनेक शतकांपासून, ती इंग्लंडच्या न्याय-पद्धतीचें एक प्रमुख अंग होऊन बसली आहे, आणि ती या-पुढेंही तशीच अबाधित चालू राहून, इंग्लंडचें वैभव सदैव उज्वल राखणार, यांत कांहीं संशय नाहीं. तिची जी एक सार-खी जोमानें वाढ होत गेली आहे; आणि तिच्यांत कांहीं ढो-बळ दोष स्पष्ट दिसत असतांही, ती जी सर्व प्रजेला दीर्घ

काळापासून अत्यंत प्रिय होऊन बसली आहे, याचें कारण एकच होय. तें हें कीं, जरी इच्या सारख्या दुसऱ्या कांहीं पद्धती या पूर्वी अनेक सुचविण्यांत आल्या, तरी त्या सर्वांपेक्षांही हीच पद्धत कमी दोषार्ह व विशेष फायदेशीर असल्याचें वेळोवेळीं प्रत्ययास आलें आहे. तथापि, होतां होईल तों तिच्या सद्यःस्वरूपांतील ठळक दोष उघड करून दाखविणें हें प्रत्येक राष्ट्रहितेच्छूचें कर्तव्य आहे; आणि ते दोष निदर्शनास आणून दिल्यास, ते काढून टाकण्याचे प्रांजळपणें व उदारतेनें प्रयत्न करणें, हें सरकारचें कर्तव्य आहे.

# हिंदुस्थानांतील न्यायपद्धति.

( व्ही॰ कृष्णस्वामी आय्यर, बी. ए. बी. एल्;
मद्रास हायकोर्टांतील वकील व 'मद्रास लॉ जर्नल'
या मासिक पुस्तकाचे संपादक.)

———: o :———

ब्रिटिश अमलापासून हिंदुस्थानास जे अनेक फायदे झाले आहेत त्या सर्वांत वस्तुतः अत्यंत महत्वाचा म्हटला म्हणजे, सध्यांच्या अमदानींत मिळत असलेला निःपक्षपाती व समतोल न्याय, हा होय. कित्येकांच्या दृष्टीनें हल्लींच्या अमलांत जी शांतता आपल्यास उपभोगावयास सांपडते आहे, आणि प्रत्येकाला स्वतःच्या जीवजिंदगीविषयीं जी सुरक्षितता वाटत आहे—किंबहुना, या दोन्ही गोष्टी महाराणी सरकारच्या प्रत्येक प्रजाजनाचे जन्मजात हक्कच होऊन गेल्या आहेत, हेच दोन फायदे सर्वांपेक्षां अधिक महत्त्वाचे आहेत. अर्थात हेही आपल्या प्रकारें मोठे फायदे आहेत, यांत संशय नाहीं. सर्व प्रगतीचें पर्यवासन यांतच होत असतें; आणि यांचीं कार्येंही सहज सर्वांच्या नजरेस येणारीं असतात. तथापि, यांच्याहीपेक्षां उत्तम न्यायपद्धतीपासून होणाऱ्या फायद्याची योग्यता अधिक आहे. अर्थात या पद्धतीचें काम अगदीं संथ व बिनबोभाट चालत असतें; आणि तिचे परिणामही सूक्ष्म व दूरवर होत असतात. त्यामुळें, ते साधारण माणसांच्या नजरेंत एकदम भरत नाहींत; आणि त्याच्या महत्त्वाची त्यांना कल्पना होत नाहीं. तथापि इतर अनेक गोष्टींपेक्षां वास्तविक पाहिलें असतां योग्य कायद्यांच्या चोख अंमल-

बजावणीपासून प्रजेवर होणारे उपकार असंख्य व फार महत्त्वाचे आहेत, असें कळून येईल. आजपर्यंत, या देशांत अनेक राज्यकर्ते होऊन गेले; आणि त्यांनीं आपापल्या परी प्रजेस शांतीचा व सुरक्षिततेचा लाभही करून दिला. तथापि, योग्य व संमतेचे कायदे बनवून त्यांची निःपक्षपातानें चोख अंमलबजावणी करूं लागण्याचें श्रेष्ठ कृत्य इंग्लंडनेंच प्रथम या देशांत करून दाखविलें अशी इंग्लंडची गर्वोक्ति आहे. इंग्लंडानें आह्मांस एक मोठा धडा घालून दिला आहे. तो हा कीं, राजा असो वा रंक असो, कोणीही माणूस कायद्याच्या बंधनापासून मुक्त नाहीं; सर्व माणसें कायद्याच्या दृष्टीनें सारखींच असून, त्यांच्या त्यांच्या कृत्यांप्रमाणें कायदा हा समतेनें व निःपक्षपातानें त्यांस शासन करणारच. खुद्द सरकारची सत्ता व हक्क देखील मर्यादितच आहेत; आणि इतर व्यक्तींप्रमाणेंच, सरकारच्या हातून कोणाच्या हक्काची पायमल्ली झाल्यास, त्याच्याविरुद्ध दोषारोप करण्याचा व न्याय मिळविण्याचा त्या मनुष्यास पूर्ण अधिकार आहे. त्याचप्रमाणें पूर्णपणें स्थापित झालेले व प्रजाजनांस पूर्ण अवगत झालेले, अशा कायद्यांच्याच उल्लंघनाची शाबिती एखाद्या व्यक्तीवर झाल्यास त्याला शिक्षा करण्यांत येईल. आंग्ल शासनपद्धतीच्या एक शतकावरच्या अवधींत हीं शासनतत्वें मनःपूर्वक व शब्दशः पावलीं गेलीं आहेत. परंतु प्रस्तुत लेखाचा उद्देश केवळ इंग्रंजी राज्याच्या चांगुलपणाचे पोवाडे गाण्याचा, किंवा सध्यांच्या कायद्याचें व न्यायपद्धतीचें स्तुतिस्तोत्र वाचण्याचा नाहीं. तर इतक्या वर्षांच्या अनुभवानें, त्या पद्धतींत जे कित्येक दोष अगदीं ढळढळीतपणें दृष्टोत्पत्तीस आले आहेत, आणि ज्यांचा

एकंदर राज्यपद्धतीवर फार दूरवर आणि महत्वाचा परिणाम होत आहे, अशा दोषांचें आविष्करण करण्याचा व त्यावरोबरच आमच्या मतें ते दोष नाहींसे करण्यास काय उपाय केले पाहिजेत, तें सुचविण्याचा सदर्हू लेखांत आह्मीं प्रयत्न केला आहे.

इंग्रजी अमलाच्या सुखकर व न्यायी शिस्तीचा तात्कालिक व दृश्य असा एक मोठा फायदा हा झाला कीं, इंग्रज लोकांच्या सहवासानें पाश्चात्य देशांच्या पूर्वापार इतिहासाचें व त्यांच्या संस्थाचें ज्ञान प्राप्त झालेला, व त्यायोगानें, सरकारच्या पद्धतीचें रहस्य समजण्याची व त्या बरोबरच सरकारचें धोरण कोठें चुकतें, त्याविषयीं टीका करण्याची पात्रता अंगीं आलेला, असा एक सुशिक्षित वर्ग उत्पन्न झाला आहे. अर्थात हें ज्ञान जसें जसें अधिकाधिक प्रसृत होऊं लागलें, तसतसें ज्या कित्येक गोष्टी पूर्वीं लोकांनीं बिन तक्रार मान्य केल्या होत्या, त्यांच्या युक्तायुक्ततेविषयीं प्रजापक्षाकडून चर्चा होण्यास सुरवात व्हावी, हें अगदीं साहजिक होतें. ह्मणूनच, सध्यांच्या न्यायपद्धतींतील दोष दाखविण्यास जे लोक तयार होतात ते उगाच कोणी तरी नसून, त्या पद्धतीच्या प्रत्येक अंगाचें ज्यांनीं सूक्ष्म निरीक्षण केलें आहे व त्याविषयीं अभिप्राय देण्याचा ज्यांना ज्यांना पूर्ण अधिकार व पात्रता आली आहे, असेच लोक ह्मणजे आमच्यांतील सुशिक्षित लोक पुढें येत आहेत, हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. प्रजाजनांपैकीं अनेक सुशिक्षित वजनदार कायदे पंडित लोकांनीं सध्यांच्या न्यायपद्धतींतील, तिची अमलबजावणी करणाऱ्या कोर्टांतील रचनेंतील आणि त्यांच्या काम करण्याच्या शिस्तींतील अनेक दोष व उणीवा मोठ्या आस्थेनें वेळोवेळीं सरकाराच्या नजरेस आणून दिल्या आहेत.

या सूचना सरकारी अधिकाऱ्यांनीं पूर्ण सहानुभूतिपूर्वक जरी नाहीं, तथापि अंशतः तरी ऐकून घेतल्या आहेत. (पण, नुसतें ऐकून घेण्यापलीकडे त्या बाबतींत ते कांहीं सुधारणा करीत नाहींत, ही मोठी शोचनीय स्थिति आहे.) यावरून पाहतां, 'उदार व जुलमी सरकार' असें जें एक विशेषण हिंदुस्थान सरकारास कधीं कधीं लावण्यांत येतें तें अगदीं यथार्थ आहे. आपलें ह्मणणें ऐकण्यास भाग पाडण्याची सत्ता ज्यांच्या हातीं नाहीं, अशा लोकांकडून झालेली टीका त्या सरकारास मुळींच खपत नाहीं. परंतु अशा सूचनांपैकीं कांहीं 'तात्विक दृष्टया प्रमाणसिद्ध' किंवा देशाच्या सध्यांच्या सांपत्तिक स्थितींत सरकारास अंमलांत आणतां येतील अशा उत्तम सल्लामसलतीच्या आहेत असें सरकारकडून मानण्यांत आलें आहे वगैरे गुळमुळीत अभिप्राय देऊन, सरकार त्यांची संभावना करतें. वास्तविक पहातां, इंग्लंडांतील उदार व समंजस 'प्रतिपक्षीमंडळ' (Opposition अधिकारारूढ असणाऱ्या पक्षाच्या विरुद्ध बाजूची मंडळी) देखील हेंच काम करीत असतें, तरी तेथें सरकारच्या वर्तनावर योग्य व शुद्ध हितबुद्धीनें केलेल्या टीकेस कोणी नांवें ठेवीत नाहीं; किंवा अधिकारारूढ पक्षाला त्यामुळें घुस्सा येत नाहीं. परंतु, आमच्या इकडे अशा तऱ्हेची टीका कोणी केल्यास त्याला लागलीच 'गुप्त राजद्रोही' ठरवून त्याची नाचक्की करण्यांत येते! परंतु बिचाऱ्यांचा खरा उद्देश ह्मटला ह्मणजे, सध्यांच्या न्यायपद्धतींतील दोषांविषयीं लोकमत जागृत करणें, आणि लोकांच्या रास्त मागण्या सर्वांशीं नाहीं तरी अंशतः तरी स्वीकारण्याविषयीं सरकारचें मन वळविणें हाच असतो. न्यायपद्धतींतील दोष व तन्निवारणार्थ सुचविलेले उपाय

यांची चर्चा सार्वजनिक रीतीनें करण्यांत आली आहे. तेव्हां फक्त सुशिक्षित नेटिव लोकांचेंच मत असें आहे, असें मानण्यास कांहीं एक पुरावा नाहीं.

## मुलकी न्याय.

मुलकी न्यायासंबंधानें विचार करण्यासारखी पहिली गोष्ट ह्मणजे दिवाणी कोर्टांची रचना ही होय. आंग्ल राज्यसत्ते-खालीं असणाऱ्या हिंदुस्थान प्रदेशाचे निरनिराळे कांहीं प्रमुख विभाग असून, त्यांपैकीं प्रत्येक ठिकाणीं हायकोर्ट किंवा ज्यूडिशिअल कमिशनरचें कोर्ट नांवाची वरिष्ठ सभा असते, व तिच्याकडे दिवाणी व फौजदारी कामांतील जिल्हा कोर्टांच्या निकालांविरुद्ध अपिलें घेण्यांत येतात, हें सर्वांना ठाऊक आहेच. कांहीं विशेष खटले खेरीज करून, याच वरिष्ठ कोर्टाचा निकाल अखेर कायम ठरून त्याची अमलबजा-वणी होते. वर सांगितलेले विशेष खटले ह्मटले ह्मणजे, ज्यांमध्यें हायकोर्टाच्या निकालाविरुद्ध, त्याच्याहीपेक्षां वरिष्ठ अस-णाऱ्या '**प्रिव्हीकौन्सिल**' नामक इंग्लंडांतील न्यायसभेपुढें अपील करण्याचा अधिकार दिलेला आहे ते होत. एरव्हीं, कायद्याच्या बाबतींत दुय्यम प्रतीचें अपील ऐकण्याचा ज्या कोर्टांचा अधिकार आहे अशा खालच्या दर्जाच्या कोर्टांवर देखरेख करण्याचा, व प्रांतांतील सर्व स्मालकाज कोर्टांची पहाणी करण्याचा अधिकार त्यांसच असतो. हायकोर्टाच्या ताब्यांतील कोर्टें ह्मटलीं ह्मणजे डिस्ट्रिक्ट जज्जाचें, (ॲडीश-नल) मदतनीस किंवा असिस्टंट जज्जाचें, सबॉर्डिनेट जज्जाचें व मुनसफचें हीं चार होत. कांहीं प्रांतांत वरील कोर्टांस निराळीं नांवें आहेत. जसें—कमिशनर, डेप्युटी कमिशनर,

वगैरे. १००० रुपयांच्या* फिर्यादीपर्यंत मुनसफचा अधिकार चालतो. जिल्हा जज्ज आणि सबॉर्डिनेट जज्ज यांचा अधिकार सर्व फिर्यादींत चालतो. फक्त मुंबई इलाख्यांत मात्र अशी स्थिति नाहीं. कारण त्या भागांत मुनसफ असा स्वतंत्र हुद्दा नसून सबॉर्डिनेट जज्जांचेच पहिला वर्ग व दुसरा वर्ग असे दोन विभाग आहेत. त्यां पैकीं दुसऱ्या वर्गांतील सबजज्जाच्या अधिकाराची यत्ता ५००० रुपयांच्या दाव्यापर्यंत आहे. जिल्हा मुनसफ आणि सबजज्ज यांच्या जागीं बहुधा कायद्याचें चांगलें ज्ञान असलेल्या देशी लोकांस नेमण्यांत येतें. डिस्ट्रिक्ट जज्ज हा मात्र ज्यास कायद्याचें पद्धतशीर ज्ञान किंवा तादृश अनुभव नाहीं असा, एखाद्या सिव्हिलसर्विस मधील मनुष्य असतो. मुनसफानें निकाल दिलेल्या सर्व दाव्यां विरुद्ध, आणि सबजज्जानें ऐकलेल्या ५००० रु० पर्यंतच्या दाव्याविरुद्ध अपिलें घेण्याचा त्यांस अधिकार असतो. हायकोर्टास देण्यांत आलेल्या सनदेंत एक कलम असें आहे कीं, त्यांतील जज्जांपैकीं निदान ⅓ लोक सनदी नोकरांपैकीं असावेत आणि त्याचप्रमाणें आणखी ⅓ लोक निदान पांच वर्षें काम करीत असलेल्या बॅरिस्टरामधून नेमावे. यावरून दिसून येईल कीं, फक्त खालच्या दर्जाच्या दाव्यांचेंच काम कायतें देशी अधिकाऱ्यांच्या हातीं असून अपील वगैरेचें महत्वाचें काम सर्वांशीं सिव्हिल्सर्व्हिस मधील युरोपियनांच्या हातीं असतें. याबरोबर हेंही सांगितलें पाहिजे कीं, मुनसफ आणि सब्-जज्जांना 'स्मॉलकॉजपावर्स' म्हणून कांहीं अधिकार दिलेले असतात. म्हणजे ५०० रु० पर्यंतच्या किंमतीचे

---

* मद्रास इलाख्यांत २५०० रु० पर्यंत.

देण्याघेण्याचे हक्क असल्यास, त्याच्याविषयीं कायमचा निकाल करण्याचा त्यांना अधिकार आहे. अर्थात, हायकोर्टास वाटेल तर, एखाद्या कायद्याच्या मुद्यासंबंधानें सदरहु प्रकरणाची फेर तपासणी करण्याचाही हक्क आहे. म्हणजे, इंग्लंडांतील **काउन्टी-कोर्टस्** यांना पैशाच्या बाबतींत जे कित्येक अधिकार आहेत, त्यांच्या सारखेच सब-जज्ज व मुनसफ यांचे हे वरील अधिकार आहेत. **अलाहाबाद** खेरीज बाकीचीं सर्व सनदी हायकोर्टें फक्त आपापल्या इलाख्याच्या प्रमुख शहरांतीलच मूळ दिवाणी दाव्यांची चौकशी करितात. सारांश, याप्रमाणें देशांतील दिवाणी न्यायपद्धतीची जंत्री सर्वस्वी निरनिराळ्या अधिकारांच्या व भिन्न भिन्न पात्रतेच्या न्यायाधीशांच्या स्वाधीन आहे. अर्थात, हे जज्ज बहुधा युरोपियनच असतात. वस्तुतः हिंदुस्थानांत विश्वविद्यालयांची स्थापना इ० १८५८ त झाली. तेव्हांपासून आतांपर्यंतच्या काळांत देशाची किती तरी झपाट्यानें प्रगति झाली आहे. आतां, या देशाच्या प्रचंड लोकसंख्येच्या मानानें पहातां, सुशिक्षित लोकांची संख्या फारच अल्प आहे यांत शंका नाहीं. तथापि, दिवसानुदिवस उच्च प्रतीच्या शिक्षणाचा झपाट्यानें प्रसार होत असून, हजारों लोकांस विश्वविद्यालयीन शिक्षणाचा लाभ मिळत आहे; आणि हजारों नव्हेत तरी निदान शेंकडों लोकांना कायद्यांचें परिपूर्ण शिक्षण मिळून, ते न्यायाची बजावणी करण्याच्या कामास सर्वस्वीं लायक असे होत आहेत. इतकेंच नव्हे, तर न्याय करण्याच्या कामीं एतद्देशीय जज्जांच्या नैपुण्याविषयीं व निस्पृहपणाविषयीं तर सर्वांचें एकमत आहे. यासंबंधानें, **लार्ड सेलबोर्न** यांनीं केलेल्या भाषणांतील एक उतारा देतों, म्हणजे त्यावरून आमच्या म्हणण्याच्या

सत्यतेची पूर्ण साक्ष पटेल. **लॉर्डसेलबोर्न** इंग्लंडाचे एक विख्यात **लॉर्ड चान्सेलर** ( सर न्यायाधीश ) होऊन गेले. ते ह्मणाले: -

" कांहीं वर्षें, प्रिव्हिकौन्सिलच्या ज्यूडिशिअल कमिटीपुढें हिंदुस्थानांतील खटले मी घेत असे. तेवढ्या मुदतींत ज्यांत माझा कोणत्याही प्रकारचा संबंध नव्हता असा महत्वाचा खटला क्वचितच प्रिव्हिकौन्सिलपुढें आला असेल. त्यामुळें दिवाणी दाव्यांत हिंदी न्यायाधीश आपलें काम कसें चोख बजावतात तें पहाण्याची मला अनेकदां संधि मिळाली. त्या अनुभवावरून मी बिनदिक्कत असें सांगू शकतों, (आणि त्या वेळच्या तिकडील ह्म. हिंदुस्थानांतील-जज्जांचेंही असेंच मत असल्याचें मला माहित आहे ) कीं, नेटिव जज्जांचे निवाडे युरोपियन जज्जांच्या निवाड्यांपेक्षां कोणत्याही रीतीनें कमी योग्यतेचे नसत. एकंदर युरोपियन जज्ज आपलें कर्तव्य बजावण्याविषयीं किती झटत असतात, तें मला पूर्णपणें माहीत आहे. ह्मणून त्यांना गौणत्व आणणारें कांहीं बोलण्याचा प्रसंग आल्यास, मला साहजिक वाईट वाटेल. तरीपण, मला पुन्हा एकवार सांगितल्यावांचून रहावत नाहीं कीं, निस्पृहता, विद्वत्ता, बहुश्रुतपणा, निवाड्यांतील मुद्देसूदपणा व समाधानकारक निकाल, इत्यादिकांच्या दृष्टीनें पाहिलें तरी नेटिव जज्जांचे फैसले इंग्लिश जज्जांच्या निवाड्याच्याच तोडीचे असतात, असें ह्मणण्यास मला मुळींच शंका वाटत नाहीं. "

कोर्टांच्या सध्यांच्या रचनेंतील मोठा ढोबळ दोष ह्मटला ह्मणजे, सिव्हिलियन जज्जांकडे अपिलांचा निकाल करण्याचा अधिकार ठेवला आहे, हा होय. त्यांनां बहुधा कायद्याचें पद्धतशीर शिक्षण

किंवा व्यावहारिक अनुभव मुळींच नसतो. शिवाय, वरिष्ठ सरकारास सोईस पडेल त्याप्रमाणें या ठिकाणाहून त्या ठिकाणीं अशी त्यांची सारखी उचलबांगडी चाललेली असते. त्यामुळें, एखाद्या विशेष प्रांतांतील लोकांच्या आचारविचारांची व रीतीभातींची माहिती करून घेण्यास किंवा न्यायव्यवस्थेची अनुभव येण्यास त्यांना मुळींच अवकाश मिळत नाहीं. बंगालचे ॲडव्होकेटजनरल **सर चार्लस पॉल** यांनीं याविषयीं आपला अभिप्राय दिला आहे, तो येथें वाचकांच्या परवानगीनें उतरून घेतों:

"हल्लींच्या सुधारलेल्या दिवसांतही न्यायखात्यांतील वरच्या दर्जाच्या जागेवर सिव्हिलियन लोक नेमणें ही मोठी चूक आहे. ज्यांना कायद्याचें पद्धतशीर व योग्य शिक्षण मिळालें आहे आणि बरेच दिवस काम चालविल्यानें ज्यांनीं पुष्कळ अनुभव संपादला आहे, अशा बॅरिस्टर किंवा वकील लोकांनांच अशा जागीं नेमणें रास्त व इष्ट आहे. बिचारा सिव्हिलियन स्वतः कितीही बुद्धिवान् व विद्वान् असला तरी, इंग्रजी, हिंदु आणि मुसलमानी या तीन प्रकारच्या कायद्यांनीं मिश्र झालेल्या न्यायपद्धतींतील सूक्ष्म गुंतागुंतीचा व प्रचंड घोंटाळ्याचा त्याला एकदम उमज कसा पडणार ? शिवाय इंग्लंडांतील कायद्यांच्या तत्त्वांच्या धोरणावर, आपल्या इकडेही निरनिराळ्या बाबतींसंबंधानें पारिभाषिक संज्ञांनीं लिहिलेलीं अशीं अनेक 'कोडें' आहेत. त्या बाबतींची अगोदर साधारण माहिती असल्याखेरीज, त्या कोडांचा नीट अर्थ समजण्याची कोणासही मुष्कील पडते. पण बरेच वेळां असें घडतें कीं त्या कोडांतील विशेष कलमांना अनुलक्षून असे सरकारचे निरनिराळे हुकूम सुटत असतात. परंतु ते हुकूम सोयस

असून, त्यांमध्यें ते कोणत्या कलमांस धरून आहेत याविषयीं स्पष्ट निर्देश केलेला नसतो कारण, ते हुकूम ज्यांसाठीं असतात त्यांना ( जज्ज किंवा मॅजिस्ट्रेट यांना )-तीं कलमें अवगतच आहेत, असें सरकार धरून चालतें. पण वस्तुस्थिति तशी नसते. जज्ज किंवा मॅजिस्ट्रेट बहुधा सिव्हिलियन असल्यामुळें त्याला त्या कायद्याची माहिती नसते. तेव्हां अशा हुकुमांतील कलमांचा बरोबर अर्थ समजून त्यांची योग्य बजावणी करितां येण्यास, अगोदर तीं कलमें कोणत्या तत्त्वांवर बनविण्यांत आलीं आहेत, याची पूर्ण माहिती जज्ज किंवा मॉजिस्ट्रेट यांस असणें सर्वथैव अवश्य आहे केवळ स्वाभाविक रीतीनें अशा कलमांचा खरा अर्थ एकदम त्याच्या ध्यानांत येईल, असें मानणें अगदीं असमंजसपणाचें होईल. बरेच दिवसांचा अनुभव आणि अनेक प्रकारच्या खटल्यांची व तत्त्वांची प्रत्यक्ष माहिती या खेरीज तें काम कधींहीं साध्य व्हावयाचें नाहीं. याच्या समर्थनार्थ मी अनुभविक अशी गोष्ट सांगतों कीं, ज्यांनीं पूर्वी वकिलीचा धंदा केला नाहीं, असे लोक जेव्हां जज्ज बनतात, तेव्हां त्या सर्वांस बहुधा **पुराव्याच्या कायद्याची** तादृश किंवा मुळींच ओळख नसल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें. पण **पुराव्याच्या कायद्याचें** ज्ञान जज्जास असणें तर सर्वथैव अवश्य आहे. कारण साक्षीदारांच्या तपासणींत बरेच वेळां कायद्याच्या बाबी संबंधानें जे अनेक महत्त्वाचे मुद्दे उपस्थित होतात, त्यांच्या युक्तायुक्ततेबद्दल जज्जानें तेथल्या तेथें तावडतोब निर्णय करणें फार जरुरीचें व इष्ट असतें. परंतु, सध्यांच्या स्थितींत तरी, वरील हेतु साध्य होण्याइतकी जज्जांच्या अंगीं विशेष पात्रता किंवा कुशाग्रता असते, असें मला वाटत नाहीं."

शिवाय याविषयीं दुसरी एक गोष्ट ध्यानांत घेतली पाहिजे. ती ही कीं, इंग्रजी शिक्षणाचा प्रसार आमच्या देशांत जेव्हा अगदीं नुकताच सुरू झाला होता, तेव्हांच्या स्थितींत आणि सध्यांच्या स्थितींत जमीन अस्मानाचें अंतर पडलें आहे. त्यावेळीं लोकांस योग्य आणि निःपक्षपाती न्याय मिळण्याकरितां, साधारणतः चोख वर्तनाचे व पूर्वापार खानदानींत वाढलेले असे लोक न्यायाधीश नेमले तरी चालत असत. शिवाय, त्यांचा पगारही थोडा जास्त ठेवल्यानें, लांचलुचपतीकडे त्यांची प्रवृत्ति होण्याचा संभव फार कमी असे. अशा न्यायधीशांना प्रसंगविशेषीं कायद्याचें ज्ञान व तत्त्वनिरीक्षणशक्ति बेताबेताची असली तरी, त्यापासून फारसें नुकसान होण्याचा संभव नव्हता. ह्मणून, त्यांनां अपिलें ऐकण्याचा व निकाल लावण्याचा अधिकार देण्यास फारशी हरकत नसे. परंतु, इतक्या अवधींत देशाच्या स्थितींत किती तरी सुधारणा झाली आहे. पूर्वी जे गुण फक्त भारी पगाराच्या **कॉव्हेनेन्टेड सिव्हिल सर्व्हिस**मधील अधिकाऱ्यांतच विशेषतः आढळावयाचे अशी समजूत असे, ते हल्लीं न्यायखात्यांतील साधारण दर्जाच्या देशी अधिकाऱ्यांत देखील दृष्टोत्पतीस येतात. त्यामुळें, पहिल्या अमदानींतील अधिकाऱ्यांचें महत्त्व बरेंच कमी होऊन, जुन्या पद्धतींतील दोष मात्र अधिकाधिक स्पष्टतेनें लोकांच्या नजरेस येऊं लागले आहेत.

आमच्या लोकांना उठल्या सुटल्या कोर्टाची पायरी चढण्याची फार संवय आहे, त्यामुळेंच दरसाल फिर्यादींची संख्या वाढत्या प्रमाणावर आहे, असा एक आमच्यावर नेहमीं आरोप येत असतो. कधीं कधीं तर, खोटें बोलण्याची हिंदुस्थानवासी

यांना जन्मजात खोड आहे, असाही भयंकर आरोप करण्यास कित्येक परकीय मागें पुढें पहात नाहींत. अगोदर हे आक्षेप सर्वथैव निराधार, खोडसाळ आणि कुत्सित बुद्धीचे आहेत असें आम्हीं निक्षून सांगतों. आतां, त्या आक्षेपांस उत्तरही असें आहे कीं, न्यायाची बजावणी करणाऱ्या संस्थांच्या अपूर्ण स्थितीमुळेंच लोकांस पदोपदीं फिर्याद करण्यास उत्तेजन मिळतें. हल्लींची न्यायपद्धत केवळ सोडतीसारखी अनिश्चित आहे. खऱ्या पक्षकाराप्रमाणेंच खोट्या पक्षकारालाही जय मिळण्याचा सारखाच संभव असतो. एखाद्या मुनसफानें किंवा सब्-जजानें नीट काळजीपूर्वक बारीक चौकशी करून, एखाद्या खटल्यांत योग्य असा निकाल केला समजा; तरी त्या निकालाविरुद्ध अपील करण्याचा हक्क असतोच. त्यामध्यें अननुभवी किंवा गैरहुशार मनुष्याच्या पुढें तें अपील गेल्यास सब्-जजाचा निकाल रद्द होण्याचा बराच संभव असतो. अर्थात्, शेवटपर्यंत खटला नेऊन स्वतःच्या नशिबाची - किंवा लुच्चेगिरीची - परीक्षा पहाण्यास खोट्या पक्षकारांना यामुळें चांगलेंच उत्तेजन मिळतें! इतकेंच नव्हे तर, सिव्हिलियन जजांना दिवाणी न्याय देण्याची तादृश पात्रता नसते असें जें आम्हीं वर म्हटलें आहे त्यांत बरेंच तथ्य आहे, अशी अलीकडे सर्वांची खात्री होत चालली आहे.

ही स्थिति सुधारण्याचे उपाय म्हटले म्हणजे दोनच होत. दिवाणी अधिकार त्याच्यावर सोंपविण्यापूर्वी, प्रत्येक सिव्हिलियनास कायद्याचें ज्ञान आहे कीं नाहीं हें पहाणें; किंवा त्यास एखादी कायद्याची परीक्षा द्यावयास लावणें, हा एक; आणि सर्वच सिव्हिलियनांच्या हातांतून दिवाणी न्यायबजावणीचें काम काढून घेणें, हा दुसरा. परंतु राजकीय किंवा इतर

कांहीं कारणांमुळें, या दोहोंपैकीं एकही मार्ग सरकारास सध्यां स्वीकारतां येत नाहीं, असें सरकारतर्फेच्या लोकांचें ह्मणणें असतें. खुद्द हायकोर्टांत देखील सिव्हिलियनांची संख्या कांहीं अशीं अधिक आहे, असें अलीकडे सर्वांस वाटूं लागलें आहे. यावरून सर्वच सिव्हिलियन अपात्र व कुचकामाचे असतात, असा आमच्या ह्मणण्याचा भावार्थ कोणी घेऊं नये. बॅरिस्टर, वकील वगैरे मधून जज्ज झालेल्या लोकांप्रमाणेंच, कित्येक सिव्हिलियनांनींही न्यायाधीश या नात्यानें चांगली कीर्ति मिळविली आहे. दुसरी गोष्ट अशी आहे कीं, सरकारच्या अमलबजावणीच्या खात्यांत, महत्वाच्या, स्वतःची कर्तबगारी दाखवितां येण्यासारख्या व भारी पगाराच्या अशा जागा पुष्कळ आहेत. त्यामुळें सिव्हिलसर्व्हिसमधील हुशार व कर्तृत्वान् माणसांची ओढ हायकोर्टांतील न्यायाधीशांच्या जागेकडे सहसा जात नाहीं. ह्मणूनच साधारणतः न्यायखात्यांतील सिव्हिलियनांच्या अगीं एक प्रकारची कर्तृत्व शक्तींची उणीव दिसून येते. आतां, मुंबई वगैरे कांहीं भागांत न्यायखात्यांतील दुय्यम प्रतीच्या ह्मणजे डिस्ट्रिक्ट जज्ज वगैरेंच्या जागेवर सिव्हिलियनास नेमण्यापूर्वीं, त्यास कायद्याच्या अंमलबजावणीची थोडीबहुत माहिती व्हावी, अशाविषयीं सरकारनें कांहीं व्यवस्था केली आहे हें खरें आहे; पण हे केवळ अपवाद होत. हा प्रघात सार्वत्रिक नाहीं. त्यामुळें दिवाणी खात्यांतील न्यायाचें आह्मीं जें स्थूल मानानें वर्णन केलें आहे, त्यास तादृश बाध येत नाहीं.

ही स्थिति सुधारण्याचा खरा मार्ग ह्मटला ह्मणजे, हल्लीं सरकार युरोपियन अधिकाऱ्यांच्या, मुलकी खात्यांतून न्यायखात्यांत व न्यायखात्यांतून मुलकी खात्यांत अशा ज्या बदलेवर

बदल्या करीत असते, ती पद्धत त्यांनीं बंद केली पाहिजे. शिवाय' प्रत्येक सिव्हिलियनानें मुलकी खातें किंवा न्यायखातें यांतील कोणत्या खात्यांत शिरावयाचें तें त्यानें नौकरीच्या सुरवातीसच कायमचें ठरवून टाकिलें पाहिजे, असाही एक निर्बंध झाला पाहिजे. याचप्रमाणें डिस्ट्रिक्ट जज्जासारख्या जोखमीच्या जागेवर त्यांस नेमण्यापूर्वी त्यांनीं कायद्याचें चांगलें ज्ञान संपादिलें असलें पाहिजे. अशीही एक अट ठेवण्यांत यावी. कारण हल्लींच्या स्थितींत, त्यांना कायद्यांचें ज्ञान आहे कीं नाहीं हें समजण्यास परीक्षा वगैरेचें कांहींच साधन नाहीं. किंबहुना त्यांच्याकडे असलेलें दिवाणी फिर्यादींची चौकशी करण्याचें काम मुळींच काढून घेतल्यानें देखील थोडें तरी नुकसान होईल कीं नाहीं, याचीच आह्मांस शंका आहे.

पूर्वी, हायकोर्टाच्या न्यायाबद्दल सर्व लोकांत फार विश्वास व आदर असे. परंतु अलीकडे तो लोपत चालला आहे. कारण, हल्लीं जे विलायतेंतून कित्येक बॅरिस्टरांना जज्ज करून इकडे धाडतात, ते त्यांच्या कायद्यांच्या गाढ ज्ञानाबद्दल किंवा तीव्र विचक्षण बुद्धीबद्दल त्यांची तेथें ख्याती झाली असते ह्मणून नव्हे, तर केवळ राजकीय बाबतींतील मतैक्य, खाजगी स्नेहसंबंध किंवा समानपक्षीयांचा वशिला, इत्यादि गोष्टींच्या जोरावरच त्या होत असतात. जो तो स्टेट सेक्रेटरी मागचा पुढचा विचार न करितां, त्याच्या मनास येतील तशा नेमणुका करीत जातो. हायकोर्टाची इभ्रत व नांव राखणें ही किती महत्वाची गोष्ट आहे, याविषयीं त्यांच्या मनांत विचार सुद्धां येत नाहीं. त्यामुळें, हायकोर्टाची स्थिति दिवसानुदिवस फार शोचनीय होत चालली आहे.

याप्रमाणें, अनेक शाखायुक्त व पहिलें अपील, दुसरें अपील, फेरतपासणी इत्यादि प्रकारांनीं बद्ध अशा सध्याच्या न्यायपद्धतींतील खर्चाच्या बोजाविषयींचा मुद्दा फार विचार करण्यासारखा आहे. ५०० रु. पर्यंतच्या दाव्यांचे निकाल करण्याकरितां, 'स्मॉलकॉज कोर्टें' ह्मणून नेमलेलीं असतात, असें मागें सांगण्यांत आलेंच आहे. कित्येक प्रांतांत अगदीं क्षुल्लक-ह्म० १० यासून २० रु० पर्यंत-खटल्यांत यांच्या ऐवजीं **व्हिलेजकोर्टें** ह्मणून असतात. पक्षकाराची इच्छा असल्यास, त्यांच्या मार्फत आपल्या दाव्याचा निकाल करून घेण्यास त्यांना मुभा आहे. हीं व्हिलेजकोर्टें ह्मणजे कांहीं अंशीं पूर्वीच्या **गांवपंचायती**चेच अवशेष होत; परंतु हें उघडच आहे कीं, सरकारी कोर्टाइतका अशा व्हिलेज कोर्टाविषयीं पक्षकारास आदर व विश्वास वाटत नाहीं. कारण त्यांची रचना कांहीं काळापूर्वीं शुद्ध पायावर केलेली नव्हती. शिवाय दुसरें असें कीं, ह्या संस्थांकडे खटले नेणें फिर्यादींच्या इच्छेवर ठेविल्यामुळें, आपल्या प्रतिपक्षास यातायात व पुष्कळ खर्च पाडण्याच्या ईर्षेनें विशेष खर्चाच्या अशा सरकारी कोर्टाकडेच जाण्याची वादीप्रतिवादींची साहजिक प्रवृत्ति होते.

सरकार मार्फत प्रसिद्ध होणाऱ्या आंकड्यांवरून असें दिसून येतें कीं, वर्षांतील एकंदर फिर्यादींच्या संख्येपैकीं बराच अंश अशा लहान रकमांच्याच दाव्यांचा असतो. तसें च, दावा जिंकणाऱ्या माणसाला तो जिंकण्यास लागलेल्या खर्चाचा अर्धा हिस्सा देखील परत मिळण्याची मुष्किल पडते, आणि हरणाऱ्या पक्षकाराला मूळ दाव्याच्या रकमेपेक्षां कितीतरी अधिक खर्चाचा बोजा सोसावा लागतो ! या स्थितीचा परिणाम असा होतो कीं, अखेरीस दोन्हीही पक्ष धुळीस मिळतात !

त्यांतहीं जर कां बिचारे दोन्ही पक्षकार, एकमेकांच्या विरुद्ध अपिलें करून स्वतःच्या नशिबाची परीक्षा पहाण्याच्या भरीस पडले, तर त्यांच्या दुर्दशेस पारावारच नाहीं !

ही स्थिति सुधारण्यास, लहान रकमांच्या दाव्यांत अपिल करण्याचा हक्क फार मर्यादित केला पाहिजे; आणि अशा दाव्यांची मूळ चौकशी करणाऱ्या कोर्टाचे अधिकारही विशेष विस्तृत केले पाहिजेत. हाच एक सध्यांची स्थिति सुधारण्याचा उपाय आहे, असें या विषयाचें अध्ययन केलेल्या सर्व सुशिक्षित गृहस्थांचें मत झालें आहे. बडोद्याचे सुप्रसिद्ध दिवाण, **दिवाण बहादूर श्रीनिवास राघव आयंगार सी. आय. ई.** यांनीं मद्रास इलाख्यांतील गेल्या चाळीस वर्षांत झालेल्या प्रगतीविषयीं एक लेख लिहिला आहे, त्यांत ते ह्मणतात: -

' ज्या गांवांत किंवा ग्रामसमूहांत **व्हिलेजकोर्टें** आहेत अशा ठिकाणीं २० रुपयांपेक्षां कमी रकमेचे सर्व दावे वरिष्ठ कोर्टाकडे न नेतां व्हिलेजकोर्टाकडेच फिर्यादीनें नेले पाहिजेत, अशी एक सक्तीची सुधारणा सध्यांच्या कायद्यांत करणें अवश्य आहे. ह्मणजे जवळच व्हिलेज कोर्ट असतांही, वरिष्ठ कोर्टाकडे दावा नेऊन प्रतिपक्षाला विनाकारण यातायातींत व खर्चांत पाडण्याची फिर्यादीला हल्लीं जी आयतीच सवड सांपडते ती बंद होईल. कारण अशा कोर्टांत पक्षकारांपैकीं प्रत्येकाच्या तर्फेचा एकेक न्यायाधीश असतोच. त्यामुळें एक तर्फी न्याय होण्याची सहसा भीति नसते. शिवाय, विशेष प्रकरणांत डिस्ट्रिक्ट मुनसफाला, योग्य कारणें दाखऊन वाटेल तो खटला व्हिलेज कोर्टाकडून काढून स्वतः पुढें बदलून घेण्याचा अधिकार आहेच; त्याहीमुळें अन्याय होण्याचा फारसा संभव रहात नाहीं. वीस पासून पन्नास रुपयांच्या दाव्यांत मात्र आपली फिर्याद व्हिलेज कोर्टाकडे किंवा जिल्हा मुनसफाकडे नेणें हें फिर्यादीच्या खुषीवर ठेवावें. पण तशा खटल्यांत देखील, जर एखादा खटला विनाकारण

मुनसफ कोर्टापुढें नेण्यांत आला असें तेथें दिसून आलें तर, वादीला खटल्यास झालेला खर्च देण्याचें नाकारण्याचा अधिकार मुनसफाला अवश्य असला पाहिजे; तो खटला व्हिलेजकोर्टांत चालला असतां तर त्यास जितका खर्च लागला असता तितकाच खर्च वादीस मिळणें रास्त आहे. "

अशा तऱ्हेचीं कलमें, 'मद्रास सिटी सिव्हिलकोर्ट ॲक्ट' 'प्रेसिडेन्सी स्मॉलकॉझकोर्ट ॲक्ट' आणि इंग्लंडांतील 'काउन्टी कोर्टस् ॲक्ट' मध्यें असलेलीं आढळतात. मोठ्या रकमांच्या दाव्यासंबंधानें **दिवाण बहादूर** पुढें ह्मणतात:—

" जिल्ह्यांतील कोर्ट केवळ एकेकट्या व भारी पगारांच्या जज्जाच्याच सर्वस्वी ताब्यांत असल्यामुळें आणि तेही लोकमतास ताद्दश्य मानणारें नसल्यामुळें, भारी किंमतीच्या खटल्यांचा सर्व बाजूंनीं पूर्ण विचार होणें शक्य नसतें; ह्मणून एकावरएक अपिलें करण्याची अवजड पद्धत अस्तित्वांत आली, पण तिच्याच बरोबर आणखी नवेच दुष्परीणाम उद्भवले. "

यानंतर त्यांनीं त्या दुष्परिणामांचें सविस्तर कथन केलें आहे, आणि ते टाळण्याचा एक मार्गही सुचविला आहे. त्यांच्यामतें, दाव्याची प्रथम चौकशी करणाऱ्या कोर्टांत दोन जज्ज असावेत; ह्मणजे खटल्याची काळजीपूर्वक चौकशी होऊन पुराव्याचीही योग्य मीमांसा होत जाईल. अर्थात् कमी महत्वाच्या खटल्यांत जीं अपिलें होतात त्यांचेंही प्रमाण कमी होईल.

हल्लींची न्यायपद्धति उभय पक्षकारांसही फार खर्चाची व यातायातीची असून, त्या योगानें दोघेही सारखेच रसातळास कसे पोहोंचतात हें वर सांगितलेंच आहे. याचें एक कारण ह्मटलें ह्मणजे कोर्टफीच्या रूपानें न्यायावर जो जबरदस्त कर बसविला आहे तो होय. कोर्टफीच्या रूपानें सरकारास इतकें प्रचंड

उत्पन्न होत आहे कीं, त्याच्या वरच दिवाणी आणि फौजदारी न्यायखात्याचा सर्व खर्च भागतो ! या संबंधानें हिंदुस्थान सरकारानें नुक्तेच आंकडे प्रसिद्ध केले आहेत, ते येथें देतों; ह्मणजे त्यावरून त्या उत्पन्नाची चांगली कल्पना होईल:-

इ० स० १८९६-९७ सालांत एकंदर कोर्टेंमिळून ६,४५,४९,८९० रु० वसूल झाले आणि त्याच सालांतील एकंदर कोर्टांचा खर्च ३,४९,७०,६१२ रु० इतका झाला. बंगालचे सुप्रसिद्ध माजी चीफ जस्टिस **सर रिचर्ड गार्थ** यांनीं या जबर करा विषयीं सणसणीत टीका केली आहे. वास्तविक पाहिलें तर फौजदारी न्यायखात्याचा खर्च सरकारच्या सर्वसामान्य तिजोरींतूनच झाला पाहिजे. कारण तें खातें प्रत्येक नागरिकाच्या जीव जिंदगीच्या सुरक्षिततेकरितां आहे. तेव्हां त्याबद्दलचा खर्च केवळ दिवाणी पक्षकारांवरच न लादतां, सर्वांनींच तो खर्च सारखा सोसणें हें रास्त आहे. इतकेंच नव्हे, तर दिवाणी न्यायखात्याच्या योग्य अंमलबजावणींतही प्रत्येक व्यक्तीचें हिताहित आहे कीं नाहीं आणि अशा दृष्टीनें दिवाणी न्यायखात्याचाही खर्च त्यांनीं सोसणें रास्त आहे कीं नाहीं, हाही विचार करण्यासारखा प्रश्न आहे; पण तो सध्यां घटकाभर बाजूला ठेवूं. तरी देखील केवळ फौजदारी न्यायखात्याचा खर्च निघावा ह्मणून, दिवाणीखातें चालविण्यास सरकारास वास्तविक जितका खर्च येतो, त्याच्या जवळ जवळ दुप्पट कर दिवाणी पक्षकारांकडून वसूल करणें हें अगदीं अन्यायाचें व गैरशिस्त आहे, असें कोणासही सकृद्दर्शनीं दिसून येईल. आमच्या मतें, हिंदुस्थानसरकारची या बाबतींत अशी समजूत असावीशी दिसते कीं, हा सर्व प्रश्न फक्त वरीज वजाबाकीचाच आहे. ते ह्मणतील "दिवाणी पक्षकारां-

कडून कमी पैसे घेऊन सर्व साधारण तिजोरींतून अधिक खर्च करा असें जर तुमचें (रयतेचें) ह्मणणें असेल, तर हा जादा खर्च भागविण्याकरितां आमच्या तिजोरीची भरपाई करण्याची तुह्मीं दुसरी कांहीं तोड काढा." ह्याचा अर्थ इतकाच कीं, आह्मीं दुसऱ्या कोणत्या तरी रूपानें तुमच्या-वर कर लादूं. आमच्या मतें हा कोटीक्रम अगदीं चुकीचा व घातुक आहे. एखादा नवीन कर सररास लादणें हें अत्यंत अनिष्ट व असंतोषजनक होईल. शिवाय, तसें करण्यापूर्वी सरकारास आपल्या खर्चाच्या प्रत्येक बाबीचा हिशेब रयतेपुढें मांडावा लागेल. पण सरकारास तर हें करणें हिताचें नाहीं. ह्मणूनच त्यांनीं बिचाऱ्या दिवाणी पक्षकारांवर अशा (कोर्ट फी वगैरेच्या) अप्रत्यक्ष रूपानें जबर कर लादला आहे. हा कर उघडपणें नजरेस येत नसल्यामुळें, बिचाऱ्या दिवाणी पक्षकारांच्या ओरडीकडे लोकांचें तादृश लक्ष जात नाहीं. त्यामुळें सरकार निर्धास्तपणें आपलें उत्पन्न वसूल करीत असतें.

प्रत्यक्ष अन्यायाचा प्रश्न जरी बाजूला ठेवला, तरी एकंदर राज्याच्या हितासाठीं कांहीं विशिष्ट व्यक्तीस आपत्ति सोसावयास लावणें हें देखील कितपत न्याय्य आहे याची आह्मांस बरीच शंका आहे. सारांश, जज्जांचे भारी पगार वगैरे गोष्टींनीं सध्यांची न्यायप-द्धति मुळांतच वाजवीपेक्षां फाजिल खर्चाची आहे. त्यांत कोर्ट फी, अपिलांची माळका वगैरे लटांबरांची भर पडल्यामुळें बिचाऱ्या पक्षकारांस न्याय मिळण्याच्या खर्चाचें ओझें अत्यन्त दुःसह झालें आहे. तेव्हां प्रथम हें ओझें जेणेंकरून हलकें होईल अशाविषयीं जारीनें प्रयत्न झाले पाहिजेत. कोर्टफीच्या अप्रत्यक्ष कराचें ओझें कमी होण्याकरितां, **कोर्ट फी ॲक्टाची**

फेरतपासणी होणें तर सर्वथैव इष्ट आहेच. पण त्या बरोबरच अपिलांची संख्या कमी करण्याकरितां, प्रथम चौकशी करणाऱ्या कोर्टाचे अधिकार विस्तृत प्रमाणानें वाढविणें हेंही तितकेंच अगत्याचें आहे. पक्षकारांची सध्यांची दैना दूर करण्यास हाच एक मार्ग आहे.

सध्यांच्या दिवाणी न्यायपद्धतींतील दुसरा एक ढोबळ दोष ह्मटला ह्मणजे तिच्या संबंधाचे कांहीं कायदे हे होत. हे कायदे सर्व साधारण-किंबहुना मोघम-असे असल्यामुळें ज्या त्या खटल्याचें विशिष्ट स्वरूप पाहून योग्य न्याय देण्याचे कामीं त्यांच्या योगानें बराच अडथळा येतो. **कोर्ट फी ॲक्ट, रेजिस्ट्रेशन ॲक्ट, लिमिटेशन ॲक्ट** किंबहुना **सिव्हिल प्रोसिजर कोड** देखील वरील विधानांचीं उदाहरणें होत. आमच्या मतें प्रसंगविशेषीं खऱ्या पक्षकारांस न्याय न मिळण्याचें श्रेय बऱ्याच अंशीं वरील कायद्यांकडे आहे. एखाद्याचा पक्ष खरा असूनही, केवळ कायद्यांतील एखादी बारिक सारिक अट पुरी केली नाहीं, एवढ्याचकरितां बिचाऱ्यास स्वतःच्या हक्कांस व जिंदगीस कधीं कधीं मुकावें लागतें! पण तेंच एखादा खोटा पक्षकार आपल्या कावेबाजपणानें व धूर्ततेनें कायद्याच्या आटोक्यांतून सुटून, प्रसंगविशेषीं वरिष्ठ न्यायसभेंतूनही राजरोस विजयी होऊन येतो. असें पाहिलें ह्मणजे, परकीय न्यायतत्त्वांवर उभारलेल्या सूक्ष्म व क्लिष्ट कायद्यांचा या देशांत प्रजेस न्याय मिळण्याच्या कामीं कितपत उपयोग होत आहे अशाविषयीं एखाद्याच्या मनांत संशय उत्पन्न झाल्यास नवल नाहीं. ज्या त्या खटल्याचा त्याच्या विशिष्ट परिस्थितीवरून निकाल न करितां, केवळ कायद्यांतील एखादी क्षुल्लक व क्लिष्ट अट शाबीत न झाल्यामुळें खऱ्या पक्षकारांसही

नुकसान भोगावयास लावणें ही पद्धत आमच्या मतें कोणत्याही देशांत सारखीच निंद्य व लांछनास्पद समजली पाहिजे. थैली भरपूर असणाऱ्या माणसास आपल्या गरीब प्रतिपक्षापेक्षां 'न्याय' (?) मिळण्याचा विशेष संभव असतो ही सार्वत्रिक समजूत तर प्रसिद्धच आहे. त्यांतही आणखी कायद्यांच्या मखलाशीची भर घालून, बिचाऱ्या खऱ्या पण भोळसट व गरीब पक्षकारांस नाडणें हा न्यायपद्धतीवर मोठाच कलंक आहे यांत शंका नाहीं. **सिव्हिल प्रोसिजर** व **लिमिटेशन ॲक्ट** यांच्या द्वारें किती अन्याय होत असतो याची कल्पना कायदेकामाशीं परिचय नसलेल्या सामान्य लोकांना फारशी नसते. अर्थात्, दिवाणी दाव्यांतील हक्कांनां मुळींच मुदत नसावी किंवा ते दावे चालविण्यास स्वतंत्र पद्धतीची अवश्यकता नाहीं असें कोणीही समंजस मनुष्य ह्मणणार नाहीं. आमचें ह्मणणें इतकेंच कीं, सर्व दाव्यांस एकच मुदत कायमची ठरवून टाकावी; आणि सध्यांची दिवाणी काम चालविण्याची पद्धत हल्लींपेक्षां अधिक साधी व कमी यातायातीची करावी. सध्यांच्या **लिमिटेशन ॲक्टांत** निरनिराळ्या प्रकारच्या दाव्यांस निरनिराळ्या मुदती ठरविल्या असल्यामुळें, अमुक एक खटला कमी मुदतीच्या खटल्याखालीं येतो, किंवा अधिक मुदतीच्या खटल्यांत जातो, हें ठरविण्यास फार मुष्किल पडतें. इतकें करूनही, शेवटीं, वरिष्ठ कोर्टांत वादीनें चुकीची मुदत धरिली असें ठरून बिचाऱ्या पक्षकारास स्वतःच्या योग्य हक्कांस मुकावें लागतें.

या योगानें खऱ्या पक्षकारांस पुष्कळ अन्याय सोसावा लागत आहे! प्रत्येक माणसास आपल्या दाव्यास कोणती मुदत लागू होते हें बिनचूक ठरविण्याची बुद्धि निसर्गतःच प्राप्त

झालेली असते. तेव्हां त्यानें ठरविलेली मुदत चुकीची निघाल्यास त्याचा दोष सर्वस्वी त्याच्याकडेच आहे, अशी कांहीं तरी ओढून ताणून कल्पना केल्याखेरीज सध्यांच्या तऱ्हेवाईक—व कांहीं अंशी अन्यायी—पद्धतीची मीमांसा होणें कठीण आहे. असें असूनही, सरकार मार्फत प्रसिद्ध होणाऱ्या **लॉ रिपोर्टांत** आपल्यास अशीं शेंकडों उदहारणें आढळतील कीं, ज्यांत अशा प्रकारचा अन्याय उघड उघड झालेला दिसतो. याखेरीज रिपोर्टांत प्रसिद्ध न झालेल्या हजारों दाव्यांची संख्या निराळीच! असे कितीतरी खटले कोर्टापुढें येतात कीं, ज्यामध्यें वादीचा पक्ष खरा असूनही, केवळ कायद्याच्या दोरीसूद शिस्तीचें त्याच्या हातून यत्किंचित् उल्लंघन झाल्यामुळें, बिचाऱ्याचा हक्क कोर्टाकडून नाकारला जातो; आणि त्या दाव्यास दुसऱ्या कोणत्या तरी फिर्यादीचें रूप देऊन निराळ्या मार्गानें खटपट केल्याशिवाय त्याच्या हक्काची शाबिती होण्याची आशा नाहीं असेंही त्यास सांगण्यांत येतें!

आतां, अशा तऱ्हेचे अन्याय होतां होईल तों होऊं नयेत अशाविषयीं कायदे करणारांनीं कांहीं प्रयत्न केले आहेत हें खरें आहे. उदाहरणार्थ ' दाव्यांची किंमत ठरविण्याच्या कायद्यांत—**सूटस् व्हॅल्युएशन ॲक्ट**—दावे घेणाऱ्या कोर्टाचे अधिकार ठरवून टाकिले आहेत. किंवा दुसरें उदाहरण **सिव्हिल प्रोसिजर** मधील ५७८ वें कलम होय. त्यामध्यें कांहीं विशेष खटल्यांत ठरींव शिस्तीचें थोडें उल्लंघन झाल्यास, मूळ दाव्यास बाध येणार नाहीं असें ठरवून टाकिलें आहे. पण अशीं उदाहरणें फार थोडीं आहेत. आमच्या मतें, सिव्हिल प्रोसिजर आणि **लिमिटेशन, कोर्ट फी** व **रेजिस्ट्रेशन** हे कायदे हल्लींपेक्षां अधिक साधे व सुलभ कर-

ण्याकरितां होईल तितक्या लवकर कमिशन नेमणें फार फार जरूर आहे. **कोर्टफीज ॲक्टाच्या** नांवाखालीं दररोज किती भयंकर अन्याय होत आहेत याचें योग्य वर्णन करणें अशक्य आहे. देशांतील अनेक अनुभवी व कसलेल्या वकील व न्यायाधीश लोकांना देखील तें एक गौडबंगालच आहे! अमक्या एका खटल्यांत किती रुपयांचा स्टांप लाविला असतां न्यायाधिशास ती फिर्याद ग्राह्य होईल हें अगाऊ बिनचूक ठरविणें फार कठीण काम आहे. त्याचप्रमाणें एखाद्यानें आपल्या दाव्याची मुदत वाजवीपेक्षां फाजिल धरून त्याप्रमाणें फिर्यादही दाखल केली असें समजा. पुढें त्या खटल्याची वास्तविक मुदत संपण्याच्या सुमाराला, ही त्याची चूक कोर्टाच्या नजरेस आली, तर तेवढ्याच करितां बिचाऱ्याचा हक्क कोर्टाकडून ताबडतोब रद्द करण्यांत येतो. सध्यांच्या न्यायपद्धतीच्या गैरशिस्तपणाचें दुसरें एक विलक्षण उदाहरण देतों. खालच्या कोर्टानें जर चुकून कमी किंमतीचा स्टांप कबूल केला तर अपिलाचे वेळीं वरिष्ठ कोर्टाला ती तूट भरून काढण्याचा अधिकार आहे. नव्हे, त्यांनीं तसें केलेंच पाहिजे असा सक्त नियम आहे. पण तेंच खालच्या कोर्टानें जर फिर्यादीस बेकायदेशीरपणें वाजवीपेक्षां फाजिल स्टांप लावण्यास भाग पाडलें असेल तर, ही वसूल केलेली फाजील रक्कम बिचाऱ्या पक्षकारास वरिष्ठ कोर्टाकडून परत मिळण्याची आशा नसते! **स्टांप, रेजिस्ट्रेशन, लिमिटेशन,** वगैरे कायद्यांच्या अर्थासंबंधानें निरनिराळ्या हायकोर्टांचे अगदीं भिन्न भिन्न अभिप्राय पडलेले असे खटले सरकारी रिपोर्टांत किती तरी आहेत! ही जी असमाधानकारक स्थिति दिवसानुदिवस वाढत आहे, तिच्यावरून आमच्या न्यायपद्धतींत

कांहीं तरी भयंकर रोग शिरला आहे असें स्पष्ट दिसतें; आणि त्यामुळेंच, कायद्याच्या एखाद्या क्षुल्लक मुद्यावर भिस्त ठेवून आपली बाजू जिंकण्याच्या आशेनें पक्षकारांना पदोपदीं फिर्यादी करण्यास उत्तेजन मिळत आहे. असो. ही शोचनीय स्थिति सुधारण्याकरितां एक कमिशन नेमण्यांत यावें असें वर सांगितलेंच आहे. या कमिशनमध्यें कमिशनर नेमावयाचे ते कांहीं हुशार, वाकबगार आणि अनुभविक असे सरकारी अधिकारी आणि त्यांच्या जोडीला न्यायशास्त्राचीं उदात्त तत्वें पूर्णपणें जाणणारे असे निस्पृह व पोक्त देशी गृहस्थही नेमावे. त्यांनीं सध्यांच्या कायद्यांची अंमलबजावणी कशी काय होते याची नीट काळजीपूर्वक चौकशी करून न्यायपद्धति चिरस्थायी व समाधानकारक होण्यास तिच्यांत कोणत्या सुधारणा करणें इष्ट आहे तेंही त्यांनीं सुचविलें पाहिजे. सारांश ब्रिटिश लोकांची, चोख व निःपक्षपाती न्याय देण्याविषयीं जी साऱ्या जगभर योग्य ख्याति आहे, तिला हिंदुस्थानांतील न्यायपद्धतींत असणाऱ्या दोषांनीं व उणीवांनीं काळिमा लागू नये अशाविषयीं सरकारानें नेहमीं दक्ष असलें पाहिजे.

---

## फौजदारी न्यायपद्धति.

आतां फौजदारी न्यायपद्धतीविषयीं विचार करूं. या खात्यांतील प्रमाणभूत ग्रंथ ह्मणजे अर्थात **'इंडियन पीनलकोड'** हें होय. त्यांतही निरनिराळ्या स्थानिक कायद्यांची भर पडली आहे. हें कोड प्रसिद्ध **मेकॉले** साहेब यांनीं केलेलें असून, त्यांत दिलेल्या गुन्ह्यांच्या सूक्ष्म, संक्षिप्त व व्यापक

व्याख्यांमध्यें आणि त्यांस ठरविलेल्या शिक्षांच्या भयंकर प्रमाणांत या पुरुषाचें अलौकिक बुद्धिवैभव चांगलें प्रत्ययास येतें. त्यांच्या या प्रचंड कृतीनें सर्व लोक अगदीं चकित होऊन गेले; आणि आमच्या लोकांस, ही न्यायरचनेची पद्धत अपूर्व असल्यामुळें, प्रथम जणूंकाय आपल्यावर आकाशांतील कुऱ्हाड पडली आहे असें त्यांस भासलें. परंतु गेल्या चाळीस वर्षांत लोकांस या कोडाची योग्यता व उपयुक्तता बरीच कळूं लागली आहे. त्यामुळें, तें मंजूर झालें त्यावेळीं लोकांचीं मनें जशीं त्रस्त व क्षुब्ध झालीं होतीं तशीं तीं आतां नाहींत. तरी देखील, लहान सहान अपराधांपासून मोठमोठ्या अपराधांपर्यंत ज्या शिक्षा त्या कोडांत सांगितल्या आहेत, त्यांच्या वाजवीपणाचा व त्यामध्यें एकेकट्या जज्जाला किंवा माजिस्ट्रेटाला जे अधिकार व जी मुभा ठेविली आहे तिचा मेळ कसा बसवावा हें बऱ्याच लोकांना अजून मोठें गूढ वाटतें. अशा गोष्टींत सर्व कांहीं जज्जाच्या किंवा मॅजिस्ट्रेटाच्या मर्जीवर सोंपविल्यामुळें, बरेच वेळां त्यांच्या लहरीस व विशिष्ट कलांस बरीच सवलत मिळून, साध्या अपराधांस देखील कधीं कधीं वाजवीपेक्षां फाजील कडक शिक्षा देण्याकडे त्यांची प्रवृत्ति झालेली दिसून येते. म्हैसूरचे माजी दिवाण आणि आमच्या देशांतील अर्वाचीन काळांतील प्रमुख मुत्सद्दी यांनीं या संबंधानें पुढील प्रमाणें उद्गार काढले आहेत:—

"जर केवळ लोकांस आलेल्या अनुभवावरून सदहू **कोडाचें** वर्णन करूं लागलों, तर तें **कोड** अत्यंत निर्दयतेचें आणि जाचणुकीचें साधन आहे असें ह्मणावें लागेल. कारण कोणत्याही प्रकारचा गुन्हा कोडांतून गाळला जाऊं नये अशा विषयींच्या फाजील काळजीनें त्यांतील व्याख्या इतक्या मोघम व व्यापक झाल्या आहेत कीं, अर्थाच्या जराशा ओढाताणीनें साधे अपराध देखील कधीं कधीं

भयंकर गुन्ह्यांच्या स्वरूपाचे होऊं शकतात. तसेंच जबर अपराधांनां जबर शिक्षा करण्याच्या धोरणाकडे विशेष लक्ष राखल्यामुळें, बऱ्याच अपराधांनां वाजवीपेक्षां फाजील कैदेची शिक्षा व प्रसंगविशेषीं अमर्याद दंडही ठेवण्यांत आला आहे. या योगानें निगर्गट्ट बनलेल्या दरोडेखोराप्रमाणेंच एखादा भाबडा व इभ्रतदार माणूसही अरेरावी व लहरीबाज सरकारी अधिकाऱ्याच्या तावडींत सांपडण्याचा संभव आहे. आपल्या हातून एखादेवेळेस भान न राहून जरा एखादी अविचाराची गोष्ट घडल्यास, आपण **पिनलकोड**च्या तडाक्यांत सांपडणार नाहीं असें कोणालाही खात्रीनें सांगतां यावयाचें नाहीं. इतकेंच नव्हे; तर प्रसंग विशेषीं त्याबद्दल अशीही एखादी–उ० कैद वगैरेची–शिक्षा होण्याचा संभव आहे कीं, ज्या योगानें बिचाऱ्याची समाजांतील रुढ धार्मिक व आचारविषयक कल्पनांप्रमाणें नाचक्की होऊन त्यास आपल्यास दिलेली शिक्षा समाजांतील मरणच असें वाटेल. अशा तऱ्हेचा शिक्षा करण्याचा अधिकार अमर्याद असल्यावर, त्याचा कधींही दुरुपयोग होणार नाहीं असें मानणें व्यर्थ होय. हे सर्व अनर्थ टाळ-ण्यास, सध्याचें **पिनलकोड** जर अधिक सौम्य व लोकांच्या सामा-जिक समजुतीस अंशतः ग्राह्य असें करण्यांत येईल, तर फार बरें होईल. सामान्य प्रकारच्या गुन्ह्यांत कडक शिक्षा होण्याकडे विशेष लक्ष ठेवण्यापेक्षां, कांहीं तरी शिक्षा खात्रीनें झाली पाहिजे इतकेंच धोरण कायदे करितांना राखलें तरी पुरें होणार आहे. शिवाय सगळ्याच कोर्टांस अमर्याद हक्क न ठेवतां, कांहीं विशेष हक्क फक्त वरिष्ठ कोर्टां पुरतेच ठेवण्यांत यावे. याच दोन सुधारणांची देशास सध्यां फार जरूर आहे."

दिवाणबहादूर **श्रीनिवास राघव आयंगार** ह्यांचा एक अभिप्राय आह्मी मागें दिलाच आहे; तेही या संबंधानें असें ह्मणतात:–

"गेल्या तीस वर्षांत या कोडाच्या अंमलबजावणीचा बराच अनुभव येऊन त्यांतील कलमांचा अर्थ हळूहळू ज्यास्त समजूं लागला. त्या योगाने, पूर्वीं त्याच्या संबंधानें जी विलक्षण दहशत

वाटत असे, ती आतां पुष्कळ कमी झाली आहे. तरी देखील, त्यामध्यें कित्येक अपराधांना सांगितलेल्या शिक्षा लोकांच्या समजुतीस प्रतिकूल व त्यांच्या धार्मिक, व सामाजिक आचाररूढींस विघातक अशा आहेत. उदाहरणार्थ कित्येक गुन्ह्यांत जामीन न घेणें; किंवा जात, दर्जा वगैरेचा विचार न करितां सर्व स्त्रियांस हजर राहण्याविषयीं भाग पाडणें, इत्यादि गोष्टी होत. ज्यांत जामीन घेतां येत नाहीं अशा गुन्ह्यांत जामीन न घेतल्यामुळें, कित्येक प्रांतांतील इभ्रतदार हिंदूंस समाजाकडून ताबडतोब बहिष्कृत करण्यांत येतें. म्हणजे त्या अपराधाची शाबिती होण्या न होण्यापूर्वीच, त्या अपराधाच्या मानानें किती तरी कडक शिक्षा बिचाऱ्यास अगाऊ भोगावी लागते. त्याचप्रमाणें **खानदानींतील स्त्रियांस पक्षकार किंवा साक्षी या नात्यानें कोर्टांत यावयास भाग** पाडण्यानें खोडसाळ व कुत्सित बुद्धीच्या फिर्यादींनां मात्र उत्तेजन मिळतें. कारण त्या भीतीनें पैसे देऊन फिर्यादीचें तोंड दावण्याकडे त्या बिचाऱ्यांची साहजिकच प्रवृत्ति होते. अर्थात, हा लभ्यांश मनांत आणूनच फिर्याद करण्यास पुढें सरसावलेल्या धूर्त व कावेबाज लोकांच्या तें चांगलेंच पथ्यावर पडतें."

वरच्या मार्मिक अभिप्रायांत आणखी कांहीं भर घालण्याची जरूर नाहीं. फौजदारी कायद्याच्या अंमलबजावणीसंबंधानें आह्मीं जें मत दिलें आहे, तें किती यथार्थ आहे हें वरील उताऱ्यांवरून चांगलें कळून येईल. अर्थात होतां होईल तों जातीभेद, क्षुद्र सामाजिक दुराग्रह वगैरे गोष्टींस कायद्यांत नसतें महत्व देऊन त्याची योग्यता कमी करण्यापेक्षां, कायद्यांत नमूद केलेल्या उदात्त नीतीची कल्पनाच सर्व लोकांस समजून देण्याचा प्रयत्न करणें अधिक समंजसपणाचें आहे, हें आह्मांसही निःसंशय कबूल आहे. पण ज्या बाबतींत नीतितत्वें आणि लोकांच्या प्रचलित समजुती यांमध्यें फारच अंतर व

विरोध आहे, अशा बाबतींत कायद्यानें लोकमतास मान देणें हाच श्रेयस्कर मार्ग आहे. प्रसिद्ध इंग्लिश कायदेपंडित **बेन्थाम** हा होण्यापूर्वी, **इंग्लंडांतील** असलेला क्रूर फौजदारी कायदा इंग्लंडांतील ज्यूरींनीं भूतदयेच्या जोरावर तत्कालिन कायद्यांच्या धाब्यावर बसवून जरी पूर्ण रद्द नाहीं तरी सौम्य केला. परंतु बिचाऱ्या आमच्या या देशाची तशी स्थिति नाहीं. आमच्या देशांत फौजदारी न्यायाची बजावणी करणारे लोक परकीय असल्यामुळें त्यांना आमच्या लोकांचे मनोविकार, आचारविचार वगैरेची माहिती नसते व त्याबद्दल त्यांना आदर किंवा सहानुभूति वाटत नाहीं. त्यामुळें, फौजदारी न्यायाची वाजवीपेक्षां फाजील कडकपणानें अंमल बजावणी होऊन, बिचाऱ्या रयतेस अप्रत्यक्ष पण असह्य जुलूम सोसावा लागतो.

फौजदारी न्यायाची अंमलबजावणी मुख्यतः युरोपियन जज्ज व तीन वर्गांचे ( प्रतीचे ) मॅजिस्ट्रेट यांच्या मार्फत होत असते. त्यांपैकीं सेशनमध्यें चाललेल्या खटल्यांत आपापल्या प्रांतांतील हायकोर्टाकडे अपील करण्याचा हक्क पक्षकारांस असतो. इलाख्यांतील मुख्य शहरांतल्या सेशनचें काम फक्त ज्यूरी मार्फत चालतें; व बाकीच्या सेशनकोर्टांत प्रांतिक सरकारानें गुन्ह्याचें जें स्वरूप ठरविलें असेल, त्याप्रमाणें ज्यूरी किंवा असेसर यांच्या मदतीनें जज्ज सेशनचें काम पहातो. तिन्ही वर्गांच्या मॅजिस्ट्रेटच्या जाग्यांवर, युरोपियन **सिव्हिल सर्व्हंट** किंवा एतद्देशीय लोक असतात. फौजदारी कामांतील अपील ऐकण्याचें काम बहुधा युरोपियन मॅजिस्ट्रेट किंवा जज्जच करितो. हिंदुस्थानवासी एतद्देशीयांला, ( इलाखा शहरें खेरीज करून ) आपली चौकशी ज्यूरी मार्फतच व्हावी असें हक्कानें मागण्याचा अधिकार नाहीं. पण तेंच

कोणाही गोऱ्या ब्रिटिश रयतेला वाटेल त्या फौजदारी खटल्यांत आपली चौकशी ज्यूरी मार्फत करवून घेण्याचा हक्क आहे. **ईस्ट इंडिया कंपनी**च्या अमदानींत जो गोऱ्यांत व काळ्यांत भेद करण्यांत येत असे त्याचेंच हें अवशिष्ट चिन्ह आहे. अलीकडे तर असा भेद असणें सर्वथैव इष्ट आहे, असें, कांहीं क्षुद्रबुद्धि व आपस्वार्थी लोकांकडून मोठ्या आवेशानें प्रतिपादण्यांत येतें, पण हा भेद इंग्लिश कायद्याच्या मूळतत्वास सर्वथैव विरोधक आहे. आपल्या सजातीयांकडून चौकशी करून घेण्याचा हक्क हिंदुस्थानांतील एतद्देशीय लोकांस न देण्याचें कारण कित्येक लोक कधीं कधीं असें सांगतात कीं, खुद्द विलायतेंत देखील ही पद्धत अजून फारशी रुळली नाहीं; त्यामुळें तेथेंही न्यायाची योग्य अंमलबजावणी होण्यास हिचा तादृश उपयोग होत नाहीं. इतकेंच नव्हे; तर कित्येक विशेष बाबतींत या पद्धतीपासून उलट नुकसानच होतें. याकरितां, या देशांतील लोकांस हा हक्क एकदम देणें चांगलें नाहीं. ह्या कारणांत फारसा तथ्यांश नाहीं. फौजदारी खटल्यांत या पद्धतीचा चांगला उपयोग होत नाहीं असें ह्मणण्यापेक्षां, कांहीं राजकीय कारणांमुळेंच तो हक्क आमच्या लोकांस देण्याला सरकार तयार नाहीं, असें मानणें आमच्या मतें विशेष सयुक्तिक व संभवनीय दिसतें. फौजदारी न्यायाची अंमलबजावणी ही राज्यकारभाराच्या प्रमुख अंगांपैकीं एक आहे. तेव्हां अपराध्यांना शिक्षा करावयाचा अधिकार, अपराध्याच्या देशबांधवांच्या हातीं न ठेवितां, राज्यकर्त्यांच्याच हातीं असणें राजकीय दृष्ट्या हिताचें आहे, अशी सरकारची समजूत असावीसें दिसतें. या देशांतील जाति, धर्म वगैरेंची भिन्नता आणि निरनिराळ्या धर्मपंथांचा

व पोटजातींचा परस्परांविषयीं असलेला द्वेष हेंही एक हक्क न देण्याचें कारण म्हणून पुढें करण्यांत येतें. परंतु, आमच्या मतें, प्रस्तुत बाबतींत हें कारण मुळींच सयुक्तिक नाहीं. कारण, ज्या देशांमध्यें अशा तऱ्हेची धर्मभिन्नता, जातिभेद वगैरे कांहीं नाहीं, अशा देशांत देखील कित्येक वेळां ज्यूरीच्या नालायकीविषयीं अथवा त्यांच्या अभिप्रायाच्या वेडगळपणा-विषयीं टीका होत असते. हें सर्व देशांत चालवयाचेंच. एखादे वेळीं ज्यूरीच्या अपात्रतेमुळें, किंवा त्यांनीं जाणूनबुजून पक्षपाती निकाल दिल्यामुळें, थोडेंसें नुकसान होईल हें खरें आहे; तथापि, इतर बहुतेक प्रसंगीं अपराध्याच्याच देशबांधवां-पैकीं समंजस सुशिक्षित व नीतिमान गृहस्थ घेतल्यानें योग्य न्याय करण्यास जी महत्त्वाची मदत होते, तिच्या मानानें हें नुकसान कांहींच नाहीं असें म्हटलें पाहिजे. ज्यूरीची पद्धत सरसकट सुरू केल्यास, प्रत्येक समंजस मनुष्यास फौजदारी कायद्याचें व न्यायपद्धतीचें महत्त्व कळून येईल आणि सर्व लोकांच्या मनांत त्या पद्धतीविषयीं सादर विश्वासबुद्धि उत्पन्न होईल. ज्यूरीपद्धतीच्या योगानें, प्रत्येक मनुष्यास नाग-रिक या नात्यानें आपली जबाबदारी व कर्तव्यें काय आहेत हें समजून घेण्यास चांगलें साधन होतें. सारांश, ज्यूरीपद्धतीमुळें प्रसं-गविशेषीं जरी थोडें नुकसान होत असलें तरी, वर सांगितलेल्या फायद्यांवरून तिची एकंदर उपयुक्तता निर्विवाद सिद्ध होते, असें आह्मांस वाटतें. शिवाय, त्या पद्धतीपासून हल्लीं जें थोडेंसें नुकसान होत आहे—असेल—त्याचा प्रतिकार करणें फारसें कठीण आहे असें नाहीं. ज्या ठिकाणीं ज्यूरीचें मत उघडउघड चुकलें आहे किंवा ज्यूरी जाणून बुजून खोटा अभिप्राय देत आहे असें जज्जास वाटेल; किंवा ज्यांत त्याचा

व ज्यूरीचा मतभेद होईल, असे खटले हायकोर्टाकडे निकाला-
करितां पाठविण्याचा सेशन जज्जाला हल्लीं एक अधिकार
आहेच. त्याचप्रमाणें, एखाद्या खटल्यांत ढळढळीत अन्याय
झाला आहे असें हायकोर्टाच्या निदर्शनास आल्यास, त्या खट-
ल्याची स्वतः चौकशी करण्याचा अधिकार हायकोर्टाकडे
ठेवला ह्मणजे, वरच्यासारखे प्रकार बरेच कमी होतील
यांत शंका नाहीं. सध्यांच्या पद्धतींत दुसरीही एक गोष्ट
विचार करण्यासारखी आहे. ती ही कीं, सेशनमध्यें सुटलेल्या
प्रत्येक फौजदारी खटल्याविरुद्ध हायकोर्टाकडे अपील
करण्याचा सरकारास अधिकार आहे. परंतु, हा हक्क सध्यां-
पेक्षां अधिक मर्यादित होणें इष्ट आहे. खालच्या कोर्टानें
सोडून दिलेल्या दरेक लहानसहान खटल्यांत ( सरकारच्या
अपिलावरून ) जर हायकोर्ट मन घालूं लागलें, आणि
पदोपदीं खालच्या कोर्टाचा आणि त्याचा मतभेद पडून
सुटलेल्या आरोपितास शिक्षा होऊं लागली, तर, त्या योगानें
लोकांच्या मनांत न्यायपद्धतीविषयीं बराच गैरसमज व
अविश्वास उत्पन्न होण्याचा संभव आहे. कारण हा मतभेद
तरी केवळ दोन कोर्टांमधीलच आहे, आणि तो तसा पुष्कळ
वेळ होणें साहजिक आहे. तेव्हां दरवेळेस अशी चिकित्सा
करीत गेल्यास, ' आरोपीस संशयाचा फायदा मिळाला
पाहिजे, हें जें इंग्रजी कायद्याचें उदात्त तत्त्व आहे त्यास पूर्ण
हरताळ लागेल. ह्मणून आमची अशी सूचना आहे कीं,
जेथें अन्याय झाला आहे असें वाटेल अशा खटल्याखेरीज,
इतर कोणत्याही खटल्यांत सरकारानें हा अपिलाचा हुकूम
सहसा बजावूं नये. फौजदारी कायद्याच्या अंमलबजावणी संबं-
धानें दुसरा एक महत्वाचा प्रश्न अलीकडे कांहीं वर्षांत वि-

शेष उपस्थित झाला आहे, व त्याविषयीं इंग्लंडांत आणि या देशांत बरीच चर्चा होऊं लागली आहे. हा प्रश्न ह्मणजे न्यायखातें आणि अंमलबजावणी खातें यांच्या फारकतीचा होय. **इंडिया** पत्र जे नियमानें वाचीत असतील, त्यांना सदहू फारकतीच्या तर्फेचीं कारणें चांगलीं अवगत झालीं असतीलच. कारण, त्या पत्रांत या प्रश्नाविषयीं जे लेख येतात ते, या देशांत बरींच वर्षे अनुभव घेतलेल्या व नामांकित अशा अँग्लो-इंडियनांनीं लिहिलेले असतात. त्यामुळें त्यांतील विवेचन फार मुद्देसूद, इतर कोठेंही एकत्र रूपानें न मिळणाऱ्या अशा महत्वाच्या माहितीनें भरलेलें आणि कळकळीचें असें असतें. आमच्यांतीलही कांहीं लोकांनीं यांविषयीं निरनिराळ्या चळवळी उभारून, त्या प्रश्नाच्या माहितीचीं हस्तपत्रकें वांटून, विलायतेंतील व येथील लोकमत जागृत करण्याकरितां अश्रांत श्रम केले आहेत; व अजूनही करीत आहेत. यांत प्रमुख ह्मटले ह्मणजे परलोकवासी **बाबू मनमोहन घोस,** व हल्लीं विलायतेंत असलेले **रमेशचंद्र दत्त** हे होत. इतकेंच नव्हे, तर ज्यावेळीं या प्रश्नाची चर्चा हाउस ऑफ् लॉर्डस मध्यें झाली, त्याचवेळीं न्यायखातें व अंमलबजावणी खातें एकत्र ठेवण्यापासून होणाऱ्या अनिष्टांची कल्पना नामांकित ब्रिटिश मुत्सद्दयांना होऊन चुकली होती. त्या प्रसंगीं झालेला वादविवाद मनोरंजक व बोधप्रद आहे. या परस्परविरुद्ध खात्याचें संमेलन केल्यापासून न्यायाच्या योग्य अमलबजावणीस कसा विरोध येतो, तें त्यावरून स्पष्ट कळून येण्यासारखें आहे.

बंगालचे सुप्रसिद्ध मार्जी **चीफ जस्टिस, सर रिचर्ड गार्थ** यांनाही या संमेलनापासून उद्भवणाऱ्या अनर्थांची चांगली

अटकळ झाली होती. त्यांनीं या संबंधानें एक लेख लिहिला आहे. त्यांतील कांहीं भाग विशेष मुद्देसूद व आमच्या ह्मण-ण्यास पुष्टी देणारा असा वाटल्यावरून, तो येथें देतों:—

" सर्व खेड्यास घाबरवून टाकणारा असा एक भयंकर दरोडा पडल्याची खबर आलेल्या गांवांतील पोलीस, पाटील, वगैरे मंडळींचा सल्ला घेऊन, गुन्हेगाराच्या शोधास एक तरुण वांड व उमेदी मॅजि-स्ट्रेट लागले आहेत अशी कल्पना करा. एकदां दोनदां त्यांचे प्रयत्न निष्फळ होऊन, तिसऱ्या खेपेस त्याच्या हातीं एखादा माणूस सांप-डतो; आणि तोच खरा गुन्हेगार होय अशीही त्याच्या मनाची पक्की खात्री होऊन जाते. मग पूर्वीच्याच मंडळाच्या अंतस्थ सल्लामसलतीनें त्या माणसाची बारीक चौकशी करण्याविषयीं तो हुकूम सोडतो. त्यांच्याच द्वारें जी माहिती येईल, ती तो स्वतः पुढील चौकशींत दाखल करितो; प्रसंगविशेषीं, वहिमानें धरलेल्या माणसावर गुन्ह्याची शाबिती होण्याकरितां, योग्य पुरावा 'हुडकून' (!) काढण्यास किंवा 'तयार' (!) करण्यास मुदतही देतो! याप्रमाणें खटल्याच्या पूर्व-भागांतील आपलें काम मोठ्या उत्सुकतेनें केल्याबद्दल त्यास धन्यता वाटते. नंतर, 'माजिस्ट्रेट' या नात्यानें हे साहेब त्या खटल्याची चौकशी करण्यास न्यायासनीं विराजमान होतात! आणि जो पुरावा गोळा करण्यांत आपण मदत केली तो पुरावा आरोपीवर खटला चालविण्यास पुरेसा (!) आहे कीं नाहीं, हें पाहण्याचा तो गंभीरपणें आव घालतो. अर्थात्, तो तसा असल्याबद्दल त्याची साह-जिक (!) खात्री होऊन, ज्यूरी वगैरेची मदत न घेतां माजिस्ट्रेट या नात्यानें स्वतःच आरोपीची चौकशी करूं लागतो; आणि शेवटीं त्याच पुराव्यावर गुन्हा शाबित ठरवून, बिचाऱ्या आरोपितास शिक्षा ठोठावतो. इंग्लंडांतील लोकांना वर केलेलें वर्णन किती जरी घोर व भयंकर वाटलें, तरी त्यांत काडी इतकी अतिशयोक्ति नाहीं."

" हिंदुस्थानांतील लोकांचा युरोपियन अधिकाऱ्यांविषयीं सरस-कट बेभरंवसा असतो असें नाहीं. परंतु जो मनुष्य खटला करण्यास-

अप्रत्यक्ष रीतीनें कां होईना--मदत करितो त्याच मनुष्याकडे 'न्याया-याधीश' या नात्यानें त्या खटल्याची चौकशी करण्याचें काम असावें हें खरोखर फार गैरशिस्त व ढळढळीत अन्यायाचें आहे! अशा तऱ्हे-ची लांछनास्पद पद्धत इंग्रजी अमलाखालीं इतके दिवस राजरोस चालू रहावी हीच मोठी आश्चर्याची गोष्ट आहे! वास्तविक पाहिलें तर, माजिस्ट्रेटचें काम अंमलबजावणीचें आहे. तेव्हां तो जिल्ह्यांतील, वरिष्ठ अंमलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्याच्या हाताखालीं असावा हें योग्य आहे; तसेंच, ज्यांच्याकडे जिल्ह्यांतील न्याय बजावणीचें काम आहे, ते सर्व जिल्ह्यांतील वरिष्ठ न्यायाधीशाच्या ताब्यांत असावेत हेंही सयुक्तिक व इष्ट दिसतें. पण फौजदारी कोर्टांना पोलिस अधिकाऱ्यांचे ताबेदार करणें किंवा त्यांना त्यांच्यापेक्षां कमी दर्जाचे समजणें ही पद्धत सर्वथैव युक्तिविरुद्ध व अनर्थकारक आहे. एखाद्या जिल्ह्यांतील जज्जाची बढती करणें न करणें हें तेथील वरिष्ठ पोलिस अमलदाराच्या मर्जीवर ठेवणें ह्मणजे जज्जास त्या अधिकाऱ्याची खुशामत करण्याचा निंद्य मार्ग शिकविणें आहे. सारांश, फौजदारी कोर्टें जोंपर्यंत—प्रत्यक्ष नसलीं तरी वस्तुतः —पोलिस अधिकाऱ्यांच्या दपटशाखालीं आहेत, तोंपर्यंत, त्यांच्या-पासून निस्पृह स्वातंत्र्याची किंवा चोख न्यायाची अपेक्षा करणें अगदीं व्यर्थ आहे!"

इंग्रजी अर्थशास्त्राचा आदिजनक जो प्रसिद्ध **ॲडम स्मिथ** त्याचेंही याविषयीं काय मत आहे, तें खालीं देतों:—

"ज्या ठिकाणीं न्यायखातें व अंमलबजावणी खातें हीं एकत्र असतात, त्या ठिकाणीं कधीं कधीं राजकारणाच्या सबबीवर न्यायाची पायमल्ली झाल्याशिवाय राहवयाचीच नाहीं. राज्यकार-भाराचीं सूत्रें हातीं असणाऱ्या मनुष्यांची स्वभावतः जरी दुष्ट बुद्धि नसली, तरी, 'मुत्सद्दीगिरीच्या' (?) दृष्टीनें, 'राजकारणा' साठीं व्यक्तिक हक्कांची पायमल्ली झाली तर त्यांत कांहीं अन्याय नाहीं, असें त्यांस वाटण्याचा संभव असतो. पण न्यायपद्धति ज्या मानानें चोख,

निर्दोष व निस्पृह असेल, त्या मानानें राज्यांतील प्रत्येक व्यक्तीला स्वतःच्या स्वातंत्र्याविषयीं व जीव जिंदगीच्या सुरक्षिततेविषयीं कमी अधिक भरंवसा वाटत असतो. तेव्हां प्रत्येक व्यक्तीस आपल्या हक्कांविषयीं पूर्ण निर्धास्तपणा वाटेल असें करण्याची इच्छा असल्यास, अंमलबजावणी व न्यायखातें यांची फारकत केली पाहिजे. इतकेंच नव्हे, तर, न्यायाधिकार अंमलबजावणीपासून जितका अलग व स्वतंत्र करितां येईल तितका अवश्य केला पाहिजे."

आतां, या फारकतीपासून सरकारी तिजोरीस अधिक खर्च येईल, हीही भीति निराधार असल्याचें निर्विवाद सिद्ध झालें आहे. कारण, **मार्किस** ऑफ् **डफरीन** व **मार्किस** आफ् **लॅन्सडाऊन** सारख्या दोन नामांकित मुत्सद्दी-व्हाइसरायांचें देखील सदर्हू फारकतीस अनुकूल मत पडलें आहे. इतकेंच नव्हे, तर, मद्रास सरकारानें प्रयोगादाखल या बाबतींत अगदीं अल्प व तात्पुरते असे कांहीं प्रयत्न करून पाहिले, व त्यांत त्यांस पूर्ण यश आलें.

एकंदरींत, प्रस्तुत प्रश्नाचा मथितार्थ हा आहे कीं, जीं मनुष्यें अंमलबजावणी खात्यांत कमी अधिक मानानें वरिष्ठ आहेत, आणि ज्यांच्याकडे असे कांहीं अधिकार आहेत कीं, त्यांत बढती मिळण्याच्या आशेनें, गुन्हेगारास शिक्षाच व्हावी असा त्यांचा कल होणें साहजिक आहे—अशाच मनुष्यांना निर्विकार, निस्पृह न्यायाधीश मानून, त्यांच्यापुढें फौजदारी खटल्यांची चौकशी चालविण्याची पद्धत कायम ठेवणें इष्ट आहे काय? इकडील मॅजिस्ट्रेटचा अधिकार (मामलेदार, महालकरी वगैरे असलेले) बहुतेक देशी अमलदार मुलकी खात्याचे वरिष्ठ कामगार असतात; आणि युरोपियन मॅजिस्ट्रेटांकडे देखील न्यायबजावणीच्या कामाखेरीज . . . . .

इतर पुष्कळ लहानसहान कामें असतात. याविषयीं मि. **रमेशचंद्र दत्त** यांनीं पुढील प्रमाणें वर्णन केलें आहे:-

"जिल्हा अधिकारी हाच आपल्या जिल्ह्यांतील पोलिसचा वरिष्ठ अंमलदार असतो. खून वगैरे सारख्या भयंकर अपराधांची चौकशी तोच करवितो. चौकशीवर पाठविलेल्या पोलिस अमलदारांच्या डायऱ्या त्याच्याकडेच येतात; आणि त्या वाचून पाहून त्यावरून तो त्या खटल्याविषयीं आपलें मत बनवितो. तो खटला खरा आहे असें जर त्याला दिसून आलें, तर मग तो चौकशीकरितां आपल्यापुढें पाठविण्याविषयीं हुकूम करितो. त्याप्रमाणें खटला दाखल झाल्यावर, जिल्हा अधिकारी तो आपल्या हाताखालील एखाद्या मॅजिस्ट्रेटकडे सोंपवितो; व त्यावेळीं त्याच्याच हाताखालचा एखादा पोलिस अंमलदार त्याच्या तर्फे फिर्यादीचें काम करितो. हा हाताखालचा मॅजिस्ट्रेट २ ऱ्या किंवा ३ ऱ्या वर्गाचा असला, आणि त्यानें जर आरोपीस शिक्षा केली, तर त्या निकालाविरुद्ध अपील सदर्हू जिल्हा–अधिकाऱ्याकडेच करावयाचें असतें. समजा कीं, असें एक अपील त्या जिल्हा-अधिकाऱ्याकडे आलें; आणि त्यानें तें नामंजूर करून, खालच्या मॅजिस्ट्रेटनें दिलेली सक्त मजुरीची शिक्षा कायम केली; कीं, पुन्हां तो जिल्हा-अधिकारीच स्थानिक तुरुंगाचा मुख्य देखरेख पहाणारा असल्यानें शिक्षा झालेला माणूस तुरुंगांत कसें काय काम करितो, हें पाहण्याची त्याला संधि मिळते. (अर्थात, प्रसंगविशेषीं साहेब मजकुरांच्या मर्जीमाफक होत नसल्यास, विचाऱ्या कैद्याच्या मागें तेथेंही साडेसाती उभी राहणारच.) सारांश, पोलिसमार्फत खटल्याची चौकशी करविणारा अमलदार जिल्हा अधिकारी; खटल्याची चौकशी करणाऱ्या मॅजिस्ट्रेटचा वरिष्ठही तोच; खटल्यांतील फिर्यादी म्हणून तोच ( जिल्हा-अधिकारी ) उभा राहणार; चौकशी करणारा मॅजिस्ट्रेट २ ऱ्या किंवा तिसऱ्या वर्गाचा असल्यास, त्याच्या निकालाविरुद्ध अपील ऐकणारें कोर्ट तोच; आणि शेवटीं शिक्षा झालेला माणूस तुरुंगांत कसें काय काम करितो त्याची देखरेख पहाण्याचें कामही त्याच्याकडेच !–( म्हणजे एका जिल्हा अधिकाऱ्याचीं इतक्या प्रकारचीं रूपांतरें होतात ! )"

शिवाय, मुलकी अमलदाराला न्याय बजावणीचें काम ह्मणजे दुय्यम प्रतीचें वाटणार. तेव्हां 'हुजूरस्वारी' फिरतीवर असतांना त्याच्या मागोमाग मुक्कामामुक्कामाला फिरण्यांत, बिचाऱ्या आरोपिताला जी यातायात व जो खर्च पडतो, तो कांहीं विचारूं नका! त्यांतही खुद्द माजिस्ट्रेट साहेबांच्या लहरी तब्येतीची भर पडून, पहिल्यापासूनच त्याच्याविषयीं त्याचें (मॅजिस्ट्रेटाचें) मन कलुषित झालें नसलें ह्मणजे मोठें भाग्य! एकाच अमलदाराकडे अनेक प्रकारचीं कामें ठेविल्यानें, अन्याय होण्याचा बराच संभव असतो! किंबहुना राजरोस जुलूम करण्यास आयतीच सवड मिळते, असें अनेक अनुभवी व योग्य गृहस्थांचें मत आहे. दोन खात्यांच्या फारकती विषयींच्या चळवळीला, 'सल्लयांचा उत्तम मासला' असें कधीं कधीं सतिरस्कार उपहासानें नांव देण्यांत येत असतें! परंतु खरा विचार केला तर, सदर्हू चळवळीची यथार्तता व व्यवहारिक उपयुक्तता कोणाच्याही लक्षांत येण्यासारखी आहे.

पैशाच्या टंचाईमुळें सरकाराला ही सुधारणा सध्यां अमलांत आणतां येत नाहीं, असें सरकार तर्फे कधीं कधीं सांगण्यांत येतें. सरकारच्या ह्मणण्याप्रमाणें ही सुधारणा अमलांत येण्यास फक्त पैशाच्या टंचाईचीच जर अडचण असेल, तर, आह्मांला वाटतें, सध्यां सरहद्दीच्या स्वाऱ्यांकडे व अवाढव्य लष्करी खात्याकडे जो कोट्यावधि रुपयांचा विनाकारण खर्च होत आहे, तो थोडा कमी करून त्याचा विनियोग सर्व लोकांना संमत अशा या महत्वाच्या सुधारणेकडे केला, तर फार चांगलें होईल. परंतु सरकार तर तसें करण्यास तयार नाहीं. यावरून पैशाची टंचाई ही नेहमीं प्रमाणें कांहीं तरी बाह्यात्कारी सबब असून, सरकार या बाबतीविषयीं पूर्ण उदासीन अथ-

वा विरुद्ध आहे, असें उघड सिद्ध होतें. इंग्रजी साम्राज्याचा बोज व इभ्रत राखण्यास सदर्हू खात्यांची फारकत न होऊं देणें हेंच सर्वथैव अगत्याचें आहे, अशी कित्येकांची समजूत आहे. याविरुद्ध उत्तम पुरावा ह्मटला ह्मणजे बंगालचे माजी **लेफ्टनंट गव्हर्नर सर चार्लस ईलियट** यांचा होय. त्यांनीं सदर्हू विधानाच्या वैयर्थ्याविषयीं आपण होऊन कबुली दिली आहे. या मता इतकें सर्वस्वीं निराधार व शुष्क असें मत दुसरें क्वचित्च असूं शकेल. राजपद्धतीच्या तत्त्वांचें अध्ययन न करितां किंवा गतानुभवाकडे लक्ष न देतां, अधिकार बजावण्यासंबंधानें कित्येक अधिकाऱ्यांच्या पहिल्यापासूनच ज्या अनेक विलक्षण दृढ कल्पना झालेल्या असतात, त्याचाच एक उत्तम मासला वरील समजूत आहे. हीं दोन्हीं खातीं एकत्र ठेवल्यामुळें जे अनेक प्रकारचे घोर अन्याय होत आहेत, त्यांचीं सविस्तर उदाहरणें देण्यास येथें सवड नाहीं. तथापि इतकेंच सांगतों कीं, सालोसाल देशांतील निरनिराळ्या भागांत या देशांतील सर्व सुशिक्षित पुढाऱ्यांची जी 'कांग्रेस' ( राष्ट्रपरिषद ) भरते, तिच्या मध्यें अनेक वेळां या प्रश्नाचा यथास्थित व सप्रमाण ऊहापोह झाला आहे. सदर्हू लेखाचा उद्देश, आरंभीं सांगितल्याप्रमाणें, ब्रिटिश अमलामुळें पूर्वींपेक्षां देशस्थितींत किती महत्वाच्या सुधारणा झाल्या त्यांचें वर्णन करावयाचा नसून, फक्त सध्यांच्या न्यायपद्धतींतील ठळक दोषांचें दिग्दर्शन करण्याचाच आहे. गतकालाचें चिंतन करून आनंद पावणें, किंवा अर्ध्या शतकांत झालेल्या हितकारक सुधारणांकडे पाहून त्यांतच तृप्ति मानणें, हें खऱ्या मानवी स्वभावास कधींही शक्य नाहीं. कारण, जेथें अल्प तृप्ति आली, तेथें प्रगतीची वाढ खुंटली असें समजावें. ह्मणून, उन्नतीच्या अगोदर तिच्याविषयीं

आगाऊ सात्विक असमाधान उत्पन्न होणें हेंच खऱ्या प्रगतीचें मुख्य लक्षण आहे. अशा तऱ्हेच्या असमाधानाला कृतघ्नता (राजद्रोह) वगैरे विशेषणें लावणें कधींही न्याय्य होणार नाहीं.

जागेच्या संकोचामुळें, सध्यांच्या न्यायपद्धतींतील फक्त कांहीं ठळक दोषांचेंच आह्मांस विवेचन करावें लागलें. तथापि या प्रश्नाचा जर कोणी आणखी काळजीपूर्वक व निर्विकार बुद्धीनें विचार करील, तर त्याचेंही या बाबतींत आमच्याच प्रमाणें मत होईल, अशी आमची पूर्ण खात्री आहे.

---

# हिंदुस्थानांतील रेलवे-प्रसार.

( जी. सुब्रह्मण्य अय्यर. बी. ए. 'हिंदु' पत्राचे माजी चालक. )

हिंदुस्थानांतील रेलवेच्या प्रसारास अखंड गति देण्याचें (माजी व्हाइसराय) **लॉर्ड एल्जिन** यांनीं जणूं काय ब्रीदच अंगिकारिलें होतें, व तें त्यांनीं आपल्या अमदानींत अखंड चालविलें. त्यांच्या कारकीर्दीच्या ५ वर्षांत, हिंदुस्थानांतील रेलवेस सुमारें ४५०० मैलांची भर पडून, त्याप्रीत्यर्थ जवळ जवळ ४ कोट रुपये खर्च झाला. दरएक बाबतींत जें मत विशेष प्रचलित असेल, ( त्याच्या युक्तायुक्ततेचा विचार न करितां ) त्याच्याच धोरणानें चालण्याचा माजी व्हाइसरायांचा क्रम असे. त्याप्रमाणें, याही बाबतींत त्यांनीं केलें. हिंदुस्थानाची झपाट्यानें भरभराट होण्याचा खरा मार्ग ह्मणजे त्या देशांत होईल तितका रेलवेचा प्रसार करणें हाच होय, असें बऱ्याच इंग्रज मुत्सद्यांचें एक ठरीव मत आहे. माजी स्टेट सेक्रेटरी **सर हेन्री फौलर** यांचें मत असेंच होतें; व सध्यांचे स्टेट सेक्रेटरी **लॉर्ड जॉर्ज हॅमिल्टन** हेही सदर्हू मताचेच पुरस्कर्ते आहेत. इंग्लंडांतील दानशूर लोक व आपमतलबी व्यापारी ह्यांनीं हिंदुस्थानाची सांपत्तिक विपन्नावस्था नष्ट करण्याचें रामबाण औषध ह्मणून रेलवे बांधण्यांत अगणित पैसा खर्च करावा, ह्या वेडगळ युक्तीची शिफारस केली, व हिंदुस्थानच्या सर्व दुरितांचा नाश करण्यास रामबाण तोडगा ( रेलवेचा प्रसार ) हाच आहे, अशी इंग्लंडांतील लोकांनीं

त्यांनींच या देशांतील रेलवेच्या बाबतींतला खर्च अवाढव्य वाढविण्यास आमच्या सरकारास उत्तेजन दिलें आहे ! आपल्या हिंदी बांधवांस दिवसांनुदिवस येणारें दारिद्र्य पाहून ज्यांना हळहळ वाटते; आणि हजारों लोकांचा संहार करून, लाखों लोकांस कायमचे निःशक्त व पंगू करून देश उध्वस्त करून सोडणारे असे सालोसाल या देशावर पडणारे दुष्काळ पाहून ज्यांना आमच्याविषयीं कळवळा येतो, असे कित्येक थोर व उदारधी इंग्रजलोक देखील हे सर्व अनर्थ टाळण्यास रेलवेचा प्रसार हाच एक उपाय आहे, असें प्रतिपादित असतात. या खेरीज, गोरे भांडवलवाले, कंपनीवाले, पेढीवाले, लोखंडाचे व्यापारी, रेलवेचे इंजिनियर व डायरेक्टर—वगैरे सर्व आपल्या मतलबाकरितां, रेलवे प्रसाराच्या आवश्यकतेविषयीं हूल उठवीत असतात; व याला कांहीं सरकारी (अँग्लो-इंडियन) अधिकारी, आपल्या पेन्शनांत थोडी भर पडेल या आशेनें आपलें पाठबळ देत असतात, अशी स्थिति आहे. हिंदुस्थानचा सर्व परदेशीय व्यापार युरोपियनांच्याच हातीं आहे. शिवाय, त्यांना आतां केवळ समुद्र किनाऱ्यावरील मुख्य मुख्य शहरांत व्यापार करण्याची आवश्यकता राहिली नसून, देशांतील खेड्यापाड्यांत देखील त्यांच्या व्यापाराचा संबंध जाऊन पोहोंचला आहे. तेव्हां, रेलवेचें जाळें सर्व देशभर पसरण्यांत त्यांचा फायदाच आहे. सारांश, हिंदुस्थानचें कल्याण करण्याची उदार इच्छा आणि स्वजातीयांचा फायदा होण्याची उत्तम संधि, या दोहोंचाही इंग्रजी मुत्सद्यांवर इतका प्रबळ परिणाम झाला आहे कीं, त्याचा त्यांच्या हातून प्रतिकार होणें सर्वथैव अशक्य झालें आहे. फार कशाला, आमचे सध्याचे कर्तृत्ववान् व्हाइसराय **लॉर्ड कर्झन** यांना जरी,

प्रजेस सुखकर असे अनेक उपाय शोधून काढण्याच्या कामीं ब्रिटिश लोकांच्या अतुल सामर्थ्याबद्दल अतिशय अभिमान आहे, तथापि, त्यांच्यावर देखील वरील दुहेरी प्रेरणेचा परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं असें उघड दिसतें. आपण आपल्या पूर्वगामी शास्त्याचेंच ब्रीद पुढें चालवूं; व आपल्या अमदानींत सध्यां चालू असलेल्या २३ हजार मैल रेलवेरस्त्यांस आणखी ५ हजार मैलांची तरी भर करूं, अशी आपली आशा असल्याबद्दल, त्यांनीं या देशांत आल्यावर नुकतेंच जाहीर केलें आहे.

रेलवेचा प्रसार हल्लींपेक्षां मुळींच अधिक होऊं नये, असें प्रतिपादन करण्याचा प्रस्तुत लेखाचा उद्देश नाहीं. तर फक्त, त्यांत नेमस्तपणा राखण्याविषयीं आणि इतर देशांप्रमाणें याही देशास रेलवेचें खरें व पूर्ण सुख मिळेल अशा रीतीचें धोरण ठेवण्याविषयीं या लेखांत नम्रपणें सुचवावयाचें आहे. रेलवेपासून या देशास अनेक फायदे झाले आहेत, हें कोणींही नाकबूल करणार नाहीं. देशांमधील अन्नसामुग्री सर्व भागांत सारखी वांटून टाकण्याच्या कामीं त्यांचा किती तरी उपयोग होत आहे? त्याचप्रमाणें, जेथें कांहीं व्यापारास जागा नव्हती, अशा ठिकाणीं नव्या व्यापारास द्वार करून देऊन, एक प्रकारें औद्योगिक चळवळींस त्यांच्याकडून उत्तेजनच मिळालें आहे. लोकस्थिति सुधारण्याच्या बाबतींतही त्यांच्याकडून फार महत्वाची मदत झाली आहे. विशेषतः त्यांच्याचमुळें, दुष्काळासारख्या भयंकर प्रसंगीं समाधानकारक रीतीनें 'मदत कामें' मोठ्या प्रमाणावर चालविणें सरकारास शक्य झालें. त्याचप्रमाणें, सुबत्ता असलेल्या प्रदेशांतील अन्नसामुग्री विशेष ग्रासलेल्या भागांत नेण्याच्या

कामीं, खासगी व्यापाऱ्यांस त्यांची जी मदत झाली ती तर अवर्णनीय होय! हें सर्व आह्मीं पूर्णपणें जाणून आहों; तथापि, देशाच्या सांपत्तिक स्थितीकडे व सरकारी उत्पन्नाच्या अडचणींकडे लक्ष न देतां, सालोसाल लाखों रुपये कर्ज काढून, ते रेलवे वाढविण्यांत खर्च करणें हें कितपत शहाणपणाचें आहे, याविषयीं शंका घेण्यास बरीच जागा आहे. या देशांतील लोकांची स्थिति सुधारण्याचा रेलवे-प्रसार हा एकच उपाय आहे, असें नाहीं. त्या योगानें नवीन संपत्तीचें उत्पादन होत नसून, उपलब्ध असलेल्या संपत्तीचा विभाग फार तर होऊं शकेल. परंतु तेच, नाले, कालवे, वाढविले तर, त्यायोगानें ज्या ठिकाणीं रयतेला १ मणभर गहूं पिकवितां येत असे, तेथें २ मण पिकविण्यास तरी मदत होते; किंवा सशास्त्र औद्योगिक शिक्षणाची पद्धत या देशांत सुरू केली, तर या देशाच्या कलाकौशल्याच्या सद्यःस्थितींत केवढें तरी अंतर पडेल? व निरनिराळ्या हुन्नरांत योग्य स्पर्धा सुरू होऊन, कारागिरांची केवळ वंशपरंपरा मिळालेल्या शिक्षणावर भिस्त न रहातां, त्यांच्या आंगच्या कल्पकतेस व शोधक बुद्धीस उत्तेजन मिळेल. अशा रीतीनें, त्यांची सध्यांची दैना जाऊन, त्यांना बरीच सुस्थिति येईल. परंतु औद्योगिक शिक्षणाकडे हिंदुस्थान सरकारचें जावें तितकें लक्ष जात नाहीं, ही गोष्ट सरकारच्या मित्रांस देखील कबूल आहे. त्याचप्रमाणें कालवे, पाट, यांची वृद्धि करण्यासंबंधानेंही सरकारची प्रवृत्ति वरवर व मंद असून, रेलवेकडे जितका त्यांचा सढळ हात आहे, तितका तो या बाबतींत नाहीं. वस्तुतः पहातां, दुष्काळांपासून लोकांचें संरक्षण होण्यास ज्या ज्या भागांत रेलवे असावी, असें दुष्काळ-कमिशननें सुचविलें होतें,

अशा सर्व भागांत रेलवे होऊन चुकली आहे. तेव्हां आतां तरी, मोठमोठ्या कर्जाऊ रकमा काढून ज्यांच्यापासून व्यापारास किंवा दळणवळणास तादृश उपयोग नाहीं, अशा नवीन रेलवे उभारण्याची फारशी आवश्यकता राहिली आहे असें आह्मांस वाटत नाहीं.

निरनिराळ्या रेलवे कंपन्या जें भांडवल देतील, किंवा रेलवेपासून जें उत्पन्न होईल, त्या खेरीज, दरसाल रेलवे प्रसाराप्रीत्यर्थ, सरकारानें २९ लक्ष पौंडांपेक्षां जास्त रक्कम कर्जाऊ काढूं नये, असें सन १८८१ सालीं नेमलेल्या **पार्लमेंटरी कमिटीनें** ठरविलें होतें. पुढें सन १८८४ त नेमलेल्या कमिटीनें ही २९ लक्षांची मर्यादा २९॥ लक्ष पौंड केली. परंतु हिंदुस्थान सरकारानें सरहद्दीवरील रेलवेचें काम उपस्थित केल्यामुळें, थोड्याच वेळांत कर्जाची रक्कम वरील यत्तेच्याही बाहेर गेली; त्याशिवाय कांहीं वर्षी आणखी जादा खर्च येत, ते निराळेच. सन १८९६ पासून तर, रेलवे प्रीत्यर्थ होणाऱ्या खर्चाचें मान सरासरीनें दरसाल १० कोट रुपयांपर्यंत वाढलें आहे! सन १८९६ पूर्वी असलेलें खर्चाचें धोरण देशस्थिति सुधारण्यास पुरेसें नाहीं, असें माजी व्हाइसराय **लॉर्ड एल्जिन** यांस वाटून, त्यांनीं आपलें नवीन योजलेलें धोरण पुढील प्रमाणें, अत्यंत आशादायक, गौरवाच्या व भरंवशाच्या शद्बांनीं देशास जाहीर केलें. लाट साहेब ह्मणाले:—

"रेलवेचा प्रसार करून देशाची सुधारणा करण्याचें ब्रीद हिंदुस्थान-सरकारानें आज किती तरी दिवसांपासून अंगिकारलें आहे. तेव्हां, आणखी नवीन व सविस्तर युक्तिवादानें त्याचें समर्थन करण्याची आवश्यकता नाहीं. हिंदुस्थानासारख्या, मुख्यत्वेंकरून शेतकीवर उदर-निर्वाह करून राहणाऱ्या अफाट देशाची संथपणानें व खात्रीनें स्थिति

सुधारणारा असा हा ( रेलवे-प्रसाराचा ) एकच मार्ग आहे. मध्यप्रांताच्या तर्फेचे नामदार सभासद यांनीं जें सांगितलें कीं, शेतकऱ्यांच्या सध्यांच्या स्थितींत सरकारानें अवश्य लक्ष देण्यासारख्या अशा बऱ्याच गोष्टी आहेत, तें मला सर्वथैव मान्य आहे; आणि त्या गोष्टींची सुधारणा होण्याचा उपाय ह्मणजे हा एकच-रेलवे-प्रसार. कालवे, नाले, पाट, यांचा कांहीं ठिकाणीं फार महत्वाचा उपयोग होतो, हें खरें आहे. तथापि, रेलवेप्रमाणें त्यांचे फायदेशीर परिणाम दूरवर पोहोंचतात, असें कधीं ह्मणतां यावयाचें नाहीं-निदान रेलवेच्या मदतीवांचून तरी ते दृष्टोत्पत्तीस येणें अगदीं अशक्य आहे. "

"रेलवेमुळेंच लोकस्थिति इतकी सुधारली, हें जें मी नेहमीं विशेष रीतीनें प्रतिपादित असतों, त्याचा आजच्या वादविवादांत फार निकट संबंध आहे, हें मी सांगावयास पाहिजे असें नाहीं. लष्करी कामाकरितां, व दुष्काळांपासून लोकरक्षण होण्याकरितां बांधलेल्या रेलवेची गोष्ट बाजूला ठेविली तर, बाकीच्या रेलवे प्रीत्यर्थ खर्चिलेल्या भांडवलावर आह्मांस योग्य नफा मिळत आहे, अशी माझी समजूत आहे. परंतु वस्तुतः, ह्या प्रत्यक्ष फायद्यापेक्षां रेलवेपासून दळणवळणाची झालेली सुलभता, व त्या योगानें आलेली जमीनमहसुलाची शाश्वतिक वृद्धि ( ज्यांच्यावरच हिंदुस्थानची तिजोरी बऱ्याच अंशीं अवलंबून आहे) हे आनुषंगिक फायदे फार महत्वाचे आहेत, हें मीं सांगणें नकोच.

"तेव्हां एकंदरींत, रेलवे-प्रसाराच्या धोरणाच्या उपयुक्ततेविषयीं तरी आतां कोणी फारशी शंका घेईल असें मला वाटत नाहीं. फक्त, त्या धोरणाची अंमलबजावणी कशी करावी याविषयीं मात्र बरेच दिवसांपासून पुष्कळ मतभेद आहे. प्रथम रेलवे उभारण्याचें काम कोणत्या तरी प्रकारची हमी देऊन, सरकार खाजगी कंपन्यांकडे सोंपवीत असे. नंतर सरकारच तें काम आपल्याकडे घेऊं लागलें. पण १८८० सालापासून सरकार या दोन मार्गांत घोटाळत असतें. कांहीं रेलवेचें कामं खाजगी कंपन्यांस देतें; व कांहीं ठिकाणीं तें काम आपण हातीं घेतें. ह्मणूनच, खाजगी भांडवल मिळतें त्याचा, व सरकारच्या स्वाधीन जें भांडवल असतें त्याचा, रेल्वे प्रसाराच्या

कामीं उत्तम उपयोग कसा करून घेतां येईल, हा हल्लीं महत्वाचा प्रश्न होऊन बसला आहे."

"इ० स० १८९५-९६ सालाच्या आरंभीं, ( ह्म. ९५ च्या १ ल्या एप्रिलला) व्यापारास खुल्या असलेल्या एकंदर रेल्वेची लांबी १८,८६३ मैल होती; व तयार होत असलेल्या किंवा तयार करण्याची मंजुरी मिळालेल्या एकंदर रेल्वेची लांबी ( त्याच दिवशीं ) २,२१७ मैल होती. तेव्हांपासून ( ह्म० ९५ च्या १ ली एप्रिलपासून ) तों हल्लींपर्यंत, (१८९६ पर्यंत) २,२८४ मैल रस्ता तयार करण्याची मंजुरी मिळाली आहे; व आणखी १,००९ मैल रस्ता व्यापारास खुला झाला आहे. ह्मणजे, एकंदर १९,८७३ मैल रेल्वे रस्ता या घटकेस व्यापारास खुला आहे; व सध्यां तयार होत असलेल्या किंवा सुरवात करण्याविषयीं मंजुरी मिळालेल्या एकंदर रेल्वेची लांबी ३,५६४ मैल आहे.

यांत आणखी चालू सालाच्या आरंभीं पुऱ्या झालेल्या व वर्षीअखेर पुऱ्या होणाऱ्या रस्त्याची लांबी मिळविली कीं, आपल्यास यावर्षीअखेर ४,५७३ मैल नवीन रेल्वे रस्ता मिळेल; किंवा सध्यां देशांत एकंदर रेल्वे आहे त्याच्या $\frac{1}{4}$ ची, त्यांत सालअखेर भर पडेल. ही रेल्वेची एकंदर होणारी लांबी, **ग्रेटब्रिटन** व **आयर्लंड** मध्यें गेल्या २० वर्षांत तयार करण्यांत आलेल्या रस्त्याच्या एकंदर लांबी बरोबर होईल. किंवा हेंच दुसऱ्या रीतीनें सांगावयाचें ह्मटलें तर **इंग्लंडां**तील सर्वांत श्रेष्ठ अशी जी ' **लंडन नॉर्थ-वेस्टर्न** (वायव्य भागांकडील ) रेल्वे आहे, तिच्या एकंदर रस्त्याच्या लांबीच्या दुप्पट आहे; आणि एकट्या १८९५-९६सालांत हिंदुस्थानांत जेवढा रेल्वे रस्ता सुरू करण्यांत आला, तेवढा एकंदर रस्ता ज्यांचा आहे, अशा **ग्रेटब्रिटन** आणि **आयर्लंड** मध्यें फार झालें तर ५-६ रेल्वे कंपन्या असतील. हा जो इतका रेल्वेचा प्रसार करण्याचें आह्मीं योजिलें आहे, तो सध्यां तरी पुरे आहे, असें माझ्या प्रमाणें कौन्सिलच्या सभासदानांही वाटेल अशी माझी आशा आहे. या प्रसारापैकीं जो भाग अजून पुरा व्हावयाचा राहिला आहे, त्यास एंकंदर सुमारें ३५ कोटी खर्च येईल.

जमाखर्चाच्या खर्ड्यावरून आपल्याला दिसून येईल कीं, खाजगी कंपन्यांकडून मिळणाऱ्या व सरकारचा कांहीं संबंध नसलेल्या अशा रकमा धरून सुद्धां, आह्मीं वरील संख्येचा ⅓ च काय तो या वर्षी (१८९६–९७) खर्च करणार आहों."

"आह्मी योजिलेला रेल्वे–प्रसार बराच विस्तृत असून त्यांत बऱ्याच प्रदेशाचा समावेश होणार आहे हें मी वर दर्शविलेंच आहे. आतां, या संबंधानें सरकारावर एक मोठी थोरली जबाबदारी येऊन पडली आहे, हें मला येथें विशेष सांगावयाचें आहे; ती बजाविण्याविषयीं आपण फार सावधगिरी राखिली पाहिजे. ती जबाबदारी कोणती ह्मणाल तर, सध्यां तरी, आणखी रेल्वे वाढविण्याच्या मोहांत न पडणें ही होय. मोठमोठीं कामें सरकारानें हातीं घ्यावीं, अमक्या अमक्या कामांत सरकारानें मदत करावी, असें ह्मटलेलें ऐकलें ह्मणजे मनास मोठें धन्य वाटतें; व ताबडतोब त्या कामास हात घालण्याविषयीं मोह उत्पन्न होतो. या देशांतील प्रत्येक रेल्वेशीं सरकारचा कांहींना कांहीं तरी संबंध असतो, असें ह्मटल्यास फारशी चूक होईल असें मला वाटत नाहीं. ह्मणूनच हल्लींसारख्या अनुकूल वेळीं स्वस्थ न बसतां, रेल्वेच्या प्रसारास सुरुवात करणें हें तर सरकारचें कर्तव्य आहेच; परंतु त्या कामीं आयापेक्षां फाजील खर्च न होईल, याविषयींही दक्षता राखणें तितक्याच महत्त्वाचें कर्तव्य आहे. आपण धैर्यवान् बनलें पाहिजे, धाडसी होणें चांगलें नाहीं. याकरितां मोठमोठ्या जोखमीच्या कामांत, ज्या नवीन रेल्वे हातीं घ्याव्या असें लोकांकडून सुचविलें जातें, त्याचा सरकारानें अगोदर पूर्णपणें विचार केला पाहिजे. असें केलें तरच आह्मीं योजलेला रेल्वे-प्रसार आह्मांस चांगल्या रीतीनें व अखंड सुरू ठेवितां येईल. सारांश, यावरून सध्यां तरी, रेल्वे संबंधाचीं मोठमोठीं कामें हातीं धरण्यास आमचे हातपाय फारसे मोकळे नाहींत; ह्मणून त्या बाबतींत महत्वाकांक्षाही मर्यादित असली पाहिजे, हें कोणासही स्पष्ट दिसून येईल. परंतु मोठमोठ्या कामांखेरीज, रेल्वेरचनेसंबंधानें दुसरी एक बाब आहे, ती सध्यां फार महत्त्वाची आहे. ही बाब ह्मटली ह्मणजे रेल्वेच्या मोठमोठ्या मार्गांचे

लहान लहान फाटे काढणें ही होय. त्या योगानें देशांतील निरनिराळ्या भागांचें परस्पर दळणवळण व सामुग्रीव्यवहार वाढून, हल्लींचे मोठे मार्ग अधिक उपयुक्त होतील, यांत शंका नाहीं. मी आरंभीं सांगितल्याप्रमाणें, देशाची भरभराट होण्यास अशा लहान फाट्यांची फार अवश्यकता आहे याविषयीं सर्वांचें एकमत आहे. तेव्हां आह्मांस सध्यां जरी फारशी सवड नाहीं, तथापि या दिशेनें थोडी बहुत सुरुवात करण्यास आह्मांस हरकत नाहीं असें मला वाटतें. विशेषतः, खाजगी भांडवलवाल्यांना हें काम फार फायदेशीर होईल; आणि या बाबतींत त्यांना उत्तेजन देण्याकरितां आह्मीं किती सवलती देण्यास तयार आहों, हें मीं वर सांगितलेंच आहे. सध्यांच्या ज्या मोठमोठ्या रेलवे कंपन्या आहेत, त्यांनींच हें काम हातीं घेतल्यास, त्यांना त्यांत खात्रीनें फायदा होण्याचा संभव आहे; आणि तें त्यांनीं घ्यावेंच अशी आमची फार इच्छा आहे. अर्थात्, त्यांतल्या कित्येक बाबती कित्येकांस कदाचित् क्षुल्लक वाटतील; तथापि एकंदरींत पहातां, मोठमोठ्या रेलवे रस्त्यांस शाश्वती आणण्यास व त्यांच्या जंगी भांडवलवाल्यांस योग्य मोबदला मिळण्यास हेंच एक उत्तम साधन आहे, अशी माझी दृढ समजूत आहे. लोकांची सामाजिक व सांपत्तिक स्थिति सुधारण्यास आणि देशांत राजकीय शांतता प्रस्थापित करण्यास, रेलवे हें जर खरोखर प्रबल साधन करावयाचें असेल तर, मोठमोठ्या मार्गांस अशा लहान फाट्यांचा दुजोरा असणें अगदीं अवश्य आहे."

वरील उताऱ्यांत, रेलवेप्रसारासंबंधानें **लॉर्ड एल्जिन** यांनीं जे आंकडे दिले आहेत, त्यांत पुढें त्यांना थोडे फेरफार करावे लागले.

सन १८९६–१८९७ पासून सन १८९८–९९, या ३ वर्षांत खुद्द हिंदुस्थानसरकार मार्फत किंवा त्यांनीं हमी दिलेल्या कंपन्यांमार्फत तयार होणाऱ्या रेलवे मार्गांस एकंदरींत रु० २८,००,००,००० लागतील, असें हिंदुस्थानसरकारानें स्टेट सेक्रेटरीस कळविलें. त्यावर स्टेट सेक्रेटरींची त्यास रीतीप्रमाणें

मंजुरी आली. सदहू रकमेपैकीं, हिंदुस्थान सरकारास योग्य वाटेल तितकी रक्कम त्यांनीं कर्जाऊ काढावी, व बाकीची रक्कम खुद्द स्टेटसेक्रेटरी किंवा त्यांच्याशीं करार करणाऱ्या कंपन्यांनीं उभारून द्यावी, असें ठरलें. ही रक्कम फार मोठी दिसते खरी; पण तिच्यांत कित्येक कंपन्यांच्या उत्पन्नांचा समावेश झाला नव्हता. अशा कंपन्या ह्मटल्या ह्मणजे, ज्यांना सरकारची प्रत्यक्ष हमी अशी नसून, ज्या केवळ सरकाराशीं कांहीं विशेष ठराव करून (या ठरावांस 'Branch line terms' ह्म० लहान फाट्यांचे ठराव असें ह्मणतात.) काम करीत त्या होत. '**बेंगाल अँन्ड नॉर्थ वेस्टर्न रेल्वे**' ही कंपनी अशा प्रकारची आहे. शिवाय, वरील रकमेंत, प्रांतिक सरकारांना या बाबतीदाखल दिल्या जाणाऱ्या लहान सहान रकमा धरल्या नव्हत्या. अजमासापेक्षां खर्च वाढत चालल्यामुळें, २८ कोटींची मंजुरी असतां ती रक्कम २९⅔ कोटीपर्यंत वाढविण्यांत आली. हा वाढलेला खर्च वरील रकमेपेक्षां किती तरी अधिक झाला, हें खालील कोष्टकावरून दिसून येईल.

| बाब: रेल्वे. | [ताळेबंदी केलेल्या हिशोबावरून] साल १८९६–९७. | साल १८९७–९८ | साल १८९८–९९ |
|---|---|---|---|
| सरकार निसबत झालेला खर्च. | रु० १,१२,२८,००० | ८४,१४,४०० | १,०३,३६,९०० |

३ वर्षां मिळून एकूण रु० ३,०४,७९,३००.

* ही सर्व रक्कम खर्च करण्यांत आली किंवा वरील रकमेंत कांहीं वजा करावें लागेल, हें अजून (ताळेबंदीचा हिशेब तयार झाला त्यावेळीं) पहाणें आहे.

असा हा प्रचंड खर्च पाहून, सरकारानें अंगिकारलेल्या (रेलवे प्रसाराच्या) या धोरणाच्या युक्ततेविषयीं लोकांच्या मनांत शंका उत्पन्न होऊन, त्याबद्दल चोहोंकडून ओरड झाली, हें साहजिक आहे. या धोरणाची महती गातांना, **लॉर्ड एल्जिन** साहेबांनीं आपण अशा कामीं 'योग्य हिय्या' केला पाहिजे, 'अविचारी धाडस' हितावह नाहीं, असा सर्वांस उपदेश केला होता. पण, वरील आंकड्यांवरून दर्शित होणारें सरकारचें धोरण, 'योग्य हिय्या'चें नसून, सर्वथैव 'अविचारी साहसाचेंच' आहे, असें पुष्कळांस वाटूं लागलें. खुद्द व्हाइसरायांच्या **मंत्रीसभेंत** नामदार **रहिमतुल्ला सयानी** यानीं याविषयीं पुढील उद्गार काढले:—

"... याप्रमाणें, (गेल्या २० वर्षांत,) सरकार व कंपन्या यांनीं मिळून, ९,१०,००,००० लक्ष पौंड, व ५५ कोट रुपये, इतके रेलवे प्रीत्यर्थ खर्च केले, किंवा तितक्या रकमेची जबाबदारी त्यांनीं आपल्या आंगावर घेतली आहे. त्यांपैकीं, दर रुपयास १६ पेन्स असा हिशोब धरून बेरीज केली तर या २० वर्षांत एकंदर २०० कोट ह्मणजे सालीना १० कोट रेलवे प्रीत्यर्थ खर्च झाला आहे. या सर्वांचा परिणाम सरकारच्या तिजोरीवर झालेला स्पष्ट दिसत आहे. २० वर्षांपूर्वीं, या बाबतींत सरकारास दरसाल १½ कोट खर्च येत असे, तो हल्लीं २ कोट पर्यंत गेला आहे. ही गोष्ट सरकारचे नामदार फडणीस साहेबासही कबूल आहे. पण त्याचें ते असें समर्थन करतात कीं, रुपयाचा भाव उतरल्यामुळें, इतका तोटा झाला असें आपल्यास वाटतें खरें; पण वस्तुतः पाहिलें तर हा तोटा नसून, उलट आपल्यास दरसाल

५० लाखांचा फायदाच होत आहे. ते ह्मणतात त्याप्रमाणें वस्तुस्थिति असो वा नसो, परंतु, हिशेबाच्या दृष्टीनें इतकें निर्विवाद सिद्ध होतें कीं, रेलवेवर, 'पुनरुत्पादक' ( ज्याच्या विनियोगापासून पुन्हां फायदा मिळतो असें ) भांडवल ह्मणून जो पैसा खर्च करण्यांत येतो, त्याच्यापासून किफायत तर होत नाहींच; पण उलट, व्याजाची भरपाई करण्याकरितां, रेलवेपासून होणाऱ्या उत्पन्नास सरकारी तिजोरींतून दरसाल २ कोटींची भर घालावी लागते. आतां, ५० रेलवे-कामांची यादी दिली आहे, तिचा विचार करूं. तिच्यावरून असें दिसतें कीं, १८९६—९७ सालीं यादींतील ५० कामांपैकीं ३८ कामांत तोटा येऊन, फक्त ८ च कामांत काय तो फायदा झालेला आहे. अशी जर एकंदर स्थिति आहे, तर आपल्या सध्यांच्या सांपत्तिक स्थितींत तरी, दरसाल जवळजवळ १० कोटी अधिक रुपये केवळ रेलवेप्रीत्यर्थ खर्च करणें कितपत हितावह व समंजसपणाचें आहे, या प्रश्नाचा विचार होणें अगदीं अवश्य व रास्त आहे. रेलवेकडे सरकारचें इतकें ज्यारीनें लक्ष आहे; पण दुष्काळाचें निवारण करण्याच्या कामीं रेलवेपेक्षां शतपट उपयुक्त असणारे कालवे, पाट, नाले, वगैरे बांधण्याच्या कामाकडे सरकार फक्त पाऊण कोट—ह्म० दरसाल रेलवे प्रीत्यर्थ होणाऱ्या खर्चाच्या जवळ जवळ $\frac{1}{13}$ च खर्च करतें. रेलवेचा प्रत्यक्ष असा उपयोग ह्मटला ह्मणजे, अन्नसामुग्रीची सर्व देशावर विभागणी करणें इतकाच होय. अवर्षणाच्या काळीं, जमीनींतून थोडें तरी अधिक धान्य उत्पन्न करण्याच्या कामीं त्याचा मुळींच उपयोग होत नाहीं. परंतु कालवे, पाट यांच्या योगानें, अवर्षणाच्या काळीं देखील, जमीनींतून थोडें तरी अधिक धान्य उत्पन्न करण्याच्या कामीं चांगली मदत होते. गेल्या दुष्काळांत, अशा कालवे, पाट, वगैरे कामांच्या द्वारें सरकारास ५० लाख उत्पन्न ( अंदाजापेक्षां ) जादा झालें; पण त्याच वर्षी रेलवेचें उत्पन्न अंदाजलेल्या उत्पन्नापेक्षांही सुमारें १॥ कोटीनीं कमी आलें. या सर्व गोष्टी विचारांत घेतल्या ह्मणजे रेलवे, व कालवे, पाट वगैरे, यांच्या प्रीत्यर्थ होणाऱ्या खर्चांत अगदीं अयोग्य आणि उलट्या प्रकारचें अंतर

ठेवण्याचें सध्यां जें सरकारचें धोरण आहे, त्यांत लवकर फेरफार होणें अगदीं जरूरीचें आहे असें कोणासही दिसून येईल."

अर्थात, या धोरणाविषयीं सरकारचें मत निराळें आहे. स० १८९६त, वरिष्ट कायदे कौन्सिलमध्यें, हिंदुस्थान सरकारचे माजी फडणीस **सर जेम्स वेस्टलंड** यांनीं, **लॉर्ड एल्जिन** साहेबांच्या झपाट्यानें रेलवेप्रसार करण्याच्या नवीन धोरणाचें समर्थन केलें. ते ह्मणाले:——

" रेलवेसंबंधीं सर्व व्यवहार एकत्र करून पाहिले तर, सरकारास त्या प्रीत्यर्थ सारा २ च कोट रुपये खर्च येतो. आतां मी अगदीं हिशेबी दृष्टीनें विचारतों कीं, सर्व देशभर पसरलेला हा वीस हजार रेलवे रस्ता दरसाल केवळ २ कोट रुपये खर्च करून देखील, हिंदुस्थानवासीयांनीं प्राप्त करून घेणें त्यांच्या हिताचें नाहीं काय ? माझी खात्री आहे कीं, २ नाहीं १० कोट रुपये लागले तरी, तेवढे दरसाल खर्च करून या देशांतील रेलवे वाढविणें हें हिंदुस्थानची स्थिति सुधारण्यास अवश्य आहे, हें नाकबूल करणारा एक तरी प्राणी येथें आहे काय ? या दोन कोट रुपयांविषयीं मला दुसरें असें सांगावयाचें आहे कीं, हा जो बोजा आह्मांस सोसावा लागतो, यांतील बराच भाग हमी देऊन बांधावयास सांगितलेल्या रेलवे संबंधानें असतो. थोड्या वर्षांपूर्वींच हा तोटा फक्त ७० लाख रुपयेपर्यंत असे. हल्लीं जो हा २ कोटी पर्यंत ( सन १८९७ सालीं ही तोट्याची रकम २॥। कोटी होती. ) वाढला, याचें मुख्य कारण ह्मटलें ह्मणजे, इतर रेलवेचें कर्ज पौंडांत काढलें असल्यामुळें, सध्यांच्या उतरलेल्या किंमतीच्या रुपयांनीं त्याची भर करितांना हुंडणावळीच्या रूपानें आह्मांस अलीकडे फार जबर घस सोसावी लागते, हें होय. गेल्या १०।२० वर्षांत आह्मीं जरी कोणतेंही रेलवे काम हातीं घेतलें नसतें, तरी देखील, इतर रूपानें आह्मांला वरील घस सोसावी लागलीच असती. तेव्हां, एकंदरींत पहातां, अलीकडे रेलवे बांधण्याचा व त्याचा झपाट्यानें प्रसार करण्याचा जो क्रम सरकारानें सुरू केला

आहे, त्यापासून वस्तुतः नुकसान होत नसून, उत्पन्नाच्या दृष्टीनें फायदाच होत आहे, असें ह्मणण्यास हरकत नाहीं."

१८९७ त, त्याच सभेंत बोलतांना, सरकारच्या पब्लिक वर्कस् खात्याचे सभासद नामदार **ट्रेव्हर** यांनीं वरच्यापेक्षां अधिक आवेशानें व भरंवशानें एल्जिन साहेबांच्या धोरणाचें समर्थन केलें. ते ह्मणाले:—

"अजून पर्यंत, रेल्वे बाबत खर्च केलेल्या भांडवलावर आह्मांस स्पष्ट व निर्विवाद दाखवितां येण्यासारखा नफा मिळूं लागला आहे, असें ह्मणण्यास मी तयार नाहीं. तथापि, मला आपल्या मनावर हें विशेष रीतीनें ठसवावयाचें आहे कीं, या बाबतींत खर्च झालेला प्रत्येक रुपया रेल्वेच्या उत्पन्नाच्या हिशेबांत दाखविला जातो; व त्यामुळें इंग्लंडांत किंवा हिंदुस्थानांत उभारलेलें भांडवल व तत्संबंधींचें व्याज, नाण्याच्या अदलाबदलीमुळें किंवा अन्य कारणानें होणारा तोटा सहन करण्याची जी जबाबदारी आमच्या रेलवेच्या मालकीमुळें किंवा हमीमुळें आमच्या तिजोरीवर पडते, तिची भरपाई होण्यास रेलवेउत्पन्न किती कमी झालें, तें दिसून येतें. परंतु, रेल्वेच्या प्रसारानें आमच्या सरकारी उत्पन्नास शाश्वतता येण्यास किती मदत झाली आहे, हें त्यावरून कळण्यास मार्ग नाहीं. कारण त्या मदतीची किंमत हिशोबी आंकड्यांत दाखविणें अशक्य आहे. राज्यकारभारास व ( लाट साहेबांच्या शब्दांनीं सांगावयाचें म्हटलें म्हणजे ) 'लोकांची सामाजिक व सांपत्तिक स्थिति सुधारण्यास व देशांत राजकीय शांतता प्रस्थापित करण्याच्या कामीं' रेल्वेचा जो अमूल्य उपयोग झाला, त्याच्या योगानें व्यापाराची झालेली वृद्धि, आणि हुंडणावळीच्या उतरत्या भावामुळें आह्मांस लागणारें नुकसान अंशतः कमी करण्याच्या कामीं त्यांचा झालेला उपयोग, या सर्व गोष्टी क्षणभर बाजूला ठेविल्या तरी, आमच्या वाढत्या उत्पन्नाची अशी एकही बाब नाहीं, कीं जी रेल्वेचा प्रसार करण्याचें बंद केलें असतां वाढली असती; असें मी माझ्या म्हणण्याला कोणी

आक्षेप घेईल अशी भीति न बाळगतां खात्रीनें सांगूं शकेन असें मला वाटतें. इतकेंच नव्हे; तर, रेल्वेपासून प्राप्त होणाऱ्या अमोल फायद्यांच्या मोबदल्यादाखल २$\frac{3}{4}$ कोट हे देखील कांहीं नव्हत, ( किंवा गेल्या वर्षी आमच्या एका सन्मान्य सभासद बंधूंनीं म्हटल्याप्रमाणें, १० कोट रुपये देखील त्यांची अगदीं स्वस्ती किंमत होईल ) असें मी ह्मटल्यास त्यास सर्व श्रोते आपली अनुमति दर्शवितील अशी मला आशा आहे. तेव्हां, केवळ तात्पुरत्या अडचणींनीं धीर खचूं देऊन, रेलवे बाबतींतील संथ व सुव्यवस्थित प्रसाराचें आपलें धोरण हिंदुस्थान सरकारानें मध्येंच सोडणें अगदीं असमंजस व कोत्या दृष्टीचें होईल. उलट, जोंपर्यंत माफक उपायांनीं किंवा प्रजेवर आणखी एखादा जादा कर न लादतां, अशा अडचणींचा प्रतिकार करितां येण्यासारखा आहे, तोंपर्यंत त्या अडचणींस नेटानें व धैर्यानें तोंड देणें हेंच सरकारचें कर्तव्य आहे. ''

याविषयीं सविस्तर विवेचन करण्यापूर्वी, सरकारतर्फे रेल्वे प्रसारापासून होणाऱ्या फायद्यांचें हें जें विशेष उत्साहसंचारक व आशादायक चित्र रेखाटण्यांत आलें आहे, तें यथार्थ आहे कीं काय याचें आपण प्रथम परिक्षण करूं. रेल्वे तयार करण्याच्या कामीं हल्लीं खर्च होणाऱ्या पैशांत जो तोटा येतो, त्याची एक महत्वाची बाब **सर जेम्स वेस्टलंड** यांनीं आपल्या हिशोबांत धरली नाहीं. जितक्या खर्चाऊ भांडवलावरचें व्याज देण्यांत येतें, त्यापैकीं (भांडवलापैकीं) बऱ्याच अंशापासून कांहींही वसूल होत नाहीं, असें **मि. स्टीफन जेकब** यांनीं **वेलबी कमिशनपुढें** आपल्या साक्षींत सांगितलें आहे. तीच ही बाब होय. उदाहरणार्थ, १८८६-८७ ते १८९४-१८९५ या ९ वर्षांत, तयार होणाऱ्या, मोजणी झालेल्या आणि व्यापारासाठीं सुरू न केलेल्या रेल्वे मिळून, एकंदर ११,००,००,००० रुपये भांडवल गुंतून राहिलें होतें. अर्थात्, यापासून प्रत्यक्ष

वसूल होत नसून, त्यावर व्याज मात्र आकारलें जाई. त्या पुढच्या वर्षांचे आंकडे मला मिळाले नाहींत. तथापि, हें तुंबलेलें भांडवल सालोसाल असेंच फुगत जाऊन, त्यायोगानें सरकारी तिजोरीस (व्याजाच्या रूपानें) निदान ९० लाखांचा चट्टा बसत असेल, असें मानण्यास हरकत नाहीं. **वेस्टलंड** साहेबांचें दुसरें जें ह्मणणें आहे कीं, सरकारास रेलवेप्रीत्यर्थ सोसाव्या लागणाऱ्या नुकसानीचा बराच अंश, जुन्या रेलवेचें कर्ज इंग्रजी नाण्यांत असल्यामुळें, त्यास भरावा लागतो, तेंही चकविणारें आहे. कारण अगदीं अलीकडील (१८९६–९७ चा) राज्यकारभाराच्या रिपोर्टींत पाहिलें तर असें दिसून येईल कीं, हा तोटा केवळ अगदीं जुन्या, हमी दिलेल्या रेलवेमुळेंच सरकारास येतो असें नसून, त्यांत अगदीं अलीकडील रेलवेचीही बरीच भर पडते. १८५८–५९ ते १८९६–९७ या वर्षांत, रेलवेच्या उभारणींत खर्च केलेल्या भांडवलावर कसकसा तोटा येत गेला हें खालील आंकड्यांवरून कळून येईल. (हे आंकडे वर्षअखेर ताळेबंदी झालेल्या हिशेबीपत्रकावरून घेतले आहेत):–

| | तोटा रुपये. |
|---|---|
| (ईस्ट इंडिया, ईस्टर्न बेंगाल, सिंध, पंजाब आणि दक्षिण हिंदुस्थानांतील रेलवे खेरीज) सरकारानें हमी दिलेल्या रेलवे बाबत. (१८७२–७३ सालापासून ... | ३३,२०,६३,०० |
| खुद्द सरकारमार्फत चालविलेल्या रेलवे बाबत | २३,०१,२८,१२० |

| | |
|---|---|
| ( ईस्ट इंडिया रेलवेखेरीज. ) कंपन्यांस भाड्यानें दिल्या व त्यांनींच चालविलेल्या सरकारी रेलवे बाबत. | ७,३६,१,८११० |
| एकूण तोटा | ६३५८०९२४० |
| यातून वजा ईस्ट इंडिया रेलवेमार्फत झालेला नफा ( १८७२-७३ सालापासून. ) | १४,१२,५२,६५० |
| एकून नक्त तोटा | ४,९४,५५,६५७ |
| यांत जमा इतर किरकोळ बाबींचा खर्च | ६१,१८,६०७ |
| सरकारास एकून तोटा | ५५,५७,४,२,१४० |

सरकारचा वसूल दिवसानुदिवस जो वाढतो आहे तो रेल्वे नसती तर कधींही वाढला नसता, हेही ह्मणणें वस्तुस्थितीस धरून नाहीं. रेल्वेच्या अंगीं वसूल वाढविण्याची शक्ती आहे असें जें सरकारी अधिकारी सांगतात, ती आहे तरी कोठें ? सरकारी अधिकाऱ्यांजवळ प्रत्येक बाबतींत दोन प्रकारचीं उत्तरें नेहमीं तयार असतात; वेळ पडेल तसें त्यांतील एक पुढें करावयाचें. व दुसऱ्या वेळीं त्याच्या अगदीं विरूद्ध उत्तर पुढें करण्यासही ते मागें घेत नाहींत. एकीकडे **लार्ड एल्जिन व नामदार ट्रेव्हर** वसुलाच्या—विशेषत: जमीन महसुलाच्या-वृद्धीची जोरानें व आवेशानें तारीफ करितात; व दुसरीकडे, सरकारचे प्रतिनिधि ह्मणून नेमलेले लोक अंमलबजावणी करणारे अधिकारी असतात, त्यांची वसुलांत मुळींच वर्धनशक्ती नाहीं, अशी नेहमीं ओरड चालू असते. उदाहरणा-

र्थ, '**करन्सी कमिशन**' पुढें साक्ष देतांना, मि. **जे. ई. ओकॉनर** यांनीं पुढील उद्गार काढले आहेत:–

"या देशाच्या वसुलांत वर्धनशक्ती, ह्म० एके वर्षी किंवा एका बाबतींत नुकसान झाल्यास, दुसऱ्या वर्षी व दुसऱ्या बाबतींत त्याची भर करण्याची शक्ती आहे, अशी जी एक समजूत आहे, त्याविषयीं मला असें सांगावयाचें आहे:–३–४ वर्षांपूर्वी, हिंदुस्थान सरकारच्या हिशेबी नकाशाकरितां, मी एक प्रमाणदर्शक आकृति (Diagram) तयार केली होती. त्यामध्यें, जमीनमहसूल, मीठ, अफू, आयातकर, स्टॅम्प, प्रांतिककर, कस्टम्स, प्रत्यक्ष आकारलेले कर (ह्म. मुख्यत: उत्पन्नावरील कर) आणि रजिस्ट्रेशन या ठळक सदरांखालीं उत्पन्नाची कशी वाढ होत गेली, तें दाखविलें होतें. ती जर आकृति आपण पाहिली तर, त्यांपैकीं बहुतेकांत मुळींच चढउतार नसून, बहुतेक रेषा समांतर राहिल्या आहेत, असें आपल्यास दिसून येईल. इकडील वसुलांत थोडी वर्धनशक्ती आहे खरी, पण इंग्लंडच्या मानानें पहातां ती कांहींच नाहीं."

या देशाच्या वसुलांत भरपाई करण्याची जर खरोखरच शक्ती असेल तर १८८२ पासून आज तागायत स्थिति चालली आहे ती कशामुळें? अगदीं शेवटीं ह्मणजे १८८२ तच सरकारानें एक कर माफ केला, तेव्हांपासून आतांपर्यंत एखादा तरी कर माफ करून, रयतेच्या शिरावरचें ओझें यत्किंचित् हलकें करण्यास सरकारास फावलें नाहीं. इतकेंच नव्हे; तर उलट, नवीन नवीन कर लादण्याच्याच कामांत सरकार अगदीं गर्क होऊन गेलें आहे. आतां, जमीन महसुलासंबंधानें पाहिलें तरी, त्याच्या वाढीचें वार्षिक प्रमाण केवळ १·२६ आहे. ह्मणजे वस्तुत: कांहींच नाहीं. आणि ही वाढ देखील त्याच्या आंगच्या वर्धनशक्तीमुळें झाली नसून, दरवर्षी अधिकाधिक जमीन लागवडींत येत असल्यामुळें, व फेरतपासण्या

होऊन, जमिनीवरचे सारे जबर प्रमाणानें चढत असल्यामुळेंच झाली आहे, ही गोष्ट मशहूरच आहे. तेव्हां एकंदरींत रेलवे प्रसारामुळें जमीनमहसुलांत झालेल्या वृद्धीविषयीं व भरपाई करण्याच्या शक्तींचे जे आमच्या माजी लाट साहेबांनीं गोडवे गाईले, त्या शक्तीला सरकारी अधिकाऱ्यांच्या कल्पनासृष्टी-खेरीज दुसऱ्या कोठेंच वास्तविक अस्तित्व नाहीं, हें कोणासही दिसून येईल.

'जसजसा रेलवेचा प्रसार होतो तसतशी व्यापाराची वृद्धि होते' हें एक कित्येक गोऱ्या अधिकाऱ्यांचें, व व्यापाऱ्यांचें त्रिकालाबाधित महावाक्य आहे. 'रेलवेच व्यापार करितात,' अशी त्यांच्यांत म्हण पडून गेल्यासारखें दिसतें. परंतु रेलवे खरोखरच व्यापार करितात काय? हा प्रश्न फार विचारणीय आहे. त्याचें उत्तर त्याच्याविषयीं आंकडे पहा कीं, ताबडतोब मिळेल. बंदरांमार्फत नेलेल्या मालाखेरीज, फक्त नदी किंवा आगगाडी यांच्या साहाय्यानें एका प्रांतांतून दुसऱ्या प्रांतांत नेलेल्या एकंदर मालाचे अगदीं अलीकडील कांहीं वर्षांचे आंकडे याप्रमाणें आहेतः—

| | | | |
|---|---|---|---|
| साल | १८९१–९२ | नेलेला माल मण. | १३,१९,११,००० |
| ,, | १८९२–९३ | ,, | १३,०४,५१,००० |
| ,, | १८९३–९४ | ,, | १३,६४,९३,००० |
| ,, | १८९४–९५ | ,, | १५,९७,८१,००० |
| ,, | १८९५–९६ | ,, | १५,७५,५९,७०० |
| ,, | १८९६–९७ | ,, | १६,७०,६५,६४० |

वरील आंकड्यांतून, दुष्काळ आणि अवर्षणाच्या योगानें एका प्रांतांतून दुसऱ्या प्रांतांत अन्नसामुग्री जाण्यास जी विशेष तेजी येते तिचा हिशोब जर वजा केला, तर देशां-

तील अंतर्व्यापारांत फारसा वाढावा झालेला आहे असें ह्मणतां येत नाहीं.

आतां, त्याच वर्षांत बंदरांतून नेलेल्या एकंदर मालाच्या वजनाचे आंकडे असे आहेत:—

| साल | | नेलेला माल मण. |
|---|---|---|
| साल | १८९१–९२ | १८,४४,०५,००० |
| ,, | १८९२–९३ | १६,५७,८१,००० |
| ,, | १८९३–९४ | १७,४३,७२,००० |
| ,, | १८९४–९५ | १४,३९,६१,००० |
| ,, | १८९५–९६ | १८,५१,९९,००० |
| ,, | १८९६–९७ | १६,५१,०५,००० |

शेवटल्या सालीं, दुष्काळ व चलनी नाण्याचा उतरलेला भाव यांमुळें बंदरांतून गेलेल्या एकंदर मालाचा आंकडा थोडा कमी आला; परंतु हा सगळा अंतर्व्यापार मुख्यत्वेंकरून गोऱ्या व्यापाऱ्यांच्या हातीं आहे. तेव्हां, पीक मूळ उत्पन्न होण्याचीं ठिकाणें आणि देशांतील निरनिराळ्या व्यापाराच्या मुख्य पेठा, यांच्यामध्यें रेलवेनें जसजसा अधिक संबंध जडला जातो, तसतशी यांच्या व्यापाराच्या प्रसारास व फायद्यास अधिक मदत होते. ह्मणूनच रेलवेच्या प्रसाराविषयीं या लोकांची ओरड असते. देशांतील अनेक पदार्थांची निरनिराळ्या लोकांत जी एक प्रकारची अदलाबदल तीस व्यापार ह्मणतात. याकरितां रेलवेचा प्रसार होऊन देशांतील संपत्ति वाढली आहे, असें ह्मणतां येणार नाहीं.

पण इंग्लंडचा पैसा कर्जाऊ काढून, खंड न पडूं देतां एकसारखा रेलवेरस्ता वाढविण्याचा सध्यां जो हिंदुस्थान सरकारानें क्रम स्वीकारला आहे, त्याचे देशाच्या स्थितीवर अनेक प्रकारचे अनिष्ट परिणाम होत आहेत. त्यायोगानें एक

तर, आमचें ( इंग्रजी नाण्यांतील ) राष्ट्रीय कर्ज वाढत जाऊन, त्याचें व्याज देण्याचीही जबाबदारी अधिकाधिक होत जाते. त्याखेरीज, परकीय व्यापाऱ्यांच्या धनतृष्णेस उत्तेजन मिळून, रेल्वेच्या द्वारें हिंदुस्थानच्या निर्गत व्यापाराची वाजवीपेक्षां फाजील वाढ होते. हुंडणावळीच्या उतरलेल्या भावानेंही या अनर्थांत आणखी भर पडली आहे. किंबहुना, उतरता हुंडणावळीचा भाव, दिवसानुदिवस वाढत जाणारे अनेक प्रकारचे खर्च आणि रेल्वे बाबत होणारा वार्षिक अवाढव्य खर्च, या त्रिमुखी अरिष्टांचा देशांतील अन्नसामुग्रीवर फार शोचनीय परिणाम होत आहे. गोऱ्या व्यापाऱ्यांचे मतें हिंदुस्थानची भरभराट होण्यास त्याचा निर्गत व्यापार जंगी प्रमाणावर होऊं लागला पाहिजे. अशा पैकीं एकानें '**करन्सी कमिशन**' पुढें आपला असा अभिप्राय दिला आहे:—' हिंदुस्थानची भरभराट करणें हाच सर्वांचा मुख्य उद्देश असला पाहिजे, आणि त्याकरितां या अफाट साम्राज्यांतील लहान मोठे भाग खुले करून आणि त्यांतील विशिष्ट कलाहुन्नरांची अभिवृद्धि करून, मोठ्या प्रमाणावर निर्गत व्यापार सुरू करण्याची पात्रता त्याच्या ( हिंदुस्थानच्या ) ठिकाणीं अधिकाधिक आणण्याचे प्रयत्न केले पाहिजेत." पण अलीकडील कांहीं वर्षांत इतक्या झपाट्यानें रेल्वेप्रसार होत आहे आणि त्याच्या योगानें निर्गत व्यापाराचें मानही बरेंच भरारत चाललें आहे, तथापि रयतेच्या सद्यः स्थितींत वरच्या सारख्या गृहस्थांच्या ह्मणण्याप्रमाणें, अजून कांहींच भरभराटीचीं चिन्हें दिसत नाहींत. उलट, दिवसानुदिवस, रयतेची स्थिति फार भयंकर प्रमाणानें शोचनीय होत चालली आहे, असेंच सरकारी आंकड्यांवरून दिसतें. हिंदुस्थान सरकारचे एक सेक्रे-

टरी मि० **होल्डरनेस** यांनीं दुष्काळसंबंधानें एक पुस्तक तयार केलें आहे. त्यांत दुष्काळाचा पूर्व इतिहास देतांना, १८८० मधील '**फॅमिन कमिशन**' नें ठरविलेल्या आंकड्यांच्या धोरणानें सध्यां देशांत धान्य आहे किती आणि लोकांस हवें आहे किती, याची त्यांनीं फार काळजीपूर्वक चौकशी करून माहिती दिली आहे. लोकांना पुरून उरेल इतक्या धान्याचा संचय १८८० सालीं जितका होता, त्याच्या पेक्षां सुमारें २९ लक्ष टनांनीं कमी आहे. या २९ लक्ष टनांत जवळ जवळ १ कोटी लोकांचा निर्वाह झाला असता हें सांगितलें ह्मणजे, सदरहू तूट किती भयंकर व शोचनीय स्थितिदर्शक आहे, याची वाचकांस चांगली कल्पना होईल ! गेल्या १९ वर्षांत, खाण्याच्या उपयोगी नसलेल्या पिकांच्या लागवडीचें प्रमाण शेंकडा ८१·४० नें वाढलें आहे; पण तेंच, खाण्याच्या धान्याच्या लागवडीचें मान फक्त शेंकडा १२ प्रमाणेंच वाढलें आहे ! खाद्यबाह्य पिकाच्या लागवडीचें मुख्य प्रमाण वाढण्याचें कारण ह्मणजे, आमचें विलायती नाण्यांतील देणें अधिकाधिक वाढत चालल्यामुळें, त्यांच्यां भरपाईकरितां, निर्गत व्यापारास फार तेजी येत चालली आहे, हें होय. दुसरें कारण असें आहे कीं, हुंडणावळीचा भाव फारच उतरल्यामुळें, येथें उत्पन्न होणारे जूट, कापूस, चहा, वगैरे जिन्नस परदेशींच मोठ्या प्रमाणावर नेऊन विकण्याकडे व्यापाऱ्यांचें विशेष लक्ष वेधलें आहे. तेव्हां अर्थात, अन्नोपयोगी धान्याची लागवड करण्यापेक्षां, अशा तऱ्हेच्या किफायतदार खाद्यबाह्य पिकांचीच लागवड करण्याकडे या देशांतील कृषिवर्गाची प्रवृत्ति करण्यास, हें मोठें प्रबल आमिष झालें आहे. त्यामुळें, ही स्थिति

अधिकाधिक नाजूक व शोचनीय ( रयतेच्या संबंधानें पहातां ) होत चालली आहे. त्यांतही, परकीय भांडवलवाल्यांची व सट्टे करणाऱ्यांची निर्गत मालासंबंधानें नेहमीं जंगी उलाढाल चालू असल्यामुळें, सदर्हु अनिष्ट परिणाम विशेष रीतीनें प्रत्ययास येऊं लागला आहे. यासंबंधानें, ( **आर. डी. मेथा** यांनीं कलकत्याच्या ' **स्टेटस्मन** ' पत्रामध्यें पुढील प्रमाणें ह्मटलें आहे:–

उदाहरणार्थ, **रॅली ब्रदर्स** हे अशा मंडळीचे एक प्रमुख पुढारी आहेत, हें सर्व श्रुतच आहे. हे पीक उत्पन्न करणारांशींच प्रत्यक्ष व्यवहार करित नाहींत. पण लहानसहान व्यापाऱ्यांजवळ, 'मालाच्या आगाऊ पाठवणी' बद्दल हे एकदम मोठमोठे करार ( सट्टेच ह्मणावयाचे )करून टाकतात. मग हे लहान व्यापारी, शेतकऱ्यांस लागवडी करितां लहान लहान रकमा कर्जाऊ देतात. अर्थात, ते विचारे कर्जानें अशा व्यापाऱ्यांचे मिंधे झाल्यामुळें, आगाऊ ठरविलेल्या दरांनीं आपलीं पिकें या लहान व्यापाऱ्यांस देऊन टाकतात. अशा रीतीनें सदर्हू कंपनीनें गव्हांचे इतके जंगी सट्टे केले कीं, मालगाडींतील प्रतेक डबा किंवा माल ठेवावयाची प्रत्येक वखार, त्यांनीं खरेदी केलेल्या मालानें बहुधा भरलेली असे! अशा तऱ्हेचा हा अश्रुतपूर्व प्रचंड निर्गत व्यापार पाहून, हिंदुस्थानच्या प्रत्येक खऱ्या हितचिंतकास मनांत अत्यंत खेद झाला असेल, यांत शंका नाहीं."

यावर कित्येक असें ह्मणतात, ' जगांतील ज्या ज्या देशांत रेलवेचा प्रसार झपाट्यानें करण्यांत येत आहे, ते बहुतेक देश या कामाकरितां इंग्लंडपासूनच कर्जाऊ भांडवल घेतात व तें अर्थशास्त्रदृष्ट्या घातुक आहे अशी त्यांची समजूत असलेली दिसत नाहीं; मग हिंदुस्थानांतील लोकांचीच त्याविरुद्ध इतकी ओरड कां असावी ? ' यास उत्तर इतकेंच आहे कीं, हिंदुस्थान व इतर देश यांच्या राजकीय स्थितींत जमीनअस्मा-

नाचें अंतर आहे. हिंदुस्थान जर स्वसत्ताक असतें; आणि त्यास सध्यांप्रमाणें, परकीय अमलापासून भोगावे लागणारे भयंकर तोटे जर सोसावे लागले नसते, तर मात्र केवळ सार्वजनिक हिताच्या कामींच नव्हे, तर रेल्वे वगैरे प्रत्येक जोखमीच्या कामांत इंग्लंडचें भांडवल घेणें हें कदाचित् सयुक्तिक झालें असतें. आस्ट्रेलिया, चीन, जपान, वगैरे देश, अशा कामाकरितां मोठमोठीं व्याजें देऊन, परकीय देशांतूनच भांडवलें घेतात हें खरें आहे. तथापि, अशा रीतीनें परकी सावकारांस व्याज देण्यानें हिंदुस्थानाप्रमाणेंच त्यांना देखील थोड्या बहुत प्रमाणानें आनिष्ट परिणाम भोगावे लागतात, ही गोष्ट निर्विवाद आहे. आतां, या देशांना सुदैवानें स्वराज्याचें सुख अनुभवावयास सांपडत असल्यामुळें, व इतर मार्गांनीं संपत्तीचा ओघ परदेशीं वहात नसल्यामुळें, हे परिणाम अगदीं स्पष्ट दृग्गोचर होत नाहींत, इतकेंच कायतें. परंतु, तीच आमच्या हिंदुस्थानची काय स्थिति आहे पहा. एकतर, दरवर्षी आमच्या देशांतून जवळ जवळ ४ कोट रुपये परदेशांत जाऊन पडत आहेत. शिवाय, रयतही दिवसानुदिवस दरिद्री होत असून, तिच्या डोक्यावर अनेक जबर करांचें ओझें कायमचें बसलें आहे. हाच या देशाच्या व इतर देशांच्या स्थितींतील भयंकर फरक ! व त्यामुळेंच चीन, आस्ट्रेलियासारख्या स्वसत्ताक देशांत लागू न पडणाऱ्या एका (परकीय भांडवला संबंधाच्या) मुद्याचा या देशाच्या राजकीय व सांपत्तिक बाबतींत अवश्य विचार करणें फार अगत्याचें व महत्वाचें आहे. रेल्वे भांडवलावरील व्याजादाखल, देशास दरसाल ४½ कोट रुपयांची जी ही प्रचंड तुंबडी लागलेली आहे कीं जिच्या योगानें, **लॉर्ड सॅलिसबरींनीं** ह्मटल्या प्रमाणें

हिंदुस्थानचें रक्त निःशेष शोषलें जात आहे.—ती हिंदुस्थानच्या जमाखर्चांत क्षुल्लक बाब आहे, असें कधींही म्हणतां यावयाचें नाहीं. इतर कोणत्याही प्रकारच्या तुंबड्या न लागतां, रेलवे प्रीत्यर्थ घेतलेल्या कर्जाऊ परकीय भांडवलाचें व्याजच जर त्यास द्यावें लागतें तर कदाचित् गोष्ट निराळी, हें वर सांगितलेंच आहे.

वरच्या खेरीज, हिंदुस्थान व इतर देश यांच्या स्थितींत एक मोठा फरक आहे. उदाहरणार्थ, आस्ट्रेलियांतील रेलवेंची व्यवस्था सर्वस्वीं तेथील लोकांच्या हातीं असून, तेथें इकडच्या सारखी भारी पगार ओढणाऱ्या परकीयांची भरती नाहीं. आमच्या इकडे, आज तयार असलेल्या एकंदर रेलवेंची व्यवस्था ठेवण्याच्या कामावर सुमारें २६०० युरोपियन असून, त्यांच्या पगारांची एकंदर रक्कम, सालिना जवळ जवळ ८००,००० पौंड (ह्म० ) १२ लक्ष रु० आहे. यांत वरिष्ठ कामदारांच्याही पगारांचा समावेश होतो. दरेक रेलवेमध्यें, बारीक सारीक कामें करण्याकरितां देखील तरण्या बांड गौरबालकांचे तांडेच्या तांडे नेमले असतात. हीं गौरबालकें एकतर, बिचाऱ्या अल्पतृप्त, कामसु व इमानी एतद्देशीयांच्या तोंडची भाकर काढून घेतात; शिवाय अशा गौरबालकांचीच खोगीरभरती झाल्यामुळें, एतद्देशीयांना रेलवे वगैरे सारखीं कामें करून, सार्वजनिक कारभार पहाण्याचें जें शिक्षण मिळावयाचें, त्याचाही मार्ग बंद होतो.

याप्रमाणें, परकीय अमलामुळें देशाच्या संपत्तीस अगोदरच अनेक प्रकारच्या जळवा लागल्या आहेत; आणि त्यांतही, रेलवेच्या व्यवस्थेंत युरोपियन लोकांची भरती केल्यानें, लोकांस वर सांगितलेलें कारभारी शिक्षण मिळा-

वयाचें तेंही मिळेनासें होतें. इतर देशांतील व या देशांतील रेलवेंत महत्त्वाचा ( व दुर्दैवानें आमच्या देशास प्रतिकूल ) फरक हाच होय; पण, अधिकारी वर्गाच्या डोक्यांत त्याची कल्पना उतरविणें फार दुर्घट आहे. कमिशनर लोकांची अशी समजूत असावीशी दिसते कीं, जरी वर सांगितलेले अनिष्ट परिणाम होत असले, ( कारण, ते होतात हें त्यांना कबूल करावेंच लागतें. ) तथापि, रेलवेंचा प्रसार होईल तितका झपाट्यानें करण्याच्या धोरणानें होत असलेल्या अनेक फायद्यांपुढें, ते परिणाम कांहींच नव्हत. परंतु, हे जे भरपाई करणारे फायदे ह्मणून दाखविण्यांत येतात, त्यांतील बरेच वाजवीपेक्षां उगाच जास्त फुगवून दाखविलेले असून, कांहीं तर केवळ काल्पनिक आहेत, हें मी वर केलेल्या सप्रमाण विवेचनावरून वाचकांस दिसून आलेंच असेल. दुष्काळासारख्या प्रसंगीं, केवळ हिंदुस्थानांतील धान्यसंपन्न भागांतूनच दुष्काळग्रस्त भागांत अन्नसामुग्री पोंचविण्याच्या कामीं रेलवेचा उपयोग होतो असें नाहीं; तर जगाच्या इतर सर्व भागांतून धान्य आणण्यास देखील त्यांची अमोल्य मदत होते, हें एक रेलवे प्रसाराच्या तर्फेंच दुसरें प्रमाण नेहमीं विशेष जोरानें प्रतिपादण्यांत येत असतें. सकृद्दर्शनीं, तें बरेंच सबळ व यथार्थ असें दिसतें. परंतु, खरा विचार केला तर, तशी स्थिति आहे काय? आज सुमारें २३००० मैल रेलवेचें जाळें पसरलें आहे; तरी त्यायोगानें दुष्काळ यावयाचा टळला काय? १८७८ च्या भयंकर दुष्काळानंतर, १०,००० मैलांवर रेलवे मार्ग तयार झाला. तरी देखील, गेला दुष्काळ

लोकांस फार भयंकर रीतीनें जाणवला, हें कोण कबूल करणार नाहीं ?

आतां, एका भागांतून दुसऱ्या भागांत अन्नसामुग्री नेण्यास व दुष्काळग्रस्त प्रदेशांत आरंभीं अगदीं धान्य नसलें तर तें थोडेंबहुत मिळेसें करण्यास रेलवेंचा फार उपयोग झाला, हें मला देखील सर्वथैव कबूल आहे. परंतु, हें अन्नसामुग्री पोंहोचविण्याचें काम त्या ( रेलवे ) मोबद-ल्याशिवाय करीत नाहींत, ही गोष्ट आपण ध्यानांत ठेविली पाहिजे. अन्नसामुग्रीची नेआण करण्यास पैसा पडतो. तेव्हां, जेथें तें धान्य नेऊन पोंहोचवावयाचें तेथें, इतर वर्षांतील नेहमींच्या दरांपेक्षां थोडीतरी अधिक किंमत घेऊन तें विकलें, तरच निभाव लागतो. परदेशांतून या देशांत धान्य आणतां येईल, आणि दुष्काळच्या वेळीं हिंदुस्थानानें परदेशाच्या धान्यावर अवलंबून रहाण्यास हरकत नाहीं, असें एक बऱ्याच अर्थशास्त्रज्ञांचें ह्मणणें होतें. परंतु, गेल्या दुष्काळांत, त्याची अशक्यता पूर्णपणें अनुभवास आली. **अमेरिकें**तून धान्याची मदत येईल, **रशियांतून** येईल, अशी जी कित्येकांची आशा होती, त्याप्रमाणें कांहींच झालें नाहीं. याचें कारण उघड आहे. तें हेंच कीं, किफायत झाल्याशिवाय, आपल्या देशांतून परदेशीं धान्य पाठविण्यास खाजगी व्यापारी कधींही तयार नसतात. **अमेरिकन** लोकांस किंवा **रशियन** लोकांस, हिंदुस्थान इतक्या लांबीच्या पल्ल्यावर, गहूं पाठविणें परवडणार नाहींसें दिसलें असेल ह्मणूनच त्यांनीं त्या बाबतींत लक्ष घातलें नाहीं. शिवाय, खरी स्थिति अशी आहे कीं, आमच्या देशांतला दुष्काळ केवळ धान्याचा—अन्नसामुग्रीचा—नसून, पैशाचाही आहे. किंबहुना, दिवसानु-

दिवस धान्यापेक्षां पैशाचाच दुष्काळ अधिकाधिक पसरत चालला आहे, असें ह्मटल्यास हरकत नाहीं. बिचाऱ्या हिंदी रयतेस दिवसानुदिवस जास्त निकृष्ट दशा येत चालली आहे. धान्य जरी मिळण्यासारखें असलें तरी, तें विकत घेण्यास पैसा हा पाहिजेच. तो तर रयतेजवळ हळुहळु दुर्मिळ होऊं लागला आहे. सारांश, हिंदुस्थानची सांपत्तिक स्थिति सुधारण्यास रेल्वे हाच एक रामबाण उपाय आहे, ही समजूत, माझ्यामतें सर्वथैव चुकीची व घातुक आहे.

सरकारी पक्षाचें समर्थन करणाऱ्या लोकांचें दुसरें एक असें ह्मणणें असतें कीं, रेल्वेच्या योगानें, शेतकी जिनसांच्या किंमती वाढतात, त्यामुळें कृषिवर्गास पुष्कळ फायदा होतो. परंतु ह्या ज्या किमती चढलेल्या दिसतात, त्या लोकांच्या स्थितींत सुधारणा होत असल्यामुळेंच चढतात किंवा इतर कांहीं कारणांनीं चढतात, या विषयीं मला बरीच शंका आहे. शेतकी जिनसांच्या चढलेल्या किंमती ह्मणून जे आंकडे सरकारच्या रिपोर्टांत प्रसिद्ध होतात, ते अगदीं चुकीचे व गैरसमज करणारे असतात. कारण, त्यांत दुष्काळामुळें, किंवा विशेष खडतर ऋतूंमुळें, चढलेल्या किमतीही सामील केल्या आहेत. सरकारमार्फत मोठमोठीं–तलाव, पूल वगैरे–सार्वजनिक कामें जेथें चालूं असतात, तेथें, थोडया मुदतीपुरते, बरेच लोक एकत्र होतात. अर्थात, तितक्या हंगामापुरत्या, तेथें सर्व जिनसांच्या किमती साहजिकच चढतात. अशा तात्पुरत्या चढलेल्या किमतींचाही वरील आंकड्यांत समावेश केलेला असतो. शिवाय, आडगांवें, खेडीं वगैरेपेक्षां, शहरांत किमतींचें प्रमाण थोडें अधिक असतें, व तें असावयाचेंच–हें सर्वांना ठाऊकच आहे. या सर्व

बाद्मी वजा करून, वरील आंकड्यांचा विचार केल्यास, त्यावरून, खेडें गांवांतील किमतींत फारशी वृद्धि झाली आहे, असें कितपत सिद्ध करितां येईल याची मला शंका आहे. आतां, शेतकी जिनसांच्या किमतींत खरोखरच वाढवा झाला आहे असें क्षणभर गृहीत धरलें, तरी त्यापासून कृषिवर्गास वस्तुतः कांहीं फायदा आहे कीं काय, याचा आपण विचार करूं. सरकार देण्याच्या बाबतींत पाहिलें तर, किमती चढल्यानें, शेतकऱ्यास थोडा फायदा होईल, हें खरें. कारण, सरकारचा सारा कांहीं वर्षे तरी ठरीव असणार. तेव्हां उत्पन्न झालेल्या पिकापैकीं थोडा अंश, चढलेल्या किमतीनें विकला कीं, त्याच्यांतून सरकारचा सारा त्यास सहज देतां येईल. हें वरवर लिहिण्यास ठीक आहे. परंतु येथेंही एक ' अंदरकीं ' गोम आहे. सरकार सारा देण्याच्या वेळा सरकारानें अशा ठरविल्या आहेत कीं, त्या वेळीं धान्याचा भाव अगदीं उतरलेला असतो. तेव्हां, सरकार देण्याचा भरणा करण्याकरितां, तितक्या उतरलेल्या भावानें देखील आपलें उत्पन्न विकून टाकणें बिचाऱ्या रयतेला भागच पडतें. वस्तुतः, रयतेस सरकार देणें देण्यास सोईचें पडावें या उद्देशानेंच, सरकारानें, उत्पन्न घरांत येतें ती वेळ–ह्य॰ कापणीची वेळ–सारा भरण्यास नेमिली आहे. परंतु, त्याचा प्रत्यक्ष परिणाम अगदीं उलट होतो. सरकार. सारा भरण्याच्या निकडीनें एकाच वेळीं, बाजारांत जरुरीपेक्षा किती तरी धान्य येऊन पडतें. अर्थात, या असाधारण व अतिशय पुरवठयानें, एकंदरच धान्याचा भाव उतरतो. याचा फायदा दलाल, अडते, वगैरे लोकांस चांगलाच व्यावयास सांपडतो. कसें तरी, जवळचें धान्य हातावेगळें

करून, सरकार देण्याची भरपाई करण्याकडे रयतेचें लक्ष लागलेलें असतें. तेव्हां, हे लोक आयतेच, बाजारांत असेल तेवढें धान्य खरेदी करून सांठवून ठेवितात. पुढें, पुरवठ्याच्या दुर्भिळतेमुळें, बाजारभाव जेव्हां चणचणतो, तेव्हां सांठविलेलें धान्य बाहेर काढून, त्याच्यावर ते लोक किती तरी नफा मिळवितात. कित्येकवेळां तर असें देखील घडतें कीं, बिचाऱ्या रयतेला धान्याचा भाव उतरलेला असेल त्यावळीं आपल्या उत्पन्नाचा कांहीं भाग विकून, सरकारची भर करावीच लागते. पुढें कांहीं दिवसांनीं शिल्लक राहिलेलें उत्पन्न घरांत खर्च होऊन, शेवटीं, बाजारभाव चढलेला असतो अशावेळीं त्याला कुटुंबाच्या निर्वाहापुरतें धान्य खरेदी करणें भाग पडतें. अशा रीतीनें एका सरकार देण्याच्या बाबती खेरीज, ( आणि तेंही कांहीं विशेष गोष्टींतच ) इतर कोणत्याही बाबतींत चणचणलेल्या बाजारभावानें रयतेस फायदा होत नाहीं. उलट सरकार धारा भरणारे देशांतील बहुतेक जमीनदार (ज्या ठिकाणीं **कायम धारेबंदी** चालू आहे अशा प्रांतांखेरीज ) अगदीं गरीब असून, प्रत्येकाजवळ ४ पासून ९ एकरांपर्यंत जमीन असते नसते. मद्रास इलाख्यांत $\frac{2}{3}$ जमीनदारांच्या इतक्या क्षुल्लक जमिनी आहेत कीं, त्यांना १० रुपयांपेक्षां अधिक सरकार सारा देण्याचें मुळींच त्राण नाहीं; आणि ही रक्कम धारेबंदीच्या कल्पनेप्रमाणें, जमिनीच्या पिकापासून उत्पन्न होणाऱ्या नक्त वसुलाच्या अर्ध्या इतकी आहे !! ह्मणजे दुसऱ्या शब्दांनीं असें ह्मणावयाचें कीं, दक्षिण हिंदुस्थानांतील $\frac{2}{3}$ लोकांना, त्यांच्या जमिनींपासून सरकार सारा दिल्यावर १० रुपये देखील उत्पन्न होण्याची मुष्कील पडते! शिवाय, या राहिलेल्या उत्पन्नावर देखील कर्जदारांची

धाड असतेच. तेव्हां, बिचाऱ्या जमीनदाराला, आपल्या उदरनिर्वाहाचें धान्य, सर्पण, कपडेलत्ते वगैरे—पदार्थ पदरच्या खर्चानें बाजारांत विकत घ्यावे लागतात. यावरून दिसून आलेंच असेल कीं, 'चणचणलेला' बाजारभाव ह्मणतात, त्या योगानें रयतेचा मुळींच फायदा होत नसून, उलट सर्वतोपरी नुकसानच होतें; आणि खरा फायदा दलाल, अडत्ये, वगैरे मधल्या लोकांना मात्र मिळतो.

रेलवेप्रसार हिंदुस्थानास सर्वांशीं हितकर नाहीं या मताच्या पुष्ट्यर्थ आणखी एक प्रमाण असें आहे कीं, त्यांच्या योगानें, देशांतील मूळचे उद्योग धंदे—कलाहुन्नर—ऱ्हास पावूं लागतात. हिंदुस्थान हा देश, हा कांहीं नवीन वसाहत केलेल्या लोकांचा देश नाहीं; कीं ज्या लोकांची सुधारणा बाल्यावस्थेंत आहे. त्याची सुधारणा हजारों वर्षांपूर्वींच पूर्ण होऊन गेलेली असून, त्याला सध्यां योग्य अभिमान वाटण्यासारखी प्राचीन कलाहुन्नरांची अभिवृद्धि त्यांच्यांत आज अनेक शतकें रूढ होऊन राहिली आहे. ही विशिष्ट स्थिति सरकारी अधिकाऱ्यांच्या लक्षांत येत नाहीं—निदान ती ते लक्षांत घेत नाहींत. ज्या सुधारणा व ज्या संस्था एखाद्या प्रदेशांत साहजिकपणें उद्भवून क्रमाक्रमानें विकास पावत जातात, त्या सुधारणा व त्या संस्था फक्त त्या देशा पुरत्याच सुखकारक असतात, ही गोष्ट आमच्या अधिकाऱ्यांना कांहीं केल्या कळत नाहींसें दिसतें. किंवा, ज्या देशाची स्थिति केवळ इमारतीच्या पायासारखी मूलभूत आहे, ह्मणजे ज्याच्यावर, एक इमारत काढून दुसरी उभारली असतां, कांहीं नुकसान होण्याचा संभव नसतो, व जेथें तें काम सहज होऊं शकतें—अशा देशांत त्या सुधारणांचें व संस्थांचें बीजा-

रोपण केल्यास, इष्टसिद्धीची थोडी आशा असते. परंतु, हिंदुस्थानासारख्या अफाट व प्राचीन देशांत–कीं ज्यांतील विशिष्ट समाज संघटना, रेलवे वगैरे पाश्चात्य सुधारणेच्या साधनांचें ज्याकाळीं नांवही ठाऊक नव्हतें अशा अनेक युगांपासून, अगदीं दृढ होऊन गेली आहे–अशा देशांत अर्वाचीन सुधारणांचा वाजवीपेक्षां फाजील व भलत्याच दिशेनें प्रवेश करण्याचा प्रयत्न केल्यास हितापेक्षां अहितच होण्याचा जास्त संभव आहे, हें कोणासही दिसून येईल. याचा प्रत्यक्ष अनुभव हल्लीं येतच आहे. हिंदुस्थानांत जेथें जेथें ह्मणून ही रेलवे घुसली आहे, तेथें तेथें बहुधा आज अनेक शतकांपासून ज्या उद्योग धंद्यांवर तेथले लोक आपला चरितार्थ करीत आले, त्या उद्योगधंद्यांचा सफाई नाश झाला आहे. विशेषतः, कोष्टयांच्या धंद्यावर रेलवे प्रसाराचा जितका भयंकर व शोचनीय परिणाम झाला आहे, तितका दुसऱ्या कोणत्याही धंद्यावर झाला नसेल.

कोष्टयांच्या धंद्याची जी स्थिति, तीच कमी अधिक मानानें इतर उद्योगधंद्यांचीही झाली आहे. किंबहुना, रेलवेच्या मार्गानें या देशांतील लहान सहान खेड्यांवर पसरणारा युरोपातील यंत्रांच्या साहाय्यानें तयार केलेला प्रत्येक पदार्थ या देशांतील कल्लाहुन्नराच्या शरीरांत जणूकाय मर्मभेदी बाणच सोडल्यासारखा आहे. हिंदी रयतेस जें दिवसानुदिवस अधिकाधिक दारिद्र्य येत आहे व त्यांस ‘ नको हें जीवित ’ असें वाटत आहे, याचें पातक बऱ्याच अंशीं, रेलवेच्या फाजील प्रसाराच्या माथीं आहे.

यावर कित्येक असें सांगतील कीं, ज्या ज्या ठिकाणीं हातकामाच्या ऐवजीं यांत्रिक रचनेचा उपयोग प्रथम सुरू

होतो, तेथें तेथें आरंभीं असे अनर्थ ओढवणें अपरिहार्य आहे. हिंदुस्थानास ही गोष्ट विशेष आहे असें नसून, त्याच्या-पूर्वीं अनेक देशांस असें नुकसान सोसावें लागलें आहे. हें ह्मणणें तात्त्विकदृष्टया सर्वथैव खरें आहे, यांत शंका नाहीं. तरी लोकांवरच (रेल्वे खर्चाच्या रूपानें) तत्संबंधीं करांचें ओझें लादून, तो अपरिहार्य अनर्थ त्यांच्यावर विशेष उग्र रीतीनें व लवकर गुदरेल असें, आपण होऊन मुद्दाम करणें शहाणपणाचें आहे काय? लोकांचा संहार होणें जर अपरिहार्य असेल तर, तो होण्याची रीति हल्लींपेक्षां अधिक सावकाश व क्रमाक्रमानें अमलांत आणल्यास चांगलें होणार नाहीं काय? ह्मणजे त्यायोगानें मधून मधून लोकांस पुढच्या अरिष्टाशीं झगडण्याची तयारी करण्यास तरी वेळ मिळत जाईल.

रेल्वे प्रसाराच्या अनुषंगानें दुसरा एक महत्वाचा प्रश्न उपस्थित होतो. तो हा कीं,—त्यास लागणारें कर्जाऊ भांडवल **लंडन**मधील घ्यावें किंवा या देशांतीलच घ्यावें. अर्थात, दुसरा मार्गच श्रेयस्कर आहे. तो कसा, हें मी मागें एके ठिकाणीं सविस्तर सिद्ध करून दाखविलेंच आहे. त्याच्या खेरीज, आणखीही कांहीं कारणें आहेत. त्यांचा येथें विचार करणें अवश्य आहे.

पहिली गोष्ट अशी कीं, गेल्या पाव शतकांत, **लंडन**मधीलच भांडवल कर्जाऊ घेण्याचा क्रम सरकारानें स्वीकारला असून, त्यापासून कांहीं फायदा होत असल्याचें मुळींच दिसत नाहीं. तेथल्या भांडवलावरील व्याजाचा दर पुढें बराच कमी झाला, हें खरें आहे. तथापि, त्याच वेळेपासून, रुपयाची किंमत इतकी उतरली कीं, त्या योगानें हुंडणावळीची भरपाई कर-ण्याकरितां येणारा खर्च, व्याजाचा दर कमी झाल्यानें जी

रक्कम वांचली, तिच्यापेक्षां किती तरी अधिक लागूं लागला. हुंडणावळीच्या चढत्या भावानें, इंग्लंडांतील भांडवलाच्या व्याजाची रक्कम गेल्या १८ वर्षांत २९ लक्ष पौंडांपासून जवळ जवळ ३७॥ लक्षांपर्यंत चढली आहे! १८९६ त, सरकारानें रेल्वेखर्चाप्रीत्यर्थ आणखी ३० कोटी रु० चें नवीन कर्ज काढण्याचें ठरविलें. त्यांपैकीं १० कोटीच फक्त, हिंदुस्थानांतील घेऊन, बाकीची रक्कम विलायतेंत उभारावी असें ठरलें. तसें झाल्यास, विलायतेंतील भांडवलावरील व्याजांत आणखी पांच लक्ष पौंडांची भर पडेल! आणि हिंदुस्थानच्या विलायतेंतील एकंदर कर्जाची रक्कम स्थूलमानानें १२॥ कोटी पौंड होईल! हें सर्व कर्ज फेडावयाचें सरकारानें मनांत आणल्यास, (सध्यांच्या—१८९८ च्या—हुंडणावळीच्या भावानें) दर पौंडास १७॥ रुपये या हिशोबानें, सरकारास २ खर्व २ अब्ज (२,२,००,००,००,००० रु०) इतकी रक्कम आतां उभी करावी लागेल! परंतु, तसें होणें मुळींच शक्य नाहीं; आणि सरकारचाही तसा उद्देश दिसत नाहीं. तथापि हें कर्ज दरसाल अंशतः तरी फेडणें इष्ट आहे. तसें करण्यास उत्तम उपाय ह्मणजे, केवळ या करितांच खर्च करावयाची अशी कांहीं रक्कम—'गंगाजळी' ठेवी सारखी—सरकारानें दरसाल आपल्या वसुलांतून निराळी काढून ठेवणें हा होय. पण, हिंदुस्थान सरकारच्या जमाखर्चाच्या पत्रकांत तशा तऱ्हेची कांहींच तजवीज केलेली दिसत नाहीं, ही शोचनीय गोष्ट आहे. यामुळें, मुद्दलाची कांहींच फेड न होतां, दरसाल ४० लक्ष पौंडांची (व्याजाच्या रूपानें भरावी लागणारी) रक्कम मात्र हिंदुस्थानच्या तिजोरीवर कायमचा खर्च होऊन बसेल! कदाचित्, हा क्रम असाच

अव्याहत चालू राहिल्यास, तो कोठवर वाढेल याचा सुमार नाहीं!

इतक्या रकमेची, देशाच्या संपत्तीस दरसाल कायमची ओढ लागणें हें कोणीही इष्ट ह्मणणार नाहीं. तेव्हां वरील क्रम सोडून, यापुढें हिंदुस्थानांत मिळण्यासारखें असेल तेवढेंच भांडवल दरसाल जर सरकार रेलवे प्रीत्यर्थ कर्जाऊ घेण्याचा निश्चय करील तर, सध्यां होत असलेली व्याजाच्या रकमेची अनावर वाढ बंद होईल इतकेंच नव्हे. पण तितक्या मानानें या देशांतील भांडवलवाल्यांसही उत्तेजन मिळेल. दरसाल सुमारें ५ कोटी रु० भांडवल हिंदुस्थानांत मिळण्यासारखें आहे, असा सरकारानें अदमास केला आहे. परंतु अगदीं खात्रीचा अदमास धरण्याकरितां, आणि देशांतील इतर व्यापारधंद्यांत गुंतलेल्या भांडवलास हरकत न यावी याकरितां, आपण ही रकम ३ कोटच धरून चालूं. या रकमेंत सरकारच्या तिजोरींतील आणखी १ कोट रुपयांची भर घातली ह्मणजे, दरसाल ४ कोट रुपये अगदीं बिनधोक रीतीनें रेलवे प्रसाराप्रीत्यर्थ खर्चण्यास सरकारास मिळतील; आणि येवढ्यानें जेवढा प्रसार होईल, तेवढ्यांत सरकारानें समाधान मानलें पाहिजे. हिंदुस्थानांतलें हिंदुस्थानांतच कर्जाऊ भांडवल घेतल्यानें, चांगलें फायदेशीर पडतें असें अलीकडील कांहीं वर्षांच्या अनुभवावरून निर्विवाद सिद्ध झालें आहे. रुपयांत असलेल्या नोटांचा व रोख्यांचा दर अलीकडे सारखा चढत आहे. त्यामुळें, सरकारास कमी कमी दरानें पुष्कळ भांडवल मिळत आहे. व्याजाच्या रोख्यांचा दर प्रथम ३॥ झाला व होतां होतां तो ३ वर येऊन ठेपला! ही गोष्ट बाजूला ठेऊन, येथील भांडवलास **लंडन** मधील भांडवलापेक्षां अधिक व्याज

पडतें असें जरी धरलें, तरी देखील भारी दरानें हिंदुस्थानचेंच भांडवल काढणें अनेक कारणांनीं श्रेयस्कर आहे. त्यांपैकीं कांहीं कारणांचें वर विवेचन केलेंच आहे, त्यांखेरीज आणखी कांहीं कारणांचें दिग्दर्शन मी आतां खालीं थोडक्यांत करणार आहें.

रुप्याची सोन्याच्या भावांतली किंमत दिवसानुदिवस जी अधिकाधिक उतरत चालली आहे, याचें खरें कारण म्हटलें म्हणजे, स्टेट सेक्रेटरी लंडनमध्यें दरसाल हिंदुस्थानास कर्जाऊ भांडवल देण्याच्या जास्त जास्त हुंड्या विक्रीस काढतात हें होय. परंतु, ही गोष्ट हिंदुस्थान सरकारच्या हिशोबनवीसांच्या कशी ध्यानांत येत नाहीं, हें मोठें आश्चर्य आहे. तथापि, केवळ सरकारी हिशोबा पुरताच या प्रश्नाचा विचार करून उपयोग नाहीं. त्याचा हिंदुस्थानच्या प्रजेवर काय परिणाम होतो, याचाही विचार केला पाहिजे. कर्जाऊ भांडवल घ्यावयाचें तें विलायतेंतील न घेतां या देशांतलें घेतलें, तर त्याच्यावरचें व्याज तरी या देशांत रहाणाऱ्या लोकांस मिळेल. समजा कीं, ३ टक्के व्याजानें सरकारानें १० कोट रु० भांडवल या देशांतलें काढलें; तर यावरील व्याजाच्या रूपानें देशी सावकारांत ३० लाख रु० विभागून जातील. त्याखेरीज, अशा उपायानें देशी उद्योग व्यापारास अप्रत्यक्ष उत्तेजन मिळेल, तो फायदा निराळच. शिवाय, याप्रमाणें येथल्या लोकांपासून भांडवल काढल्यास त्यांना एक प्रकारचें व्यापारी शिक्षणही मिळेल; आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे ३० लाख रुपये देशांतल्या लोकांतच राहून, त्यांवर उभारलेल्या उद्योगधंद्यांच्या द्वारें, सार्वजनिक संपत्तीच्या वृद्धीस किती तरी मदत

होईल. अशा तऱ्हेचें धोरण जर स्वीकारलें तर, तें लोकांमध्यें मितव्यय, संचयबुद्धि आणि योग्य विनियोग इत्यादि हितावह गोष्टींचा प्रसार करण्यास चांगलें साधनीभूत होईल. कारण, असे जर १० कोट रुपये सरकारानें कर्जाऊ भांडवलाच्या रूपानें लोकांपासून बाहेर काढले नाहींत, तर त्या सर्व रकमेचा किंवा त्यांतील बऱ्याच अंशाचा व्यय हल्लीं जसा बहुधा, अव्यवस्थित घरखर्च, दागिन्यांचा हव्यास, लग्नकार्यादि समारंभांत अप्रयोजक उधळपट्टी, वगैरे सारख्या अनेक शुष्क व अनुत्पादक गोष्टींत होत आहे, तसाच कायम राहील; व त्यापासून देशाच्या सामाजिक स्थितीस अधिकाधिक निकृष्ट दशा येत जाईल. पण, सरकारानें आपण होऊन जर प्रजेस १० कोट रुपयांचा योग्य विनियोग करण्याचा मार्ग दाखवून दिला, तर लोकांस त्याच्या मोबदला ३० लाख रुपये मिळून, त्यांची औद्योगिक स्थिति सुधारण्यास त्या रकमेची केवढी तरी मदत होईल.

---

# परदेशांत (मु० आफ्रिकेंतील वसाहत-प्रांतांत) गेलेल्या हिंदुस्थानवासी-यांची स्थिति.

[ लेखक–जी० परमेश्वरं पिले, बी. ए., 'मद्रास स्टँडर्ड' पत्राचे चालक. ]

हिंदुस्थानांतील लोक म्हणजे पुराणप्रिय–जुन्यास चिकटून राहणारे–व सहसा दाराच्या उंबरठ्या बाहेर न पडणारे, (परदेशगमन न करणारे) असा त्यांच्याविषयीं साधारणतः सर्वत्र ग्रह आहे. तथापि विद्येच्या, संपत्तीच्या, किंवा मजुरीच्या उद्देशानें, अलीकडे बरेच हिंदुस्थानवासी लोक परदेशीं जाऊं येऊं लागले आहेत; व कित्येकांनीं तर तिकडेच आपलें कायमचें वसतिस्थान केलें आहे. अशा परदेशीं गेले-ल्या लोकांचे हक्क तिकडे कितपत मानण्यांत येतात किंवा परकीयांकडून त्यांना कशाप्रकारें वागविण्यांत येतें, ह्याचा प्रस्तुत लेखांत विचार करावयाचा आहे.

दरवर्षी बरेच हिंदुस्थानवासी लोक **युरोपांतील** देशांत जा-तात; विशेषतः **ग्रेटब्रिटन**–विलायत–मध्यें जाणाऱ्यांची संख्या अधिक असते. त्यांपैकीं बहुतेक (बॅरिस्टर, सिव्हिल् सर्व्हिस परीक्षा वगैरेच्या) विद्याभ्यासाकरितां तिकडे जातात; आणि कांहीं मात्र तेथें कायमचे जाऊन राहिले आहेत. परंतु, तेथें गेलेले हिंदुस्थानवासी लोक थोडया मुदतीपुरते गेलेले असोत किंवा कायमचेच जाऊन राहिलेले असोत, त्या सर्वांचे

**ब्रिटिशइंडियन** या नात्यानें असलेले हक्क पूर्णपणें मानण्यांत येतात; आणि खुद्द हाऊस ऑफ् कॉमन्समध्यें देखील प्रवेश करून घेण्याची त्यांस मुभा आहे.

**अमेरिकेकडे** हिंदुस्थानवासीयांचें युरोपाइतकें लक्ष लागलेलें दिसत नाहीं. तरी पण **दक्षिण अमेरिकेंतील डेमेरारा, ब्रिटिश ग्वायना, सुरीनम्,** (डचग्वायना) आणि **वेस्टइंडीज** मधील **जमेका** आणि **ट्रीनीदाद** बेटें वगैरे भागांकडे दरवर्षीं हिंदी मजुरांच्या बऱ्याच टोळ्या जात असतात. यांना तिकडे नेण्यापूर्वीं, त्यांच्या जवळून अमूक एक वर्षं चाकरी करूं असा करार करून घेण्यांत येतो; व ही मुदत पुरी झाल्यावर त्यांची स्वदेशीं परत जाण्याची इच्छा असल्यास मक्तेदाराच्या खर्चानें हिंदुस्थानांत त्यांची परत रवानगी होते. १८९५–९६ सालांत **डेमेरारा** व **ट्रीनीदाद** या दोन वसाहतींनीं वरील शर्तींत थोडासा फरक केला आहे. ज्यांचीं त्या कॉलनींत १० वर्षें गेलीं असतील, आणि ज्यांच्याजवळ करारांतील मुदत पुरी झाल्याबद्दल दाखले असतील, अशा हिंदी मजुरांना स्वदेशीं परत जाण्याची इच्छा असल्यास, दर पुरुषानें वाटखर्चाचा $\frac{1}{4}$ आणि प्रत्येक स्त्रीनें $\frac{1}{6}$ दिला ह्मणजे झालें. बाकीचा खर्च कॉलनी देते. अगदींच निराश्रित मनुष्य असल्यास सर्वच खर्च देऊन, त्याची स्वदेशांत रवानगी करण्यांत येते. त्यांनीं दुसराही एक असा ठराव केला आहे कीं, ज्यांचीं कॉलनींत फक्त ५ च वर्षें गेलीं असतील व ज्यांच्याजवळ करारांतील मुदत पुरी झाल्याचे दाखले असतील, अशा मनुष्यांना स्वदेशीं परत जावयाचें असलें तर मात्र, सर्व खर्च ज्याचा त्यानें सोसला पाहिजे. याशिवाय, दुसऱ्या ज्या कॉलनी आहेत ( त्यांपैकीं एक डच

लोकांची आहे हें लक्षांत येईलच. ) त्यांनीं, अशा मजुरांचीं १० वर्षें भरून त्यांना स्वदेशीं परत जावयाचें असल्यास, सररास फुकट वाटखर्च देण्याचा ठराव केला आहे. ब्रिटिश लोकांची **जमेका** येथें कॉलनी ( स्वतंत्र वसाहतीचा प्रदेश ) आहे. तेथील कायद्यांत मात्र कांहीं फरक झाला नाहीं. कारण त्या प्रदेशांत बहुधा फारच थोडे मजूर जातात; आणि १८९६–९७ सालीं तर एकही परदेशांतील मजूर तिकडे गेला नाहीं.

**ओशानियांत**, हिंदु मजूर जाण्याचीं ठिकाणें ह्मटलीं ह्मणजे दोनच–**ऑस्ट्रेलिया** आणि **फिजीबेटें**. त्यांपैकीं, फिजीबेटांत, अमेरिकेंतील **जमेका** आणि **सुरीनम** येथें परदेशीय मजुरांविषयीं जे कायदे आहेत, तेच कायदे तेथें जाणाऱ्या मजुरांस लागू आहेत. जमेका, व सुरीनम प्रमाणेंच, तेथेंही मजुराचीं १० वर्षें भरल्यावर, त्यास स्वदेशीं जाण्याचा खर्च देण्यांत येतो. परंतु **न्यूसाऊथवेल्स** आणि पश्चिम **ऑस्ट्रेलिया** या प्रांतांनीं कायदे करून, त्या प्रांतांत येणाऱ्या हिंदी लोकांची संख्या मर्यादित केली आहे. या कायद्यांस आपल्या महाराणी सरकारची मंजुरीही मिळाली आहे. इतकेंच नव्हे, तर, 'सदर्हू कायदा आपल्यास लागू होऊं नये, अशी एखाद्याची इच्छा असल्यास, त्याला त्या बाबतींत, युरोपमधील कोणत्याही एखाद्या भाषेंत अर्ज लिहावयास सांगितला असतां, लिहितां आला नाहीं तर अशा माणसास कॉलनींत राहूं देऊं नये' असाही एक कायदा सदर्हू कॉलनीनीं करण्याचें योजिलें आहे; व त्याचाच सध्यां राणीसरकारच्या मंत्रिमंडळांत खल होत आहे.

खुद्द **आशिया**मधील, हिंदी लोकांच्या वसाहतीचीं विशेष स्थळें ह्मटलीं ह्मणजे **सिलोन**, व 'स्ट्रेटस् सेटलमेंटस,' ( सामुद्र

धुन्यांतील वसलेला प्रदेश. येथें हिंदी लोकांच्या वस्तीचें मान फारच कमी आहे.) आणि **जपान** हीं होत. त्यांपैकीं, सिलोन आणि 'स्ट्रेटस् सेटलमेंट' मध्यें इतर ब्रिटिश प्रजे-प्रमाणें हिंदी लोकांना हक्क आहेत. जपानच्या उदार सरकारानें आपल्या देशांत येणाऱ्या हिंदी लोकांवर आपण होऊन कोणत्याही प्रकारच्या अटी लादल्या नाहींत. परंतु, चमत्कारा-ची गोष्ट अशी कीं, सुमारें ४ वर्षांपूर्वींच ( हल्लीं ९।६ वर्षें ) जपान व ग्रेट ब्रिटनमध्यें जो एक तह झाला, व जो पुढील वर्षापासून ( १८९९ ) अमलांत येणार आहे, त्यांतील कांहीं कलमांनीं, इतर ब्रिटिश प्रजेला जे हक्क आहेत, ते हक्क ब्रिटिश इंडियन लोकांस मना केले आहेत. या तहान्वयें, कांहीं अपवाद खेरीज करून, ब्रिटिश प्रजेला साऱ्या जपान-भर व्यापाराचा, प्रवासाचा व वसतीचा हक्क देण्यांत आला आहे. परंतु, या तहांतून हिंदुस्थानचें नांव अजीबात गाळलें आहे; आणि हिंदुस्थान सरकारानें किंवा विलायत सरकारानें तें दाखल करण्याविषयीं वेळींच योग्य काळजी दाखवावयास पाहिजे होती, ती मुळींच दाखविली नाहीं. तह झाल्यापासून दोन वर्षांच्या आंत, हिंदुस्थानचें नांव दाखल करण्याविषयीं त्यांनीं जपानास सुचविलें असतें, तर त्यावेळीं सहज होण्यासारखें होतें. पण तसें कांहींच झालें नाहीं. त्यामुळें, ब्रिटिश इंडियनांना, फक्त १८९८ सालच्या तहामध्यें निर्दिष्ट केलेल्या बंदरांतच, व्यापार, प्रवास व वसती करण्याची परवानगी आहे.

इतर खंडांपेक्षां, **आफ्रिका** खंडाकडे पुष्कळच ब्रिटिश इंडियनांचें लक्ष ओढवलेलें दिसतें. व्यापारी, मजूर व इतर धंदेवाले या नात्यानें पुष्कळ हिंदी लोक तेथें कायमची वसती करून राहिले आहेत. पण दुःखाची

गोष्ट ही कीं, त्या देशांत या बिचाऱ्यांच्या हक्कांविषयीं बरीच शंका घेण्यांत येत असते. प्रसंगविशेषीं, त्याचे हक्क मुळींच नाकबूल करण्यांत येतात; अथवा वाजवीपेक्षां फाजील मर्यादित करण्यांत येतात. याचकरितां, मुख्यत: आपणाला प्रस्तुत विषयाचा विचार करावयाचा आहे. हिंदी लोक ज्यांत जाऊन राहिले आहेत, अशा कॉलनी ह्मटल्या ह्मणजे **नेटल** आणि **केप कॉलनी**, ( या स्वतंत्र ब्रिटिश वसाहतवाल्यांच्या ताब्यांत आहेत. ) **झुलुलंड** येथील सरकारची कॉलनी, **ट्रान्सवाल** आणि **आरेंज फ्रीस्टेटची** प्रजासत्ताक राज्यें,* **डेलागोवा** उपसागरांतील पोर्तुगीज लोकांचे प्रांत, **बैरा** आणि **मोझांबिक** या होत. याखेरीज **युगांडा**, आणि **ईस्ट ऑफ्रिकन प्रोक्टरेट** या दोन कॉलन्यांची अगदीं अलीकडे भर पडली आहे. एकट्या १७९६–९७ सालांत, या दोन्ही कॉलनींनीं ३९००० हिंदी मजूर आपल्या प्रांतांत घेतले. **मॉरिशस** बेटांतही, आज बरींच वर्षें हिंदी मजूर—विशेषत:, दक्षिण हिंदुस्थानांतील—जात असतात.

नेटल ही कॉलनी स्वसत्ताक आहे. तेथें झालेल्या अगदीं अलीकडील खानेसुमारीवरून कळतें कीं, त्या प्रांतांत हिंदी लोकांची एकंदर संख्या ५१,००० आहे. पैकीं ३०,००० स्वतंत्र लोक आहेत—ह्मणजे ज्यांची कराराची मुदत पुरी होऊन, जे निरनिराळ्या स्वतंत्र धंद्यांस लागलेले असे आहेत. ५००० व्यापारी या नात्यानेंच कॉलनींत आलेले असून, बाकीचे निरनिराळ्या मुदतीच्या करारांनीं, मजुरीच्या कामावर आहेत. १८९६–९७ पर्यंत, कॉलनीच्या एका कायद्याप्रमाणें, मजुरीवर येणाऱ्या लोकांच्या करारांची मुदत

* ह्या लेख लिहिला गेला त्या वेळीं हीं प्रजासत्ताक राज्यें होतीं.

९ वर्षें ठरलेली होती. ही मुदत भरल्यावरही जर ते आणखी ५ वर्षें कामावर राहिले, तर कॉलनीच्या खर्चानें स्वदेशीं जाण्यास ते लायक होत. परंतु, हा कायदा रद्द होऊन, दुसरा एक नवीन कायदा झाला आहे, व त्यास हिंदुस्थान सरकारची मंजुरीही मिळाली आहे. त्यानें असें ठरविलें आहे कीं, मुदतीचीं ५ वर्षें भरल्याबरोबर स्वदेशीं परत जाईन असा जर आगाऊ करार लिहून देण्यास मजूर तयार असेल, तरच त्याला स्वदेशीं जाण्याचा खर्च मिळेल. तशी खुषी नसेल आणि कॉलनींतच पुढें राहावयाचें असेल तर, आणखी ५ वर्षें चाकरी करण्याचा क़रार लिहून दिला पाहिजे; किंवा दरसाल ३ पौंड (रु. ४५) देऊन, तेथें रहाण्याविषयीं परवाना खेरदी केला पाहिजे. हे फेरफार नेटल सरकारानें जरा भीतभीतच सुचविले होते. कारण, ते हिंदीलोकांच्या तोट्याचे असल्यामुळें, त्यास हिंदुस्थानसरकारची मंजुरी मिळणें सहसा शक्य नाहीं, असें त्यांस वाटलें. परंतु हिंदुस्थानसरकारची संमति मिळविण्याकरितां जे कमीशनर्स इकडे पाठविण्यांत आले होते, त्यांना व्हाईसरॉय ( **एल्जिन** ) साहेबांची मंजुरी मिळण्यास प्रयास पडले नाहींत ! त्याच्याही पूर्वीं सुमारें ११ वर्षें, हिंदीलोकांच्या वसाहतीच्या स्थितीविषयीं चौकशी करण्याकरितां, त्यावेळच्या नेटलच्या गव्हर्नरानें एक कमिशन नेमलें होतें. त्या कमिशननें हिंदी लोकांसंबंधानें अशा तऱ्हेचा कायदा करणें 'घोर अन्यायाचें' होईल, असें आपलें स्पष्ट मत दिलें होतें. तीच 'घोर अन्याया'ची गोष्ट हल्लीं नेटलच्या कायद्यांत राजरोस जाऊन बसली आहे !

नेटलांत रहावयास गेलेल्या हिंदी लोकांचे हक्क खची करणारा असा हा एकच कायदा नेटल सरकारानें केला आहे असें नाहीं.

इ० स० १८९७ त प्रसिद्ध **मि० गांधी** यांनीं **दक्षिण आफ्रिके**तील हिंदी लोकांच्या हक्कां संबंधानें हिंदुस्थानांत प्रथमच चळवळ केली, आणि त्या योगानें इकडील सर्व लोकांचें लक्ष त्या प्रश्नाकडे पूर्वीपेक्षां जास्त वेधलें. त्याचा परिणाम असा झाला कीं, हिंदी लोकांचा स्पष्ट नामनिर्देश न करितां, सामान्यतःच, कॉलनींत वसाहत, प्रवास, किंवा व्यापाराच्या हेतूनें येणाऱ्या लोकांची जी सररास गर्दी होते, तिचें नियमन करण्याच्या मिषानें त्यांनीं त्याच सालीं ३ कायदे केले. त्यांपैकीं १ ल्या कायद्याचें नांव '**कारंटाइन ॲक्ट**' असें असून, तो येणें प्रमाणें आहेः—

(१) १८८२ च्या ४ थ्या कायद्यानुसार, जेव्हां जेव्हां एखादें ठिकाण **दूषित** ह्मणून जाहीर करण्यांत येईल, तेव्हां तेव्हां अशा ठिकाणाहून आलेल्या जहाजांतील कोणाही मनुष्यास स्वच्छ व निर्दोष स्थलीं उतरूं देऊं नये, असाही एक जाहीरनामा गव्हर्नर इन कौन्सिल यांनीं काढावा. (२) ज्या जहाजावर अशा दूषित जागेमधील थोडेतरी उतारू असतील असें जहाज, जरी दुसऱ्या कोठून आलें असेल; किंवा जाहीर केलेल्या दूषित स्थलाचा त्याला यत्किंचित् संसर्ग झाला नसला, तरी त्यास हा हुकूम लागू करण्यांत येईल. (३) सदर्हू हुकूम दुसऱ्या एखाद्या जाहीरनाम्यानें रद्द झाल्याचें प्रसिद्ध होई-पर्यंत अमलांतच आहे, असें समजावें. (४) एखादा इसम जर सदर्हू कायद्याचा भंग करून, किनाऱ्यावर आलाच, तर शक्य असल्यास, तो ज्या जहाजांत **नेटल**मध्यें आला असेल, त्या जहाजाकडे त्याची तावडतोब रवानगी करण्यांत येईल; आणि अशा जहाजाच्या कप्तानानें त्या मनुष्यास वर घेतलें पाहिजे; आणि जहाजाच्या मालकांच्याच खर्चानें त्यास कॉलनींतून, दुसऱ्या कोठें नेऊन सोडलें पाहिजे. (५) ज्या जहाजां-तून, सदर्हू कायद्याविरूद्ध, एखादा किंवा कांहीं इसम किनाऱ्यावर उतरतील, अशा जहाजाचे मालक व कप्तान, अशा उतरलेल्या दर-एक इसमाबद्दल निदान १०० पौंडांच्या शिक्षेस पात्र होतील, आणि

ह्या दंडाची भरपाई करण्याकरितां, वरिष्ट कोर्टाच्या दरखास्तीनें सदर्हू जहाजही जप्त होण्यास पात्र होईल; आणि असा दंड देण्यांत येईपर्यंत, आणि अशा उतरलेल्या दरएक इसमास कॉलनी बाहेर सोडून देण्याची तजवीज जहाजाच्या कप्तानाकडून होईपर्यंत, जहाज मोकळें करण्याची–आंतील माल उतरण्याची–वाटल्यास परवानगीही देण्यांत येणार नाहीं.

दुसरा कायदा व्यापाराच्या परवान्याविषयीं आहे. परंतु, हिंदी लोकांस फुकट परवाने मिळण्याचे बंद व्हावे, हाच त्या कायद्याचा हेतु असल्याचें स्पष्ट दिसून येतें. तो कायदा येणेंप्रमाणें:—

(१) दरएक परगण्यांत किंवा गांवांत, फुटकळ किंवा घाऊक व्यापाऱ्यांस (१८९६ च्या ३८ व्या कायद्याखालीं येणाऱ्या परवान्यांखेरीज) वार्षिक परवाने देण्याकरितां **टाऊन कौन्सिल** किंवा **टाऊन बोर्डानें** वेळोवेळीं एखादा अधिकारी नेमावा. (२) १८८४ च्या ३८ व्या किंवा **स्टॅम्प ॲक्ट** सारखा दुसरा एखादा ॲक्ट किंवा प्रस्तुत ॲक्ट यांअन्वयें, घाऊक व फुटकळ व्यापाऱ्यांस लागणारे परवाने देण्याकरितां जो कोणी इसम नेमला जाईल, त्यास या ॲक्टांत 'परवानगीदार अधिकारी' असें समजण्यांत येईल. (३) १८९६ च्या ३८ व्या कायद्याखालीं न येणारा वाटेल तो–घाऊक किंवा किरकोळ व्यापाराचा–परवाना देणें न देणें 'परवानगीदार' अधिकाऱ्याच्या खुषीवर राहील; आणि तो देण्या न देण्यासंबंधानें त्या अधिकाऱ्याचा जो निकाल ठरेल, तो कोणत्याही न्यायकोर्टाकडून, किंवा पुढल्या कलमांत सांगितलेल्या मार्गाखेरीज इतर मार्गानें, फेरतपासणी होण्यास, रद्द होण्यास, किंवा फेरफार होण्यास पात्र होणार नाहीं. (४) १८८४ चा ३८ वा कायदा किंवा अशा दुसऱ्या ॲक्टानुसार जे परवाने मिळावयाचे असतील, त्यासंबंधीं 'परवानगीदार अधिकाऱ्या'च्या हुकुमाविरुद्ध अपील करावयाचा हक्क परवाना हवा असलेल्या माणसास आहे; आणि तें **कलोनियल सेक्रेटरीकडे** केलें पाहिजे;

बाकीच्या परवान्यांसंबंधानें अपील त्याच्या विशिष्ट स्वरूपाप्रमाणें **टाऊन बोर्ड** केलें पाहिजे. ह्मणजे **कलोनियल सेक्रेटरी टाऊन कौन्सिल** किंवा **टाऊन बोर्ड** त्या अपिलाचा विचार करून परवाना द्यावा किंवा रद्द करावा याविषयींचा हुकूम सोडतील. (५) ज्या माणसाला (इ० स० १८८७ चा ४७ वा कायदा) **नादारीच्या** कायद्यांतल्या [१८० कलमांतील पोटकलम, (अ) च्या] सर्व अटी (तसें करावयास सांगितलें असतां) परवाना अधिकाऱ्याच्या मनाप्रमाणें पुऱ्या करून दाखवितां येणार नाहींत, अशा कोणाही इसमाला कशाचाही परवाना काढून मिळणार नाहीं. [ १८० पोट कलम ( अ ) यांतील अट ह्मणजे, आपल्या व्यापारास लागणाऱ्या सर्व हिशेबाच्या वह्या इंग्रजींत ठेवतां येणें वगैरे. ] ( ६ ) व्यापार करावयास योजलेली जागा जर त्या व्यापारास योग्य अशी नसेल; किंवा तेथें योग्य व पुरेशी अशी आरोग्याविषयीं व्यवस्था नसेल, किंवा माल ठेवावयाच्या वखारी खेरीज, कारकून, नौकरचाकर, विक्री करणार वगैरे लोकांची सोय करण्यासारखी चांगली व पुरेशी अशी दुसरी जागा नसेल, तर त्या जागेवर व्यापार करण्याचा परवाना मिळणार नाहीं. ( ७ ) घाऊक किंवा किरकोळ व्यापार उदीम करणारा कोणीही इसम, जर परवाना मिळविलेल्या जागेची अशी अव्यवस्था होऊं देईल कीं, ज्या योगें त्याचा परवाना काढून घेण्यास तो पात्र होईल; अशा प्रत्येक माणसानें हा कायदा मोडला असें समजण्यांत येऊन, दर अपराधाबद्दल २० पौंडाच्या ( ३०० रु. ) दंडास पात्र होईल; व हा दंड कोणीही परवानगीदार अधिकाऱ्यास मॅजिस्ट्रेटच्या कोर्टांत वसूल करून घेण्याचा अधिकार आहे.

यांपैकीं, ९ व्या कलमाचा रोंख मुख्यतः हिंदी व्यापाऱ्यांनाच परवाने मिळूं न देण्याविषयीं आहे, हें तेव्हांच दिसून येतें; कारण, फक्त हिंदी व्यापाऱ्यांपैकींच पुष्कळांना आपले हिशेब इंग्रजींत ठेवितां येत नाहींत.

तिसऱ्या कायद्याचा उद्देश ( बाह्यात्कारी तरी ) बाहेरून

येणाऱ्या लोकांच्या गर्दीचें नियमन करण्याचा होता हें वर सांगितलेंच आहे. त्यांतील कलमें येणेंप्रमाणें:—

१ या ॲक्टास '१८९० चा, परदेशियांच्या येण्याचें नियमन करणारा ॲक्ट' असें ह्मणावें.

२ हा ॲक्ट पुढील इसमांस लागू नाहीं:—

(अ.) या ॲक्टास जोडलेल्या अ परिशिष्टा बरहुकूम ज्याच्याजवळ दाखला आहे, व ज्याच्यावर **कलोनियल सेक्रेटरीची, नेटलच्या एजंट-जनरलाची**, किंवा या कायद्याच्या कामाकरितां नेटलसरकारानें नेमलेल्या-नेटलमधील किंवा नेटलच्या बाहेरील अधिकाऱ्याची सही आहे, असा कोणीही इसम.

(ब.) ज्या प्रकारच्या लोकांस **नेटलांत** येऊं देण्याविषयीं **नेटलच्या** कायद्यानें किंवा सरकारच्या स्वतंत्र ठरावानें विशेष व्यवस्था करण्यांत आली आहे, अशा वर्गांतील कोणीही इसम.

(क) **कलोनियल सेक्रेटरीच्या** दस्तुरखुद्द लेखानें ज्या इसमास सदर्हू कायद्यापासून जादा मोकळीक मिळाली आहे, असा कोणीही इसम.

(ड.) महाराणी सरकारचे आरमारांतील व सैन्यांतील लोक.

(इ.) कोणत्याही सरकारच्या लढाऊ गलबतावरील अमलदार व हाताखालचे लोक.

(फ.) राणीसरकारच्या किंवा दुसऱ्या कोणत्याही सरकारच्या हुकूमानें ज्यास योग्य रीतीनें **नेटल** मध्यें पाठविण्यांत आलें आहे, असे लोक.

पुढील पोट कलमांत 'मनाई केलेले परकीय लोक' या सदराखालीं निर्दिष्ट केलेल्या वर्गांपैकीं कोणत्याही इसमास जलमार्गानें किंवा खुष्कीनें **नेटलमध्यें** येऊन वसाहत करण्याची या कायद्यानें मनाई केली जात आहे. ते इसम येणेंप्रमाणें:—

(अ) या कायद्यानुसार नेमलेल्या एखाद्या अंमलदारानें एखाद्या इसमास, या कायद्यास जोडलेल्या परिशिष्टाबरहुकूम, युरोप-

मधील कोणत्यातरी एक भाषेंत **कलोनियल सेक्रेटरीला** अर्ज ल्याहावयास व त्यावर सही करावयास सांगितलें असतां, ज्यास तसें करितां येणार नाहीं असा इसम.

( ब. ) अगदीं कंगाल असलेला किंवा पुढें मागें सार्वजनिक खर्चानें पोसण्याची वेळ येण्याचा संभव असलेला इसम.

( क. ) वेड लागलेला किंवा डोकें ताळ्यावर नसलेला इसम-

( ड. ) किळसवाण्या व भयंकर अशा सांसर्गिक व्याधीनें पीडिलेला असा इसम.

( इ. ) एखाद्या राजकीय गुन्ह्याबद्दल पूर्ण माफी मिळण्यापूर्वी, दोन वर्षांच्या आंत, ज्याला, बदमाषगिरीबद्दल किंवा दुसऱ्या कोणत्या निंद्य अपराधाबद्दल अथवा नैतिक भ्रष्टता दर्शविणाऱ्या कोणत्याही गैरवर्तनाबद्दल शिक्षा झालेली आहे असा इसम.

( फ. ) कोणीही वेश्या, किंवा इतरांच्या वेश्यत्वावर उदरनिर्वाह करणारा कोणीही इसम.

४ मना केलेला कोणीही परकीय मनुष्य वरील अटींचें उल्लंघन करून **नेटल**मध्यें आलेला किंवा येण्याचा प्रयत्न करीत असतांना सांपडल्यास, त्यानें या कायद्याचा भंग केला असें समजण्यांत येईल; आणि इतर शिक्षेखेरीज, कॉलनींतून बाहेर घालवून देण्याच्या शिक्षेसही तो पात्र होईल; आणि गुन्ह्याची शाबिती झाल्यास त्यास सहा महिन्यांहून अधिक नाहीं अशी बिन सक्तमजूरीच्या कैदेची शिक्षा देण्यांत येईल; परंतु गुन्हेगारास बाहेर पाठविण्याचे वेळीं किंवा एका महिन्याचे आंत, कॉलनी सोडून जाण्याविषयीं प्रत्येकीं ५० पौंडाचे ( ७५० रुपयांचे ) असे दोन लायक जामीन गुन्हेगारानें दिल्यास, ही शिक्षा रद्द होईल.

५ जो इसम या ॲक्टाच्या तिसऱ्या कलमांत किंवा सदर्हू कलमांतील क, ड, इ, फ या पोट कलमांत दिलेल्या ( मनाई केलेल्या परकीयांच्या) व्याख्येखालीं येत नाहीं, त्यास पुढील अटींवर **नेटल** मध्यें येण्याची परवानगी दिली जाईल. त्या अटी येणेंप्रमाणेः—

(अ) त्यानें किनाऱ्यावर उतरण्यापूर्वी या कायद्या अन्वयें नेमलेल्या अधिकाऱ्यांजवळ १०० पौंड (१५०० रु०) अनामत ठेविले पाहिजेत.

(ब) **नेटल**मध्यें आल्यापासून एका आठवड्याच्या आंत जर सदर्हू मनुष्य, तो या कायद्याच्या मनाईखालीं येऊं शकत नाहीं, अशाविषयीं कॅलोनियल सेक्रेटरीचा किंवा एखाद्या मॅजिस्ट्रेटचा दाखला हजर करील, तर ते त्याचे अनामत ठेवलेले १०० पौंड परत देण्यांत येतील.

(क) परंतु याप्रमाणें एका आठवड्याच्या आंत जर तो इसम अशा प्रकारचा दाखला हजर करण्यास चुकेल, तर ते त्याचे अनामत ठेवलेले १०० पौंड जप्त करण्यांत येतील; आणि त्यास 'मनाई केलेला परकीय' असें समजण्यांत येईल. तथापि, अशा प्रकारचा इसम ज्या जहाजांतून कॉलनींतील एखाद्या बंदरांत उतरला असेल, अशा जहाजावर किंवा त्याच्या मालकावर कोणत्याही प्रकारची जबाबदारी सदर्हू कायद्यानें येऊं शकत नाहीं.

६ जो कोणी इसम, आपण **नेटल**मध्यें कायदेशीर रहिवासी झालों आहों, आणि कलम ३ किंवा त्यांतील पोट कलमें क, ड, इ, फ, यांमध्यें दिलेल्या 'मनाई केलेल्या परकीयां'च्या व्याख्येखालीं आपण येत नाहीं, अशी या कायद्या अन्वयें नेमलेल्या अधिकाऱ्याची पूर्ण खात्री करून देईल, त्यास 'मनाई केलेला परकीय' असें मानण्यांत येणार नाहीं.

७ 'मनाई केलेला परकीय' नसणाऱ्या इसमाची बायको आणि (अज्ञानवयी असल्यास) मूल, हीं या कायद्यानें ठरविलेल्या मनाईतून मुक्त आहेत, असें समजलें जाईल.

८ ज्या जहाजांतून एखादा,–'मनाई केलेला'–नेटलच्या किनाऱ्यावर उतरण्यांत येईल, अशा जहाजांचा कप्तान व त्याचे मालक हे सर्व मिळून, किंवा प्रत्येकीं निदान १०० पौंडांच्या (१५०० रु.) दंडास पात्र होतील; आणि असे 'मनाई केलेले' इसम पांचांपेक्षां अधिक असल्यास पहिल्या पांचानंतर, दरेक माणसामागें १०० पौंड या प्र-

माणें हा दंड ५००० पर्यंतही वाढविण्यांत येईल; आणि अशा तऱ्हेच्या दंडाची भरपाई करण्याकरितां, वरिष्ट कोर्टाच्या हुकुमानें सदर्हू जहाज जप्त करण्यास पात्र होईल, अथवा या दंडाचा पुरा भरणा होईपर्यंत, आणि जितके मनाई केलेले उतारू त्या जहाजावर असतील त्या सर्वांना कॉलनीच्या बाहेर नेऊन सोडण्याची तजवीज जहाजाच्या कप्तानानें केली आहे, अशी या कायद्याअन्वयें नेमलेल्या अधिकाऱ्याची पूर्ण खात्री होईपर्यंत, तें जहाज रिकामें करण्याची परवानगी देण्यांत येणार नाहीं.

वरील कायद्यांतील ३( अ ) हें कलम केवळ हिंदी लोकांस नेटलमध्यें न देऊं देण्याच्याच उद्देशानें मुद्दाम घातलें आहे हें चाणाक्ष वाचकांच्या ध्यानांत आलेंच असेल. वरील तिन्ही कायद्यांत ब्रिटिश इंडियनांचा कोठेंही स्पष्ट निर्देश केलेला नाहीं, हें खरें आहे. तथापि, हे सर्व कायदे निःसंशय त्यांनाच अनुलक्षून करण्यांत आले, हें समजणें फारसें कठीण नाहीं. तरी देखील, हे कायदे करण्यांत ते करणारांचा वरीलच उद्देश होता, अशाविषयीं कोणास प्रमाण हवें असल्यास '**इमिग्रेशन ॲक्ट**' (वसाहत करावयास येणाऱ्यांच्या संबंधाचा कायदा) पुढें आणतांना त्या वेळचे मुख्य प्रधान **नेक नामदार हॅरी एस्कोंब** यांनीं तत्संबंधानें काढिलेले उद्गार येथें देतों, ह्मणजे झालें. ते ह्मणालेः-

"हा कायदा युरोपियनांना लागू करण्याचें कोणत्याही सरकारच्या स्वप्नीं देखील नाहीं, असें जबाबदार माणसांनीं स्पष्ट जाहीर केलेंच आहे. ह्या कायद्याचा मुख्य रोंख **आशियांतून** येणाऱ्या लोकांवरच आहे. कित्येक लोक असें ह्मणतात कीं, आह्मांस सरळ व रास्त मार्ग पाहिजे. होय. कबूल आहे. पण सदाच सरळ व साधा मार्ग मिळतो किंवा तो धरून चालल्यानें हित होतें, असें नाहीं. तारूं जेव्हां वाऱ्याच्या उलट दिशेनें जात असेल, तेव्हां शिडांचीं तोंडें फिरविणें व वळणा-

वळणानें जहाज चालविणें हेंच श्रेयस्कर असतें. एखाद्या मनुष्यास अडचणी आल्या असतां, त्याच्याशीं लढणें हाच खरा पुरुषार्थ होय; त्या अडचणी अगदीं दूर होण्यासारख्या नसल्या तर, त्यांना घेरा घालून टाळून जाणें, हेंच शहाणपणाचें होय. आवेशाच्या भरांत, समोर असलेल्या दगडी भिंतीवर तुटून पडून, स्वतःचा कपाळमोक्ष करून घेणें ह्मणजे अविचाराची कमाल होय."

यावर सध्यांचे (**नेटलचे**) मुख्यप्रधान **सर हेन्री बिन्स** यांनीं पुढीलप्रमाणें जरा झणझणीत उत्तर दिलें:—

"अशा सारख्या गंभीर सार्वत्रिक महात्त्वाच्या प्रश्नाचा केवळ मर्यादित परिस्थिती पुरता विचार करणें इष्ट नाहीं. हा ( '**इमिग्रेशन ॲक्टाचा**' ) मसुदा अगदीं अयोग्य व एकदेशीय आहे. त्याविरुद्ध आतांच जो अर्ज वाचून दाखविण्यांत आला, त्याच्यांत या कायद्याविषयीं 'ब्रिटिश लोकास न शोभेसा' (अर्थात अन्यायी व लांछनास्पद. Un-British) असें जें ह्मटलें आहे, तें सर्वथैव खरें आहे. हा मसुदा कोणासच संमत नाहीं. **नेटल**मध्यें असा एकही मनुष्य नाहीं, कीं ज्याला हा मसुदा पसंत आहे. खुद्द मुख्य प्रधानांना देखील तो मान्य नसेल, अशी माझी खात्री आहे. आतां, तशा तऱ्हेच्या वाममार्गाची सध्यांच जरूर आहे, ह्मणून त्याला कायद्याचें स्वरूप मिळणें इष्ट आहे, असें त्यांना वाटत असेल तर वाटो. पण निदान त्यांना स्वतःला तरी तो कायदा संमत नाहीं. ही गोष्ट त्यांच्या भाषणावरून स्पष्ट होत आहे."

परंतु, **सर हेन्री बिन्स** यांच्या पथ्यकर युक्तिवादाचा कांहीं उपयोग झाला नाहीं! सर्व मसुदे एकामागून एक पसार होऊन, हल्लीं ते **नेटलचे** कायदे बनून राहिले आहेत.

याचप्रमाणें हिंदीलोकांचे निवडणुकीचे हक्कही हिरावून घेण्याविषयीं **नेटल सरकारानें** प्रयत्न केले आहेत. १८९१ पर्यंत इतर ब्रिटीश प्रजेप्रमाणेंच, हिंदी लोकांनाही निवडणुकींमध्यें हक्क असत. परंतु १८९४ मध्यें एक कायदा पसार

होऊन, **आशिया**मध्यें जन्मलेल्या देशी लोकांचीं नांवें कोणत्याही प्रकारच्या मतदारांच्या यादींत घालावयाचीं नाहींत असें ठरविण्यांत आलें. तथापि कांहीं दिवसांनीं हा कायदा रद्द होऊन, त्याच्या ऐवजीं 'हक्काविषयीं कायदा' नांवाचा दुसरा एक कायदा पसार झाला. '**इमिग्रेशन ॲक्ट**' वगैरे जे कायदे मागें सांगितले, त्याच प्रकारचा हा कायदा आहे. यामध्यें देखील ब्रिटिश इंडियनांविषयीं स्पष्ट असा निर्देश कोठेंही केलेला नसून, त्याचे अनिष्ट परिणाम मात्र त्यांनाच भोगावे लागत आहेत. हाच कायदा **नेटल**मध्यें हल्लीं चालू असून तो येणेंप्रमाणें आहेः—

"जे जातीनें युरोपियन नसतील, व ज्या देशांस पार्लमेंटांतील निवडणुकीच्या हक्काच्या धर्तीवर उभारलेल्या लोकनियुक्त संस्थांचा हक्क अजून मिळाला नाहीं, अशा देशांतील जे रहिवाशी असतील अथवा अशा देशांतल्या पुरुषांचे जे वंशज असतील, त्यांनीं ह्या हक्काच्या बजावणीपासून मुक्तता होण्याविषयीं **गव्हर्नर-इन्-कौन्सिल** पासून आगाऊ हुकूम मिळविल्याशिवाय, कोणत्याही प्रकारच्या मतदारांच्या यादींत आपलीं नांवें नोंदविण्यास ते लायक होणार नाहींत."

यावर, 'पार्लमेंटांतील निवडणुकीच्या हक्काच्या धर्तीवर उभारलेल्या लोकनियुक्त संस्थांचा हक्क आह्मीं हिंदुस्थानांत उपभोगीत आहों' अशी **नेटल** मधील ब्रिटिश इंडियनांनीं तक्रार केली; परंतु **नेटल सरकारानें** ती मुळींच मान्य केली नाहीं; आणि सरसकट हिंदी लोक सदर्हु कायद्याप्रमाणें निवडणुकींत मत देण्याच्या हक्कास लायक नाहींत, असें ठरवून टाकलें.

अशाच सारखे **नेटल**मध्यें दुसरेही कित्येक कायदे आहेत. त्या योगानें तेथें गेलेल्या हिंदी लोकांची योग्यता फारच कमी

दर्जाची झाली आहे. उदाहरणार्थ, १८६९ चा १९ वा कायदा ह्मणून एक आहे. त्यांत असें आहे कीं, कोणाही 'काळ्या अदमी' नें आपल्या लायकीविषयीं सरकारी अमलदाराची खात्री करून देतां येण्यासारखी असल्याशिवाय, किंवा स्वतःच्या धन्याचा दाखला जवळ असल्याशिवाय, रात्रीं ९ च्या पुढें घराबाहेर पडूं नये. या कायद्याची अमलबजावणी इतक्या सक्तीनें होत असते कीं, कित्येकदां चांगल्या इभ्रतदार हिंदी गृहस्थांना देखील अंधार-कोठडींत बसून रात्र काढण्याचा प्रसंग आलेला आहे! दुसऱ्या एका कायद्यानें, सरकारी अमलदारांना वाटेल त्या हिंदी माणसाजवळ परवाना मागण्याचा अधिकार दिला आहे. हे सर्व कायदे केवळ हिंदी लोकांना पदोपदीं नाडण्याकरितां व त्यांना त्यांची हीनता पावलोंपावलीं जाणविण्याकरितांच केले आहेत. त्यांची अमलबजावणीही तितक्याच करड्या दृष्टीनें होत असल्यामुळें, हिंदी लोकांस जो छल व जी मानहानि सोसावी लागते, ती कांहीं अवर्णनीय आहे!

**नेटलचा 'कॉन्स्टिटयूशन ॲक्ट'** (रचनेचा कायदा) ह्मणून सर्वांत महत्त्वाचा कायदा आहे. त्यांत असें एक कलम आहे कीं, (नेटलमध्यें) जेव्हां कॉलनीमधील एखादा विशिष्ट वर्गापुरताच लागू असणारा कायदा करावयाचा असेल, व ज्याचा उद्देश जातीनें युरोपियन नसणाऱ्या ब्रिटिश प्रजेचे हक्क मर्यादित करण्याचा असेल, असा कायदा अमलांत येण्यापूर्वीं, त्यास **राणीसरकारची** आगाऊ मंजूरी मिळाली पाहिजे. अर्थात, रीतीप्रमाणें, असे सर्व कायदे, कॉलनीच्या करितां नेमलेल्या राणीसरकारच्या **स्टेट सेक्रेटरीकडे** मंजुरी करितां पाठविण्यांत येतात; आणि चमत्काराची व खेदाची

गोष्ट ही कीं, अशा कायद्यांविरुद्ध **नेटल**मधल्या हिंदी लोकांच्या तक्रारी **स्टेट सेक्रेटरीकडे** गेल्या असतांही, ते सर्व कायदे स्टेट सेक्रेटरीकडून मंजूर होऊन येतात ! याप्रमाणें, हिंदी लोकांचे हक्क मर्यादित करण्याकरितां केलेल्या प्रयत्नांनीं **नेटलसरकारचें** समाधान झालें नाहींसें दिसतें ! कारण, यापुढें, हिंदी लोकांना कॉलनींत जमीनही विकत घेतां येऊं नये, अशाविषयीं कायदा होण्याचीं चिन्हें दिसत आहेत. या संबंधानें, **ॲन्टि-आशिऑटिक** ( आशियांतील लोकांविरुद्ध असणारी ) **कमिटी** आणि **नेटल प्रोग्रेस लीग** ( **नेटल**-उत्कर्षेच्छु मंडळ ) यांनीं एक ठराव पसार करून, तो सरकाराकडे पाठविला. त्यास सरकारच्या **चीफ अंडर सेक्रेटरी**चें असें उत्तर आलें:—

'आपणांस कळविण्यांत येतें कीं, कॉलनींत ( नेटलच्या ) जमिनी पैदा करण्याची **आशियाटिक** लोकांना बंदी करणारे कायदे करण्याचा जो प्रश्न उपस्थित झाला आहे, त्याचा सरकार काळजीपूर्वक विचार करील.'

**केप ऑफ् गुडहोप** किंवा हल्लीं जी **केपकॉलनी** या नांवानें विशेष प्रसिद्ध आहे, तेथील हिंदी लोकांची स्थिति, **नेटल**पेक्षां फारशी समाधानकारक आहे असें नाहीं. या कॉलनीची लोकसंख्या १८ लक्ष असून, त्यांपैकीं सुमारें १० हजार हिंदी लोक आहेत. इ० स० १८९४ त, केपकॉलनी सरकारानें एक कायदा केला; व त्यांत हिंदी लोकांना हम रस्त्याच्या बाजूच्या पायवाटांवरून चालण्याची मनाई करण्याचा, आणि त्यांना ठरीव भागांतच वसती करण्यास भाग पाडण्याचा, असे पोट-कायदे तयार करण्याचा '**ईस्ट लंडन म्युनिसिपालिटी**'ला अधिकार दिला. त्याचप्रमाणें, तेथील हिंदी व्या-

पाऱ्यांना परवाने मिळण्यासही फार अडचण पडते. कारण, तेथील मॅजिस्ट्रेट, कारणें वगैरे न दाखवितां, त्यांना परवाने देण्याचें नाकारतात; आणि त्याच्या विरुद्ध तक्रार केली असतां, सरकार मॅजिस्ट्रेटचाच निकाल कायम करितें! **आशियांतून** येणाऱ्या लोकांसंबंधानें सर्वांनीं मिळून योग्य बंदोबस्त करण्याकरितां, **दक्षिण आफ्रिकें**तील **स्वतंत्र संस्थानां**ची लवकरच एक परिषद् भरविण्याचा आपला विचार असल्याचें, **केपकॉलनी**चे सध्यांचे प्रधान **मि० स्क्रीनर** यांनीं नुक्तेंच जाहीर केलें आहे. कारण, **नेटल**मधल्या '**इमिग्रेशन ॲक्टा**'नें दक्षिण आफ्रिकेंतील युरोपियन वसाहतवाल्यांच्या हक्कांचें व्हावें तसें संरक्षण होत नाहीं, असें त्यांचें मत आहे.

**झुलुलंड** ही खुद्द सरकारची कॉलनी; तिनें देखील **नेटल** व **केपकॉलनी** यांचाच कित्ता उचलला आहे. या कॉलनींत म्युनिसिपालिटीचा हक्क असलेलीं अशीं कांहीं शहरें आहेत. परंतु अशा शहरांत, फक्त, जातीनें व वंशावळीनें युरोपियन असणाऱ्या लोकांनांच रहावयास मिळेल, असें सरकारानें ठरविलें आहे. **मेलमंथ** शहरांत, कित्येक हिंदी लोकांनीं जवळ जवळ २००० पौंड ( ३० हजार रुपये ) किमतीच्या जमिनी खरेदी केल्या; पण त्यांना त्या जमिनी ताब्यांत घेण्याची सरकारानें मनाई केली ! याप्रमाणें, सदर्हू कॉलनींत हिंदी लोकांना पूर्ण बहिष्कार घातल्यासारखें केलें आहे.

**झुलुलंड** मधील खाणींत निघालेलें सोनें कोणीही हिंदी मनुष्यानें विकत घेणें किंवा त्याच्या जवळ सांपडणें हा देखील, तेथील 'खाणींच्या कायद्या' प्रमाणें, गुन्हा आहे ! **ट्रान्सव्हाल** किंवा **साऊथ आफ्रिकन रेपब्लिक** हें जरी मुख्यत्वेंकरून **डच** ( **बोअर** ) लोकांच्या अमलाखालीं आहे, तथापि

महाराणी सरकारचें वर्चस्व त्यांनीं कबूल केलें आहे. या **रेपब्लिक**मध्यें, व्यापारी, फेरीवाले, स्वयंपाकी, मजूर या नात्यानें जाऊन राहिलेले असे सुमारें ५००० हिंदी आहेत. १८८४ च्या **लंडन कन्व्हेन्शन** कायद्याच्या १४ व्या कलमांत असें स्पष्ट म्हटलें आहेः—'मूळ रहिवाशांखेरीज, जे कोणी इतर लोक **साऊथ आफ्रिकन रेपब्लिकचे** कायदे पाळण्यास तयार असतील, त्यांना **ट्रान्सव्हाल** संस्थानांतील कोणत्याही भागांत मुशाफरी करण्याची किंवा मुलांमाणसांसुद्धां येऊन रहाण्याची पूर्ण परवानगी मिळेल. घरें, कारखाने, वखारी, दुकानें, बखळी, वगैरे संपादन करण्याचा किंवा भाड्यानें चालविण्याचा त्यांना हक्क मिळेल. त्यांना, स्वतः किंवा त्यांना योग्य वाटतील त्या मुनिमांमार्फत, आपला व्यापार चालविण्याची पूर्ण मुभा आहे. जीवजिंदगीसंबंधानें, किंवा उद्योग धंद्यासंबंधानें, एकंदर **ट्रॅन्सव्हालांतील** लोकांवर जे कर सर्व साधारण किंवा विशेष स्थानापुरते—बसविण्यांत येतील, त्यांच्याखेरीज, कोणतेही जादा कर परस्थ वसाहतवाल्यांवर बसविण्यांत येणार नाहीं." या करारप्रमाणें. १८९३ पर्यंत **ट्रॅन्सव्हाल**मधील हिंदी लोकांना इतर ब्रिटिशप्रजेप्रमाणेंच पूर्ण हक्क होते. परंतु, १८९३त, हे ब्रिटिश इंडियनांचे हक्क काढून घेण्याकरितां, **ट्रॅन्सव्हाल** सरकारानें, वरच्या कायद्यांत अशी सुधारणा करण्याचें योजलें.—मूळ कायद्यांत, 'मूळ रहिवाशांखेरीज जे कोणी इतर लोक' असे शब्द होते, त्यांच्या ऐवजीं, '**आफ्रिकेंतील** मूळ रहिवासी, किंवा वसाहतीस आलेल्या हिंदी व चिनी मजुरांखेरीज' असे शब्द घालावे, अशी एक सूचना पुढें आली. त्यावेळचे कॉलनीबाबत **स्टेट सेक्रेटरी लॉर्ड डर्बी** हे होत. त्यांनीं ही सूचना बऱ्याच विचारांतीं जरा नाखुषीनेंच

मान्य केली; व शेवटीं वरच्या सारखा कायदा करण्याची **ट्रॅन्सव्हाल** सरकारास परवानगी दिली. त्यावर, '**व्होल्कस् राड**'नें (**ट्रॅन्सव्हालां**तील लोकप्रतिनिधींची सभा) **लॉर्ड डर्बी** यांच्या हुकुमाचा भलताच अर्थ करून, १८८५ चा ३ रा म्हणून एक कायदा पास केला. त्यांत हिंदी लोकांना स्थावर मिळकत संपादण्याची व रेपब्लिकच्या नागरिकपणाचा हक्क मिळण्याची मनाई केली. जे हिंदी लोक कॉलनींत वसाहत करावयास येतील, त्यांनीं कॉलनींत आल्यापासून ८ दिवसांच्या आंत, २५ पौंड (रु० ३७५) भरून, आपलीं नांवें नोंदविलीं पाहिजेत, असेंही त्यांत एक कलम घातलें. त्याचप्रमाणें, हिंदी लोकांना चालण्याकरितां स्वतंत्र रस्ते नेमून देण्याचा, व त्यांच्या वसतीकरितां विशिष्ट जागा व भाग ठरविण्याचाही अधिकार सरकारानें आपल्याकडे घेतला. हा कायदा पास होऊन जेव्हां स्टेट सेक्रेटरींकडे गेला, तेव्हां तो कनव्हेन्शनच्या १४ व्या कलमाविरुद्ध आहे, असें त्यांनीं ठरविलें. त्यावर स्टेट सेक्रेटरी आणि **आफ्रिकेचे हायकमिशनर** यांच्यामध्यें सदर्हू बाबतींत जंगी व मजेदार पत्रव्यवहार होऊन, शेवटीं **व्होल्कस राड**नें सदर्हू कायद्यांत पुढील सुधारणा कराव्या असें ठरलें:–हिंदी लोकांना, त्यांना नेमून दिलेल्या रस्त्यांवर किंवा शहराच्या विशिष्ट भागांत स्थावर मिळकत करण्याची परवानगी असावी; नांवें नोंदविण्याची फी २५ पौंडांची ३ पौंड करावी; आणि हिंदी लोकांना रहाण्याकरितां विशिष्ट जागा नेमून देतांना, स्वच्छता व आरोग्य या गोष्टीकडे अवश्य लक्ष पुरविण्याविषयीं, **व्होल्कसरडा**नें आश्वासन द्यावें. यावर, ट्रॅन्सव्हाल सरकारानें, हिंदी लोकांस केवळ वस्ती करितांच 'विशिष्ट भाग' नेमून न

देतां, त्यांनीं आपला व्यापारही तितक्याच मर्यादित भागांत चालवावा, अशी सक्ति करण्याचा प्रयत्न केला. अर्थात्, **ट्रॅन्सव्हाल**मधील हिंदी लोकांनीं या बाबतींत स्टेट सेक्रेटरी-कडे तक्रारीचा अर्ज केला. तेव्हां, दोन्ही सरकारांनीं या प्रकरणाची तडजोड करण्याचें काम, **ऑरेंज फ्रीस्टेट**मधील **चीफ-जस्टिस मि० मेलिन्स ड व्हिलिअर्स** यांजकडे सोंपविलें. **मि० व्हिलिअर्स** यांनीं पुढील प्रमाणें निकाल दिला:—

हिंदी लोक आणि आशियांतील इतर व्यापारी हेही ब्रिटिश प्रजा असल्यामुळें, इ० स० १८८५ च्या ३ ऱ्या कायद्यांत १८८६ सालीं व्होल्कसराडनें सुधारणा केल्या प्रमाणें, त्यांत हिंदी लोकांविषयीं केलेलीं कलमें पूर्णपणें अमलांत आणणें व पाळणें सरकारचा हक्क व कर्तव्य आहे; आणि ज्या बाबतींत, आपल्यास मिळत असलेली बागणूक सदर्हू कायद्यास धरून नाहीं, अशी, अशा लोकांपैकीं ( हिंदी व इतर एशियाटिक लोकांपैकीं, ) अर्ध्या अधिक लोकांची तक्रार येईल, त्या बाबतींत शिरस्त्याप्रमाणें ट्रॅन्सव्हाल मधील योग्य न्याय-कोर्टांत जाऊन तेथें जो निकाल होईल, तो उभयपक्षांनीं मान्य केला पाहिजे. ”

परंतु, या निकालानें हिंदीलोकांना **ट्रॅन्सव्हाल** सरकाराकडून मिळणाऱ्या वागणुकींत मुळींच सुधारणा झाली नाहीं. कारण, सदर्हू तडजोडीच्या निकालांत वादग्रस्त बाबतींत निकाल करण्याचें काम पुन्हां ट्रॅन्सव्हालच्याच न्यायाधीशांकडे ठेवण्यांत आलें. अशा रीतीनें आपल्यास सर्वस्वीं **ट्रॅन्सव्हाल** मधील न्यायाधीशांच्या हातीं ठेवणें अन्यायाचें आहे, असें हिंदीलोकांनीं पुन्हां स्टेट सेक्रेटरीकडे गाऱ्हाणें नेलें. परंतु, त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. फक्त, **स्टेट सेक्रेटरी** मि० **चेंबर्लेन** यांनीं **हायकमिशनरास** पाठविलेल्या खलित्यांत असें म्हटलें आहे:—

" होतां होईल तों, मि० **व्हिलीअर्स** यांनीं दिलेला निकाल पाळण्याची व त्याच्या धोरणावर केलेल्या कायद्याच्या व सार्वजनिक महत्त्वाच्या बाबतींत, उभय सरकारांमध्यें जे वादग्रस्त प्रश्न आहेत त्यांचा निकाल लावण्याची माझी मनःपूर्वक इच्छा आहे. तथापि, **साऊथ आफ्रिकन रेपब्लिकास**, या व्यापाऱ्यांच्या तर्फे पुढें मागें मित्रत्वाच्या नात्यानें सूचना करण्याची मोकळीक मी स्वतःस ठेवीत आहें. त्याप्रमाणें, त्या सरकारच्या अधिकाराची कायदेशीर मर्यादा एकदां निश्चित झाल्यावर, या नवीन धोरणावर आपल्या शासनपद्धतीची फेर तपासणी करून, हिंदी लोकांस अधिक उदारतेनें वागविणें व व्यापारांतील स्पर्धेस आपण उत्तेजन देत आहों, असा संशय देखील ( कारण, वस्तुतः अशा तऱ्हेची पक्षपात बुद्धि तेथील अधिकारी वर्गांत वसत नाहीं, असें मानण्यास मजजवळ पुष्कळ सबळ कारणें आहेत. ) घेण्यास जागा राहूं नये, अशी व्यवस्था करणें, हें त्या सरकारास बरेंच फायदेशीर होईल, असेंही त्यास सुचविण्याचा माझा इरादा आहे. "

हा ' **ट्रॅन्सव्हाल**च्या अधिकाराची कायदेशीर मर्यादा ' बहुतेक अमर्यादच आहे, असें निश्चित होऊन चुकलें आहे. वरील हक्कासंबंधानें नुकताच एक महत्वाचा खटला **ट्रॅन्सव्हाल**च्या **हायकोर्टा**पुढें कांहीं दिवसांपूर्वीं आला होता. त्यावेळीं, हिंदी लोकांनीं ' विशिष्ट भागांतच राहिलें पाहिजे व तेथेंच व्यापार चालविला पाहिजे ' असें ठरवून टाकिलें ! तेव्हांपासून, त्या कायद्याची अशीच अंमलबजावणी चालू आहे. तथापि अजूनपर्यंत हिंदीलोकांस, अधिक उदारतेनें वागविण्याविषयीं ' मित्रत्वाच्या नात्यानें ' सूचना **मि. चेंबर्लेन** साहेबांकडून गेली नाहीं !

याखेरीज, **ट्रॅन्सव्हाल** मधील हिंदीलोकांस इतर किती तरी प्रकारची हाल अपेष्टा व मानहानी सोसावी लागते. गो-

-यालोकांकरितां राखून ठेवलेल्या आगगाडीच्या १ ल्या व २ ऱ्या वर्गाच्या डब्यांत प्रवास करण्याची त्यांस मनाई आहे. प्रवास करितांना प्रत्येक हिंदी लोकांस आपल्या जवळ एक शिलिंग किंमतीचा '**ट्रॅव्हेलिंग पास**' ( प्रवास करण्याचा परवाना ) नांवाचा परवाना जवळ बाळगावा लागतो. इ. स. १८८९ त राणीसरकार व ट्रॅन्सव्हाल सरकार ह्यांच्यामध्यें एक तह होऊन, ट्रॅन्सव्हाल मधील ब्रिटिशप्रजेवर लष्करी नौकरीची सक्ती करण्यांत येऊं नये असें ठरलें. परंतु 'ब्रिटिश प्रजा' ह्मणजे गोरे लोकच असून, त्यांमध्यें 'काळ्या आदमीं' चा समावेश होत नाहीं, असें **व्होल्कसराड** नें ठरविलें! **झुलुलन्ड** प्रमाणेंच येथल्याही ( ट्रॅन्सव्हाल मधील ) 'खाणींच्या कायद्या' नें, हिंदी लोकांजवळ तेथल्या खाणींत उत्पन्न होणारें सोनें सांपडणें गुन्हा ठरविला आहे. **नेटल** प्रमाणेंच **ट्रॅन्सव्हालां**तही कोणा हिंदी माणसास परवान्यावांचून रात्री ९ च्या पुढें घराबाहेर पडतां येत नाहीं. **केपकॉलनी** प्रमाणें येथेंही हिंदी लोकांस हम रस्त्याजवळील वाटांवर चालू न देण्याविषयीं, **प्रिटोरियाच्या** पोलिसांस ताकीद असते.

**ऑरेंज फ्रीस्टेट** हें अगदीं पृथक व स्वसत्ताक संस्थान असून, तेथें **डच** लोकांचेंच मुख्यतः वर्चस्व आहे. तेथल्या कायद्यांनीं तर हिंदी लोकांचा त्या कॉलनींत प्रवेश होणें बहुतेक अशक्य झालें आहे. इ. स. १८९० च्या कायद्याचा २३ वा ह्मणून एक पोट कायदा असून, 'आशियांतील काळ्या अदमींच्या गर्दीचा प्रतिकार करण्याविषयीं कायदा' असें त्याचें नांव आहे.

त्यांत कोणाही हिंदी माणसास, तेथील **प्रेसिडेन्टाची**

खास परवानगी आणल्याशिवाय, दोन महिन्यांवर कॉलनींत रहाण्याची मनाई केली आहे. परंतु परवानगीच्या अर्जास निदान एक महिना होऊन गेल्याखेरीज, **प्रेसिडेन्ट** याचा विचार करणार नाहीं, असेंही दुसरें एक कलम आहे. त्याचप्रमाणें, स्थावर मिळकत संपादण्याची किंवा शेतकी, व्यापार, उदीम, वगैरे करण्याचीही त्यांस मनाई आहे. या अटी मोडणारांस २५ पौंड दंडाची अथवा ३ महिन्यांच्या कैदेची शिक्षा ठरविली आहे. या सर्व हाल अपेष्टांखेरीज, दर हिंदी माणसावर दहा पौंडांचा वार्षिक करही आहे! इ. स. १८९० त **फ्रीस्टेट**मध्यें तीन हिंदी व्यापाऱ्यांच्या वखारी होत्या; परंतु नुकसान वगैरे भरून न देतां, एक वर्षाची नोटीस देऊन, **फ्रीस्टेट सरकारानें** त्या तिन्हीही वखारी खालीं करावयास लाविल्या! वखारींच्या लिलांवाचें उत्पन्न सुमारें ९००० पौंड ( १३५००० रु. ) झालें! बिचाऱ्या हिंदी व्यापाऱ्यांनीं दाद घेण्याविषयीं ब्रिटिश सरकारास अर्ज केला; परंतु त्याचा कांहीं देखील उपयोग झाला नाहीं. अशा तऱ्हेच्या कडक नियमांमुळें, त्या कॉलनींत फक्त चाकर नोकराच्या दर्जाचेच हिंदी लोक आढळतात.

**दक्षिण आफ्रिकेंतील डेलागोआबे** वगैरे पोर्तुगीज लोकांच्या प्रदेशांत हिंदी लोकांना किती सन्मानानें वागविण्यांत येतें हें पाहिलें ह्मणजे, वरील कॉलनींत असणाऱ्या राणीसरकारच्याच हिंदीप्रजेस मिळणाऱ्या पक्षपाती व नीच तऱ्हेच्या वागणुकीचें जास्त सखेदाश्चर्य वाटतें. **डेलागोआबे**मध्यें हिंदी लोकांस कोणत्याच तऱ्हेची ( मनाई ) नाहीं. त्यामुळें हमरस्त्यावरील जमीनजुमल्याचा अर्धा अधिकभाग हिंदी लोकांच्या मालकीचा आहे. व्यापारासंबंधानेंही हिंदीलोकांस पूर्ण मुभा असून,

कित्येक जण पोर्तुगीज सरकारच्या नोकरींतही आहेत. इतकेंच नव्हे, तर, पोर्तुगीज अधिकारी हिंदी लोकांस इतका मान देतात कीं, एखाद्या हिंदी माणसानें तिसऱ्या वर्गाचें तिकिट घेतलें आणि त्यास वरच्या प्रतीचें तिकिट घेण्याची ऐपत नाहीं असें दिसून आलें, तर प्रसंग विशेषीं त्यास दुसऱ्या वर्गाच्याही डब्यांतून प्रवास करण्यास परवानगी देतात.

हिंदुस्थानवासीयांस जे हक्क अधिकार आपल्या देशांत व इतर परकीय देशांतही पूर्णपणें उपभोगावयास सांपडतात, त्याच हक्कांना, दक्षिण आफ्रिकेंतील एखाद्या ब्रिटिश कॉलनींत पाऊल ठेविल्याबरोबर त्याला मुकावें लागतें!—इतकेंच नव्हे, तर त्या कॉलनीला लागून असणाऱ्या इतर युरोपीयन राष्ट्रांच्या कॉलनींनीही देखील त्याला विशेष आदरानें व सन्मानानें वागवावें —हें खरोखरच फार विलक्षण व उद्वेगजनक दिसतें! याविषयीं **कलकत्त्यास** भरलेल्या **राष्ट्रीयसभेंत** मी केलेल्या भाषणांतील एक उतारा येथें दाखल करण्याची वाचकांची परवानगी घेतों:—

"पहा, आपली किती विलक्षण व चमत्कारिक (आणि शोचनीयही) स्थिति आहे ती! इकडे हिंदुस्थानांत वरिष्ठ सरकारच्या कायदे कौन्सिलचे सभासद होण्याची आह्मांस मुभा आहे. खुद्द इंग्लंडांतील अत्यंत श्रेष्ठ व गंभीर प्रतिनिधी सभेचीं—हाऊस ऑफ कामन्सचीं द्वारें आह्मांस खुलीं आहेत; पण दक्षिणआफ्रिकेंत!—आह्मांला परवान्यावाचून प्रवास करितां येत नाहीं! रात्रीं बाहेर फिरण्याची आह्मांस चोरी! शहरच्या एखाद्या खबदाडांत आह्मांस दडपून टाकतात! आगगाडींत पहिल्या, दुसऱ्या वर्गांत अह्मांस मज्जाव! ट्रॅममधून आह्मांस खेंचून बाहेर काढतात! रस्त्याच्या बाजूवरील पाऊल वाटांवरून आह्मांला धक्के मारून उतरवितात! सार्वजनिक स्नानगृहांचा आह्मांस उपभोग घेऊं देत नाहींत! आमच्यावर थुंकतात—शिव्यांचा भडीमार करितात—कस्पटासमान लेखतात—आणि कोणताही माणूस शांतपणें

सहन करणार नाहीं, अशा अनेक तऱ्हेच्या हाल अपेष्टा आह्मांस निमुटपणें भोगावयास लागतात– ! ! ! ''

वरील भयंकर अन्यायाच्या स्थितीचा कांहीं तरी जाब मिळणें अवश्य आहे. कॉलनीवाले ह्मणतात कीं, वरील तऱ्हेची ( हिंदीलोकांस करण्यांत येणारी बंदी ) मनाई आरोग्य रक्षणार्थ अवश्य आहे. हिंदी लोकांची रहाण्याची पद्धत फार घाणेरडी असते, ते स्वतःच अतिशय घाणट व गचाळ असतात, आणि त्यांची वागणूकही खोडसाळ आणि अनीतिची असते, असें त्यांचें ह्मणणें आहे. परंतु खऱ्या विचाराअंतीं, हे आक्षेप सर्वथैव निराधार, कुत्सित व मत्सर बुद्धीचे आहेत, असें कळून येईल. हिंदीलोक त्यांच्या गौरकाय शेजाऱ्याइतके स्वच्छ असतात, असा अनेक युरोपियन डॉक्टरांनीं आपला स्पष्ट अभिप्राय दिला आहे. त्यांची नीतिही, युरोपांतील त्यांच्याबरोबरीच्या व कोणत्याही वर्गांतील लोकांच्या नीतीपेक्षां खात्रीनें कमी दर्जाची नाहीं. परंतु या सगळ्या जातिमत्सराचें, व एकतर्फी गैरशिस्त कायदे करण्याचें खरें कारण निराळेंच आहे. हिंदीलोकांची रहाणी साधी व काटकसरी असल्यामुळें, आणि ते स्वभावानें मेहनती, उद्योगी व सोशिक असल्यामुळें, व्यापारांत, युरोपियन व्यापारांस ते सहज मागें टाकतात. विशेषतः, ब्रिटिश कॉलन्यांपैकीं ज्या कॉलनींत, निरनिराळ्या धंद्यासंबंधानें युरोपियन व्यापाऱ्यांशीं हिंदी व्यापाऱ्यांची अगदीं निकट स्पर्धा होण्याचा संभव असतो, व जेथें त्यांची संख्या युरोपियन वसाहतवाल्यांपेक्षां अधिक असते, अशा कॉलनींतच हिंदी लोकांचा छळ सर्वांत अधिक होतो, हीं गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे; व हेंच, आमच्या वरील विधानाच्या सत्यतेचें उत्तम प्रमाण आहे. उदाहरणार्थ, केपकॉलनींत

हिंदी लोक फार झाले तर १०,००० असतील, पण गोऱ्या लोकांची वसती ४ लक्ष आहे. परंतु, **नेटल**मध्यें हिंदी लोकांचीच संख्या गोऱ्यांपेक्षां किंचित् जास्त आहे. ह्मणजे हिंदी लोक ६१,००० असून, गोऱ्या वसाहतवाल्यांची संख्या ६०,००० आहे. त्यामुळें, केपकॉलनींतल्या पेक्षां, नेटल मधील हिंदी लोकांना अधिक जाच जुलूम सोसावा लागतो. **हाय कमिशनरास** पाठविलेल्या खलित्यांत **मि० चेंबर्लेन** यांनीं जें ह्मटलें आहे कीं, मूळ रहिवाशांच्याच हिताच्या दृष्टीनें पाहिलें तरी, व्यापारी स्पर्धेस आपण उत्तेजन देत आहों असा संशय घेण्यास देखील जागा राहूं देऊं नये, अशाविषयीं **ट्रॅन्सव्हाल** सरकारनें तजवीज करणें हेंच त्यांचें कर्तव्य आहे; तें सर्वथैव खरें आहे. हा व्यापारी मत्सर हिंदी लोकांविरुद्ध आहे असें सांगतांना, 'जे लोक, शांतताप्रिय, पूर्ण आज्ञाधारक असून, ज्यांच्या ठिकाणीं निःसंशय बुद्धिमत्ता व उद्योगप्रियता आणि आश्रांत दीर्घोद्योगिता वास करीत आहे,' असें त्यांनीं हिंदी लोकांचें मोठ्या गौरवानें वर्णन केलें आहे. पण गौरव करण्यापलीकडे **मि० चेंबर्लेन** यांनीं त्या बाबतींत हिंदी लोकांस योग्य न्याय मिळण्याविषयीं कांहीं केलें नाहीं ही मोठी शोचनीय गोष्ट आहे. **मि० चेंबर्लेन** यांनीं **ट्रॅन्सव्हाल** विषयीं जें ह्मटलें आहे, तें **दक्षिण आफ्रिकेंतील** इतर कॉलन्यांसंबंधानें ही अक्षरशः लागूं पडतें.

ब्रिटिश इंडियन हे केवळ हिंदुस्थानचे रहिवाशी नसून, 'ज्याच्यावर सूर्य कधींही अस्तमित होत नाहीं' अशा वैभवशाली **ब्रिटिश साम्राज्यांतील** प्रजा किंवा त्याचे घटक या नात्यानें त्यांची योग्यता मोठी आहे, असें त्यांच्या मनांत बिंबावण्याचा कित्येक थोरमनाच्या इंग्रज लोकांचा नेहमीं

प्रयत्न असतो. परंतु; एखाद्या ब्रिटिश कॉलनींत पाऊल ठेविलें न ठेविलें तोंच सर्व हक्क हिसकावून घेण्यांत येऊन, आपल्या 'ब्रिटिश प्रजा' या पदवीला त्यांना जोंपर्यंत मुकावें लागत आहे तोंपर्यंत, त्यांना आपण **ब्रिटिश साम्राज्याचे** घटक आहोंत ही गोष्ट खरी वाटावी कशी. किंवा वाटली तर, त्यांना त्याबद्दल अभिमान तरी कसा वाटावा? केवळ शाब्दिक अभिवचनापुरतें पाहिलें तर, ९८ च्या सर्व श्रुत जाहीरनाम्यानें राणीसरकार व त्यांच्या मंत्रिमंडळानें आह्मां हिंदुस्थानवासीयांवर मोठा प्रसाद करून ठेविला आहे. त्यांत राणीसरकार ह्मणतात:— "इतर प्रजाजनांशीं आह्मी ज्या कर्तव्यबंधनांनीं बद्ध आहों, त्याच कर्तव्यबंधनांनीं हिंदुस्थानवासीयांशीं आह्मी निगडित झालों आहों; आणि सर्वशक्तिमान् परमेश्वराच्या कृपाप्रसादानें, आह्मीं तीं कर्तव्यें इमानानें व सद्विचारपूर्वक बजावूं." हिंदुस्थानचे लोकप्रिय व्हाइसराय **लॉर्ड रिपन** यांनींही एकदां असें ह्मटलें होतें कीं, "राणीसरकारची अशी इच्छा आहे, त्यांच्या हिंदुस्थानवासी प्रजाजनांस त्यांच्या इतर प्रजाजनांच्याच बरोबरीनें वागविण्यांत यावें." **दक्षिण आफ्रिकेंतील** हिंदी लोकांना जें वाईट रीतीनें वागविण्यांत येतें त्याविरुद्ध दाद लावण्याकरितां, कांहीं हिंदी लोकांचे प्रतिनिधि मि. चेंबर्लेन यांस भेटावयास गेले होते. त्यावेळीं त्यांनीं हिंदी प्रतिनिधींस असें सांगितलें: "सर्व ब्रिटिश प्रजाजनांना सारखें वागविण्यांत यावें व त्यांना सारखेच हक्क अधिकार असावेत, अशी आह्मां सर्वांची इच्छा आहे." अर्थात, राणीसाहेबांनीं किंवा त्यांच्या मंत्रिजनांनीं उद्गारून दाखविलेल्या सदिच्छेविषयीं कोणासही शंका नाहीं. परंतु, ती सदिच्छा अमलांत असलेली दिसत

नाहीं, ही गोष्ट मात्र ढळढळीत व प्रत्यक्ष अनुभवास येणारी आहे, हल्लीं सारख्या, सुधारणेच्या व प्रगतीच्या, स्वातंत्र्याच्या व सहिष्णुत्वाच्या काळांत, दक्षिण आफ्रिकेंतील स्वसत्ताक किंवा राजशासित सर्व ब्रिटिश कॉलन्यांत, आणि जेथें ह्मणून राणीसरकारची अंशतः किंवा नामधारी सत्ता आहे अशा सर्व प्रदेशांत, तिची प्रिय हिंदी प्रजा, कीं जिला आपल्या देशांत हक्क अधिकारासंबंधानें इंग्रज लोकांशीं बरोबरी करावयास सांपडते, व खुद्द इंग्लंडांत देखील ज्यांतील कित्येकांचा, लोकांसाठीं कायदे करणाऱ्या सभेंत प्रवेश होतो—अशा हिंदी प्रजेला, तेथें अमल बजावणाऱ्या शिरजोर गोऱ्या लोकांचे काबाडकष्ट करण्याच्या लायकी समजून, त्यांना अगदीं नीच दर्जाच्या लोकांप्रमाणें वागविण्यांत यावें; ही गोष्ट वैभवशाली ब्रिटिश साम्राज्याच्या उज्वल कीर्तीस खरोखर फार लांछनास्पद आहे. *

---

* सदरहू लेख लिहिण्यांत आला त्यावेळच्या व हल्लींच्या काळांत जमीन-अस्मानाचा फरक झाला आहे, हें वाचकांस सांगणें नकोच. तथापि, हिंदी लोकांच्या अनास्थेविषयीं व छलाविषयीं वरील गोष्टी अजूनही अक्षरशः प्रत्ययास येणाऱ्या आहेत. कॉलनी ( मुख्यतः ट्रॅन्सव्हाल व नेटल ) स्वसत्ताक असल्यामुळें, हिंदी लोकांच्या तर्फें, त्यांस 'मित्रत्वाच्या सूचने' पेक्षां आपल्यास त्या बाबतींत अधिक कांहीं करितां येत नाहीं, अशी **मि॰ चेंबर्लेन** यांची आजपर्यंतची सबब होती. परंतु ब्रिटिश साम्राज्याच्या पुण्याईनें ती स्थिति आतां नाहींशी झाली आहे. तेव्हां 'सर्व ब्रिटिश प्रजाजनांना सारखे वागविण्यांत यावें, व त्यांना सारखेच अधिकारहक्क असावेत अशी आह्मां सर्वांची इच्छा आहे' ही **मि॰ चेंबर्लेन** यांनीं उद्गारून दाख-

विलेली इच्छा, जर मनःपूर्वक असेल (आणि ती असेल याबद्दल आह्मांस शंका नाहीं. ) तर नवीन अमदानींत तरी बिचाऱ्या हिंदी लोकांची हल्लींची दैना व ग्रहदशा दूर करून, त्यांना समतेच्या नात्यानें वागविण्याची व्यवस्था ते अवश्य करतील अशी आशा आहे. तसें कांहीं न झाल्यास, ही 'सदिच्छा' केवळ मायावी व ओंठा पुरती आहे, अशी तेथल्या जुलमानें गांजून गेलेल्या दुर्दैवी हिंदी लोकांची समजूत झाल्यास, त्यांत कांहीं नवल नाहीं.

भा. कृ.

# आमच्या ऑफिसांत विक्रीस तयार असलेलीं पुस्तकें.

| मंडळीचीं पुस्तकें. | किंमत रु. | टपाल आणे |
|---|---|---|
| १ पानपतची मोहिम (ले. नागेश वि. बापट)... | ३॥ | ०५ |
| २ अर्थशास्त्र (ले. वि. ल. कवठेकर) ... ... | १॥ | ०२ |
| ३ विषवृक्ष (ले. वि. सि. देव) ... ... | १। | ०२ |
| ४ हिंदुस्थानचा अर्वाचीन इ० मुसलमानी रियासत. | २॥ | ०५ |
| सदर साध्या पुठ्याचें (ले. गो. स. सरदेसाई) | १॥। | ०५ |
| ५ देवीसत्यभामा (ले. शं. वि. पुराणीक) ... | १॥ | ०२ |
| सदर साधापुठ्ठा ... ... ... | १। | ०२ |
| ६ वीरमती (ले. दा. सा. यंदे) ... ... | -॥। | ०२ |
| ७ सती राणकदेवी (ले. वि. धों. कर्वे) ... | १ | ०१ |
| ८ वांईकर भटजी (ले. धनुर्धारी) ... ... | १ | ०१ |
| सदर साधापुठ्ठा ... ... ... | -॥। | ०१ |
| ९ दुर्गेशनंदिनी—कापडीपुठ्ठा (ले. शि. गो. फाळके) | १॥ | ०२ |
| १० सद्वाक्य कथासंग्रह (ले. दा. गो. चिपळोणकर) | -॥। | ०१ |
| ११ वक्तृत्वकला (ले. ल. त्र्यं. पारनाईक) .... | १ | ०२ |
| १२ माझिनी (ले. ल. गो. घाणेकर) ... ... | १ | ०२ |
| १३ आरोग्यशास्त्र (डा. कृ. वि. धुरंधर) ... | १। | ०२ |
| १४ प्याद्याचा फर्जी अथवा भोंसले घराण्याचा अभ्युदय | १ | ०१ |
| सदर साधापुठ्ठा ... ... ... | ॥। | ०१ |
| १५ परमार्थज्ञानमाला १ ला. (कर्मयोग, भक्तियोग व राजयोग स्वामि विवेकानंदाच्या चरित्रासह.) | १॥ | ०२ |
| १६ श्री. जमनाबाई महाराणी गायकवाड ... | १ | ०१ |
| १७ **कृषिकर्मविद्या** (रा.सा.रामचंद्र आबाजी राजेकृत) | ४ | ०८ |
| १८ ग्यारीबाल्डि (ले. न. चिं. केळकर) ... | १। | ०= |
| १९ हिंदुस्थानची राजनीति (ले. गुर्जर व चांफेकर) | १॥ | ०= |

| इतर पुस्तकें. | किं. रु. | ट. आणे. |
|---|---|---|
| वनस्पतींचा संसार ( डा. अ. ना. सांबारे. ) ... | ·।· | ०।- |
| रामायण कालीन लोकस्थिति (रा. ब. वि मो. महाजनी). | ।≈ | ०॥- |
| पाण्याचा आरोग्यशास्त्रदृष्ट्या विचार (डा. गो. रा. तांबे). | ·।· | ०॥- |
| घरांत खेळण्याचे खेळ... ... ... ... ... | ·।· | ०॥- |
| कुल स्त्रियांकरितां गाणीं ... ... ... ... | ·।· | ०॥- |
| बकुल पुष्पमाला ... ... ... ... ... | ०= | ०॥- |
| साळू ... ... ... ... ... ... ... | ०≡ | ०॥- |
| आरोग्यशास्त्राचीं मूलतत्वें ... .. ... ... | ०- | ०॥- |
| श्रीमद्भगवतद्गीता सार ... ... ... ... | ०- | ०॥- |
| **भारतचंपू**-मूळासह सटीक... ... ... ... | २॥ | ०३ |
| **देव मामलेदार यांचें चरित्र** ... ... ... | १ | ०२ |
| **टर्की व रशिया वॉरचा इतिहास** ... ... | १। | ०२ |
| **मेघदूत काव्य** सार्थ व सटीक ... ... ... | २॥ | ०३ |
| संगीत शापसंभ्रम नाटक ... ... ... ... | १ | ०१ |
| संगीत मृच्छकटिक नाटक ... ... ... ... | -॥।- | ०१ |
| संगीत रामराज्यवियोग नाटक ... ... ... | १ | ०१ |
| संगीत वीरतनय नाटक ... ... ... ... | १ | ०१ |
| संगीत मूकनायक नाटक ... ... ... ... | १ | ०१ |
| संगीत संशयसंभ्रम नाटक ... ... ... ... | १ | ०१ |
| संगीत मेघदूत नाटक ... ... ... ... | १ | ०१ |
| संगति देवयानी नाटक ... ... ... ... | १॥ | ०१ |
| मुक्तामाला ( कादंबरी ) ... ... ... ... | १०= | ०२ |
| माझें प्रियपुस्तक अथवा व्यवहारदर्पण ... ... | १ | ०२ |
| विलासिनी ( कादंबरी ) ... ... ... ... | १॥ | ०३ |
| शेंवटचा शूरवाघेर ... ... ... ... ... | १॥ | ०३ |
| वेदोक्त मानव धर्मसार ... ... ... ... | १॥= | ०३ |
| आत्मविचार ... ... ... ... ... ... | १॥ | ०२ |
| माधवी कंकण ... ... ... ... ... | १॥ | ०२ |
| आनंदाश्रम ... ... ... ... ... ... | १। | ०२ |

# स्वस्तपणाची कमालच.

———:o:———

आह्मी पुष्कळ लिहून स्तुती करण्यापेक्षां एकवेळ आपली खात्री करून घ्या.

पूर्वी जीं घड्याळें आह्मी रु. ६ व रु. १० स विकत होतों तीं अति उत्तम व टिकाऊ असल्याकारणानें खप पुष्कळ होऊन लोकमान्य झालीं आहेत तीं सर्वांना घेतां यावीं ह्मणून त्याच घड्याळांच्या किंमती कमी केल्या आहेत. **रासकोप** साईज वॉच **फुल-ज्युएलस** किं. रु. ९; ग्या. वर्षे ८ **सिलेंडर** वॉच किं. रु. ५; ग्या. व. ४ शिवाय सोबत काच, कमान व पेटी.

**एन. बी. रानडे नासिक सिटी,**
**वाचमेकर, सेलर व कमिशन एजंट.**